# श्रीमाणिकप्रभु
## चरित्र



लेखकः
गणेश रघुनाथ कुलकर्णी, तासगांव.

प्रकाशकः
अप्पासाहेब देशपांडे, बी. ए. ( ऑनर्स ),
एल्‌एल्. बी.
श्रीसंस्थान माणिकप्रभु
माणिकनगर



श्रीमाणिक शक
१२० १९३७




॥ श्री ॥

# अथ समर्पणम्



उमाल्हादकरो देवः श्रीसांबकुलभूषणः ।
गणेशः पातु नः सर्वान् सर्वकार्यार्थसिद्धिदः ॥

श्रीमत्सद्गुरुमाणिकप्रभुपदे लग्नैकचित्तश्रयो ॥
भास्वत् ज्ञानकलां तनोति रुचिरां भक्तान्समुद्धारयन् ॥
वात्सल्येन स वाङ्मयीं गुणमयीं स्वीकृत्यसेवामिमाम् ॥
मार्तंडप्रभुरेव शंकरगुरुः कुर्यान्मुदा मंगलम् ॥ १ ॥

श्रीकरकंजपूतो गणेशः

॥ श्रीगुरुमार्तंड माणिक ॥

# माझें पहिलें प्रकाशन

" यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं त्वाराधनं ते प्रभो "

संपूर्ण नसलें तरी साधारण पूर्ण अशा प्रभुचरित्राची उणीव बऱ्याच दिवसांपासून भासत होती. यापूर्वी दोन तीन चरित्रें प्रसिद्ध झालीं, पण तीं सर्व लेखकांकडून स्वतंत्रपणें प्रसिद्ध झालीं आहेत. श्रीप्रभुचरित्राची वाचकांची तहान इतकी तीव्र होती कीं, या लहान विहिरी कधींच आटून गेल्या, व बराच मोठा वाचकवर्ग तृषित राहून गेला. लेखकांना दुसरी आवृत्ति काढणें शक्य झालें नाहीं. हे ग्रंथ अपुरे असल्यामुळें संस्थाननें संपूर्ण अधिकृत चरित्र स्वतःच प्रसिद्ध करण्याचें ठरविलें व योग्य कालाची वाट पाहण्यांत आतांपर्यंत दिवस काढावे लागले. प्रभुचरित्रविषयक आतांपर्यंत जें वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे, त्याचा संक्षिप्त आढावा लेखकांनीं आपल्या प्रस्तावनेंत घेतला असल्यामुळें, मला त्यासंबंधीं आतां विशेष कांहीं सांगण्यासारखें राहिलेंच नाहीं.

माझे मातुल श्रीगुरु बाबासाहेब महाराज यांच्या इच्छेनुरूप विद्यमान श्रीशंकर माणिकप्रभु महाराजांनीं आपल्या पूर्वाश्रमांत शके १८५० सालीं प्रस्तुतचें चरित्र श्री. गणपतरावजी मास्तरसाहेबांकडून लिहून घेतलें व मध्यंतरीं कांहीं अडचणी उपस्थित झाल्यावरून मागल्या वर्षी त्यांनीं तें छापावयास दिलें. पण या प्रकाशन-प्रभुसेवेचा योग माझा होता.

कोठल्याही वस्तूचा आपण विचार करूं लागलों तर तत्त्व (Theory) आणि तपशील (Practice) हीं दोन अंगें आढळून येतातच. व्यक्ति व संस्था देखील या नियमास अपवाद असूं शकत नाहींत. मात्र या दोन अंगांचा भिन्न क्षेत्रांत विचार आणि आचार, परमार्थ आणि व्यवहार, तात्त्विक आणि भौतिक अशा भिन्न भिन्न नांवांनीं उल्लेख केलेला आढळून येतो. या १९३६ सालीं वेंचक रत्नें उचलण्यांत विक्रम स्थापण्याचें कालानें ठरविलें आहे कीं काय, समजत नाहीं ! गुरुवार

ता. १२ मार्च रोजीं माझे मातामह श्री सद्गुरु मार्तंड माणिकप्रभु महाराज स्वस्वरूपीं लीन झाले. या वज्राघातानें संस्थानची जी हानि झाली, ती अवर्णनीय आहे व तिचा विस्तार या स्थलीं अप्रस्तुत होईल. आतांपर्यंत संस्थानचा व्यवहार पाहत असलेले श्री. शंकरराव संस्थानची पारमार्थिक धुरा वाहण्यास पुढें झाले. व्यवहार अर्थातच मजकडे आला. आतांपर्यंत तरी श्रीजींनीं या दोन वाहकांकडून संस्थानचा रथ व्यवस्थितपणें नेला आहे. प्रकाशन-योगायोगाची एवढी हकीकत पुरेशी वाटते.

व्यक्ति जेवढी अद्वितीय, तितकेंच कुतूहलही जबर. कुतूहल हा एक मानवी स्वभावधर्म आहे. थोर पुरुषांचीं चरित्रें कां वाचावींत, हा प्रश्न आतां फार जुना झाला आहे. जेवण कां करावें, पाणी कां प्यावें, असा प्रश्न कोणीही करीत नाहीं. कारण यांपासून शरीरांत शक्ति येते, उत्साह वाढतो व कार्य करण्यास जोम येतो हें सर्वांनाच ठाऊक आहे. तसेंच थोर पुरुषांचीं चरित्रें म्हणजे उत्साहाचे व स्फूर्तीचे अखंड झरे. यांतील आकंठ उदकपानानें मनुष्य अधिक कार्यक्षम बनेल यांत आश्चर्य तें काय ? अवतार व त्यासंबंधींची पौराणिक मीमांसा, आजकालच्या बुद्धिस्वातंत्र्य ( Rationalistic ) युगांत नीरस व भाकडकथा वाटत असली, तरी कोठल्याही कालांतील पुरुष, त्या कालांतील विशिष्ट गरजा भागविण्याकडे आपलें बुद्धिसर्वस्व वेंचीत असलेले दिसतात, हें तत्त्व आजदेखील सर्वमान्य आहे. शास्त्रीय शोधक मानवी सुखाची पराकाष्ठा गांठण्यांत गुंतलेले दिसतात. राजकारणी पुरुष आजकाल प्रत्यहीं वाढणाऱ्या अवास्तव विस्ताराच्या आसुरी आकांक्षेला कसा पायबंद घालतां येईल या विचारांत गढलेले दिसतात. समाजशास्त्रवेत्ते समाजांत माजलेल्या तीव्र असंतोषाचें मूळ हुडकण्यामागें लागलेले दिसतात. धर्माचेंही असेंच. धर्म, त्याचें स्वरूप, त्याची आवश्यकता वा अनावश्यकता, याची चर्चा आजकाल सर्वत्र जोरजोरानें चालू आहे. तोच सूर येथें ओढण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. मात्र इतकी एक गोष्ट उघड दिसते कीं, संस्कारक्षम मानवी मनावर इतर कुठल्याही संस्कारापेक्षां, धार्मिक संस्काराची पकड अधिक

जोराची वसत असल्याचें दिसतें. निदान आतांपर्यंत तरी ती तशी वसली आहे हें, इतिहासाकडे स्थूल दृष्टिक्षेप टाकला तरी दिसून येण्यासारखें आहे.

श्रीप्रभु चतुर्थ दत्तावतार मानले जातात. प्रभुसांप्रदायिक दत्तात्रेयांना कोणत्या स्वरूपांत मानतात, याची सविस्तर चर्चा, श्रीमार्तंडमाणिक्प्रभु महाराजांनीं आपल्या "ज्ञानमार्तंड" ग्रंथांत केली आहे. त्याकरितां व प्रभुसंप्रदायाचें रहस्य समजून घेण्याकरितां, जिज्ञासूंनीं तो ग्रंथ अवश्य अभ्यासावा. अवधूताची निःसंग स्थिति सर्वप्रसिद्धच आहे. निस्संग राहून सर्व वस्तूंतील सार—मधु ग्रहण करण्याची अवधूतांची शिकवण आहे. मधु ग्रहण करणें असेल,तर मधुर मन हवें. मनांत माधुर्य, प्रेमाचा लेशही नसेल, तर मधु कोठें आणि कसा आढळणार ? प्रभुसंप्रदायांत प्रेमाची शिकवण कशी आहे, हें नुकतेंच उल्लेखिलेल्या "ज्ञानमार्तंड" व इतर सांप्रदायिक ग्रंथांत सविस्तरपणें सांगितलें आहेच. प्रेमळ वाचकांकरितां, प्रभुसंप्रदायाचें सार ज्यांत उत्कृष्टपणें सांगितलें आहे, अशी श्रीमार्तंड माणिकप्रभूंनीं रचिलेल्या उपदेशरत्नमालेंतील तेवढी एक ओवी येथें उद्धृत करतों—

मतमतांतरीं अनुचित जें जें । निरसोनि सुखसाम्राज्य भोगिजे ।
तरी काया वाचा मनें सेविजे । सकलमतीं ईश जो ॥ १ ॥

या प्रेमळ मनानें सारग्रहण करण्याच्या तत्त्वावर, श्रीप्रभूंनीं आपला सकलमतसंप्रदाय स्थापला व स्वतःचें 'सकलमताचार्य' हें ब्रीद कसें सार्थ करून दाखविलें, हें या चरित्रवाचकांना आपोआपच कळून येईल. धार्मिक तंटे आजकाल किती विकोपाला गेले आहेत हें येथें स्पष्ट करून सांगण्याचें कारण नाहीं. मतमतांतील गलबल्याचा आवाज किति वर चढला आहे हें सर्वांनाच माहीत आहे. या आगामी संकटाची सूचना देण्याकरितां प्रभूंचा अवतार झाला. नुसतें सूचना देण्यापुरतेंच एकांगी प्रभूचें अवतार-कार्य नसून, त्यांनीं त्यांतून मार्गही दाखविला आहे. पुढें येणाऱ्या वादळां-तून बचाव करून घेतां यावा म्हणून सकलमत संप्रदायाचें 'दीपग्रह' त्यांनीं उभारिलें. या दीपग्रहाचा उपयोग करून न घेतां तारूं जर खडकावर आदळलें, तर तो दोष कोणाचा ? अर्थात् कर्णधारांचा, अथवा

अशा मूर्ख कर्णधारांच्या नेतृत्वाखालीं ज्यांनीं प्रवास आरंभिला त्या उतारूंचा असेंही पण म्हणतां येईल. जनता किंवा तिचे नेते श्रीप्रभूंच्या सकलमतसंप्रदायाकडे जरा दृष्टिक्षेप करतील काय ?

प्रभुचरित्राच्या प्रकाशन-सेवेचें मोठें भाग्य मला लाभलें आहे खरें. पण हें भाग्य जितकें मोठें तितकें त्याचे वांटेकरीही अनंत आहेत. पुस्तकाची छपाई सुबक करून देऊन, छपाईसंबंधीं सवलती दिल्याबद्दल श्री लक्ष्मीनारायण प्रेसचे श्रीयुत तटणीस व इतर अधिकारी यांचा मी फार आभारी आहें. याखेरीज या प्रकाशनकार्यास किती तरी व्यक्तींनीं सहाय्य केलें आहे, त्या सर्वांचा आभारपूर्वक उल्लेख न करणें व्यवहार दृष्टीनें (मी मुद्दाम हा शब्द वापरीत आहें) कृतघ्नपणाचें ठरेल. प्रभुसेवा म्हणून या सर्व गृहस्थांनीं मला निरपेक्ष सहाय्य दिलें, या त्यांच्या हार्दिक सेवेचा शाब्दिक गौरव करून, या व्यक्तींपासून प्रभुसेवेचें त्यांना लाभणारें पुण्य हिरावून घेण्याचें पाप मी तरी कशाला करूं ?

सकलमतस्थापक प्रभूंचें चरित्र इंग्रजी, हिंदी, ऊर्दू, गुजराती, कानडी, तेलगू आदि सर्व भाषांतून प्रसिद्ध झालें पाहिजे व तसें करण्याचा माझा संकल्प आहे.

अशी सत्य जी पूर्णभक्तप्रतिज्ञा
खरी तीच हो श्रीप्रभूमुख्य आज्ञा ॥

हा डंका ज्या प्रभूनें गाजवला, त्याला माझा हा संकल्प पाहून काय वाटेल ? हेन्री फोर्डच्या मुलानें आपल्या पित्याजवळ मोटरीचा हट्ट घेतला, तर त्याला काय बरें वाटेल ?

वरील कैफियत आज रविवार विजयादशमी (१८५८) रोजीं लिहून झाली असली, तरी, या कैफियतीस कारणीभूत झालेल्या दिवसाची स्मृति अजून तशीच आहे म्हणून तोच दिवस खालीं दिला आहे.

श्री संस्थान माणिकनगर
गुरुवार, फा. कृ. ४
मा. श. ११९

अप्पासाहेब देशपांडे

॥ श्रीगुरुमाणिकप्रभुप्रसन्न ॥

# प्रस्तावना

श्रीमाणिकप्रभु महाराजांचें साग्र चरित्र आपल्या हातून लिहिलें जावें अशी पुष्कळ वर्षें उरीं बाळगलेली आकांक्षा आज सफल झाली आहे, हें पाहून मनास अत्यंत धन्यता वाटत आहे. श्रीसंस्थानशीं माझा निकट संबंध फारां दिवसांचा आहे. सन १८९९ सालच्या प्रारंभीं श्रीमाणिकनगरांत आल्यावर श्रीप्रभुसमाधिदर्शन प्रथम झालें, तेव्हांपासून प्रभुचरित्राचें श्रवण, मनन व निदिध्यास हीं लागून राहिलीं होतीं. प्रभुचरित्र हें अत्यंत विशाल, एखाद्या प्रचंड महासागराप्रमाणें पसरलेलें, तें माझ्या आटोक्यांत कसें यावें ही विवंचना रात्रंदिवस होतीच. तथापि अनुकूल संधि मिळाल्यास सर्व अडचणी दूर होतील, हा दृढ भरंवसा होता म्हणून तसा योग केव्हां जमून येईल याची वाट पाहत होतों.

सन १८९९ पासून १९०५ अखेरपर्यंत माझें वास्तव्य श्रीमाणिकनगरांत एकसारखें असल्यामुळें, तेवढ्या काळांत तत्कालीन वृद्ध लोकांच्या तोंडून ऐकिलेल्या गोष्टी, प्रसिद्ध झालेलीं कित्येक पुस्तकें, पोथ्या व कांहीं हस्तलिखित भाग यांचा परिश्रमपूर्वक अभ्यास करण्यास मला उत्तम संधि मिळाली. त्या संधीचा योग्य फायदा घेऊन मीं बराच संग्रह करून ठेविला होता. प्रथम प्रभुचरित्र हें जिज्ञासातृप्तीकरितां अभ्यासास घेतलें. नंतर चरित्रकथेंतील कांहीं महत्त्वाच्या भागाचें प्रत्यंतर दिसून आल्यानंतर जिज्ञासेचें रूपांतर श्रद्धेमध्यें होऊन त्यापुढें प्रेमानें सर्वोवर विजय मिळवून तें दृढमूल झालें आहे. सारांश, आज जें हें प्रभुचरित्र आपल्यापुढें दिसत आहे, त्यांत माझ्या अंतःकरणांत वसत असलेलें प्रेमच आपल्यास उत्कटतेनें दिसून येणारें आहे.

श्रीमार्तांड माणिकप्रभु महाराजांचे उभयता चिरंजीव श्री. बाबासाहेब व भाऊसाहेब महाराज यांना इंग्रजी, संस्कृत, मराठी व आणखी दुसरे विषय यांचें शिक्षण देण्याकरितां १८९९ सालीं माझी नेमणूक झाली.

हा योग सुद्धां अकल्पित घडून आला. त्यापूर्वीं श्रीमाणिकनगरचें नांवही मला माहीत नव्हतें. मी राहणारा, सातारा जिल्ह्यांतील तासगांवचा व माणिकनगर हें मोंगलाईत अगदीं मध्यभागीं असलेलें. ऐकून सुद्धां जें गांव माहीत नव्हतें, त्या गांवीं येण्याचा योग अदृष्टानेंच घडवून आणला. त्या वेळचे तासगांवचे म्युनिसिपल सेक्रेटरी श्री. रघुनाथराव चाफळकर हे नुक्तेच माणिकनगर येथील श्रीदत्तजयंती-उत्सवास जाऊन आले होते. त्यांची-माझी आमचे घराजवळ गांठ पडतांच एकदम मला त्यांनीं विचारलें, "गणपतराव, तुम्हीं माणिकनगरास जातां काय ?" मला या प्रश्नाचें आश्चर्य वाटलें. पण त्यांनींच सर्व खुलासा करून, माझ्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें देऊन, शंकांचें समाधान केलें. महाराजांनीं त्यांना एक योग्य असा शिक्षक पाठवून देण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं दुसऱ्या बऱ्याच लोकांपैकीं कोणाची निवड करावी तें ठरविलें नव्हतें. पण माझी गांठ पडतांच त्यांच्या मनांत माझ्यासंबंधानें पूर्वकल्पना नसतांही, मी त्या ठिकाणीं जाण्यास योग्य असल्याचें त्यांनीं निश्चित केलें व मीच जावें असें त्यांनीं आग्रहपूर्वक कळविलें. वडिलांची संमति घेऊन काय तें निश्चित कळवीन असें त्यांना कळवून, नंतर तशी संमति मिळतांच माणिकनगरास जाण्याचें ठरविलें.

माणिकनगरच्या अधिपतीशीं माझा प्रथमारंभीं धनी व नोकर असाच संबंध होता व तशाच प्रकारचें मीं वर्तन ठेविलें होतें. श्रीमार्तंड माणिकप्रभूंच्या आपुलकीच्या व प्रेमळ वागणुकीमुळें श्रीजींच्या ठायीं माझा स्वाभाविक असलेला आदर वाढत जाऊन, त्याची परिणति प्रेमांत झाली. या दिव्य प्रेमाचा अनुभव आज मी कित्येक तपें घेत आहें. आजपर्यंतच्या माझ्या लेखांत, व्याख्यानांत अथवा कवितेंत या अंतःकरणांतील प्रेमाचें छायाचित्र उमटलेलें कोणासही आढळून येणारें आहे. येथील कामगिरी एका अर्ध्या तपांत संपल्यानंतर तितकाच काल अगदीं भिन्न परिस्थितींत व विपरीत वातावरणांत मला घालवावा लागला तेंही प्रभुप्रेरणेनेंच असावें, अशी माझी ठाम समजूत आहे.

या क्षेत्राशीं, संप्रदायाशीं व त्याच्या अधिपतीशीं जडलेला माझा संबंध कितपत दृढ व टिकाऊ आहे, हें अजमाऊन पाहण्याकरितांच कीं काय, मला पांचगणीसारख्या युरोपियन लोकांनीं भरलेल्या वस्तींत राहून त्यांच्या मुलींच्या हायस्कुलांत शिक्षकाचें काम करावें लागलें. माझ्या आयुष्याच्या महत्त्वाच्या कालांतील एक तप, अशा रीतीनें पूर्व व पश्चिम देशांतील संस्कृतींत मिसळून राहण्यांत गेल्यामुळें कोणते संस्कार माझ्या मनावर अधिक परिणाम करितात तें पाहावयाचें होतें. इंग्लिश लोकांच्या सहवासांत सहा वर्षें मीं घालविलीं. तेथें माझें काम मला उत्तम रीतीनें करतां येऊन त्या लोकांशीं माझा स्नेहसंबंध वाढत गेला; तरी पण प्रभुसंप्रदायाशीं माझा जडलेला संबंध वृद्धिंगतच होत गेला. ख्रिस्ती धर्माचें वाङ्मय मीं पुष्कळ वाचलें, विचार केला व तुलनात्मक रीतीनें पडताळा पाहिल्यावर, या अपूर्व संप्रदायावरील माझें प्रेम वाढतच गेलें. श्रीमार्तोंड माणिकप्रभूंनीं आपल्या विचारानें व आचरणानें मला आपलेंसें करून,कोमल प्रेमबंधनानें बद्धमूल केलें.ढोंगी गुरु आपल्या शिष्यांना प्रज्ञाहत करून, सर्व बाजूंनीं त्यांना लुबाडतात, असे व्यवहार जगांत सर्वत्र चालले आहेत. पण खरे सद्गुरु आपल्या शिष्याची प्रज्ञा प्रज्वलित करून त्यांना ज्ञानाच्या मार्गावर आणून सोडण्याची पराकाष्ठा करितात, हा मीं प्रत्यक्ष अनुभव घेतला आहे. माझ्या हातून आजपर्यंत जें कार्य झालें आहे व पुढें होणारें आहे, त्याला सद्गुरुकृपाच कारणीभूत झाली आहे यांत मुळींच संशय नाहीं.

गेल्या शतकाच्या शेवटच्या वर्षापासून आजतागायत चरित्राचा व्यासंग चालू आहे; तरी पण सध्या वाचकांच्या हातीं पडत आहे तें परिपूर्ण आहे असें आज म्हणवत नाहीं. भविष्यकालीं चरित्रावर जसाजसा प्रकाश पडत जाईल, तसतसें तें विस्तृत होत जाईलच. तथापि आज तरी एवढ्यावरच समाधान मानणें भाग आहे. चरित्राची पूर्वतयारी म्हणून साधनसामुग्री जमवून एकत्र करण्याच्या हेतूनें सन १९२१ च्या डिसेंबर महिन्यांत 'श्रीमाणिकप्रभु' मासिक पुस्तक काढण्याचा उपक्रम सुरू केला.

अजमासें दोन वर्षें हें मासिक पुस्तक चालविलें. पुढें कांहीं अकल्पित अडचणींमुळें तें बंद ठेवावें लागलें; तथापि अनुकूल वेळ येईल त्या वेळीं, संप्रदायवृद्धीकरितां तरी तें काम चालविलेंच पाहिजे. श्रीप्रभुचरित्राची अत्यंत जरूरी होती व आहेही. तेंच काम हातीं घेण्याचें मनांत होतें, त्याप्रमाणें योगही जमून आला.

कै. श्री. बाबासाहेब महाराजांची इच्छा 'प्रभुचरित्र' माझ्या हातूनच तयार व्हावें अशी होती, हें मासिक पुस्तकाच्या दुसऱ्या वर्षाच्या ३।४ अंकांत स्पष्टपणें दाखविलें आहे. त्याचाच उतारा खालीं देत आहें. खालील उतारा ता. २६।१०।१९२१ सालीं श्री. बाबासाहेब महाराजांनीं मला लिहिलेल्या एका पत्रांतील कांहीं भागाचा आहे.

" + + + चरित्राबद्दल आमची पूर्ण संमति आहे व हें महत्त्वाचें कार्य आपल्याच निमित्तानें प्रभुकृपेनें घडावें व या स्वरूपानें आपलें नांव चिरकाल राहावें, अशी इच्छा मनःपूर्वक आहे. फक्त वेळ येण्याची मार्गप्रतीक्षा आहे. + + + आपण निष्काम भावनेनें प्रभूस जी सेवा अर्पण कराल तीच मान्य होईल व त्या मान्यतेमुळेंच त्या चरित्राचें महत्त्व भविष्यकालीं राहील."

कै. बाबासाहेब महाराजांस चरित्राविषयीं फारच आस्था होती, याविषयीं सदर मासिकांतील खालील उतारा वाचल्यावर सहज दिसून येईल.

" श्रीप्रभुचरित्र योग्य भक्ताकडून लिहिलें जावें ही उत्कंठा त्यांना अतिशय होती. चरित्रास लागणाऱ्या साधनसामुग्रीची जमवाजमव त्यांनीं फार व्यवस्थित रीतीनें करून ठेविली होती. त्यांनीं महाराष्ट्रांतील कित्येक कित्येक प्रख्यात लेखकांशीं पत्रव्यवहारही केला होता व कित्येकांची भेट स्वतः घेऊन चरित्रलेखनाचें काम त्यांच्याकडून होईल काय, अशी पृच्छाही केली होती. कै. हरि नारायण आपटे यांनीं सर्व कागदपत्र वाचून चरित्रलेखनाचें काम करतों असें आश्वासन दिलें होतें. पण दुर्दैवानें त्यांच्या हातून तें काम झालें नाहीं. श्रीप्रभुचरित्र लिहिण्यास नुसता निष्णात लेखक असला म्हणजे बस्स झालें असें नसून, श्रीप्रभूंच्या ठायीं विश्वास व अंतःकरणापासून निघालेला प्रेमाचा झरा यांची आवश्यकता फार आहे,

या गोष्टींची जाणीव श्रीबाबासाहेब महाराजांना होती, म्हणूनच त्यांनीं तें काम मुद्दाम लांबणीवर टाकिलें. योग्य संधि येईतोंपर्यंत वाट पाहणें हा त्यांचा स्वभावधर्म होता. या बाबतींत आमच्याशीं त्यांचें बोलणें होऊन, पत्रव्यवहारही पण झाला होता. 'मास्तर, प्रभुचरित्राचें काम तुमच्याकडूनच व्हावें अशी प्रभूंची इच्छा दिसते. मीही योग्य कालाची वाट पाहत आहें; त्या वेळीं तुम्ही कांहीं दिवस येथें राहूनच हें काम केलें पाहिजे" असें त्यांनीं आम्हास शके १८४३ च्या मार्गशीर्ष मासीं समक्ष कळविलें.

श्रीमाणिकप्रभुचरित्र लिहिण्याचें काम आजपर्यंत पुष्कळ लोकांनीं केलें आहे. श्रीप्रभूंचे पट्टशिष्य बाप्पाचार्य यांनीं "श्रीमाणिकप्रभाकर" नांवाचा संस्कृत ग्रंथ लिहिला आहे. पण तो सहजासहजीं कोणास समजण्यासारखा नाहीं. श्रीमनोहर महाराजांनीं गुरुचरित्राच्या पद्धतीवर ओंवीबद्ध चरित्र लिहिलें आहे. त्याचे ३१ अध्याय झाले आहेत, तरी तें चरित्र अपुरेंच राहिलें आहे. रामचंद्रबावा सोलापूरकर यांनींही एक ओंवीबद्ध चरित्र लिहून पुरें केलें आहे. शिवाय त्यांनीं माहिती सांगितल्यावरून रा. बळवंत मनोहर पंडित या गृहस्थानें एक पुस्तक लिहून पुष्कळ वर्षांपूर्वीं छापून प्रसिद्ध केलें आहे. त्यानंतर रा. टोळ यांनीं एक पुस्तक लिहून चित्रशाळा छापखान्यांत छापविलें होतें. त्यांनीं आपली हस्तलिखित प्रत १९०१ सालीं मला दाखविली होती. तींत पुष्कळच सुधारणा करावयास पाहिजे होती; पण छापविण्याच्या गडबडीमुळें त्यांच्याकडून योग्य दुरुस्ती झाली नाहीं व तेंही अपूर्णावस्थेंतच प्रसिद्ध होऊन सर्व प्रतीही खपून गेल्या. दत्तात्रय गोविंद सडेकर यांच्या छापखान्यांत एक ल्हानसें चरित्र छापून निघालें होतें. त्याशिवाय लहान ल्हान चरित्रग्रंथ बऱ्याच लोकांनीं लिहून काढले होते. त्यांतून कांहीं छापले गेले व कांहीं तसेच अमुद्रित राहिले. त्यांतील नरहरीकृत हस्तलिखित बखर महत्त्वाची आहे. हरिदास रघुनाथ यांचें ओंवीबद्ध चरित्र, माधव ऊर्फ जीवनदास बोकील कृत ७ अध्यायचें चरित्र व हिंदुस्थानी भाषेंत लिहिलेलें श्रीमाणिकप्रभु जीवनचरित्र, यांचाही मला बराच उपयोग झाला आहे.

दासगणूकृत अर्वाचीन 'श्रीभक्तलीलामृत' यांत १३ ते १५ या तीन अध्यायांत श्रीप्रभुचरित्र आणण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. अक्कलकोट स्वामीच्या चरित्रकारानेंही श्रीमाणिकप्रभूंचा उल्लेख केला आहे. वरील सर्व चरित्रकारांचा मला फार उपयोग झाला असून बऱ्याच वृद्ध लोकांनीं चरित्रावर प्रकाश पाडणाऱ्या गोष्टी सांगून माझ्यावर उपकार केले आहेत. रामसागर कविता सांबशास्त्री या विद्वान् पंडितानें पुष्कळ वर्षांपूर्वी 'श्रीमाणिकविजय' नांवाचा चरित्रग्रंथ संस्कृतांत लिहिलेला होता, त्याचा पहिला भाग १९२७ सालीं तेलंगणांतील शंकरगिरी या गांवीं छापून प्रसिद्ध झाला आहे व याचे वीस अध्याय आहेत. दुसरा भाग १९३३ सालीं छापला असून त्याचे ४४ अध्याय आहेत.

वरील उपलब्ध असलेल्या सर्व ग्रंथांचा मला उपयोग झाला असून, शिवाय संस्थानच्या दप्तरांतील महत्त्वाच्या कागदपत्रांचा मला फायदा झाला आहे. वरील ग्रंथांपैकीं बरेच ग्रंथ संस्थानच्या संमतिशिवाय लिहिले जाऊन स्वतंत्र रीतीनें छापले गेले असल्यामुळें संस्थानशीं त्यांचा कांहीं संबंध नव्हता. मीं लिहिलेलें हें चरित्र मात्र, संस्थानदेवतेच्या आज्ञेनें लिहिलें असून, संस्थानच्या कागदपत्रांचा मला यथायोग्य उपयोग करतां आला आहे. शिवाय छापविण्याची व प्रसिद्ध करण्याची सर्व व्यवस्था संस्थाननेंच अंगावर घेतली असल्यामुळें या ग्रंथावर संस्थानचीच मालकी झाली आहे. प्रभुसेवा म्हणून निरपेक्ष बुद्धीनें फक्त लेखनाचें काम मीं केलें आहे. आणि यांतच मला अत्यंत आनंद होत आहे. श्रीजींच्या आज्ञेनुसार माणिकनगरांत राहूनच चरित्राचें काम सुलभ रीतीनें मला करतां आलें. चरित्राला आवश्यक अशी साधनसामुग्री एके ठिकाणीं एकदम मिळण्याचें योग्य स्थान म्हणजे माणिकनगरच होतें. श्रीजींच्या आज्ञेप्रमाणें चरित्र लिहून पुरें झाल्यानंतर श्रीजींना दाखविण्यांत आलें व त्यांची मान्यता मिळाल्यानंतरच तें छापण्यास दिलें.

आजपर्यंत श्रीप्रभूचे हजारों भक्तगण होऊन गेले. त्यांनीं आपापल्यापरी अनेकप्रकारें प्रभुसेवा केली आहे. द्रव्यरूपानें, तपोरूपानें, योगाभ्यासानें,

इत्यादि अनंत मार्गांनीं प्रभुसेवा करणारे हजारों भक्त होऊन गेले; त्याप्रमाणें स्वाध्याय ज्ञानयज्ञानें प्रभुकृपा संपादन करणारेही कित्येक होऊन गेले आहेत, त्यांमध्यें माझी गणना होत आहे.

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञायोगयज्ञास्तथा परे ॥
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥

—श्रीभगवद्गीता, अध्याय ४

या श्लोकांत सांगितलेला स्वाध्यायज्ञानयज्ञ तोच मला प्रिय वाटून, या रूपानें सेवा करण्याचें मनांत योजिलें होतें. ती माझी इच्छा सफल झाली म्हणून मला अत्यंत धन्यता वाटत आहे. यांत स्वाध्याय व ज्ञान हे दोन शब्द आहेत, तरी ते एकमेकांस सहाय्यक असेच आहेत.

एकीं शब्दीं शब्दु यजिजे । तो वाग्यज्ञु म्हणिजे ।
ज्ञानें ज्ञेय गमिजे । तो ज्ञानयज्ञु ॥

श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं स्वाध्याय ज्ञानयज्ञाची अशी वेगळी व्याख्या केली आहे.

" स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते "

या गीतेच्या वचनाप्रमाणें माझें हें वाङ्मयतप होत आहे. वाग्यज्ञ काय किंवा वाङ्मयतप काय, दोन्हींचें स्वरूप एकच आहे. दोन्ही मिळूनच ज्ञानयज्ञ होत आहे. हा ज्ञानयज्ञ मला प्रिय आहे; कारण,

श्रेयान् द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप

असें भगवद्वचन आहे. श्रीप्रभूंनाही तो प्रिय असलाच पाहिजे. पूज्य व पूजक या उभयतांना प्रिय असणारें असें हें ज्ञानयज्ञाचें मूर्तिमंत स्वरूप आमच्या वाचकांसही प्रियच होईल यांत शंका काय म्हणून धरावी ?

या विसाव्या शतकांत श्रद्धाप्रधान लोक जास्त आहेत, का बुद्धिप्रधान लोक अधिक आहेत याचा उलगडा अजून झाला नाहीं. तथापि चिकित्सक बुद्धीनें पाहणाराला सुद्धां या चरित्रांत पुष्कळ उपयुक्त गोष्टी आढळून येतील. चमत्कारांच्या भाकडकथा किंवा भारूड अजिबात बाजूस सारून जरी या चरित्राचा ते स्वतंत्रपणें अभ्यास करतील, तरी बुद्धीस पटणाऱ्या गोष्टी कमी महत्त्वाच्या नाहींत, अशी त्यांची खात्री होईल. हिंदु, मुसलमान,

ख्रिस्ति, जैन, शीख किंवा बौद्ध हे आपल्या धर्माच्या अथवा पंथाच्या अभिनिवेशाच्या भरांत दुसऱ्या धर्माची अथवा पंथाची निंदा करण्यास उद्युक्त होऊन, एकमेकांशीं भांडत सुटतात; तेव्हां जगांतल्या कोणत्याही धर्मास अधिष्ठानभूत झालेलें एक सर्वसामान्य तत्त्व ते विसरून जातात. आपला धर्म अथवा आपल्यास प्रिय असलेला पंथ हाच काय तो ईश्वरापासून निघाला असून, खरा आहे आणि बाकीचे सर्व धर्म खोटे आहेत, असें म्हणण्याचा कोणालाही अधिकार नाहीं. आपल्याशिवाय इतर धर्म सर्व असत्य आहेत, असें म्हणणारा मनुष्य नकळत आपल्या स्वतःस प्रिय असणाऱ्या धर्मासही असत्याची माला घालीत असतो, या गोष्टीचा विचार कोणीही करीत नाहीं. श्रीप्रभूंनीं सर्व धर्मांचें, पंथांचें किंवा मतांचें उगमस्थान व अंतिम साध्य यांचें यथार्थ ज्ञान व्हावें व जगांतील सर्व लोकांत धर्माच्या बाबतींत तरी बंधुभाव उत्पन्न व्हावा म्हणून एक लोकोत्तर संप्रदाय सुरू केला. त्याचें महत्त्व आज किती आहे याची योग्य जाणीव जरी उत्पन्न झाली तरी मोठें कार्य झालें असें माझें मत आहे. " सर्वांतरीं आत्मा नको कुणाची निंदा " ही उच्च जाणीव मनांत ठसल्यावर, सर्व धर्म आनंदानें हातांत हात घालून सुखानें नांदतील तो दिवस भाग्याचा होय. तथापि नवीन मतप्रवाहाच्या प्रचंड लाटेंत किंवा वावटळांत, जगांतील सर्व धर्म किंवा मतमतांतरें सांपडून एकदम रसातळास गेलीं, तरी ती सुद्धां इष्टापत्तिच होईल. भांडणाचें मूळच गेल्यावर त्याच्या अनिष्ट परिणामाबद्दल भीति बाळगण्याचें कारणच राहिलें नाहीं.

प्रभूंनीं प्रेमाच्या भरभक्कम पायावर एका दिव्य संप्रदायाची उभारणी केली व प्रभु हे मूर्तिमंत प्रेमस्वरूप होते या दोन गोष्टी या चरित्रवाचनानें, वाचकांच्या मनावर पूर्णपणें बिंबल्या म्हणजे माझ्या श्रमाचें सार्थक झालें असें मी समजेन.

माणिकनगर:
मिति ज्येष्ठ शु ॥ १०
मा. श. ११९

गणेश रघुनाथ कुलकर्णी

॥ श्री ॥

# अनुक्रमणिका

## पूर्वार्ध

—

## उत्तरार्ध

श्री

# मंगलाचरण

भक्तकार्यकल्पद्रुम गुरुसार्वभौम
श्रीमद्राजाधिराज योगीमहाराज
त्रिभुवनानंद अद्वैत अभेद
निरंजन निर्गुण निरालंब परिपूर्ण
सदोदित सकलमतस्थापित
श्री सद्गुरु माणिकप्रभु
महाराजकी जय

॥ श्रीसद्गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥



# उपोद्घात

## मंगलाचरण : : १

श्रीप्रभूंची " भक्तकार्यकल्पद्रुम" ही ब्रीदावळी यापूर्वींच्या पानांवर दिली आहे. वाचकांनीं ती लक्ष्यपूर्वक अवलोकावी. हिची घोषणा कित्येक वर्षांपासून आजपर्यंत अव्याहत चालू आहे. श्रीप्रभु सांप्रदायाचें सारसर्वस्व यांत सांठविलेलें आहे. म्हणून सांप्रदायिकांमध्यें हिचें अत्यंत महत्त्व आहे. हेंच सांप्रदायिकांचें परम मंगल आहे. कोणत्याही महत्त्वाच्या कार्यारंभाला ब्रीदावळीची गर्जना करून प्रभुनामाचा जयजयकार करणें हें सांप्रदायिकांचें आद्य कर्तव्य होय.

श्रीमाणिकप्रभु महाराजांचें चरित्र ज्यांत बीजरूपानें सांठविलें आहे, असें जर कांहीं असेल तर ती ही बिरूदावळीच होय. श्रीप्रभूंचें आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक स्वरूपाचें यथार्थ वर्णन या ब्रीदावळींत आहे. प्रभूंचें

अवतारकार्य एका विशिष्ट व मर्यादित कालमध्यें, देशामध्यें व परिस्थितीमध्यें झालें असलें, तरी त्यांचा भूत, वर्तमान व भविष्य या तीन्ही कालांशीं संबंध अव्याहत निगडित असल्यामुळें तें दिक्कालाद्यपरिच्छिन्न असें आहे. एखाद्या वृक्षबीजामध्यें ज्याप्रमाणें त्याच्या सार्वकालिक स्वरूपाचें सूक्ष्म स्वरूप दृष्टीस पडतें, त्याप्रमाणेंच प्रभुचरित्राचें बीज या श्रीदावळींत दृग्गोचर होत आहे. श्रीदावळी ही प्रभूचें गुणवर्णन करून प्रभुस्वरूपाचा साक्षात्कार पटवून देणारी महाशक्ति आहे. भक्तकार्यकल्पद्रुमादि सर्व गुणविशेषणें प्रभुस्वरूपाचीं असून तीं अगदीं अन्वर्थक अशींच आहेत. सर्वगुणविशेषेण-विशिष्ट असा आमचा प्रभु आहे, व या महामंत्राचा जप अखंड केल्यास प्रभूचें विशाल, सर्वव्यापी व सर्वकाल भासमान होणारें स्वरूप प्रत्ययास आलेंच पाहिजे, हा सांप्रदायिकांचा निश्चल विश्वास आहे. या विश्वासाच्या बहुमोल सामर्थ्यरूपी भांडवलावर कोणताही प्रेमी भक्त प्रभुस्वरूपसाक्षात्कार संपादन करण्यास समर्थ आहे.

श्रीमाणिकप्रभुचरित्र आमच्या प्रेमळ वाचकांकरितां आम्हीं देत आहों. तें संपूर्ण चरित्र या श्रीदावळीच्या कसोटीवर नीट घासून, चिकित्सक बुद्धीनें त्याचें परिशीलन करून व एका-ग्रतेनें मनन करून जे पाहतील त्यांना आमच्या म्हणण्याची यथार्थता तेव्हांच पटेल. प्रभु म्हणजे एक अद्वितीय, विशाल व सर्वव्यापक असें सामर्थ्य होय, असें ही चरित्रकथा सांगत

आहे. कांहीं मर्यादित कार्यापुरतेंच सामर्थ्य घेऊन जन्मास आलेल्या अनेक विभूति भूतकालीन इतिहासांत चमकल्या आहेत. विद्यमान कालींही अलौकिक सामर्थ्य संपादन करून कार्य करण्यास प्रवृत्त झालेले अनेकविध पुरुष जगतीतलावर निरनिराळ्या कार्यक्षेत्रांत अवतीर्ण झालेले दृष्टोत्पत्तीस येत आहेत. भविष्यत् कालींही अनंत दिव्य विभूतींचा उदय होणार आहे. भूत, भविष्य, वर्तमानकालिन यच्चावत् कार्यकर्तें पुरुष एका प्रचंड शक्तीच्या आधारानेंच प्रकाशमान होत असतात. हा शक्तीचा सांठा 'एकमेवाऽद्वितीयम्' असा आहे. देश, काल, परिस्थितीच्या मानानें जगत्कल्याणकारक असें कार्य करण्यास उद्युक्त झालेल्या सर्व विभूति एकाच शक्तिसंग्रहापासून कार्यास आवश्यक तेवढी शक्ति घेऊन कार्य करीत असतात.

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ॥
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम् ॥

ही भगवदुक्ति सर्वकाल सत्याचा अनुभव पटवून देणारी आहे.

सांप्रत एका जीर्णप्राय राष्ट्राला नवजीवन प्राप्त करून देवून इतर सामर्थ्यवान राष्ट्रांच्या बरोबरीची योग्यता आणून देण्याकरितां अविश्रांत श्रम करणारा राष्ट्रपुरुष मुस्तफा केमल-पाशा यांच्यासंबंधानें एक लेखक असें म्हणतो कीं, "केमलपाशा हे निसर्गाच्या पंचमहाभूतांदिकांसारखें एक सामर्थ्य असून

त्यांच्या गतीला विरोध होऊं शकत नाहीं. त्यांच्या सहवासांतील प्रत्येक व्यक्तीला असें वाटतें कीं, ते अचेतनाला सचेतन व तेजस्वी करून सोडतील." लेखकानें काढलेले हे उद्गार प्रेमातिशयानें भरलेले असले, तरी ते सत्यपूर्ण आहेत. अशा प्रकारची शक्ति कोणत्याही कालांतील कोणत्याही प्रचंड कार्यकर्त्या पुरुषामध्यें असतेच असते. आधुनिक विद्वानांनाही ही गोष्ट पटते. नेपोलियन, जॉर्ज वॉशिंग्टन, शिवाजी महाराज इत्यादि लोकोत्तर विभूति या सामर्थ्यानें परिपूर्ण होत्या ही गोष्ट कोणीही नाकबूल करीत नाहीं. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, इत्यादि आधिदैविक सामर्थ्यसंपन्न विभूतींची योग्यताही अलीकडील सुशिक्षितांना पटलेली आहे. याकरितां आम्हांस भरंवसा आहे कीं, श्रीमाणिकप्रभुमहाराज यांच्याविषयीं आम्हीं केलेलीं विधानें विचाराच्या कसोटीवर घांसून पाहिल्यास तीं सहज पटतील.

श्रीमाणिकप्रभु हे पंचमहाभूतांना सामर्थ्य देणाऱ्या शक्तीसह प्रकट झाले. संपूर्ण विश्व हें त्यांचें संचारक्षेत्र व विश्वाचें आत्यंतिक श्रेयस् हेंच त्यांचें ध्येय असून, त्यांच्या सहवासानें, दर्शनानें अथवा स्मरणानें अचेतन सचेतन होऊन सामर्थ्यसंपन्न बनतें इतकेंच नव्हे, तर प्रभुरूपच होतें. देशकालादि मर्यादारहित, जन्ममरणाची बाधा नसलेली दिव्य काया घेऊन विशाल विश्वांत सदोदित आनंदमय वातावरण प्रसवणारी ही विभूति एका मर्यादित क्षेत्रांत, एका विशिष्ट कालीं व एका

विशिष्ट समाजांत जन्माला आली, हाच एक अद्भुत चमत्कार आहे. असे चमत्कार आजपर्यंत अनंतावधि झाले आहेत व होतही आहेत. ही चमत्कारमय चरित्रकथा आम्ही आमच्या प्रेमळ वाचकांकरितां सांगत आहोंत.

अलौकिक सामर्थ्यसंपन्न-विभूतींचीं चरित्रें चमत्कारपूर्ण असतात. साधारण लोकसमूहाच्या मानानें त्यांचें कार्यक्षेत्र अत्यंत विस्तृत असून ते आपल्या अंगीकृत कार्याशीं तादात्म्य पावत असल्यामुळें त्यांचा आधिभौतिक देह सुद्धां कार्य-क्षेत्राच्या प्रमाणांत विशाल बनतो. मग साहजिकच त्यांचें कार्य साधारणपणें सामान्य बुद्धिमर्यादेच्या पलीकडचें होऊं लागतें. बुद्धिमर्यादेच्या आंत न येणारी कोणतीही गोष्ट चमत्कार या सदराखालीं दाखल होऊन जाते. सृष्टीचे सर्व नियम सृष्ट पदार्थांना लागू असतात. या नियमांचें उल्लंघन कोणाला करतां येणें शक्य नाहीं. तथापि कांहीं लोकोत्तर अद्भुत गोष्टी आपल्या ऐकण्यांत अथवा पाहण्यांत आल्या, तर त्यांची कारणपरंपरा आपणास अज्ञात असल्यामुळें आपण आश्चर्यचकित होऊन 'काय हो हा अद्भुत चमत्कार !' असें म्हणतों. चमत्कार कसलेही अद्भुत, अश्रुत व अदृष्ट असले, तरी त्यांना कांहीं नियमबद्धता असतेच.

परमेश्वरानें सृष्टि उत्पन्न करतांना तिला जो धर्म घालून दिला, तो सृष्टिरचना कायम असेतोंपर्यंत राहणारच. सृष्टीच्या प्रत्येक पदार्थाचे गुणधर्म त्याला सोडून कधींही जाऊं शकत

नाहींत. मानवी देहधर्म मानव देह कायम असेतोंपर्यंत तसेच राहणार. अंशावतार अथवा पूर्णावतार म्हणून जगाच्या राहाटींत अवतीर्ण झालेले पुरुष, या जगतांत वावरत असतांना, आपापले देहधर्म यथाशास्त्र पाळीत आले आहेत. त्यांच्या हातून ज्या लोकविलक्षण गोष्टी घडल्या, त्या त्यांनीं आपला संकुचित स्वार्थ विशाल व विस्तृत करून स्वतः आचरणानें व अंतःकरणानें विश्वरूपाशीं तादात्म्य भाव प्रगट केला म्हणूनच होय.

प्रभुचरित्राचा नीट अभ्यास केल्यास प्रभूचें विशाल स्वरूप उघड होणार आहे. प्रभूचा जड दिसणारा देह सृष्टिनियमा-प्रमाणेंच प्रकट झाला, वाढला, परिणत दशेला आला, जीर्ण झाला व समाधिस्थ झाला. यांत सृष्टिधर्म यथाशास्त्र पाळले गेले असून लोकोत्तरतेचा गंधही त्यांत नाहीं. सामान्य प्रतीचा कोणताही जीव या सहा अवस्थेंतच परिभ्रमण करीत असतो. इतर देहापेक्षां मानवी देहांत कांहीं विशेष आहे असें नाहीं. विकासवादाप्रमाणें मानवी देह हा सृष्टीचें परिपक्व दशेस आलेलें फल आहे, असें समजतात. 'नर करनी करे तो नरका नारायण हो जाय' या वाक्यामध्यें सत्यता आहे, असें अनेक विभूतींच्या चरित्रांवरून स्पष्ट होत आहे.

षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् नारायण आहे. या नारायणाच्या ठायीं असलेले सहा गुण ज्या विभूतीमध्यें प्रतीत होतात, ती विभूति नरदेहधारी असली तरी ती नारायणस्वरूप असते ही गोष्ट निर्विवाद आहे. श्रीप्रभूंचें चरित्र आमूलाग्र श्रवण व

पठण केल्यास प्रभु षड्गुणैश्वर्यसंपन्न होते ही गोष्ट निश्चितपणें अनुभवास येणारी आहे. लोकोत्तरता आहे ती सामर्थ्यामध्यें आहे. विभूतीच्या कार्यक्षेत्राच्या विशालतेवर सामर्थ्य अवलंबून असल्यामुळें, जेवढें कार्यक्षेत्र विस्तृत, तेवढें सामर्थ्य प्रचंड, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. "ऐश्वर्यस्य समग्रस्य शौर्यस्य यशसः श्रियः ॥ ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीरणा ॥१॥" समग्र ऐश्वर्य, शौर्य, यश, लक्ष्मी, ज्ञान व वैराग्य या सहांना 'भग' अशी संज्ञा आहे. संपूर्ण ऐश्वर्य, निर्भयतायुक्त शौर्य, यश, औदार्य, ज्ञान व वैराग्य हे सहा गुण प्रभूमध्यें मूर्तिमंत वास करीत होते, हें निःसंदेह सिद्ध होत आहे.

राजसत्ता सिंहासनाधिष्ठित होण्याच्या समयीं आपला राज्यकारभार कोणत्या प्रकारें चालणार आहे हें प्रजेस समजून येण्याकरितां जाहिरनामा प्रसिद्ध करीत असते. तो जाहिरनामा म्हणजेच ब्रीदावळी होय. हें ब्रीद राखण्याची संपूर्ण जबाबदारी राजावर असते. आपण प्रकट केलेलें ब्रीद यथायोग्य रीतीनें पाळूं लागतो तोच राजा उत्तम गणला जातो. प्रजेचें कल्याण हें राजसत्तेचें आद्य कर्तव्य व तें यथायोग्य रीतीनें राजानें बजावलें, तर ऐहिक उन्नति फार दूर असत नाहीं. प्रजेनें सुद्धा आपल्या कर्तव्याची जाणीव सदैव जागृत ठेवून उन्नतीच्या मार्गाचा अवलंब करावा लागतो. राजा व प्रजा या उभयतांनीं परस्परांविषयीं कर्तव्यबुद्धियुक्त प्रेमभावाचें वर्तन केल्यास रामराज्य जवळ येतें. पारमार्थिक कल्याण हें राज-

सत्तेच्या अधिकारक्षेत्राबाहेरचें आहे. ही स्वतंत्र सत्ता आहे. व ह्या सत्तेचा अधिकारच खरा आहे. या सत्तेस ऐहिक व आमुष्मिक निःश्रेयस् साध्य करून देऊन जगताचें उभयविध कल्याण करण्याचा अधिकार आहे. हा अधिकार ज्या सत्तेस आहे, ती सत्ता चिरकाल टिकणारी आहे.

सृष्टि निर्माण करून तिचें पालनपोषण करणें व सर्व बाजूंनीं तिचा उत्कर्ष साधणें हीं कामें करणारी सर्वव्यापी व सदोदित राहणारी सत्ता म्हणजे ईश्वर होय. कोणत्याही राज-सत्तेला ही सत्ता नाकबूल करतां येणें शक्य नाहीं. ईश्वरी कृपेनें आपण राज्यसूत्रें हातीं घेत आहोंत, असेंच सर्व सार्वभौम राजे जाहीर करीत असतात, पण ईश्वराशिवाय खरा सार्वभौम कोण आहे ? सर्व भूमीवर एकमुखी अखंड सत्ता चालविणारा राजा अद्याप कधींच झाला नाहीं व पुढेंही कोणी होईल ही गोष्ट शक्यतेच्या कक्षेंत दिसत नाहीं. सार्वभौम सत्ता एका जगज्जनकाचीच आहे. या सत्तेशीं समरस होऊन तदाकार होणारे पुरुष मात्र सत्ताधारी बनतात. राजसत्ता परमावधीची प्रसन्न झाली, तर केवळ आपलें अमात्यपद देऊं शकते. पण ही सत्ता प्रसन्न झाल्यावर आत्मपद बहाल करीत असते !

प्रभूची ब्रीदावळी ही विश्वव्यापी सत्तेची ब्रीदावळी आहे. प्रभु हा विश्वाचा प्रभु आहे.तो भक्ताचे मनोरथ पूर्ण करणारा

आहे. तो सर्वांचा, सर्व जगताचा गुरु होय. राजसत्ता त्याच्याच कृपेचें फल आहे. यच्चावत् कर्तृत्वाचें तो एकच अधिष्ठान आहे. सर्वांना आनंद देणारा प्रभु हा अद्वितीय असा आहे. त्याला प्रतिस्पर्धी दुसरी सत्ता नाहीं. कोणालाही या सत्तेचा भंग करतां येणें शक्य नाहीं. निर्दोष व गुणातीत असा प्रभु स्वतःच्या अधिष्ठानावर कोणाच्याही मदतीची अपेक्षा न ठेवतां, स्थित झाला आहे. ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य व औदार्य यांनीं परिपूर्ण असा प्रभु सर्वकाल भासमान होणारा असून जगतांतील सर्व धर्म व मतमतांतरें त्याच्यापासून उत्पन्न होऊन शेवटीं त्याच्याचमध्यें लीन होत असतात. तो सद्गुरुरूपानें प्रकट होऊन माणिक प्रभु हें नाम धारण करिता झाला आहे. या प्रभूचा सदैव जयजयकार असो.

हें मंगलाचरण आमच्या प्रेमळ वाचकांचें परम मंगल करो, अशी प्रभुचरणीं प्रार्थना करून श्रीप्रभुमहाराजांचा जन्म ज्या स्थळीं, ज्या कालीं व ज्या परिस्थितींत झाला, त्या देशकालपरिस्थितीचें वर्णन पुढील भागांत करून नंतर मुख्य चरित्रकथेस सुरवात करीत आहों.



## मणिचूल पर्वत : : २

" काय सांगू तीर्थ थोरी ॥ प्रख्यात असे मणिगिरी ॥
सप्तऋषी प्रीतिकरी ॥ तप केलें बहुत दिवस ॥ १ ॥
( गु. च. अ. १५. )

निजाम सरकारचे राज्यांतील गुलबर्गा, कल्याण व बेदर या तीन इतिहासप्रसिद्ध शहरांमधील त्रिकोणाकृति क्षेत्र व्यापून गुलबर्ग्याचे पूर्व दिशेस पसरत गेलेल्या एका डोंगराळ प्रदेशास दरी अगर दरीपट्टी असें म्हणतात. या प्रदेशाची आग्नेयीपासून वायव्य दिशेकडे लांबी अधिकांत अधिक म्हणजे साठ मैल असून नैऋत्य व ईशान्य बाजूंस रुंदी अजमासें वीस मैलांची आहे. वर निर्दिष्ट केलेलीं तीन्ही शहरें या दरीच्या पायथ्याशीं आहेत. या डोंगराळ प्रदेशाचा रंग लाल असून यामध्यें पाण्याची विपुलता आहे. हवामान सामान्यतः निरोगी असें आहे. प्राचीन कालीं असलेला उंचवटा झडून जाऊन बहुतेक प्रदेश थोडयाबहुत चढउताऱ्याचा व दरींखोरीं पुष्कळ असलेला असा झाला आहे. या दरीपट्टयांत राहणारे लोक मोठया अभिमानानें सांगत असतात कीं, आमच्या भागांत सर्व प्रकारचीं धान्यें फळें व भाज्या पिकतात. सुपीकतेच्या बाजूनें हा प्रदेश चांगलाच आहे. दोन टेकडयांतील मधला भाग मऊ व तांबडया मातीनें भरला असल्यामुळें जमिनींत कस भरपूर आहे. सृष्टिसौंदर्य मूर्तिमंत नांदत असलेला हा भूभाग इतर भोंवतालच्या प्रदेशा-

पेक्षां आपली श्रेष्ठता अधिक असल्याचें आजही सांगत आहे.

या प्रदेशाचें महत्त्व पौराणिक कालांतही बरेंच होतें. मल्लारीमहात्म्यामध्यें मणिमल्ल राक्षसाशीं प्रचंड युद्ध करून त्यांना पादाक्रांत करणाऱ्या शंकरावताराचें वर्णन आहे. ज्या ठिकाणीं युद्ध झालें, तें ठिकाण मोठें क्षेत्र बनलें आहे. मैलार हें त्या क्षेत्राचें नांव. मैलार क्षेत्राचें प्राचीनत्व, महत्त्व व पावित्र्य यासंबंधानें यथाप्रसंग विस्तार या चरित्रांत करणारच आहों. यासारखींच दुसरींही अनेक क्षेत्रें या दरीपट्टयांत चोंहोंकडे आढळून येतात. प्राचीन पौराणिक कालांत या प्रदेशास मणिचूल पर्वत असें नामाभिधान होतें. श्रीगुरुचरित्रांत या प्रदेशास मणिगिरी असें म्हटलें आहे. कांहीं विशिष्ट सांप्रदायिक परिभाषेंत याला वृषभाद्रि असेंही म्हटलें आहे. मणिचूल, मणिगिरी, वृषभाद्रि इत्यादि अनेक नांवांनीं प्रसिद्ध असलेला हा प्रदेश सांप्रत कालीं 'दरीपट्टी' या नांवानें संबोधिला जात आहे. येथील हवा शुद्ध व अरोग्यकारक असून पाणी विपुल आणि लोहयुक्त असल्यामुळें साधारणतः शक्तिवर्धक असें आहे. भौगोलिक दृष्ट्या हा प्रदेश एक शतकापूर्वी जसा होता तसाच थोडयाबहुत फरकानें आजही आहे. या प्रदेशाचें साग्र निरीक्षण आम्हांस वेळोवेळीं करावयाचें असल्यामुळें त्या त्या प्रसंगास अनुसरून महत्त्वाचीं क्षेत्रें, ऐतिहासिक स्थलें, अरण्यें, गुहा, तपानुकूल भूमिवर्णन आणि

सृष्टिसौंदर्य इत्यादि संबंधानें तपशीलवार शब्दचित्र आम्ही देणार आहोंच.

ह्या प्रदेशांत तीन भाषा एके ठिकाणीं समसमानपणें नांदत आहेत. मराठी, कानडी व तेलंगी या भाषा या प्रदेशांतील लोकांमध्यें जन्मसाध्य झाल्या आहेत. चवथी भाषा (राजभाषा) उर्दू ही होय. हीही सामान्य भाषा बनली आहे. असा हा चौभाषी मुलुख झाला आहे. पश्चिम व उत्तर या दिशेकडे मराठी भाषा पसरत गेली आहे. दक्षिणेकडे कानडी भाषा विस्तार पावली आहे. आणि पूर्वेकडील प्रांत तेलंगी भाषेनें व्यापला आहे. मोंगलाईतील मराठवाडा, कर्नाटक व तेलंगण ज्या ठिकाणीं हातांत हात घालून आनंदानें नांदत आहेत, असा हा प्रदेश आहे. या तिन्ही भाषाभगिनींचें हें माहेर आहे किंवा सासर आहे, या गोष्टीचा उलगडा होणें कठीण आहे. इंद्रधनुष्यांतील निरनिराळ्या रंगाचे पट्टे पाहून ते निरनिराळे रंग कोठून व कसे निघाले आणि कोठें व कसे संपले हें जसें समजत नाहीं, तसाच हा प्रकार आहे खरा ! मात्र एक गोष्ट निर्विवाद आहे कीं, हें मिश्रण चमत्कृतिजनक आहे. गंगा, यमुना व सरस्वती या तीन निर्मल व पवित्र अशा नद्यांचा संगम ज्या ठिकाणीं झाला आहे, त्या स्थानाला त्रिवेणीसंगम अशी संज्ञा प्राप्त होऊन तें सर्वश्रेष्ठ तीर्थ झालें आहे. त्याला तीर्थराज असेंही म्हणतात. प्रयागाचें महत्त्व आर्यावर्तात अधिक मानलें जातें, तें या त्रिवेणी संगमामुळेंच.

याच न्यायानें आमचा हा मणिचूल पर्वतही क्षेत्रराज म्हणवून घेण्यास सर्वस्वी पात्र आहे. आर्य संस्कृतींतून उदय पावलेल्या तीन वाक्सरितांचा या क्षेत्रराजावर संगम होत आहे, ही एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. हा प्रीतिसंगम असल्यामुळें हा भूप्रदेश निसर्गरमणीय झाला आहे. हा विशिष्ट भूभाग प्रत्येक ऋतूमध्यें यथोचित पेहराव करून सदैव उल्लसित वृत्तीचें प्रदर्शन करीत असतो.

या प्रदेशांतील भूमिभाग रक्तवर्ण आहे हें वर सांगितलेंच आहे. पौराणिक कालीन कथांमध्यें श्रीखंडेरायानें मणिमल्ल व त्यांचे सर्व सैनिक यांचें कंदन केल्यामुळें त्या वेळीं झालेल्या राक्षसांच्या रक्तस्रावानें सर्व भूमि रक्तमिश्रित झाली व अजून तोच वर्ण कायम आहे, असें म्हटलें आहे, तें खरें कीं खोटें याविषयीं वाद घालण्याचें आम्हांस कांहीं प्रयोजन नाहीं. सांप्रतकालीं या भूमीचा वर्ण लाल आहे ही गोष्ट निर्विवाद सत्य आहे. प्रेमाचा वर्ण तांबडा असतो, म्हणूनच तो रंग सौभाग्यकारक समजला गेला आहे. स्त्रियांचें सौभाग्यदर्शक चिन्ह जें कुंकुम, तें लाल वर्णाचेंच आहे. भूदेवी प्रभूवर अनुरक्त होऊन त्यांचें स्वागत करण्याच्या अतुरतेनें दिव्य वस्त्राभरणें अंगावर घालून, सौभाग्यालंकार कुंकुमाचा मळवट भरून, आनंदभरानें सजून बसली आहे, असें रूपक आम्ही केलें तर जास्त शोभण्यासारखें आहे. भूमि रुधिरप्रिया असून रक्तप्राशनानें ती लालबुंद झाली आहे असें मानल्यास तिचें

भयानक व भेसुर चित्र आपल्यापुढें उभें राहतें. तांबडा वर्ण भयप्रद मानतात ते लोक विदेशी होत. ही विदेशी कल्पना करून भयभीत होण्यापेक्षां आपल्या आर्य संस्कृतिप्रमाणें हा रंग सौभाग्यसूचक आहे असें मानणें अधिक इष्ट आहे.

मणिचूल पर्वत हा अनेक प्रकारच्या नररत्नांची खाण होऊन बसला आहे. या ठिकाणीं प्राचीन कालापासून आजपावेतों कित्येक तेजस्वी रत्नें निर्माण होऊन त्यांनीं आपली कीर्ति अजरामर करून सोडिली आहे. प्रसिद्ध स्मृतिकार विज्ञानेश्वर हा या भूमीभागांतच उदयास आला. प्राचीन कालांतील पुलकेशी राजा प्रभावशाली झाला तें या प्रदेशाच्या प्रभावानेंच. चालुक्य, कलचूरी इत्यादि अनेक वंशांनीं आपापलीं साम्राज्यें या ठिकाणींच स्थापून, अष्टदिशेला फैलावलीं. बेदर शहरानें किती तरी राजसत्तांची घडामोड पाहिली आहे. बेदरचा किल्ला अजिंक्य, अभेद्य असाच होता. अजूनपावेतों या किल्ल्याचें लग्न झालें नाहीं असें इकडील लोक म्हणतात. याचा अर्थ असा कीं, आजपर्यंत कोणीही तो लढाईंत सर करून घेण्यास समर्थ झाला नाहीं. या दरीपट्टयावर चंद्रसेन जाधव व त्याचा पुत्र राजा रामचंद्र यांच्या यशस्वी कारकीर्दीची कीर्ति अद्यापपावेतों जिवंत आहे. आज ज्याला हुमानाबाद म्हणतात त्या शहराला पूर्वीं जयसिंगपेठ असें नांव होतें, तें चंद्रसेनानें वसविलें असून राजा रामचंद्राचें तें राजधानीचें नगर होतें. धनाजी जाधवाला ‘जयसिंगराव’ असा

किताब राजाराममहाराजांनीं दिला होता. त्याचें स्मारक म्हणून जयसिंगपेठ हें गांव चंद्रसेन जाधवानें वसविलें असावें. कल्याण, कलबुर्गा व बेदर हीं तिन्हीं शहरें इतिहासप्रसिद्ध आहेत. त्यांनीं अनंत घडामोडी अवलोकन केल्या असून, प्राचीन व अर्वाचीन वैभवाची साक्ष देण्यास, तीं अजूनही तयार आहेत.

स्मृतिकार विज्ञानेश्वराप्रमाणेंच लिंगायत धर्माचा आद्य-प्रवर्तक बसवेश्वर याचा अभ्युदय या भूमिप्रदेशांतच झाला आहे. कल्याणच्या बिज्जल कलचूरी राजाचा अमात्य बसवेश्वर हा अत्यंत विद्वान्, शिवभक्त, कीर्ति व प्रभाव-शाली होता हें त्याच्या चरित्रावरून उघड होत आहे. बसवेश्वर हा नंदिकेश्वराचा अवतार अशी लिंगायत लोकांची भावना आहे ती यथार्थ आहे. या मणिचूल पर्वतास अथवा त्याच्या भागास वृषभाद्रि हें नांव येण्याचें कारण बसवेश्वरास प्रिय असलेला हा प्रदेश आकृतीनें नंदीप्रमाणें म्हणजे वृषभाप्रमाणें त्याच्या भक्तांना वाटला, हेंच असावें, असें आम्हांस वाटतें.

फार प्राचीन कालचे सत्पुरुष सदानंद व त्यांचे शिष्य-प्रशिष्य पूर्णानंद हे लोकोत्तर रत्नांपैकींच होते. शिवराम-स्वामींची कीर्ति सर्वविश्रुतच आहे. समर्थ रामदास स्वामींच्या पंचायतनापैकीं हे एक होते. ह्यांचें वास्तव्य क्षेत्र कल्याणच. अवलिया या ठिकाणीं पुष्कळ होऊन गेले. अलंप्रभु व बक्क-

प्रभु नांवाचे सत्पुरुष लिंगायतांमध्यें होऊन गेले. असो; या सर्व नररत्नांचा इतिहास देणें कठिण काम आहे. तथापि प्रसंगानुरोधानें आम्हांला त्या त्या विशिष्ट स्थलीं त्यांची यथोपलब्ध माहिती द्यावयाची आहेच.

एकोणिसाव्या शतकाच्या प्रथम भागांत अवतीर्ण झालेल्या सर्व नररत्नांमध्यें श्रेष्ठ असें रत्न "माणिक" हें होय. माणिकप्रभूंचें ठेविलेलें नांव माणिक असें जरी होतें, तरी त्यांना, आजी व माता पिता 'रत्न्या' या अत्यंत आवडत्या नांवानेंच हाक मारीत असत. या नरमणिश्रेष्ठानें मणिचूल अथवा मणिगिरि आपल्या जन्मास, बाललीलेस, अवतारकृत्यास, आणि संप्रदाय-संस्थापनेस अधिक पसंत केला याचें कारण, सृष्टिनियमास अनुसरून वागण्याचें त्यांनीं योजिलें होतें, हेंच असलें पाहिजे. विशिष्ट हेतूनें अवतार घेणाऱ्या प्रभूला, ही मणिचूलपर्वतस्थ भूमि अनुरक्त झालेली दिसली. प्रेमाशिवाय अनुरक्तता संभवत नाहीं. प्रेमानें ओथंबलेली, तपस्वी लोकांच्या तपानुष्ठानानें तेजस्वी बनलेली, निसर्गरमणीय वनोपवनांतील तरुलतांच्या फलपुष्प संभारानें अत्यंत मोहक रूप धारण केलेली, निर्मल व पवित्र अशा नानाविध जलप्रवाहांनीं व जलाशयांनीं पुनीत झालेली आणि सोज्वळ व सुगंधी वायूनें उल्हसित होऊन सानुरागानें मार्गप्रतीक्षा करीत असलेली ही भूमिका पाहून 'भक्तकार्यकल्पद्रुम' हें ब्रीद गाजविणाऱ्या प्रभूनें तिच्याकरितां धांवत यावें हें क्रमप्राप्तच आहे.

माणिक हें व्यवहारांतील एका रत्नाचें नांव आहे, हें सर्व-श्रुतच आहे. या रत्नाचा रंगही लाल असतो, म्हणून याला 'लाल' असेंही एक नांव आहे. संपूर्ण महाराष्ट्र, कर्नाटक व तैलंगण या तीन देशांच्या केंद्रस्थानीं असलेला हा लाल, आर्य भूमीचाही लाल–सौभाग्यतिलक–आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. "खरोखरीच हा वेदांत खाणींतील लाल इतका तेजस्वी होऊन राहिला आहे कीं, प्रलयापर्यंत तो तसाच राहील" हे उद्गार महाराजा सर किसनप्रसाद बहादूर, यांनीं आपल्या पुस्तकांत काढले आहेत. सर किसनप्रसाद यांचे हे उद्गार अत्यंत महत्त्वाचे आहेत. हें अद्वितीय रत्न, हा विश्वाचा लाल, जगाच्या अंतापर्यंत असाच तेजःपुंज राहील हें निःसंशय सत्य आहे.

अशा प्रकारें मणिचूल पर्वतानें आपल्या प्रेमाकर्षणानें श्रीप्रभूस जन्म घ्यावयास लावून आपण त्यांचें क्रीडास्थान व शाश्वत निवासस्थान बनला. रत्नाला कोंदणाची जशी जरूरी असते, तशीच कोंदणालाही दिव्य रत्नाची आवश्यकता असतेच. हीं उभयतां परस्परांच्या सान्निध्यानें परस्परांना सुशोभित करून जगताला आल्हाद देतात. तद्वत् श्रीप्रभुनिवासामुळें या पर्वताला महत्त्व आलें आहे, आणि याच्या स्वाभाविक महत्त्वामुळें प्रभुही पण येथेंच प्रकट झाले. या पर्वतशिखरावर श्रीप्रभूंची गादी स्थापन झाली आहे. सकलमतसंप्रदायाची

नौबत येथें झडत असून, समतेचा झेंडा आकाशांत फडफडत आहे. ही देणगी प्रभूंच्या विश्वावरील अलोट प्रेमाची निदर्शक आहे. हा पर्वत प्रेमाचा अखंड व अभेद्य असा पाया आहे. सर्व धर्म व सर्व मतें या प्रेमाच्या अधिष्ठानावर ठाण मांडून समतेच्या झेंड्याखालीं अक्षय आनंदानें नांदावेत अशी प्रभूंची योजना आहे. कालाचा प्रवाह समतेच्या अनुरोधानेंच वाहत आहे व प्रेम, शाश्वत–शांति व आनंद हेंच विश्वाचें अंतिम साध्य आहे ही खूणगांठ प्रभूंनीं शंभर वर्षांपूर्वी बांधून तदनुरोधानें आपल्या संप्रदायाची मांडणी केली आहे. परमावधीचा ऐहिक उत्कर्ष व पारलौकिक निःश्रेयस् साध्य होण्यास योग्य अशी ही पुण्यभूमि सर्वांचें प्रेमानें स्वागत करण्यास सदैव सज्ज आहे.



## संक्रमणकाल : : ३

इसवी सनाच्या एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं महाराष्ट्र देशांत रावबाजीची कारकीर्द चालू होती. हिंदुपदपादशाहीची संस्थापना करणाऱ्या श्रीशिवछत्रपतीच्या नांवाखालीं झालेला राज्यविस्तार आर्यावर्तातील बहुतेक महत्त्वाचा भाग व्यापून राहिलेला होता. हिंदुपदपादशाहीचें मुख्य सिंहासन साताऱ्यास असलें तरी, बहुतेक सत्ता पुण्यपत्तनस्थ पेशवाईकडे गेलेली होती. परंतु रावबाजीच्या कारकीर्दींतील बऱ्याचशा दोषांमुळें पेशव्यांनीं निर्माण केलेले बहुतेक सरदार मुख्य सत्तेशीं फटकून, आपापली सत्ता बळकट करण्याच्या व्यवसायांत गुंतले होते. साम्राज्याची व्यापक दृष्टि नाहींशी होऊन प्रत्येकाच्या मनांत स्वार्थबुद्धि प्रबळ झाल्यामुळें, आपल्या पायापुरतेंच पाहण्याची जरूरी वाटूं लागली होती. रावबाजीच्या कारकीर्दीत दूरदर्शी मुत्सद्देगिरी शुष्क झाली होती. शौर्य, धैर्य व तेजस्विता लोपली होती. सहानुभूति व सहकार्य यांचा मागमूसही राहिला नव्हता. अशा प्रकारें संपूर्ण मराठा साम्राज्य विस्कळित होऊन गेलें होतें. अंतस्थ बेबंदशाही माजली होती. देह, दारा व धन यांची सुरक्षितता राहिली नव्हती. सामान्य जनता या कारकीर्दीस कंटाळली होती. ‘ मळमळीत सौभाग्यापेक्षां ढळढळीत वैधव्य बरें ’ अशीच

सर्वांची भावना झाली होती. उघड उघड रीतीनें पेंढारी लोकांनीं राज्यांत लूट चालविली होती व तिचा नीट बंदोबस्त न झाल्यामुळें प्रजा अत्यंत त्रस्त झाली होती.

इसवी सन १८१७ हें वर्ष रावबाजीच्या कारकीर्दींचें अखेरचें वर्ष होतें. परकीयांनीं पेशवाईला चोहोंकडून घेरलें होतें. हा काल महाराष्ट्राच्या, किंबहुना सर्व आर्यावर्ताच्या भवितव्यतेचा निकाल लागावयाचा होता. पेशवाई सत्तेला ग्रासून टाकणारी कंपनीची सत्ता प्रबल झाली होती. ह्या सत्तेनें हिंदुस्थान देशांतील बहुतेक सर्व प्रदेशांमध्यें शिरकाव केला होता. महाराष्ट्राच्या पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या चारी दिशांना कंपनीचें जाळें पसरलें होतें. निजामच्या राज्यांत कंपनी-सरकारच्या वकिलाचें बरेंच प्रस्थ होतें. रावबाजीनें तावे-दारीचा तह केल्यामुळें अंतस्थ व्यवहारांत ढवळाढवळ कर-ण्याचा अधिकार कंपनीला प्राप्त झाला होता. रावबाजीच्या सत्तेला वसईच्या तहानें संकुचित केलें होतें. शिंदे, होळकर, गायकवाड व पटवर्धन यांच्यांशीं वेगवेगळे स्वतंत्र तहनामे करून शेवटच्या बाजीरावाची केविलवाणी स्थिति करून सोडली होती. १८१७ मध्यें खडकी येथें पेशव्यांच्या सेना-पतीचा पराभव करून, पुणें शहर कर्नल स्मिथ यानें काबीज केल्यावर बाजीरावसाहेबाना सातारच्या छत्रपतीला बरोबर घेऊन पळत सुटावें लागलें.

कंपनीची सत्ता अशा प्रकारें मराठा साम्राज्याच्या विस्कळित स्थितीचा फायदा घेऊन, पेशवाईतील शेवटच्या पुरुषाच्या हात धुवून मागें लागली होती, तो काल अत्यंत धामधुमीचा होय. या झगड्यांत यशश्री बाजीरावाकडे पाहील असें कोणासही वाटलें नाहीं. हिंदुस्थानची भवितव्यता निश्चित नव्हती तरीं, बहुतेक अनुमान मराठा साम्राज्याच्या विरुद्ध होतें. या साम्राज्याची बळकटी मोडून बरेच दिवस होऊन गेले होते. रावबाजी अधिकारारूढ झाले त्याच कुमुहूर्तावर हें साम्राज्य खिळखिळें झालें होतें. त्यापूर्वी म्हणजे सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत हिंदुस्थानच्या भवितव्यतेचें भविष्य कोणीही हिंदुपदपादशाहीला अनुकूल असेंच केलें असतें. पण ईश्वरी इच्छा तशी नव्हती. हिंदुस्थानला नवीन जगाशीं सुधारलेल्या देशाशीं संबद्ध करून, कांहींसें नवीन वळणावर आणून सोडावें, असा ईश्वरी संकल्प असल्यास नकळे ! हिंदी राष्ट्राला भयंकर शिक्षा करून नंतरच नवीन तऱ्हेच्या राज्यव्यवस्थेचें शिक्षण मिळावें हा विधिलेख खरा व्हावयाचा होता !

१८१७ हा काळ 'संक्रमणकाळ' होता, असें आम्ही म्हणतों त्याचें कारण आतां वाचकांच्या ध्यानीं आलेंच असेल. राज्यलक्ष्मी, सत्ता वैभव आणि तेजस्विता यांसह दुसरीकडे जाण्याची—परकीयांच्या हातीं जाण्याची—वाट पाहत होती, असा हा काल आहे. एका प्रसरणशील राज्यसत्तेचा उदयकाल

असल्यामुळें, तिच्या गळ्यांतच हिंदी भवितव्यतेनें माळ घालावी असा वरील चारी देवतांनीं एकमतानें निश्चय केला होता असें दिसतें.

बंगाल, मद्रास, कर्नाटक, पश्चिमेकडील देश व उत्तर हिंदुस्थान इत्यादि सर्व ठिकाणीं कंपनीचा बोलबाला चालला होता. कंपनीस शाश्वत स्वरूप यावयास पाहिजे होतें. पेशवाई पचनीं पडल्यास साम्राज्य पदवी मिळविणें कंपनीस अत्यंत सुलभ होतें. म्हणूनच बाजीरावसाहेबाचा कंपनीच्या प्रतिनिधीनें पाठलाग चालविला होता.

इसवीसन १५९९ च्या शेवटच्या दिवशीं एलिझाबेथ राणीकडून सनद मिळवून प्रतिष्ठित झालेली ही कंपनी केवळ व्यापाराच्या मिषानें या देशांत उतरली. प्रथमचीं दीडशें वर्षे हिने निवळ व्यापारांत घालवून अगणित द्रव्य स्वदेशीं नेलें. द्रव्य जवळ झाल्यावर राज्यसत्तेची हांव सुटते, त्याप्रमाणें हिलाही राज्यसत्तेची प्रबल इच्छा होऊन प्रयत्नास सुरवात झाली. यशापयशाच्या आंदोलनांत झोंके खातां खातां शेवटीं सन १७५७ सालीं बंगाल प्रांतांत इचे बूड स्थिर झालें. तथापि इतर प्रांतांत म्हणण्यासारखें प्राबल्य व्हावयास जवळ जवळ पुढील पन्नास वर्षे गेलीं. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं चोंहोकडे जाळें पसरण्या इतकें सामर्थ्य इच्यांत आलें. पुढें गंगाधरशास्त्र्याच्या खुनाचें निमित्त उपस्थित होऊन रावबाजीवर चढाई करून जाण्याची अनुकूल संधि हिला प्राप्त झाली.

रावबाजीला कोणीकडून मदत मिळणार नाहीं, यदाकदाचित् कोणी मदत करण्यास येतील तर त्यांच्या आधींच आपण त्यांस गांठावें अशा विचारानें कंपनींने चढाई चालविली होती.

असा हा आणीबाणीचा काळ होता. निजामच्या राज्यांत या वेळीं अंतस्थ अव्यवस्था होती तरी कंपनीला भिण्याचें कारण नव्हतें. या वेळीं हैद्राबादेंत रेसिडेंटची योजना झाली होती. एच रसेल या नांवाचा रेसिडेंट या वेळीं हैद्राबादेस होता. अशा प्रकारच्या अगदीं विपरीत काळामध्यें व परिस्थितीमध्यें आमच्या चरित्रनायकाचा जन्म झाला आहे ! !

प्रभूंच्या जन्माच्या संधीस अशी परिस्थिति असावी हीं विधिघटना विचित्र आहे खरी ! प्रभूंचा जन्म होऊन एका वर्षाच्या आंत पश्चिमेकडे राज्यलक्ष्मीचा उदय व्हावा हें दिसण्यांत विपरीत असलें, तरी त्यांतही कांहीं तरी ईश्वरी संकेत असला पाहिजे हें उघड आहे.

सूर्योदयकालीन सृष्टिशोभायुक्त पूर्व दिशेचें ऐश्वर्य पाहण्याची उत्कंठा लागलेल्या लोकांना सूर्यास्त व तदनंतरची अंधारी रात्र कष्टमय वाटली तरी, ती अनुभवणें प्राप्तच असतें. राष्ट्राला सुद्धा उदयास्त आहेतच. उदयकालाची अपेक्षा असणाऱ्या राष्ट्राला अस्ताच्या दिव्यांतून गेल्याशिवाय सोयच नाहीं. प्रखर व तापदायक चंडांशु अस्तंगत झाल्याशिवाय शांत व शीतल प्रकाश देणाऱ्या चंद्राचा लाभ कसा व्हावा ?

अधिभौतिक संपत्तीनें पश्चिमेकडे प्रयाण केलें तर पूर्वेकडून अध्यात्मिक प्रथा आपल्या कोमल, शांत व रमणीय प्रकाश-किरणांनीं जगतास आनंद देण्यास उदय पावत, हा सिद्धांत खरा ठरविणें हें प्रभूचेंच कर्तव्य होतें.

हिंदुस्थानचें वैभव अस्तंगत होण्याच्या समयास श्रीमाणिकप्रभु महाराजांचा जन्म झाला आहे. विपरीत परिस्थितींत व प्रतिकूल कालीं महात्म्यांचा जन्म होणें पूर्वापार वहिवाटीविरुद्ध नव्हतें. भगवान् श्रीकृष्णाचा जन्म अशाच अणीबाणीच्या प्रसंगीं व तोही कारागृहांत झाला आहे ! किंबहुना चोहोंकडे अस्वस्थता, व बेबंदशाही होऊन धर्माची ग्लानी होते, अधर्म बोकाळतो, अशाच प्रसंगीं परमेश्वरास अवतार घेणें भाग पडतें. हिंदुस्था-नच्या राज्यव्यवस्थेची घडी विसकटली होती; सर्वत्र फाटाफूट होऊन केवळ आपल्या पायापुरतें पाहण्याची निरनिराळ्या प्रांतातील संस्थानिकांना बुद्धि होऊन स्वार्थ मनस्वी बोकाळला होता. मध्यवर्ती सत्ता नांवाची सुद्धा राहिली नव्हती. राज्य-कर्ते व प्रजा यांचें परस्परांविषयींचे पवित्र कर्तव्य पायांखालीं तुडविलें जात होतें. राज्यकर्त्यांच्या गर्भित अथवा प्रत्यक्ष संम-तीनें प्रजा लुटली जावी हा केवढा अधर्म !

स्वार्थबुद्धि पराकाष्ठेला गेली, तरी त्यांत दूरदर्शीपणाचा भाग असता तरी ठीकच होते. प्रत्येकाला आपलें लहानसें राज्य बळकट करून शाश्वत जगून राहण्याची जरी यत्किंचित इच्छा

असती, तरी ते कंपनी सरकारच्या धोरणाची अटकळ बांधण्यास समर्थ होते. परकीय लोक आपल्या कामांत निष्कारण ढवळाढवळ करून आपले हातपाय कसे बेमालूम आंवळून टाकीत आहेत, याकडे बारीक रीतीनें कोणीही नजर पुरविली नाहीं. मग त्यांचा देश, तेथील भाषा, तेथील राज्यव्यवस्था, त्या लोकांची शिस्त वगैरे महत्त्वाच्या गोष्टींचा बारकाईनें शोध कोण करीतो ?

अज्ञान, भयंकर अज्ञान, आपसांतील वैमनस्य, द्वेष आणि आपल्या पोळीपुरते तूप पाहण्याची क्षणिक लोभी वृत्ति इत्यादि दुर्गुणांनीं अंध होऊन, एका कालीं भाग्यशिखरावर अधिष्ठित झालेल्या या राष्ट्रानें, पारतंत्र्याची श्रृंखला, आपल्या पायांत अडकवून घेतली ! हें राष्ट्रीय पाप होय. याचे अधिकारी तत्कालीन सर्व राज्यकर्तें म्हणविणारे होते, यांत मुळींच संदेह नाहीं. अशा प्रकारें जीर्ण होऊन निरुपयोगी बनलेली, एकतंत्री राज्यव्यवस्था अस्तंगत होणे अपरिहार्य होतें. आंब्याची कोय पूर्णपणें नासून नाहींशी होण्यापूर्वी, तिच्यामधून चैतन्ययुक्त नवीन वृक्षाचा अंकुर फुटतो, हा सृष्टिधर्म सर्वश्रुतच आहे.

आधिभौतिक ऐश्वर्यवान सत्तेनें पश्चिमेकडे प्रयाण करण्यापूर्वी आध्यात्मिक शांतिप्रधान सत्तेनें आपल्या कोमल किरणांचा प्रकाश पाडणें रास्तच होतें. याच न्यायानें, एकोणिसाव्या

शतकांतल्या एका अत्यंत मौल्यवान नररत्नाचा, आध्यात्मिक सत्तेच्या रूपानें उदय होण्यास हा संक्रमण कालच अधिक-योग्य होता असें आमचें म्हणणें आहे. देशाच्या किंवा जगताच्या कल्याणाकरितां अध्यात्मशक्तीचा उत्कर्ष होणें अत्यंत आवश्यक आहे, हें आतां अलीकडील सुशिक्षित कबूल करीत आहेत. प्रथम अध्यात्मिक तेजानें प्रकाशित झालेला महाराष्ट्र, श्री शिवाजी महाराजांचें उत्तम कार्यक्षेत्र बनला असें इतिहास सांगतो. अलीकडे शंभर वर्षांत अध्यात्मिक ओजानें ओतप्रोत भरलेले जे पुरुष निर्माण झाले, त्यांमध्यें अग्रपूजेचा मान आमच्या चरित्रनायकाचाच आहे ही गोष्ट पुढील चरित्रकथेनें उघड होणार आहे. तथापि एकच महत्त्वाची बाब या ठिकाणीं सांगणें इष्ट वाटतें कीं,आज ज्या गोष्टीची उणीव भासते,तिची यथार्थ कल्पना श्री प्रभु महाराजांना शंभर वर्षांपूर्वी आली होती. आजचें हिंदुस्थानचें राजकारण सकलमतस्थापित राज्यव्यवस्थेच्या भोंवतीं परिभ्रमण करीत आहे, हा केवढा चमत्कार आहे ! भिन्न भिन्न राजकीय मतें एकत्र जमून त्यांनीं एक विचारानें स्थापन केलेली जी राज्य-व्यवस्था तीच 'सकलमत स्थापित' राज्य व्यवस्था होय. आज आपले पुढारी काय करीत आहेत ? आजच्या सरकारची बळकटी तरी कशांत आहे? जगांतील वातावरण आज सकल-मतस्थापित राज्यव्यवस्थेला अधिकच अनुकूल होत

आहे कीं नाहीं ? देशाच्या ऐहिक उत्कर्षाला, सुखाला व शांतीला सकलमतस्थापित राज्यव्यवस्था असणें आत्यंतिक आवश्यक असल्याचा ध्वनि सर्व जगांतील राष्ट्रांमध्यें आज दुमदुमून राहिला आहे. ( Self determination ) स्वयं-शासनाचें तत्त्व प्रभूच्या जन्मानंतर बरोबर शंभर वर्षांनीं सर्व-मान्य झालें आहे, व त्याच जोरावर आज आपल्या देशांत सर्वतोमुखीं सकलमतस्थापित राज्यव्यवस्थेची मागणी सुरू आहे.

सकलमतस्थापित प्रभूंच्या अध्यात्मिक सत्तेचा प्रादुर्भाव आज स्पष्ट दृग्गोचर होत आहे, जगताच्या ऐहिक ऐश्वर्याला, स्वास्थ्याला व मोक्षाला सकलमत धर्मच उपकारक आहे. सर्व धर्म, सर्व मतें आपापले हट्ट सोडून व द्वेषभाव विसरून प्रेमाच्या अधिष्ठानावर एकत्र जमतील, तेव्हांच या सकलमत संस्थापक प्रभूच्या प्रभावाचा साक्षात्कार होणार आहे. असा काल जवळ जवळ येत आहे ही आनंदाची गोष्ट होय.





# पूर्वेतिहास व जन्म

## कुलवृत्त : : १

इसवी सनाच्या एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं निजामच्या राज्यांतील एका पोटसंस्थानिकाच्या राजधानींत मनोहर नाईक या नांवाचे देशस्थ ऋग्वेदी आश्वालायन शाखेचे एक सुखवस्तु ब्राह्मण गृहस्थ राहत होते. या राजधानीला 'कल्याणी' असें नांव त्या वेळीं होते व अजूनही तेंच नांव चालू आहे. या कल्याणीला कोणी 'कल्याण' असेंही म्हणतात. या शहराचा समावेश महाराष्ट्रांत होतो. मात्र महाराष्ट्राचा हा भाग सांप्रत निजामच्या राज्यांत असल्यामुळें ब्रिटिश महाराष्ट्राच्या नकाशांत हा भाग दिला नाहीं. कलबुर्गा, कल्याण अशा जोड नांवाचा उल्लेख केव्हां केव्हां होत असतो. मुंबईजवळ एक कल्याण म्हणून गांव आहे. त्या गांवापासून हें कल्याण भिन्न आहे हें दाखविण्याकरितां याला कलबुर्ग्याच्या गळ्यांत बांधला आहे असें वाटतें. कल्याणी अगर कल्याण हीं दोन्हीं नांवें, सध्या या एकाच गांवाला प्रचलित आहेत.

मनोहर नाईक हे मूळचे कल्याणीचे रहिवासी नव्हते. 'हरकुड' या नांवच्या एका खेडे गांवांतून, त्यांचें घराणें कल्याणास आलें होतें म्हणून त्यांना कल्याणास आल्यानंतर 'हरकुडे' हें उपनांव प्राप्त झालें होतें. पूर्वीच्या कालीं उपनांवांचा उपयोग बहुतकरून क्वचितच करीत असत. उपनांवें हीं बहुधा वतनावरून अथवा धंद्यावरून किंवा राहण्याच्या गांवावरून देण्यांत येत असत. मनोहर नाईकांचे वाडवडिल कल्याणास येऊन राहिले होते म्हणून कल्याणास ते 'हरकुडे' झालें. मूळ हरकुडास ते काय होते हें नाईक या उपनांवावरून दिसून येत आहे. सराफी अथवा सावकारी करणारास, नाईक असें म्हणण्याचा परिपाठ आहे. त्याप्रमाणें त्यांचा वडिलार्जित धंदा सराफीचा व सावकारीचा असावा हें उघड आहे.

मनोहर नाईकांचें घराणें हरकुड सोडून कल्याणास आलें त्या वेळीं त्यांचा सावकारीचा धंदा चालू नव्हता. तो त्यांनीं सोडला होता, पण 'नाईक' या उपपदानें त्यांना सोडलें नव्हतें. त्यांच्या पिढीपुरतें हें उपपद व उपनांव चालू राहून पुढील पिढीला या उभयतांनाही रजा मिळाली हें पुढील कथानकावरून दिसून येईल. मनोहर नाईकांचें घराणें ईशभक्त असून सात्विक वृत्तीचें होतें. मनोहर नाईकांच्या वडिलांचा जन्म कल्याणीस झाला. वडिलांचें नांव नृसिंह नाईक. केशव नाईक यांचे हे पुत्र. केशव नाईक यांनीं बेदरजवळील 'झरणी नृसिंह' नांवाच्या पवित्र क्षेत्रांत राहून अनुष्ठान केल्या-

नंतर त्यांना पुत्र झाला म्हणून त्या पुत्राचें नांव नृसिंह असें ठेविलें. केशव नाईक हे जसे सात्त्विक गुणसंपन्न होते तसे बाणेदार वृत्तीचेही होते असें म्हणतात. वडिलार्जित संपत्तीच्या वांटणींत न्यायाला अनुसरून जो भाग मिळावयास पाहिजे होता तो मिळत नाहीं असें पाहून त्यांनीं आपला सर्व हिस्सा आपल्या बंधूस देऊन फक्त एका कुलस्वामी श्री खंडेरायाच्या मूर्तीसह ते हरकुड सोडून कल्याणास येऊन राहिल्याची आख्यायिका आहे.

केशव नाईकांनीं आपल्या मुलाचा व्रतबंध करून विवाह केला. नृसिंहास श्रीरामनामाचा उपदेश त्यांनींच दिला. व स्नुषेस हनुमंताची उपासना सांगितली. नृसिंह नाईक व त्यांची पत्नी बच्चंमा यांच्या उदरीं, मनोहर नाईकांचा जन्म झाला. बच्चंमा देवी श्रीमारुतिराय नित्य नैवेद्य भक्षण करून गेल्याशिवाय अन्न घेत नसत असें एका चरित्रकारानें लिहिलें आहे. बच्चंमा अत्यंत भाविक व प्रेमळ होत्या. त्यांच्या उदरीं दोन पुत्र झाले. वडील पुत्र मनोहर नाईक, शके १७०९ मध्यें कल्याण येथें जन्मले. कनिष्ठ पुत्र मार्तंड नाईक यांचा जन्म शके १७११ मध्यें झाला. हे दोन्ही मुलगे अल्पवयी असतांच बच्चंमावर पतिनिधनाचा दुर्धर प्रसंग कोसळला. पतिनिधनानंतर बच्चंमा लाडवंती या गांवीं आपल्या माहेरीं येऊन राहिल्या. निजामचे राज्यांतल्या पायगा

इलाख्यांतील प्रतापपुर तालुक्यांत लाडवंती हा गांव आहे. रामतीर्थ, हें स्थान लाडवंतीच्या अगदी नजीकच आहे.

या धैर्यशाली स्त्रीनें अशा दुर्धर प्रसंगींही न डगमगतां, आपल्या दोन्ही पुत्रांचें चांगल्या रीतीनें संगोपन करून तत्कालीन उपयुक्त विद्येमध्यें त्यांना प्रवीण केलें होतें. मनोहर नाईक जसे सात्विक व प्रेमळ भक्त होते, तसेच बहुश्रुत व विद्वान् गृहस्थही होते. त्यांनीं केलेलीं कांहीं पदें उपलब्ध झालीं आहेत, त्यावरून ते भक्त कवि होते हें स्पष्ट दिसतें. बालपण लाडवंतीस गेल्यानंतर त्यांचा विवाह झाला. शरीरसंबंध कल्याणचे अप्पाराव कुलकर्णी यांची कन्या बयंमा यांच्याशीं होऊन पुनश्च ते कल्याणास येऊन राहूं लागले. मनोहर नाईक अत्यंत मातृभक्त होते. प्रेमळ व ईशसेवानिरत अशा मातेच्या देखरेखीखालीं मनोहर नाईक हे वाढल्यामुळें, त्यांचें संपूर्ण आयुष्यही सर्वस्वीं उदात्त कार्यांत खर्च झालें. त्यांच्या प्रेमळपणावर लुब्ध होऊन, त्यांचें उपदेशामृत घेण्यास आतुर झालेले बरेच शिष्यगण होते. या शिष्यगणांत सर्व जातींच्या लोकांचा समावेश होत होता. त्यांचे कनिष्ठ बंधु मार्तंड नाईक हे अल्पवयी निवर्तले.

बयादेवीसारख्या अभिजात उच्च मनोवृत्तीच्या सात्विक स्त्रीशीं मनोहर नाईकांचा समागम झाल्यामुळें, त्यांचा प्रपंचच परमार्थ बनला होता. स्त्रीपुरुषात्मक हे दोन जीव परस्पर भिन्न-

शरीरी दिसत असलें तरीं, पारमार्थिक श्रेष्ठतेंत ते एकाच पातळींत असल्यामुळें प्रपंचांतील खऱ्या सौख्याचा अनुभव घेत होते. अशा प्रकारें बच्चंम्मा देवींच्या प्रेमळ कृपाछत्राखालीं आनंदानें नांदत असलेल्या या दांपत्यास शके १७३५ सालीं प्रथम पुत्र लाभ झाला. बच्चंमास श्रीहनुमंताची उपासना असल्यामुळें त्यांच्या आज्ञेनें या पुत्रास हणमंत असें प्राकृत नांव ठेविलें. यांनाच पुढें हणमंतरावदादा ऊर्फ दादामहाराज असें नामाभिधान प्राप्त झालें.

बहुतेक सर्व चरित्रकार हणमंतराव यांना मारुतीचा अवतार समजतात व ते मुंज होईतोंपर्यंत बोलत नव्हते असें लिहितात. मुंजीनंतर ते चांगले बोलूं लागले. त्या वेळच्या रीतीप्रमाणें त्यांनीं व्यावहारिक शिक्षणाचा लाभ घेतला होता, तरी त्यांची वृत्ति पुढें बहुतेक मौनीपणाचीच राहिली. एकांतप्रियता हा त्यांचा स्वभाव बनला होता.

मनोहर नाईकांच्या व त्यांच्या कुटुंबाच्या अनुष्ठानाचें फळ मिळण्याचा समय प्राप्त झाल्याचें चिन्ह त्यांना दिसूं लागलें. अंतःकरणाची प्रसन्नता, उच्च मनोवृत्ति आणि पारमार्थिक श्रेय संपादन करून घेण्याची आतुरता या जोडप्यामध्यें मूर्तिमंत वसत होती. परमश्रेष्ठप्रतीचा पुत्र व्हावा ही तीव्रतर इच्छा त्या उभयतांना होती. वंशाचा, देशाचा, धर्माचा व जगताचा उद्धार करणारा पुत्र आपल्या कुशींत निपजावा असें कोणत्या सत्त्वगुणसंपन्न मातेस वाटणार नाहीं ? अलीकडील

सुप्रजाजननशास्त्राचा त्या जोडप्यास गंधही नव्हता. तथापि आर्य संस्कृतींत जन्म घेऊन वाढलेल्या या दंपत्यास आत्मोद्धाराची प्रबलतर इच्छा होती. कोणी म्हणतात कीं, उत्तम सुलक्षणी व सर्वसामर्थ्यसंपन्न पुत्र व्हावा म्हणून बयंमानी गोमूत्रांतील दशमी खाण्याचें व्रत पुष्कळ वर्षें केलें होतें. तें कांहीं असलें तरी आपल्या पोटीं उत्तम कुलदीपक पुत्र व्हावा अशी त्यांना इच्छा असणें साहजिक होतें.

मनोहर नाईक रामभक्त होते. ते रामनवमीचा उत्सव करीत असत. शके १७३९ ची रामनवमी त्यांनीं मोठ्या उत्साहानें साजरी केली. त्यांचें भाग्य उदयास येण्याचा तोच दिवस ईश्वरी संकेतानें ठरला होता. हीं उभयतां पतिपत्नी त्या दिवशीं कर्तव्यपरायण होऊन आनंदमग्न झालीं असतां विलक्षण तेजस्वी गर्भसंभवाची प्रतीति होऊन त्यांना दृष्टांत झाल्याचें सर्वश्रुत आहे. दृष्टांत झाल्याचा हा दिवस म्हणून या दिवशीं श्रीनगरीं श्रीप्रभुजन्मोत्सव अद्यापपावेतों होत असतो. असो. हा गर्भ सृष्टिक्रमाप्रमाणें परिणत अवस्थेस पोंचल्यानंतर पुत्ररूपानें बाहेर आला. शके १७३९ मार्गशीर्ष शु॥ १४ रोज मंगळवार या दिवशीं मनोहर नाईक यांना द्वितीय पुत्र होऊन पुढें त्याचें नांव ‘ माणिक ’ असें ठेविलें. या पुत्राच्या जन्मानें मनोहर नाईक यांच्या कुलाचा, देशाचा धर्माचा व जगताचा उद्धार कसकसा झाला हेंच आम्हास या चरित्रकथानकांत सांगावयाचें आहे.

या अद्वितीय नरश्रेष्ठाचा जन्म बयंमाच्या अथवा बयाबाईंच्या उदरीं झाल्यामुळें तिला देवीपद प्राप्त होणें योग्यच आहे. बच्चंमाचे माहेरीं म्हणजे मनोहर नाइकांच्या आजोळीं लाडवंती येथें प्रभूंचा जन्म झाला.'यास सिद्धाची लाडवंती असेंही म्हणतात. इचे जवळच रामतीर्थ नगरी असल्याचें वर निर्दिष्ट केलेंच आहे. मनोहर नाईक यांना या पुत्रप्राप्तीनें परमावधीचा आनंद झाला. या बालकाचें जातक त्यांनीं स्वतः वर्तवून लाडवंती येथील जयाप्पा सोनाराच्या कड्यांत तें भूर्जपत्र घालून ठेविलें होतें. मनोहर नाईकांची मातुःश्री बच्चंमा यांनाही या नातवाच्या जन्मानें अत्यानंद झाला हें सांगणें नको. बच्चंमा या आपल्या आवडत्या नातवंडास 'रत्न्या' या लाडक्या नांवानें हाक मारीत असत, त्याप्रमाणें वडील व मातुःश्री त्याच नांवाचा उपयोग करीत. आपल्या कुलांत हें एक अद्वितीय रत्न निर्माण झालें आहे, अशी त्या सर्वांची भावना होती. ईश्वरी तेजाचा प्रवाह अव्याहत चाललेला असतो. विशिष्ट हेतूस्तव अवतार घेण्याचें ईश्वरी संकेतानें ठरलें असल्यास त्या अवतारांतील भूमिकेस योग्य असें कुल पाहावेंच लागतें. त्याप्रमाणें श्रीप्रभूंनीं या कुलाची निवड केली.पूर्वीचें हें कुल सामान्य स्थितींतील होतें. ऐहिक ऐश्वर्य, सत्ता, अथवा व्यावहारिक शहाणपण यांचा लाभ या कुलास झाला नव्हता. मात्र सात्त्विक संपत्तीचें हें कुल माहेरघर होतें. म्हणूनच प्रभूंनीं यांचा आश्रय करून

या कुळाचा सर्व बाजूंनीं उद्धार केला. कार्यावरून कारणाचें महत्त्व मानण्यांत येतें हा लौकिक व्यवहार आहे. संपूर्ण प्रकारें उत्कृष्ट असें फळ चाखावयास मिळालें तर तें ज्या वृक्षावर येतें, तो वृक्षही श्रेष्ठ प्रतीचा गणला जातो. त्या न्यायानें हें कुळ अत्यंत श्रेष्ठ प्रतीचें गणलें जाणें योग्यच आहे. प्रभूंच्या जन्मकाळीं चोहोंकडे दिव्य प्रकाश पडून साक्षात् श्रीदत्तात्रेय प्रकट झाले, व वरप्रसाद देवून नंतर बालकरूप धारण करिते झाले, अशा प्रकारचें वर्णन बहुतेक सर्व चरित्रकारांनीं केलें आहे. पुढील प्रभुचरित्र स्वतः अवलोकन किंवा श्रवण केलें असल्यामुळें, अशा प्रकारच्या लोकोत्तर नरमणीचा जन्महीं लोकोत्तर रीतीनेंच व्हावा अशी त्यांची प्रेमळ भावना झाली यांत अयोग्य असें कांहींच नाहीं. एका सामान्य कुळांत जन्म पावलेला तरुण, स्वतः निस्संग, निर्विकार, अनिकेत, व अकिंचन स्थितींत राहून तत्कालीन जनता आपल्याकडे प्रेमानें आकर्षण करून घेण्यास समर्थ होतो. हजारों नव्हें लाखों जीवांना अन्न, वस्त्र, व धन देऊन संतुष्ट करतो व सर्व प्रकारें ईप्सित पूर्ण करणारा मूर्तिमंत कल्पद्रुम होऊन राहतो. इतकेंच नव्हे तर, जगताला आदर्शभूत होणारें एक तत्त्व स्वतः आचरणांत आणून त्याची स्थापना करतो; हिंदु, मुसलमान, शीख, जैन, लिंगायत इत्यादि अनेक जातींच्या व धर्मांच्या लोकांना आपापले स्वाभाविक वैरभाव विसरावयाला लावून सर्वांना एकाच ठिकाणीं प्रेमानें नांदवून, त्यांच्या-

कडून ' प्रभुरेव प्रभु:साक्षात्, ' ' पीरान् पीर दस्तगीर, ' ' नानक सोहि मानिक ' ' धन्य प्रभु ' इत्यादि धन्योद्गार काढवितो. हें पाहून व ऐकून कोणता मनुष्य प्रभूच्या दैवी सामर्थ्याच्या प्रभावानें दिपून जाणार नाहीं ! लोकोत्तर पुरुषाचें लोकोत्तरत्व पाळण्यांत असल्यापासूनच सुरू होतें, हें म्हणणें अवास्तव नाहीं. प्रभूचें प्रभुत्व लहानपणापासूनच प्रकट झालें, हें पुढील प्रकरणावरून वाचकांच्या ध्यानांत येणारें आहे.

श्रीमाणिकप्रभूंचा जन्म होतांच घरच्या सर्व मंडळीस आनंदीआनंद झाला. मातापितरांना या दिव्य पुरुषाची खूण पटून त्यांनीं आनंदोत्सव केला हें यथायोग्यच झालें. पण सृष्टिदेवीसुद्धां त्या वेळीं आनंदभरित झाली होती. या वेळीं सर्व वातावरण दिव्य आनंदानें भरून गेलें होतें. ईश्वर नाम संवत्सर अन्वर्थक नाम झालें. ' मासानां मार्गशीर्षोऽहम् ' ही भगवदुक्ति प्रसिद्धच आहे. वर्षाच्या बारा महिन्यांत हा मार्गशीर्ष महिना अनेक दृष्टींनीं श्रेष्ठ मानिला जातो. या महिन्यांतील शु॥ १४ च्या रात्रीं चंद्र, रोहिणी नक्षत्रीं होता. दिवस व रात्र पूर्ण प्रकाशमान होतीं. प्रकाशाला खंड पडला नव्हता. वार मंगलसूचक व रक्तवर्ण दर्शक होता. उत्तम प्रकारचा वर्षाकाल झाल्यामुळें, पृथ्वी सर्व प्रकारच्या पिकांनीं आच्छादून गेली होती. तरुलता टवटवीत झाल्या होत्या. नदी, नाले, विहिरी यांचें पाणी स्वच्छ झालें होतें. सुवत्ता व

आरोग्य अनुभवास येत असल्यामुळें, पशु, पक्षी व मनुष्यें सुखांत होतीं.

लोकोत्तर सामर्थ्यसंपन्न विभूति जन्मास येतात, त्या वेळीं कारण न समजतांही सर्वांचीं अंतःकरणें प्रमुदित होत असतात. सृष्टिदेवीच बहुतेक या आनंदोत्सवांत पुढाकार घेत असते. पूर्वींच्या अनेक चरित्रांत याचें प्रत्यंतर पाहण्यास सांपडेल. भगवान् श्रीकृष्ण जन्मास आले, त्या वेळीं विपरीत परिस्थितींत सुद्धां, वसुदेव देवकी यांना परमावधीचा आनंद झाला यांत नवल काय ? पण त्या वेळीं सर्व सृष्ट पदार्थही आनंदातिशयानें उचंबळले होते, असें श्रीमद्भागवतांत म्हटलें आहे. श्रीप्रभुचरित्रकारांनीं, या वेळीं लाडवंती गांवांतील लोकांनीं सुद्धां घरोघर उत्सव केले असें म्हटलें आहे, तें खरें आहे. मूर्तिमंत सच्चिदानंदानें या पृथ्वीतलावर देह धारण केल्यावर सर्व वातावरण आनंदमय झालेंच पाहिजे.

अथ सर्वगुणोपेतः कालः परमशोभनः ॥
यर्ह्येवाजनजन्मर्क्षं शान्तर्क्षग्रहतारकम् ॥ १ ॥

दिशः प्रसेदुर्गगनं निर्मलोडुगणोदयम् ॥
मही मंगलभूयिष्ठपुर ग्रामव्रजा ऽऽकरा ॥ २ ॥

नद्यः प्रसन्नसलिला ह्रदा जलरुहश्रियः ॥
द्विजालिकुलसंनादस्तबका वनराजयः ॥ ३ ॥

ववौ वायुः सुखस्पर्शः पुण्यगंधवहः शुचिः ॥
अग्नयश्च द्विजातीनां शान्तास्तत्र समिन्धत ॥ ४ ॥

मनांस्यासन् प्रसन्नानि साधूनामसुरद्रुहाम् ॥
जायमानेऽजने तस्मिन्नेदुर्दुन्दुभयो दिवि ॥ ५ ॥

—श्रीमद्भागवत स्कंध १०, अ. ३

भगवान् श्रीकृष्ण जन्मास आले त्या वेळीं, अशा प्रकारचें सृष्टीचें स्वरूप होतें.

"नंतर सर्व उत्तम लक्षणांनीं संपन्न आणि परम मंगल कारक असा भगवंताचा जन्मकाल प्राप्त झाला. त्या वेळीं सर्व नक्षत्रें, ग्रह व तारा शांत असून चंद्र रोहिणी नक्षत्रांत होता. सर्व दिवस दिशा प्रसन्न झाल्या, आकाशांत निर्मल नक्षत्रें उदय पावलीं. पृथ्वीवरील नगरें, गांवें, गौळवाडे व रत्नादिकांच्या खाणी या ठिकाणीं मंगलोत्सव सुरू झाले. नद्यांचें पाणी स्वच्छ झालें, डोहांत कमळेंच कमळें होऊन विलक्षण शोभा आली. वनराजींतील पुष्पगुच्छ, पक्षी आणि भ्रमरसमुदाय यांच्या शब्दांनीं नादयुक्त झाले. पवित्र सुगंध वाहून आणणारा आणि म्हणून ज्याचा स्पर्शही अत्यंत सुखावह आहे असा शुद्ध वारा वाहू लागला. ब्राह्मणांचे अग्नि शांतपणें प्रज्वालित होऊं लागले. असुरांचा द्वेष करणाऱ्या सज्जनांचीं मनें प्रसन्न झालीं. जन्मरहित असा भगवान् जन्मास येत असतां स्वर्गांत दुंदुभी वाजूं लागल्या."

वरील वर्णन शब्दशः श्रीप्रभूंच्या जन्मकालास लागू होण्यासारखें आहे. बहुतेक सर्व चरित्रकारांनीं अशा अर्थाचेंच वर्णन दिलें आहे.

यानंतर मनोहर नाईकांना तृतीय पुत्राचा लाभ झाला.याचा जन्म शके १७४९ सर्वजित् नाम संवत्सर पौष शु॥ १३ सोमवार या दिवशीं होऊन त्याचें नाव नृसिंह असें ठेविलें. बच्चंमाचें वृद्धपण होऊन त्यांनीं देह ठेविला व पुढें कांहीं कालानें मनोहर नाईक यांनीं इहलोकचें कार्य संपवून परलोकीं प्रयाण केलें. बयादेवी आपल्या तिन्ही अल्पवयी पुत्रांसह, कल्याणास राहूं लागल्या. बयादेवीचे बंधु कल्याणास नवाबाचे पदरीं नोकरीस होते. त्यांचा आधार त्यांना बराच मिळाला. प्रभूंचें बालपण बहुतेक कल्याणासच गेलें. तिकडे आपण आतां वळूं.

टीप:—तीन पुत्रांशिवाय मनोहर नाईकास चिमणाबाई नांवाची एक कन्या होती.



## कल्याण : : २

॥ वृषभाद्रि कल्याण नगर ॥ तीर्थें असती अपरंपार ॥
॥ न होय संसार येरझार ॥ त्या क्षेत्रा आचरावें ॥

### प्राचीन इतिहास

इतिहासांत कल्याण शहराचा प्रथम उल्लेख इसवी सनाच्या अकराव्या शतकांत आला आहे. या कल्याणास कल्याणी असेंही एक नांव असल्याचें पूर्वीं कळविलेंच आहे. हैद्राबाद संस्थानांतील एका जहागीरदार नबाबाचें हें सध्या मुख्य ठिकाण आहे. हें शहर पूर्वींच्या कालीं महाराष्ट्राच्या राजधानीचें मुख्य नगर मानलें जात होतें. चालुक्य वंशांतील पहिल्या सोमेश्वर राजानें हें गांव आपल्या राजधानीचें ठिकाण केलें. अकराव्या शतकांत या वंशाकडे राजसत्ता येऊन ती सुमारें शंभर वर्षेंपावेतों कायम राहिली. इसवी सन १०७६ च्या सुमारास प्रसिद्ध मिताक्षराकार विज्ञानेश्वर याचा अंत या ठिकाणींच झाला. विज्ञानेश्वर हा भारद्वाज गोत्री पद्मनाभ भट्टोपाध्यायाचा मुलगा, व उत्तमपाद नामक गुरूचा शिष्य होता, असा उल्लेख सांपडतो. कल्याणीचा विक्रमार्क राजा याचा आश्रयदाता होता. विज्ञानेश्वर हा पुढें संन्यासी झाला. याची याज्ञवल्क्य स्मृतीवरील 'मिताक्षरा' नांवाची टीका सर्व प्रसिद्ध असून,ती हिंदुस्थानांतील बहुतेक भागांत प्रमाण मानली जात

आहे. प्रसिद्ध काश्मीरी कवि बिल्हण यानें आपल्या "विक्रमाङ्कदेव चरित" या संस्कृत महाकाव्याच्या द्वितीय सर्गांत तत्कालीन कल्याण शहराचें फार सुरस वर्णन केलें आहे.

चालुक्य वंशांतील तिसरा तैल नांवाचा राजा कल्याणास होऊन गेला, त्याचा सेनापति बिज्जल यानें राजाविरुद्ध बंड करून आपण राज्य बळकावून बसला. बिज्जल व त्याच्या वंशाकडे हें राज्य सुमारें सत्तावीस वर्षें राहिलें. (११५६ पासून ११८३ पर्यंत). बिज्जल हा कलचुरी वंशांतील पुरुष होय. हें कलचुरी घराणें प्राचीन कालच्या 'हैहय' नांवाच्या क्षत्रिय घराण्याची शाखा होय. ह्या वंशाचें चेदि देशावर महाभारत काळीं राज्य होतें. बिज्जल हा महाशूर होता. कल्याणी हेंच आपल्या राजधानीचें शहर कायम ठेवून त्यानें अनेक प्रदेश जिंकिले. म्हैसूरपर्यंत त्याचा अंमल बसला होता. बिज्जल क्षत्रिय होता, तरी जैन मताचा होता. या वेळीं कर्नाटकांत बौद्ध व जैन मतांविरुद्ध वीरशैव धर्माची लाट उसळली होती. याचा फायदा घेऊन बसव नांवाच्या बिज्जलाच्या ब्राह्मण प्रधानानें बंड उभारून त्याचा मोड केला. (११६७) बिज्जलाचा वडील मुलगा सोमेश्वर यानें बसवाचा पराभव करून पुन्हा राज्य केलें. इसवी सन ११८३ मध्यें चालुक्य वंशांतील चौथा सोमेश्वर यानें आपलें राज्य परत घेतलें. पण लगेच एक वर्षांत होयसळ यादव वीर बल्लाळ यानें चालुक्य व कलचुरी या दोन्ही घराण्यांचा नाश करून

आपलें साम्राज्य स्थापिलें. कल्याणीचें महत्त्व पूर्वीच्या दोन्ही घराण्यांनीं कायम राखिलें होतें. देवगिरीच्या यादव वंशाकडे याचें स्वामित्व गेलें तें बरेंच वर्षे टिकलें. चौदाव्या शतकांत बहामनी राज्याची स्थापना झाल्यानंतर त्यांच्याकडे व नंतर विजापुरच्या मुलखांत याचा समावेश झाला. १६५३ सालीं हा गांव मोंगलांनीं लुटला. कल्याणचा किल्ला अवरंगजेबानें मोठ्या शिकस्तीनें १६५६ सालीं सर करून घेतला. हिंदु राजांच्या हातून गेल्यानंतर अनेक प्रसंगीं जीं रणकंदनें झालीं, त्यामुळें या ठिकाणीं असलेलीं कित्येक सुंदर देवळें उध्वस्त झालीं. १७९५ च्या सुमारास मराठ्यांच्या स्वारीच्या भयामुळें येथील किल्ल्यांत निजामानें लढाईची कडेकोट तयारी केली होती असें म्हणतात.

लिंगायत धर्माचा संस्थापक बसवेश्वर या ठिकाणींच उदयास आला. बिज्जल राजाचा हा अमात्य होता हें वर लिहिलेंच आहे. बसवेश्वराचें जन्मस्थान कलादगी तालुक्यांतील 'बागेवाडी' नांवाचें एक गांव होतें. कृष्णा व मलप्रभा यांच्या संगमावर असलेल्या 'कप्पदि' गांवीं ह्याचें वास्तव्य असे. हा आराध्य जातीचा ब्राह्मण. याच्या प्रथम पत्नीचा जनक कल्याणच्या बिज्जल राजाचा अमात्य होता. सासऱ्याच्या मरणानंतर याला अमात्यपद मिळालें. आपला भाचा चन्नबसव याच्या मदतीनें यानें एक स्वतंत्र मत स्थापन केलें व जंगमांचा पुरोहित वर्ग तयार केला. जंगमांचा पगार राजाच्या

खजिन्यांतून दिला म्हणून राजाची इतराजी होऊन त्यास पकडण्याचा हुकूम सुटला. पण लिंगायत धर्मानुयायांच्या सहाय्यानें बंड पुकारून यानें राजाचा पराभव केला. राजा ठार मारला गेला. राजपुत्रानें या गोष्टीचा सूड उगविण्याकरितां बसवेश्वराचा पाठलाग केला, तेव्हां संगमेश्वरास पळून जाऊन तेथील शिवलिंगांत तो गडप झाला, असें लिंगायत लोक म्हणतात. याच्यानंतर चन्नवसवाकडे लिंगायत धर्माचें पुढारीपण आलें. वसवेश्वराची बहीण पद्मावती ही विज्जलाची राणी होती असेंही म्हणतात. अलंप्रभु अथवा प्रभुलिंग हा बसवाचा सहकारी असून त्याला गणपतीचा अवतार मानतात.

सांप्रत हें गांव निजामच्या राज्यांतील एका मुसलमान जहागीरदाराचें मुख्य ठिकाण झालें आहे. जहागीरदारास नबाब असें म्हणतात. अवरंगजेब बादशहाच्या मरणानंतरच्या धामधुमींत निजामउल्मुलुकाप्रमाणें नवाबाचे पूर्वज उत्तरेकडून इकडे नशीब काढण्याकरितां आले. मीरकलाखां ऊला व मीरकलाखां सानी हीं त्यांचीं नांवें होत. आलमगीर बादशहाच्या कारकीर्दींत त्यांचें बरेंच आयुष्य गेल्यामुळें साहजिक महत्त्वाकांक्षेनें प्रेरित होऊन हे बंधु दक्षिणेंत आले. कल्याण व बेदर या ठिकाणीं सुभेदार बनले. निजामउल्मुलूकाला राज्य स्थापन करण्यास शांततेची जरूरी होती व सरदारांचीही अनुकूलता पाहिजे होती. याकरितां त्यानें अनेक लोकांचें सहाय्य घेतलें. त्यांत मोंगल दरबारांतील सरदारांप्रमाणें

हिंदुपदपादशाहींतून फुटून निघालेले कित्येक मराठे सरदारही होते. वरील वंधुद्वयाचा उपयोग निजामशहाला कितपत झाला तें समजत नाहीं. तथापि या प्रांतांतील मराठा सरदार चंद्रसेन जाधव व त्याचा पुत्र राजा रामचंद्र जाधव यांचें प्राबल्य लयास जाईतोंपर्यंत सध्याच्या नबाबाच्या पूर्वजांस कल्याणची जहागिरी मिळाली नाहीं. सन १७६९ च्या सुमारास कल्याणच्या नबाबास सत्तर हजाराची जहागीर मिळाली असा उल्लेख सांपडतो. याच वर्षी राजा रामचंद्र जाधव याचा अंत झाला आहे. कल्याण व आसपासच्या मुलखांत मराठ्यांचें प्राबल्य फारच होतें. कल्याणांतील देशपांडे व इतर इनामदार मंडळीकडे राजा रामचंद्र जाधवांनीं दिलेल्या सनदा आढळतात. या सनदा राजा रामचंद्र व त्याचा बाप चंद्रसेन या दोघांनींही करून दिलेल्या होत्या. या उभयतां पितापुत्रांची सविस्तर हकीकत आम्ही पुढील प्रकरणांत 'हुमनाबाद' या सदराखालीं देणार आहों.

अवरंगज़ेब बादशहाच्या मृत्यूनंतर ( १७०७ ) साठ वर्षें कल्याणच्या आसपास मराठे सरदारांचें प्राबल्य निर्विवाद होतें. तदनंतर कल्याण हें प्रस्तुतच्या नबाबाच्या घराण्याकडे गेलें, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं.

## आजचें कल्याण

आजच्या प्रवाशांस कल्याण हें गांव फारसें आकर्षक वाटणार नाहीं. सामान्य जनतेची स्थिति संपन्न दिसत नाहीं.

चोहोंकडे ओसाड दिसतें. जुनी मोठमोठालीं घरें पडत्या कालाचें प्रदर्शन करीत आहेत. तथापि या घरांवरून पूर्वींच्या संपन्नतेच्या कालाची कांहींशी कल्पना होते. एका कालीं या गांवांत सोन्याचा धूर निघत असावा, असें अनुमान "गोसावी गल्ली" पाहणारास सहज होतें. हैद्राबाद संस्थानांत जे ठिकठिकाणीं श्रीमान गोसावी लोक आहेत, त्यांचें मूल स्थान हें कल्याणच होय. येथें त्यांच्या मंहतांचा मठ आहे. मठाचें काम उत्कृष्ट आहे. इमारत पक्क्या दगडाची व चुनेगच्चीची आहे. या इमारतींत गेल्यावर, एखाद्या पूर्वींच्या राजवाड्यांत आल्याचा भास होतो. गोसावीगल्लींत दहाअकरा मोठालीं घरें (मठ) आहेत. सर्वांचा नमुना एकच आहे. गोसावी लोक पूर्वीं अत्यंत संपत्तिमान व तसेच दानशूरही होते. मोठमोठ्या राजेरजवाड्यांना कर्जाऊ रकमा देऊन, त्यांजकडून प्रांताचा वसूल घेत असत, त्यामुळें त्यांच्या हातांत सत्ताही असे. कल्याणच्या मुख्य महंतास सध्या सरकारांतून जहागीर असल्याचें समजतें. पूर्वींच्या कालीं या महंताजवळ पांचशें अरब लोक नोकरीस होते असें म्हणतात. गोरगरिबांना अन्नदान व दक्षिणा यांची रेलचेल असे. गोसावी लोकांनीं बांधलेल्या विहिरी पाहून मन थक्क होतें. सर्वांत मोठी विहीर म्हणजे एक तळेंच असून तें एक प्रेक्षणीय स्थल आहे. ही विहीर चौकोनी असून, एका बाजूनें, उतरण्यास घाटाप्रमाणें पायऱ्या केल्या आहेत. या पायऱ्या इतक्या प्रशस्त आहेत कीं, पन्नास गायी विहिरींत उतरून सहज

एकदम पाणी पिऊं शकतील. या चौकोनी विहिरींच्या प्रत्येक बाजूची लांबी दोनशें फूट आहे. याच नमुन्याच्या दुसऱ्या लहान विहिरी चोहोंकडे आहेत.

प्रेक्षणीय स्थलांपैलीं, किल्ला हें महत्त्वाचें स्थल आहे. किल्ला फार प्राचीन कालचा असावा असें दिसतें. मुसलमानी सत्तेपासून त्याचें स्वरूप पालटलें आहे. आंतील बराच भाग फारच जुना व पडीक आहे. किल्ल्याभोंवती खंदक आहे, पण सध्या त्यांत पाणी नाहीं. सांप्रत या ठिकाणीं मालकांपैकीं कोणी नसल्यामुळें, सर्वत्र भयाण दिसत आहे. सध्याच्या नवाबाची जहागीर नबाब अज्ञान असल्यामुळें निजाम सरकारच्या " कोर्ट ऑफ वॉर्डस " च्या ताब्यांत आहे. नबाबसाहेब हैद्राबादेस राहतात, त्यामुळें किल्ल्यांतील त्यांचा राहता भाग अस्वच्छ दिसतो. किल्ल्याच्या उंच भागीं, ताजमहाल या नांवाचा बंगला असून तेथेंच सध्यांचे नबाबसाहेब येथें असले तर राहत असतात. या इमारतींतून कल्याणचा देखावा उत्तम दिसतो.

उंच ठिकाणावरून पाहिल्यास कल्याण हें एखाद्या दाट झाडींत वसल्याप्रमाणें दिसतें. गावांत व गांवाभोंवतीं झाडें विपुल आहेत. त्यांत आंब्यांच्या बागा पुष्कळच आहेत. किल्ल्यांत जुन्या तोफा पुष्कळ आहेत. पूर्वीं लढाईस तयार ठेवलेल्या स्थितींतच कांहीं तोफा आहेत. एक नवगजी तोफ आहे, तिच्याजवळच दारूचें कोठार असून जवळ शेंकडों

दगडाचे गोळे पडलेले आहेत. त्यांचा उपयोग लढाईंत करीत असावेत असें वाटतें. ठिकठिकाणीं मोर्चेबंदी असून तोफाही मांडल्या आहेत. परंतु या तोफा सांप्रत निरुपयोगी बनल्या आहेत. कांहीं पंचरसी तोफा आमच्या पाहण्यांत आल्या. किल्ल्याच्या एका बाजूला गांव आहे. किल्ल्यावरून चोहों-कडे तोफांचा मारा होण्यासारखा आहे. परंतु सध्या हा किल्ला इतक्या पडक्या स्थितींत आहे कीं,याच्या आंतील साधा-रण दुरुस्तीसुद्धां, साठ-सत्तर हजार उत्पन्न असणाऱ्या जहा-गीरदाराच्या हातून होणें कठीण आहे. एका काळीं आपण फार शक्तिमान् व वैभवशाली होतों, यापेक्षां आज रोजीं अधिक असें कांहीं या किल्ल्यास सांगतां येईल असें वाटत नाहीं.

किल्ल्यावरून सकाळच्या वेळीं सुमारें पाऊण मैलावर असलेल्या, पूर्वीच्या नबाबसाहेबाच्या कबरस्थानावरील सुवर्ण-कळस चकाकलेले दिसतात. सध्या या इमारतीस "बंगला" अशी संज्ञा आहे. हें कबरस्थान व मशीद हीं पाहण्यासारखीं आहेत. या ठिकाणींही नबाबाचें वास्तव्यस्थान आहे. पूर्वीच्या आर्य संस्कृतींत तयार झालेलें उत्कृष्ट कारागिरांचें काम उध्वस्त होऊन गेल्याचें पाहून, मन उद्विग्न होतें. उद्विग्न करणारे भाग या कल्याणांत पुष्कळ आहेत.

सदानंदस्वामींचा मठ हें अत्यंत पुरातन स्थळ पाहण्या-सारखें आहे. सदानन्दस्वामी हे प्रसिद्ध रामानन्द स्वामींचे

गुरु होत. हे काशीकडील गौड ब्राह्मण असून, गुरूच्या आज्ञेवरून इकडे आले. 'चेत अवधूत' असें ते नेहमीं म्हणत. याला प्रत्युत्तर ज्या ठिकाणीं मिळेल, त्या ठिकाणीं रहा असें गुरूंनीं सांगितल्यावरून ते दक्षिणेंत आले. त्यांना त्याचें प्रत्युत्तर कल्याणांत मिळालें, म्हणून ते येथेंच राहूं लागले.त्यांच्यासंबंधानें पुष्कळ आख्यायिका आहेत. ज्ञानेश्वराप्रमाणें यांनींही भिंत चालविली असें म्हणतात. ही भिंत अजूनही पूर्वीच्या स्थितींत संभाळून ठेविली आहे.

यांनीं आपल्या शिष्यांकडून मठाचें काम पुरें केलें, आणि जमिनीच्या आंत तळघर करून त्यांतील एका कमानींत आपण वसून समाधि घेतली. हें तळघर बरेंच खोल आहे. तेथें आणखी दोन समाधि आहेत. त्यांत पूर्णानंद स्वामीची एक समाधि आहे. पूर्णानंद हे शिवरामस्वामीचे तीर्थरूप व गुरु होत. शिवरामस्वामीची कीर्ति सर्वश्रुत आहे. गावांत यांचें निवासस्थान असून हल्लीं तेथें यांचे कांहीं वंशज असतात. त्यांची प्रतिभासंपन्न काव्यसरस्वती मराठी भाषेस भूषणभूत झाली आहे. शिवराम स्वामी हे सदानंद स्वामीच्या शिष्यपरंपरेंतील असून सदानंदापासून दहावे पुरुष होत. समर्थ कालीं शिवरामस्वामी हे समर्थ पंचायतनांतील एक होते. त्यांची कविता अलीकडे छापून निघाली आहे.

मठ पक्क्या दगडांनीं बांधलेला आहे. मठास दोन हजार रुपयांचें उत्पन्न असून, खर्चही बराच आहे. मठाभोंवतीं

बाग चांगली आहे. सध्याच्या स्वामींचें या बागेवर चांगलें लक्ष असल्यामुळें मठाला शोभा आली आहे. याखेरीज मुसलमान वली " राजे बागसवार " यांचा दर्गाही पाहण्यासारखा आहे.

प्राचीन स्थानांपैकीं बसवेश्वराचा मठ ऐतिहासिक दृष्ट्या पाहण्यासारखा आहे. बसवेश्वरासंबंधींची संक्षिप्त हकीकत यापूर्वीं वर आलीच आहे. लिंगायत धर्माचें आदिस्थान या दृष्टीनें याचें महत्त्व अधिक आहे. मठाचें छायाचित्र यासोबत दिलें आहे, त्यावरून सध्याच्या मठाची कल्पना होईल. या गांवांत हल्लीं प्रभूची गादी आहे. संस्थानाकडून या गादीची पूजा, झोळी वगैरेकरितां एक मनुष्य नेमला आहे. त्यानें गादीची व्यवस्था चांगल्या प्रकारें ठेविली आहे. कुळकर्णी आळींतील आपल्या मामाच्या घरीं असतांना मारुतीच्या देवळानजीकच्या कट्टयावर प्रभु नेहमीं बसत, त्याच ठिकाणीं ही गादीची इमारत तयार झाली आहे. यासोबत गादीचें छायाचित्रही दिलें आहे. प्रभूच्या बालपणांतील प्रथमच्या लीला याच गांवीं झाल्यामुळें या गादीचें फार महत्त्व आहे. ज्या ठिकाणीं लहानाचे मोठे झाले, त्या ठिकाणीं इतकी मान्यता असणें, जरा विशेषच होय.

एकंदरींत आजचें कल्याण गांव पडक्या स्थितींत दिसत असलें, तरी भोंवतालची जमीन सुपीक असून ठिकठिकाणीं बागबगीचे व आंबराया यांची गर्दी असल्यामुळें अरण्यांतील

आश्रमस्थानाप्रमाणें भासतें. प्राचीन पावित्र्य या गांवाला बरेंच लाभलें आहे व महाराष्ट्रांत हें गांव एक वेळ वरिष्ठ प्रकारचें मानलें जात होतें. गोसावी लोकांनीं बांधलेल्या विहिरी व बागा यांच्यामुळें भोंवतालच्या भागाला चांगली शोभा आली आहे. पूर्वींच्या कालच्या दानशूर गोसाव्यांनीं हजारों आंब्यांचीं झाडें लावून, आल्यागेल्या गोरगरीबांना ते यथेच्छ आंबे खाऊं घालून वाटेल तितकें ओझें नेऊं देत असत, अशी आख्यायिका सांगतात. धर्मार्थ देण्यांत येत असलेले आंबे पिकत घालण्याकरितां बागेंतच पक्की इमारत बांधून ठेविली आहे; ती पाहिल्यावर तर मनुष्य चकित होऊन जातो. आज या बागांचे धनी धर्मादायाकडे पाहत नाहींत; कारण या मोठ्या बागाच त्यांचें निर्वाहाचें साधन होऊन बसल्या आहेत.

कल्याणपासून दोन मैलांवर 'तिपरांत' अथवा 'त्रिपुरांतक' नांवाचें एक प्रचंड तळें आहे. त्यांतील पाणी गांवांत येऊन भोंवतालच्या जमिनीस व बागांस मिळतें. बिल्हणाच्या 'विक्रमाङ्क देवचरितांत' श्रीतैलप या चालुक्य सम्राटानें पुत्रप्राप्तीकरतां 'त्रिपुरांतक' येथें तपश्चर्या करून श्रीशिवाला प्रसन्न करून घेतलें असा उल्लेख आहे. तें रमणीय स्थल हेंच असावें अशी कल्पना होते.

या 'त्रिपुरांतक' तलावाजवळच 'आकनागण्णाची गवी' आहे. इकडे गुहेला गवी असें म्हणतात. ही गुहा फार

प्राचीन काळची असून पाहण्यासारखी आहे. तलावाजवळ उभें राहून भोंवतालीं अवलोकन केल्यास सृष्टिशोभा विलक्षण दिसते. कल्याणचा बाहेरचा भाग फारच मनोहर दिसतो. जलाशय, गुहा, टेकड्या व हिरव्या गार वृक्षांची गर्दी यांमुळें भोंवतालच्या प्रदेशास फारच रमणीयता आली आहे. अशा या सभोंवारच्या रमणीय प्रदेशांतच, प्रभुमहाराजांच्या बालपणांतील बहुतेक भाग गेला असल्यामुळें त्याचें अत्यंत महत्त्व आहे. आजही प्रभूची अगाध लीला येथें सर्वत्र ऐकूं येत आहे.



# शिक्षण : : ३

प्रभूंचें बहुतेक बालपण कल्याणासच गेलें. या कल्याण-संबंधीं सविस्तर हकीकत, यापूर्वीं दिलीच आहे. त्यावरून कल्याण क्षेत्राची खरी योग्यता आमच्या वाचकांना समजून आली असेलच. प्रभूंनीं त्या ठिकाणीं ज्या कांहीं विविध लीला केल्या, त्यांचें स्मरण, त्यांच्या सवंगड्यांस मरेतोंपर्यंत होत असे. श्रीकृष्णाची बाललीला ज्याप्रमाणें गोकुळवृंदावनांत चिर-स्मरणीय झाली, त्याप्रमाणें प्रभुलीलाही प्रेमळ भक्तांना, केवळ स्मरणानें, आनंदाचें भरतें येण्यास कारणीभूत झाली. हा कथा-भाग यापुढील प्रकरणांत देण्याचें आम्हीं योजिलें आहे.

प्रभूंच्या लहान वयांतील मुख्य गोष्ट शिक्षणाची होय. हें व्यावहारिक शिक्षण प्रभूंना कोणाकडून मिळालें हें समज-ण्यास मार्ग नाहीं. सामान्य समजूत अशी आहे कीं, प्रभूंचें शिक्षण त्या वेळच्या कोणत्याही शाळेंत झालें नाहीं. तत्कालीन शाळा गांवठी पंतोजीच्या असत. अक्षरओळख, पत्रलेखन, हिशेब, जमाखर्च वगैरे व्यावहारिक शिक्षण देणारे पंतोजी लहान विद्यार्थ्यांना केवळ यमस्वरूपी वाटत असत. तात्या पंतोजी व त्याची छडी यांचा भयंकर दरारा असे. सध्याच्या पिढीच्या लोकांना या पंतोजीच्या शाळांची कल्पना येणें दुरा-पास्त आहे. पूर्वीं साधारण शिक्षणाची इच्छा करणाऱ्या मुलाला या शाळेशिवाय दुसरी सोयच नसे. त्या वेळीं शिक्षणाचे दोन-

चारच प्रकार असत. एक साधारण अक्षरओळख झाल्यावर वैदिक विद्या शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचा वर्ग असे. दुसरा शब्द-रूपावलि, अमरकोश वगैरे शिकून व्याकरणादि शास्त्रें शिकणाऱ्यांचा वर्ग. हे बहुतेक शास्त्री म्हणविले जात असत.तिसरा त्या वेळची राजभाषा—दरबारी भाषा-फारशी, ऊर्दू वगैरे शिकून सरकारी नोकरींत शिरणाऱ्यांचा वर्ग. हे पुढें नशीबाच्या कमी-अधिक प्रमाणानें मोठमोठे अंमलदार होऊन उदयास येत. चौथा लिहिणें, वाचणें, हिशेब, जमाखर्च शिकून व्यापारी कारकुनी करणारांचा वर्ग. हा वर्ग बहुतेक मध्यम स्थितींतच राहून समाधान मानी.

या चार प्रकारच्या शिक्षणक्रमापैकीं कोणत्याही प्रकारचें शिक्षण, प्रभूंनीं एखाद्या शाळेंत अगर पंतोजीकडून घेतल्याचें कोणासही ठाऊक नव्हतें. एवढी गोष्ट मात्र निर्विवाद आहे कीं, त्यांचा व्रतबंध मनोहर नाईक यांनीं करून, त्यांना गायत्री मंत्राचा उपदेश दिला. मनोहर नाईकांच्या देखरेखीखालींच प्रभूंना अक्षरओळख झाली असावी. प्रभूंच्या हस्ताक्षरांना एक जुन्या तऱ्हेचें वळण आहे. हें या पुस्तकांत स्वतंत्रपणें दिलेल्या त्यांच्या हस्ताक्षराच्या नमुन्यावरून उघड होणार आहे. व्यवहाराच्या कामीं जरूर असलेलें प्राथमिक शिक्षण त्यांना मनोहर नाईकांकडूनच मिळालें असावें. अगदीं लहानपणापासून, प्रभूंचा एक अलौकिक दिव्य पुरुष म्हणून लौकिक होता. बालपणच्या अनेक

लीलांवरून ते अवतारी होते, अशी सर्वांची खातरी झाली होती. अशा प्रसिद्ध व थोर पुरुषाच्या विद्यागुरुत्वाचा मान आपल्यास लाभला असें म्हणणारा कोणीही गृहस्थ उपलब्ध नव्हता व नाहीं, व अशा महात्म्यांचा एखादा व्यावहारिक गुरु असला, तरी "पुण्यात्मनामत्र तथाविधानां निमित्तमात्रा गुरवो भवन्ति" या बिल्हण उक्तिनुरूप ते केवळ निमित्त-मात्रच होत.

मनोहर नाईकास आपल्या या पुत्राचें महत्त्व समजून आलें होतें. अशा पुरुषास शिक्षण कोणी द्यावें व तें कशाचें द्यावें, हा मोठाच प्रश्न होता. प्रभूंच्या बालपणांतील मुख्य काल, स्वतंत्र वृत्तीनें, रानावनांत, जंगलांत फिरून सवंगडी जमवून नानाप्रकारचे खेळ खेळण्यांत गेला, हें वरवर पाहणाऱ्यास दिसून येतें. पण या विविध खेळांतसुद्धां प्रभूंचें प्रभुत्व दिसून येत होतें. शिक्षण हें चार भिंतीच्यामध्यें असलेल्या कांहीं विवक्षित जागीं व कांहीं विवक्षित व्यक्तीं-कडूनच मिळविल्याशिवाय मिळूं शकत नाहीं, असा सर्व-सामान्य सिद्धांत आहे. आधुनिक शिक्षणसंस्था अशाच प्रका-रच्या आहेत. विश्वविद्यालय असलें, तरी तें वरील वर्णानांत येतें. प्रचंड इमारत, उत्तम सामानसुमान, मोठा ग्रंथसंग्रह व वरिष्ठ प्रतीचे नामांकित शिक्षक यांच्या सहाय्यानें अलीकडील विद्यार्थीवर्ग, आपलें शिक्षण घेऊन यशस्वी झाल्यावर, विश्वविद्या-लयाचा त्याच्यावर छाप बसतो व तो विश्वविद्यालयाचा पदवीधर

बनतो. अशा प्रकारच्या शिक्षणाचा मार्ग प्रभूंना अवगत नव्हता ही गोष्ट खरी आहे. पण खरें विश्वविद्यालय कसें असतें, हें प्रभूंनाच पूर्णपणें माहीत होतें व खरें ज्ञान कोठें असतें व तें कसें प्राप्त करून घ्यावें हें प्रभूंनीं पक्कें जाणलें होतें.

जन्मतःच दिव्य तेजस्वी व ज्ञानसंपन्न असलेल्या प्रभूला कोणाकडून ज्ञान प्राप्त करून घेण्याची आवश्यकता नव्हती, ही गोष्ट खरी असली, तरी व्यवहाराच्या दृष्टीनें मानवी देह धारण करणाऱ्या सर्व विभूतींनीं सृष्टिक्रमाला अनुसरून व पूर्व व्यवहारास धरून आपला वर्तनक्रम ठेवल्याचें दिसून येतें. मानवी देह जसजसा क्रमाक्रमानें वाढत जातो, तसतसें बाल, यौवन व वार्धक्य या अवस्थांमधून जाणें त्याला भागच असतें. देहाचे संस्कार, देहाच्या अवस्था या यथाशास्त्र पाळूनच सर्व अवतारी पुरुषांनीं आपापलें नियोजित कार्य शेवटाला नेलें आहे. प्रभूंचा देह सृष्टिक्रमानुसार वाढत होता. त्यांचा देहभोग सुटला नव्हता. देहाच्या वाढीबरोबर जरूर असणाऱ्या सर्व गोष्टी त्यांच्या हातून घडत गेल्या. बालपणचें शिक्षण आपल्या पुढील कार्याला आवश्यक तेवढें त्यांनीं संपादन केलें होतें. पण तें इतर सामान्य लोकांच्या दृष्टीनें जसें संपादन करावयास पाहिजे होतें, तशा प्रकारचें मात्र नव्हतें.

प्रभु कधीं शाळेस गेले नाहींत. इतर मुलांप्रमाणें पुस्तक, पोथी वगैरे घेऊन पाठ करीत बसले नाहींत. बालपणचा बहुतेक सर्व काळ सवंगडी जमवून, नाना प्रकारचे खेळ

खेळण्यांत, त्यांनीं घालविला. कित्येक प्रसंगीं भयंकर राना-वनांत एकटेंच फिरावें; विविध पशुपक्ष्यांच्या संगतीनें व वृक्ष-लतादिकांच्या सांन्निध्यानें स्वच्छंद क्रीडा करावी; गुहांमध्यें शिरून, एकांतांत कांहीं दिवस घालवून, देवस्थानें, तीर्थें यांना भेटी द्याव्यात, अशा प्रकारचा त्यांचा क्रम असे. व्याव-हारिक शिक्षण घेऊन, त्या शिक्षणाच्या जोरावर, आपल्या कुटुंबाचें भाग्य उदयास आणावें, अशी त्यांच्या आप्तवर्गाची अपेक्षा असणें साहजिक आहे. विशेषेंकरून त्यांचे मामा, बळवंतराव आपाराव कुळकर्णी यांची, त्यांच्यामागें शिक्षणाच्या बाबतींत फारच टोंचणी असे. बळवंतराव हे कल्याणीच्या नवाबाच्या पदरीं मोठ्या अधिकाराच्या जागेवर होते. त्यांच्या-जवळ शिपाई,जवान वगैरे बरेच असत. शाळेला जाण्यासंबं-धानें प्रयत्न करून यश येत नाहीं, असें दिसल्यानंतर, त्यांनीं प्रभूला शिपायांच्या पहाऱ्यांत देण्यासही कमी केलें नाहीं. पण शिपाई लोकांच्या सक्त नजरेंतूनही प्रभु सहज लीलेनें निसटून जात. एकदां तर शाळेला न जातां हा मुलगा कोठें जातो हें पाहण्याकरितां गुप्तपणें पाठलाग करीत स्वतः मामा प्रभूंच्या मागें बरेच लांबवर गेले. प्रभूंना अरण्यांत शिरतांना पाहून हेही मागोमाग जाऊं लागले तोंच एक भयंकर वाघ समोर उभा असल्याचें पाहून, गर्भगळित होऊन मामा परत फिरले. प्रभूंनीं शाळेस जावें म्हणून केलेल्या कोणत्याही प्रयत्नास यश येत नाहीं हें पाहून त्यांनीं तो नाद अखेर सोडून दिला.

प्रभूंच्या या स्वच्छंद व स्वैर वर्तनानें कित्येक लोकांना हा मुलगा वेडा असावा असें वाटलें व 'वेडा भाऊ' असेंही नांव त्यांना प्राप्त झालें. तथापि हा वेडा दिसणारा मुलगा महाज्ञानी आहे अशीही कित्येक जाणत्या लोकांची खातरी झाली होती. प्रभूंच्या वाणीमध्यें अद्भुत सामर्थ्य आहे असा पुष्कळांना दाखला येत होता. अगदीं अल्पवयांतच प्रभूंच्या या अमृतमय वाणीचा लौकिक कल्याण व आसपासचीं खेडीं यांमध्यें पसरला होता. आपलें काम कसें होईल, केव्हां होईल वगैरे प्रश्न प्रभूंना वारंवार विचारण्यांत येत असत. वेड्या भाऊची वाणी सत्य झालीच पाहिजे अशी निष्ठा लोकांमध्यें वाढत चालली होती. त्यामुळें एक प्रकारचा आदर उत्पन्न झाला होता. ह्या वेड्याचें रूप कधीं उत्तम थाटांत दिसे, कधीं लंगोटी घालून, तर कधीं अंगाला राख लावून दिगंबर झालेलें दिसे, कधीं कधीं प्रतिष्ठित माणसें बसतात, त्याप्रमाणें आसन ठोकून मोठमोठ्या उदात्त गोष्टी बोलत बसलेलें असे. बहुतेक वेळा तर प्रभु मुलांच्या संगतींत वाटेल त्या खेळांत दंग झालेले दिसत. त्यांच्या संगतींत मुलांना अतिशय आनंद होत असे. त्यांच्या भाषणांत व वागण्यांत एक प्रकारचा आकर्षक प्रभाव होता. प्रभूंच्या सांगातीं मुलांचा मेळा सदैव असे. खडीसाखरेस लागलेल्या मुंग्यांप्रमाणें मुलें प्रभूला बिलगून असत. प्रभूंच्या बरोबर कसल्याही ठिकाणीं व कोणत्याही काळीं, मुलें आनंदानें जात असत. तीं प्रभूंच्या सहवासांत अगदीं निर्भय असत.

प्रभूबरोबर बालक्रीडा केलेल्या एका वृद्ध गृहस्थाची व आमची सुमारें तीस वर्षांपूर्वीं भेट झाली होती. त्यांनीं प्रभूंचें नांव आमरण मुखांत वागविलें होतें. प्रभूंच्या बाललीलांचें वर्णन करीत असतां, त्यांना अत्यंत गहिंवर येई व "हाय रे प्रभु, आम्हांस त्या वेळीं तूं आपला अंत दिला नाहींस. आम्हीं तुझें वास्तविक स्वरूप न ओळखतां तुझ्याशीं बरोबरीच्या नात्यानें खेळलों, कुस्ती केली, पोहलों, झाडावर चढलों, मारामारी केली, अनेक गोष्टी केल्या." असे प्रेमोद्गार त्यांनीं काढावेत व डोळ्यांतून अश्रुधारांचा लोट बाहेर यावा. अंत:करण प्रेमातिशयानें उचंबळून येऊन त्यांचें बोलणें बंद पडावें. गोष्ट सांगतां सांगतां गोष्टीचें भान विसरून, वाचेनें प्रभुनामाचें संकीर्तन अखंड चालावें.

प्रभूंच्या बाललीलांचें यथायोग्य वर्णन करणें आमच्या शक्तीबाहेरचें आहे. आबालवृद्धांना आपल्या प्रेमानें आकर्षण करून घेणारा वेडा भाऊ, कधीं शाळेस गेला नाहीं; पण शाळा मात्र त्याच्या मागें गेली, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. शाळेंत जाऊन बुद्धीचा तरतरीतपणा वाढविणें व क्रमाक्रमानें ज्ञान प्राप्त करून घेणें ह्या गोष्टी सामान्य विद्यार्थी करीत असतात. शाळेंत गेल्यानें ज्या गोष्टी साध्य करून घेतां येतात, त्या शाळेच्याबाहेरही तितक्याच नव्हे, त्यापेक्षांही उत्तम रीतीनें साध्य करून घेतां येतात, हें प्रभुचरित्रावरून दिसून येणारें आहे. चार भिंतींच्या आंत असलेल्या एका

इमारतीला 'शाळा' हें नांव असलें, तरी, ज्ञान प्राप्त करून घेण्याची जागा, सर्वत्र आहे. तिला मर्यादा घालतांच येत नाहीं. विश्वविद्यालय हें कोणत्याही मर्यादेच्या आंत राहणारें नव्हे. विश्व हेंच ज्याचें विद्यालय आहे, त्यालाच ज्ञानमार्ग सुलभ असतो, ही गोष्ट प्रभूंनीं आपल्या चरित्रानें सिद्ध केली आहे. योग्य अधिकारी विद्यार्थ्यांच्या मागें, विश्वांतील प्रत्येक वस्तु, आपल्याजवळ असलेल्या ज्ञानसंग्रहाचा नजराणा घेऊन धांवत असते, ही गोष्ट प्रभुचरित्रावरून दिसून येईल.

सृष्टिदेवी ही सदैव ज्ञानाचा दरवाजा खुला राखून सर्वांचें स्वागत करण्यास, तत्परतेनें उभी आहे. निर्जीव पदार्थापासूनही ज्ञानप्राप्ति होते ही गोष्ट स्पष्ट होत आहे. मानवी जीवित हें काय आहे, त्याचें इतिकर्तव्य काय व मानवी पूर्णता कशानें होते, या गोष्टींची जिज्ञासा बाळगणाऱ्यास, विश्वामध्यें सर्वत्र ज्ञानसाधन भरल्याचें आढळून येतें. ज्ञानलालसा जितकी तीव्रतर असते, तितक्याच प्रमाणांत ज्ञानसाधनेंही उत्कटतेनें प्राप्त होत असतात. मात्र खरी जिज्ञासा पाहिजे. जिज्ञासेच्या बरोबरच साधनें उत्पन्न होतात. मानवी कर्तव्याची परिसमाप्ति ज्ञानानें होत असते हा सर्वमान्य सिद्धांत आहे. तें ज्ञान योग्य अधिकारी गुरुकडून मोठ्या नम्रतेनें त्यांची सेवा करून, संपादन करण्याचा राजमार्ग जगांत रूढ आहे. हा गुरुसंप्रदाय परंपरागत चालत आला असून, तो सार्वत्रिक आहे.

या राजमार्गाचा अवलंब प्रभूंनीं कां केला नाहीं,हा एक मोठा प्रश्न आहे. व्यवहारांत रूढ असलेल्या मार्गाचा अवलंब न करितांही, प्रभू अत्यंत ज्ञानसंपन्न होते याचें मर्म काय असावें ? मराठी, कानडी, तेलंगी, ऊर्दू, फारशी,अरबी, हिंदी, व्रजभाषा इत्यादि अनेक भाषांवर प्रभूंचें प्रभुत्व होतें. या भाषा त्यांना अत्यंत सफाईनें बोलतां येत होत्या, व या भाषांमध्यें त्यांनीं केलेलीं पदेंही हृदयंगम आहेत.व्यवहाराच्या बाबतींत पाहवयाचें झाल्यास सर्वतोपरी पूर्णता, त्यांच्या ठायीं होती. तत्कालीन बडयाबडया मुत्सद्यांना थक्क करून सोडण्याइतका दूरदर्शी चाणाक्षपणा प्रभूंजवळ होता. वैराग्याच्या बाबतींत प्रभूंची बरोबरी करणारा कोणी नव्हता. औदार्याची ख्याति अमर्याद पसरली होती. आध्यामिक ज्ञानसंपन्नता मूर्तिमंत वास करीत होती.अशा प्रकारचा हा लोकविलक्षण महात्मा, कोणत्याही शाळेंत जाऊन अथवा कोणत्याही गुरूकडे जाऊन शिकला नाहीं, हें आश्चर्य नव्हे काय ?

प्रभुचरित्रांतील हा महत्त्वाचा चमत्कार आहे. इहलोकीं वास्तव्य करणाऱ्यांपैकीं कोणालाही प्रभूंचें गुरुत्व लाभलें नाहीं. तरी पण पुढील चरित्रावरून "गुरु सार्वभौम" ही पदवी प्रभूंच्या आश्रयास आली हें उघड होत आहे. विश्वाचें गुरुपद प्रभूंना प्राप्त झालें, याचें बीज त्यांच्या बालपणच्या कार्यांत दिसून येणारें आहे. प्रभूंची अनेकविध लीला, बालपणीं निसर्गाशीं तादात्म्य पावण्यांत दृग्गोचर होत आहे. शब्द-

सृष्टीच्या वैभवापेक्षां निसर्गजन्य वैभवामध्यें रममाण होण्यांत प्रभूना आनंद होत होता. निसर्ग पदार्थांपासून ज्ञान प्राप्त करून घेण्याची विद्या अलौकिक असते. ती प्रभूला पूर्णपणें अवगत होती. निर्मल निर्झर, सुंदर लता, व डौलदार वृक्ष यांच्या साहचर्यानें अनंत पशुपक्ष्यादिकांच्या अंतःकरणाचा अभ्यास करून त्यांच्याशीं समरस होणें हें प्रभूचें स्वभावजन्य कार्य होतें. पूर्वींच्या इतिहास-पुराणादिकांमध्यें अशा प्रकारचीं उदाहरणें आढळून येतात. श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधामध्यें यदुराजा व श्रीअवधूत यांचा संवाद भगवंतांनीं कथन केला आहे. त्यावरून सृष्ट पदार्थांपासून ज्ञान संपादन करण्याची अवधूतांची पुष्कळ दिवसांची वहिवाट सिद्ध होत आहे.

अवधूतं द्विजं कञ्चिच्चरन्तमकुतो भयम्
कविं निरीक्ष्य तरुणं यदुः पप्रच्छ धर्मवित् ॥१॥

यदुरुवाच—

कुतो बुद्धिरियं ब्रह्मन्नकर्तुः सुविशारदा ॥
यामासाद्य भवाँल्लोकं विद्वांश्चरति बालवत् ॥२॥
प्रायो धर्मार्थकामेषु विवित्सायांच मानवाः ॥
हेतुनैव समीहन्ते आयुषो यशसः श्रियः ॥३॥
त्वंतु कल्पः कविर्दक्षः सुभगोऽमृत भाषणः ॥
न कर्ता नेहसे किञ्चित जडोन्मत्त पिशाचवत् ॥ ४ ॥
जनेषु दह्यमानेषु कामलोभदवाग्निना ॥
न तप्यसेऽग्निना मुक्तो गङ्गाम्भस्थ इव द्विपः ॥५॥
त्वं हि नः पृच्छतां ब्राह्मन्नात्मन्यानन्द कारणम् ॥
ब्रूहि स्पर्शविहीनस्य भवतः केवलात्मनः ॥ ६ ॥

धर्मवेत्त्या यदुराजानें एका तरुण ज्ञानसंपन्न, द्विजश्रेष्ठ अवधूताला (दत्तात्रेयाला) निर्भयपणें स्वच्छंद क्रीडा करीत चाललेला पाहून, विस्मित होऊन प्रश्न विचारला कीं, "हे ब्रह्मन्, आपण महा विद्वान् असूनही एखाद्या बालकाप्रमाणें, स्वच्छंद क्रीडा करीत चाललां आहां व व्यावहारिक स्वार्थ साधण्याकरितां कांहीं खटपट करीत नाहीं, हें आश्चर्य असून, हें उत्तम ज्ञान आपणास कसें प्राप्त झालें ? या जगामध्यें बहुत करून सर्व लोक आयुष्य, कीर्ति व संपत्ति संपादन करण्याच्या हेतूनेंच धर्म,अर्थ,काम व मोक्षादि साधण्याकडे प्रवृत्त होतात. सामान्य लोकसुद्धां याच मार्गाचें अवलंबन करीत असतात. आपण तर शक्तिमान्, ज्ञानसंपन्न, चतुर, सुंदर व गोड बोलणारे असून, कांहीं करीत नाहीं व कशाचीही इच्छा करीत नाहीं. उलट निर्बुद्ध, वेडया पिशाचाप्रमाणें वागतां ! सर्व लोक कामक्रोधादिकांच्या वणव्यांत भाजून निघत असतां, आपण मात्र गंगेच्या उदकांत स्वैर क्रीडा करणाऱ्या हत्तीप्रमाणें शांत व स्वस्थ असून आनंदांत निमग्न आहां ! संसारसुखाचा स्पर्शही नसतां आपण निरतिशयानंदांत सदैव रममाण असतां, हें कशामुळें, हें आम्हांस निवेदन करा."

तरुण, सौंदर्यवान, समर्थ व ज्ञानी असून मधुर भाषण करणाऱ्या भगवान अवधूताची वृत्ति लहान बालकाप्रमाणें कशी बनली याचें यदुराजाला आश्चर्य वाटलें. जगांतील

असंख्य प्राणी सुखदु:खाच्या फेऱ्यांत सांपडून कधीं सुखी होतात तर कधीं कष्टी होतात; पण हा अवधूत सदैव शांत व स्वस्थ असून सदोदित आनंदानें क्रीडा करीत चालला आहे, हें पाहून यदुराजा चकित झाला, म्हणून त्यानें अवधूताला नम्रपणानें प्रश्न विचारला; त्याचें उत्तर अवधूतानें जें दिलें आहे तें विचार करण्यासारखें आहे.

प्रभुचरित्राचा जो विशेष आहे तो हाच होय. प्राचीन व अर्वाचीन जे असंख्य संत महात्मे झाले,त्यापेक्षां प्रभु अगदीं वेगळ्या प्रकारचे आहेत.अत्यंत बालवयांत ज्ञान व योगसामर्थ्य यांची प्राप्ति प्रभूंना झाली. कांहीं लोकांच्या बाबतींत, उपजत अंगस्वभाव जन्मत:च नजरेस येतो, त्याप्रमाणें, हा प्रभूंचा उपजत अंगस्वभाव होता, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. अत्यंत तेज:पुंज अंगकांति, तारुण्य आणि ज्ञान यांनीं युक्त असलेल्या प्रभूंना बालोन्मत पिशाचाप्रमाणें स्वच्छंदानें वागडत असलेल्याला पाहून कोणीही त्यांना यदुराजाप्रमाणेंच प्रश्न केला असता आणि यदुराजाला अवधूतानें जें उत्तर दिलें, तेंच उत्तर प्रभूकडूनही मिळालें असतें.

एवढया बालवयांत हें वैराग्य, हें ज्ञान, हें सामर्थ्य प्रभूंना कसें प्राप्त झालें, याचें यदुराजाप्रमाणें सर्वांनाच आश्चर्य वाटत आहे. प्रभु हे मूर्तिमंत अवधूत होते. त्यांना श्री दत्ताचा अवतार म्हणतात. जन्म दत्तजयंतीच्या सुमारास झालेला, जन्मापूर्वी वडिलांना दृष्टांत झालेला, हें त्या वेळच्या ज्ञात्यांनीं

ओळखून हे मूर्तिमंत दत्तात्रेय आहेत अशी त्यांनीं खूणगांठ बांधली होती. अवधूताला अनुरूप अशीच बालक्रीडा प्रभूंनीं केली. या बालक्रीडेंत सुद्धां अवधूताचें अप्रतिम तत्त्व प्रभूंनीं सोडलें नाहीं. सृष्ट पदार्थांपासून बोध घेण्याचें तत्त्व प्राचीन कालापासून प्रभूच्या अंगवळणीं पडलें होतें, म्हणूनच त्यांनीं रानावनांत फिरून लहान लहान समवयस्क बालकांबरोबर अनेक प्रकारच्या क्रीडा केल्या.

अणुभ्यश्च महद्भ्यश्च शास्त्रेभ्यः कुशलो नरः ॥
सर्वतः सारमदाद्यात् पुष्पेभ्य इव षट्पदः ॥१॥

लहानापासून, मोठ्यापासून, शास्त्रापासून अथवा सृष्ट पदार्थांपासून, यच्चयावत् सर्वांपासून मधु म्हणजे सार घेणें हें अवधूत विद्येचें गमक आहे. मधुकराचें व्रत प्रत्येक पुष्पामधून मधु असेल तोच घ्यावयाचा. सृष्टीच्या प्रत्येक पदार्थापासून मधु ग्रहण करण्याची जी अपूर्व शैली, तिलाच मधु विद्या असें म्हणतात. ही शैली फक्त दत्तात्रेयाला साधली आहे. दत्तात्रेयाची मधुमति ही विशेष शक्ति आहे. मधु या शब्दाचा अर्थ ज्ञान, सार, अर्क असाही होतो.

प्रभु लहान वयांतच अरण्यवास मोठ्या आनंदानें स्वीकारीत. त्यांत त्यांना अत्यंत गोडी वाटत होती. प्रभूंभोंवतीं प्रेमळ वातावरण लगेच पसरे. पशुपक्षी, तरुलता, निर्झर व गुहा इत्यादिकांचें हृद्गत प्रभूंना कळून येई. पंचमहाभूतांशीं त्यांचा तादात्म्यभाव होई. प्रत्येक पदार्थमात्रांत असलेला सहजानंद

प्रभूंच्या अंतःकरणांत प्रतिबिंबित होऊन ते तात्काळ समरस होत. (अवधूताच्या तोंडून निघालेलीं वाक्यें प्रभूंच्या तोंडचींच आहेत, असें मानल्यास प्रभुचरित्राचें मर्म लक्षांत येणारें आहे.) अलीकडील बुद्धिमान लोकांना, आम्हीं म्हणतों याची सत्यता पटेल असें आम्हांस वाटतें. प्रोफेसर जगदीशचंद्र बोस यांनीं एक योग साध्य केला असून त्याच्या योगानें तरुलता व वृक्ष हे त्यांच्याशीं सुखदु:खाच्या गोष्टी बोलत असतात, असें आम्हीं म्हटलें तर तें सत्याला धरून आहे, तितकेंच वरील आमचें म्हणणेंही सत्यपूर्ण आहे.

जंगलांत जाऊन प्रभूंनीं हें अद्भुत योगसामर्थ्य मिळविलें. प्रत्येक सजीव अथवा निर्जीव प्राण्याच्या अंतःकरणांत शिरण्याचें सामर्थ्य लोकविलक्षण आहे. सहृदय महात्म्याशिवाय या गोष्टी साध्य होणें शक्य नाहीं. अंतःकरणाचें शिक्षण अलीकडील कोणत्याही शाळांत किंवा विद्यालयांत मिळत नाहीं. अलीकडील विद्यालयें बुद्धिमत्ता वाढवितात. पण अंतःकरणशून्यता नाहींशी करून, तें विशाल व उदार बनविण्याचें कार्य सृष्टिदेवी करीत असते. सृष्टिदेवीचें विद्यालय हें खरें विश्वविद्यालय आहे. प्रभूचें अध्ययन या विश्वविद्यालयांत झालें, असें प्रभूच स्वमुखानें सांगतात.

प्रसिद्ध आंग्ल कवि सॅम्युअल टेलर कोलरिज यानें आपल्या 'फ्रॉस्ट ॲट मिडनाईट ( Frost at Midnight ) " या कवितेंत स्वतःच्या अर्भकाच्या शिक्षणासंबंधीं जे विचार प्रकट केले आहेत तेही वाचकांनीं लक्षांत घेण्याजोगे आहेत.

"My babe so beautiful ! It thrills my heart
With tender gladness, thus to look at thee,
And think thou shalt learn far other Lore,
And in far other scenes !......................
...................................................
But thou, my babe ! shalt wander like a
breeze
Of ancient mountain, and beneath the
clouds,
Which image in their bulk both lakes and
shores
And mountain crags : so shalt thou see and
hear
The lovely shapes and sounds intelligible
Of that eternal language, which thy God
Utters, who from eternity doth teach
Himself in all, and all things in Himself.
Great Universal Teacher ! He shall mould
Thy spirit, and by giving make it ask."

अवधूतः—सन्ति मे गुरवो राजन् बहवो बुद्ध्युपाश्रिताः ॥
यतो बुद्धिमुपादाय मुक्तोऽटामीह ताञ्छृणु ॥ १ ॥

अवधूतांनीं यदुराजाला सांगितलें कीं, "राजा, मला पुष्कळ गुरु आहेत. अनेक प्रकारच्या बुद्धि त्यांनीं आत्मसात् केल्या असून, त्यांच्याकडून त्या त्या बुद्धीचें ग्रहण केल्यामुळें, मी मुक्त होऊन पृथ्वीवर फिरत आहें." याप्रमाणें मला पुष्कळ गुरु आहेत असें सांगून त्यांनीं आपल्या पुढील श्लोकांत चोवीस गुरूंचींच नांवें सांगितलीं आहेत. अर्थात् तीं उपलक्षणार्थ समजावयाचीं आहेत.

अवधूतांसारख्या नित्यमुक्त ज्ञान्याला विश्वांतील अनंत पदार्थांपासूनही ज्ञान प्राप्त करून घेण्याची आवश्यकता आहे. मग आम्हांसारख्या अल्पज्ञाला किती तरी असली पाहिजे.

पृथिवी वायुराकाशमापोऽग्निश्चन्द्रमारविः ॥
कपोतोऽजगरः सिन्धुः पतङ्गो मधुकृद्गजः ॥१॥
मधुहा हरिणो मीनः पिङ्गला कुररोऽर्भकः ॥
कुमारी शरकृत्सर्प ऊर्णनाभिः सुपेशकृत् ॥२॥
एते मे गुरवो राजन् चतुर्विंशतिराश्रिताः ॥
शिक्षावृत्तिभिरेतेषामन्वशिक्षमिहात्मनः ॥३॥

"पृथ्वी, वायु, आकाश, पाणी, अग्नि, चंद्र, सूर्य, कपोत-पक्षी, अजगर, समुद्र, पतंग,मधुकर, हत्ती, मध हरण करणारा मनुष्य, हरीण, मासा, पिंगला, कुररपक्षी, बालक, कुमारी, बाण करणारा कारागीर, साप, कोळी, आणि कुंभारीण माशी असे माझे चोवीस गुरु आहे. या चोवीस गुरूंच्या वर्तनक्रमावर बारीक लक्ष देऊन, मीं ज्ञान मिळविलें आहे."

अवधूतांनीं आपले चोवीस गुरु आहेत म्हणून सांगितलें, ते चोवीस गुरु प्रत्यक्ष बोध देणारे नव्हत. त्यांच्या अंतरंगांत शिरून, त्यांच्यापासून कोणता वोध मिळणें शक्य आहे हें अवधूतांनीं नीट निरीक्षण करून ठरविलें. सृष्ट पदार्थांपैकीं पंचमहाभूतें, सूर्य, चंद्र व इतर पशु, पक्षी, कीटक, मनुष्य-प्राणि इत्यादिकांचा या चोवीसांत समावेश झाला आहे. म्हणून विश्वांतील सर्व भूतमात्राला ह्यांपासून कोणता ना कोणता महत्त्वाचा बोध घेतां येतो, हें यावरून उघड होत आहे. गुरूपेक्षां शिष्याची

प्रज्ञा अधिक असावी लागते. प्रज्ञावान् शिष्य असल्यावर, परमेश्वर तेथेंच प्रकट होऊन ज्ञानदान देतो. 'शिष्यप्रज्ञा बलीयसी' हें खरें आहे. सृष्टीचें मर्म ओळखणें हें काम सामान्य मानवाच्या आटोक्यांतलें नव्हे. प्रभूप्रमाणें अभिजात ज्ञानसंपन्न विभूतींनाच या गोष्टीची सिद्धि प्राप्त होते. प्रत्येक वस्तूचें निरीक्षण करून तिच्यांतील उत्तम तत्त्व–सार–मधु–ग्रहण करण्याची कला ही सर्वांत श्रेष्ठ प्रतीची कला आहे. हिलाच मधुविद्या,वारुणीविद्या अथवा भार्गवीविद्या असें म्हणतात. तत्त्व-ज्ञान प्राप्त करून घेणें हीच ब्रह्मविद्या आहे; ह्या विद्येच्या योगानें अवधूताला गुरुत्व प्राप्त होऊन ते विश्वाचे गुरु झाले आहेत.

मधु विद्येचा उल्लेख ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आला असून ती श्रेष्ठ विद्या गणली गेली आहे. 'अध्यात्मविद्या विद्यानाम्' असें भगवद्वाक्य आहे. सर्व विद्यांमध्यें अध्यात्म-विद्या श्रेष्ठ प्रतीची आहे. वैदिक ऋषींनीं हिला मधुविद्या असें नांव दिलें आहे. इंद्र या मधुविद्येंत निष्णात होता. त्यानें दध्यङ् आथर्वणाला ही विद्या शिकविली, पण ही विद्या गुप्त ठेवण्यास त्याला बजावलें. दुसऱ्याला शिकविलीस तर शिरच्छेद करीन असें त्याला सांगितलें. अश्वी देवांना ही विद्या शिक-ण्याची उत्कंठा लागली. त्यांनीं दध्यङ् ऋषीचें शिर तोडून त्या ठिकाणीं अश्वाचें शिर लाविलें व अशा रीतीनें त्यांनीं दध्यङ् ऋषीकडून ही विद्या संपादन केली. पुढें इंद्राला हें समजतांच त्यानें दध्यङ्चें तें घोडयाचें शिर उडविलें. नंतर अश्वीदेवांनीं

त्याला पूर्वीचें शिर लावून प्रथमप्रमाणेंच केलें, असा कथाभाग ऋग्वेदांत आहे. ही मधुविद्या हातीं येतांच अश्वीदेवांनीं आपलें जीवित मधुमय–सुखमय केलें. या मधुविद्येचें मर्म प्रत्येक वस्तुमात्रांतून उत्तम भाग घेऊन, आपलें जीवन आनंदमय करणें, यांत आहे.

सर्व सृष्ट पदार्थांतील उत्तमोत्तम भाग घेण्यापासून सुरवात करून शेवटीं प्रभूंनीं 'सकलमतसंप्रदाय' अस्तित्वांत आणिला. जगांतील सर्व धर्मांचा जो उत्तम भाग आहे, त्याचें ग्रहण करावयाचें, दोष टाकून द्यावयाचे व सर्वांतर्यामीं प्रभूचें वास्तव्य आहे म्हणून सर्व प्रभुमय आहे असा विश्वास धरावयाचा, हें या संप्रदायाचें मर्म आहे. 'सर्वांतरीं आत्मा, नको कुणाची निंदा' हेंच तें बीज होय.

प्रभु, अकरा वर्षें वयाचे असतां जन्मास आलेल्या एका परदेशस्थ महात्म्याची सृष्टीशीं समरस होण्याची कल्पना वाचून साहजिकच मौज वाटते. कौन्ट लियो टॉलस्टॉय यांचें नांव सर्वांच्या परिचयाचें आहेच. त्याला रशियाचा रामदास असेंही कोणी म्हणतात. त्याचें म्हणणें असें कीं, "कृत्रिमपणा न धरतां सृष्टीच्या नियमानुसार वागण्यांत खरें सुख आहे. सृष्टि-वैभवाच्या अवलोकनांतच काय ती खरी मौज आहे. सृष्टीशीं हितगुज करणें यांतच शुद्ध ब्रह्मानंद आहे." प्रभूंना समका-लीन असणाऱ्या विभूतींमध्यें, विचाराची एकवाक्यता असल्याचें आढळून येतें हा केवढा चमत्कार होय !



" My babe so beautiful ! It thrills my heart
With tender gladness, thus to look at thee,
And think thou shalt learn far other Lore,
And in far other scenes !......................
.................................................................
But thou, my babe ! shalt wander like a
breeze
Of ancient mountain, and beneath the
clouds,
Which image in their bulk both lakes and
shores
And mountain crags : so shalt thou see and
hear
The lovely shapes and sounds intelligible
Of that eternal language, which thy God
Utters, who from eternity doth teach
Himself in all, and all things in Himself.
Great Universal Teacher ! He shall mould
Thy spirit, and by giving make it ask."

अवधूतः—सन्ति मे गुरवो राजन् बहवो बुद्ध्युपाश्रिताः ॥
यतो बुद्धिमुपादाय मुक्तोऽटामीह ताञ्छृणु ॥ १ ॥

अवधूतांनीं यदुराजाला सांगितलें कीं, " राजा, मला पुष्कळ गुरु आहेत. अनेक प्रकारच्या बुद्धि त्यांनीं आत्मसात् केल्या असून, त्यांच्याकडून त्या त्या बुद्धीचें ग्रहण केल्यामुळें, मी मुक्त होऊन पृथ्वीवर फिरत आहें." याप्रमाणें मला पुष्कळ गुरु आहेत असें सांगून त्यांनीं आपल्या पुढील श्लोकांत चोवीस गुरूंचींच नांवें सांगितलीं आहेत. अर्थात् तीं उपलक्षणार्थ समजावयाचीं आहेत.

अवधूतांसारख्या नित्यमुक्त ज्ञान्याला विश्वांतील अनंत पदार्थांपासूनही ज्ञान प्राप्त करून घेण्याची आवश्यकता आहे. मग आम्हांसारख्या अल्पज्ञाला किती तरी असली पाहिजे.

पृथिवी वायुराकाशमापोऽग्निश्चन्द्रमारविः ॥
कपोतोऽजगरः सिन्धुः पतङ्गो मधुकृद्गजः ॥१॥
मधुहा हरिणो मीनः पिङ्गला कुररोऽर्भकः ॥
कुमारी शरकृत्सर्प ऊर्णनाभिः सुपेशकृत् ॥२॥
एते मे गुरवो राजन् चतुर्विंशतिराश्रिताः ॥
शिक्षावृत्तिभिरेतेषामन्वशिक्षमिहात्मनः ॥३॥

"पृथ्वी, वायु, आकाश, पाणी, अग्नि, चंद्र, सूर्य, कपोतपक्षी, अजगर, समुद्र, पतंग, मधुकर, हत्ती, मध हरण करणारा मनुष्य, हरीण, मासा, पिंगला, कुररपक्षी, बालक, कुमारी, बाण करणारा कारागीर, साप, कोळी, आणि कुंभारीण माशी असे माझे चोवीस गुरु आहे. या चोवीस गुरूंच्या वर्तनक्रमावर बारीक लक्ष देऊन, मीं ज्ञान मिळविलें आहे."

अवधूतांनीं आपले चोवीस गुरु आहेत म्हणून सांगितलें, ते चोवीस गुरु प्रत्यक्ष बोध देणारे नव्हत. त्यांच्या अंतरंगांत शिरून, त्यांच्यापासून कोणता बोध मिळणें शक्य आहे हें अवधूतांनीं नीट निरीक्षण करून ठरविलें. सृष्ट पदार्थांपैकीं पंचमहाभूतें, सूर्य, चंद्र व इतर पशु, पक्षी, कीटक, मनुष्यप्राणि इत्यादिकांचा या चोवीसांत समावेश झाला आहे. म्हणून विश्वांतील सर्व भूतमात्राला ह्यांपासून कोणता ना कोणता महत्त्वाचा बोध घेतां येतो, हें यावरून उघड होत आहे. गुरूपेक्षां शिष्याची

प्रज्ञा अधिक असावी लागते. प्रज्ञावान् शिष्य असल्यावर, परमेश्वर तेथेंच प्रकट होऊन ज्ञानदान देतो. 'शिष्यप्रज्ञा बलीयसी' हें खरें आहे. सृष्टीचें मर्म ओळखणें हें काम सामान्य मानवाच्या आटोक्यांतलें नव्हे. प्रभूप्रमाणें अभिजात ज्ञानसंपन्न विभूतींनाच या गोष्टीची सिद्धि प्राप्त होते. प्रत्येक वस्तूचें निरीक्षण करून तिच्यांतील उत्तम तत्त्व–सार–मधु–ग्रहण करण्याची कला ही सर्वांत श्रेष्ठ प्रतीची कला आहे. हिलाच मधुविद्या,वारुणीविद्या अथवा भार्गवीविद्या असें म्हणतात. तत्त्व-ज्ञान प्राप्त करून घेणें हीच ब्रह्मविद्या आहे; ह्या विद्येच्या योगानें अवधूताला गुरुत्व प्राप्त होऊन ते विश्वाचे गुरु झाले आहेत.

मधु विद्येचा उल्लेख ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आला असून ती श्रेष्ठ विद्या गणली गेली आहे. 'अध्यात्मविद्या विद्यानाम्' असें भगवद्वाक्य आहे. सर्व विद्यांमध्यें अध्यात्म-विद्या श्रेष्ठ प्रतीची आहे. वैदिक ऋषींनीं हिला मधुविद्या असें नांव दिलें आहे. इंद्र या मधुविद्येंत निष्णात होता. त्यानें दध्यङ् आथर्वणाला ही विद्या शिकविली, पण ही विद्या गुप्त ठेवण्यास त्याला बजावलें. दुसऱ्याला शिकविलीस तर शिरच्छेद करीन असें त्याला सांगितलें. अश्वी देवांना ही विद्या शिक-ण्याची उत्कंठा लागली. त्यांनीं दध्यङ् ऋषीचें शिर तोडून त्या ठिकाणीं अश्वाचें शिर लाविलें व अशा रीतीनें त्यांनीं दध्यङ् ऋषीकडून ही विद्या संपादन केली. पुढें इंद्राला हें समजतांच त्यानें दध्यङ्चें तें घोड्याचें शिर उडविलें. नंतर अश्वीदेवांनीं

त्याला पूर्वीचें शिर लावून प्रथमप्रमाणेंच केलें, असा कथाभाग ऋग्वेदांत आहे. ही मधुविद्या हातीं येतांच अश्वीदेवांनीं आपलें जीवित मधुमय—सुखमय केलें. या मधुविद्येचें मर्म प्रत्येक वस्तुमात्रांतून उत्तम भाग घेऊन, आपलें जीवन आनंदमय करणें, यांत आहे.

सर्व सृष्ट पदार्थांतील उत्तमोत्तम भाग घेण्यापासून सुरवात करून शेवटीं प्रभूंनीं 'सकलमतसंप्रदाय' अस्तित्वांत आणिला. जगांतील सर्व धर्मांचा जो उत्तम भाग आहे, त्याचें ग्रहण करावयाचें, दोष टाकून द्यावयाचे व सर्वांतर्यामीं प्रभूचें वास्तव्य आहे म्हणून सर्व प्रभुमय आहे असा विश्वास धरावयाचा, हें या संप्रदायाचें मर्म आहे. 'सर्वांतरीं आत्मा, नको कुणाची निंदा' हेंच तें बीज होय.

प्रभु, अकरा वर्षें वयाचे असतां जन्मास आलेल्या एका परदेशस्थ महात्म्याची सृष्टीशीं समरस होण्याची कल्पना वाचून साहजिकच मौज वाटते. कौन्ट लियो टॉलस्टॉय यांचें नांव सर्वांच्या परिचयाचें आहेच. त्याला रशियाचा रामदास असेंही कोणी म्हणतात. त्याचें म्हणणें असें कीं, "कृत्रिमपणा न धरतां सृष्टीच्या नियमानुसार वागण्यांत खरें सुख आहे. सृष्टि-वैभवाच्या अवलोकनांतच काय ती खरी मौज आहे. सृष्टीशीं हितगुज करणें यांतच शुद्ध ब्रह्मानंद आहे." प्रभूंना समकालीन असणाऱ्या विभूतींमध्यें, विचाराची एकवाक्यता असल्याचें आढळून येतें हा केवढा चमत्कार होय !






# बालपणांतील लीला

## गोविंदा गवळी : : १

प्रभूंच्या संगतींत असलेल्या पुष्कळ मुलांमध्यें गोविंदा या नांवाचा एक गवळ्याचा मुलगा होता. तो नित्य गाई-म्हशी चारण्याकरितां रानांत जात असे. प्रभूंच्या खेळगडयांत पुष्कळ गुराखी मुलें सामील असत. प्रभू बरोबर असले म्हणजे त्यांना आपल्या गुरांची विशेष काळजी वाटत नसे. इतर मुलांबरोबर हीं गुराखी मुलेंही खेळांत येत. खेळांचा प्रकार नित्य नवा असे. गोविंदा गवळी चारपांच दिवस कोठें खेळांत दिसला नाहीं. खेळांत दृष्टीस न पडणाऱ्या मुलाची प्रभु नेहमीं विचारपूस करीत. त्याप्रमाणें एके दिवशीं सकाळीं प्रभु गोविंदा गवळ्याच्या घरीं, गोविंदा अलीकडे खेळांत कां येत नाहीं म्हणून चौकशी करण्यास गेले. अंगणांत उभे राहून ' गोविंदा, अरे गोविंदा ' अशी हाक मारतांच घरांत रडण्याचा आवाज ऐकूं आला. त्या गरीब गवळ्याचीं माणसें, गोविंदाभोंवतीं जमून, ओक्साबोक्सीं रडत असतांना पाहून प्रभूंनीं विचारलें, ' काय, झालं तरी काय ? कशाकरतां

रडतां ?' गोविंदाची आई हें ऐकून धाय मोकलून जास्तच रडूं लागली. प्रभूंना कोणीं सांगितलें कीं, अलीकडे चारपांच दिवस, ज्वरानें आजारी होऊन गोविंदा मरण पावला. त्यावर प्रभु जवळ जाऊन त्याच्या आईस म्हणाले—'बाई, उगीच रडूं नको. तुझा गोविंदा मेला नाहीं. तूंच त्याला जोरानें हाक मारून पाहा, म्हणजे तो उठेल. माणूस जिवंत असतांना रडणें चांगलें का ?' वेड्या भाऊचें हें म्हणणें बाकीच्या लोकांना खरें वाटलें नाहीं. त्यांनीं गोविंदा मेला म्हणून त्याच्या प्रेत-यात्रेची सर्व तयारी केली होती, व जातभाई त्याला उचलून घेऊन जाण्याच्या बेतांत होते. गोविंदाच्या आईचा मात्र भाऊच्या म्हणण्यावर विश्वास होता. तिनें जोरानें 'गोविंदा, ऊठ रे, किती वेळ निजतोस ? भाऊ आला आहे बघ तुला बोलवायला' असें म्हणतांच, गोविंदा झोंपेंतून जागा झाल्या-प्रमाणें खडबडून उठला.. आईच्या आनंदाला पारावार नव्हता ! इतर लोक हें पाहून आश्चर्यचकित झाले. प्रभूंनीं मात्र या गोष्टीची जबाबदारी आपल्या अंगावर न घेतां 'काय वेडीं माणसें आहेत पाहा ! जिवंत मनुष्याला जाळायला नेत होतीं.' असें म्हणून, गोविंदाला गुरें घेऊन रानांत येण्यास सांगून, आपण निघून गेले. ही गोष्ट तात्काळ गांवांत पसरली. गोविंदाला पाहण्यास सर्व गांव लोटलें. वेडा भाऊ मात्र दोन-तीन दिवस गुप्त झाला, त्याचा पत्ता कोणासही लागला नाहीं.

## माळीण :: २

एके दिवशीं, एक माळीण, डोकीवर आंब्यांची पाटी घेऊन, 'आंबे घेतां का, आंबे' असें ओरडत, रस्त्यानें फिरत चालली होती. दहापांच मुलें घेऊन वेडा भाऊ, त्या माळणीजवळ येऊन म्हणतो, 'आम्हांस आंबे पाहिजेत; देतेस का ?' आंब्यांच्या किंमतीचा विचार न करितां, नुसते आंबे मागणारा हा वेडा पाहून, माळीण आंबे फुकट देण्यास तयार होईना. पैशांशिवाय ती आंबे कशी देणार ? माळीण जरा लांब गेलेली पाहून प्रभु हलक्या आवाजांत म्हणतात, 'माळणीस मुलग्याची जरूर असेल तर आम्हांस आंबे देईल.' हे शब्द माळणीचे कानावर पडतांक्षणींच माळीण परतली. तिच्या अंतरंगांतील विचार प्रभूंनीं ताडला होता. लग्न होऊन वयांत आल्यास तिला पुष्कळ वर्षें होऊन गेलीं होतीं. मुला-करितां तिनें नवससायास केले होते. मुलाकरितां ती अगदीं आतुर झाली होती. अशा वेळीं प्रभूच्या तोंडचे हे शब्द तिला अमृतवत् वाटले. ' बाळ, तुझ्या तोंडांत साखर पडो. तुला लागतील तितके आंबे घे. ' असें म्हणून तिनें आंब्याची पाटीच प्रभूपुढें ठेविली. प्रभूंनीं त्या पाटींतून फक्त अकरा आंबे उचलले व म्हणाले ' बस पुरे. अकरा मुलांना अकरा आंबे. तुला अकरा मुलगे होतील, ' बाईला आनंदीआनंद झाला. मुलांसह प्रभु उडया मारीत निघून गेले.

या माळणीस पुढें वर्ष दीड वर्षाच्या फेरानें पांच मुलगे झाले. पांच मुलगे होतांच मुलांसंबंधींची तिची हौस पूर्ण झाली. यापुढें आतां आपणांस बाळंतपणाचे कष्ट सहन होणार नाहींत, अशी नंतर तिनें प्रभुजवळ विनंति केल्यावर प्रभु हंसून म्हणाले, 'तुझी मर्जी बाई ! आतां प्रभु तुझ्या ऋणांतून मुक्त झाला आहे. तुझ्या मर्जीप्रमाणें होईल.'

यासारख्या गोष्टी अनंत आहेत. वेड्या भाऊची वाणी अमृताची असल्याबद्दल सर्वांची खातरी होत चालली होती. बालपणाच्या प्रत्येक गोष्टीचें संक्षिप्त टिपण घेतलें, तरी ग्रंथविस्तार फार होईल. करितां अतिशय प्रसिद्ध असलेल्या तेवढ्याच गोष्टी या पुस्तकांत घेण्याचें आम्हीं योजिलें आहे.



## आठ कवड्या : : ३

हैद्राबाद शहरीं, त्या वेळीं, अरबांचें सैन्य निजामच्या पदरीं होतें. या अरबांच्या सैन्याचे दोन बेहडे अगर भाग असत. त्या प्रत्येकावर वेगवेगळे अधिकारी असत. या अधिकाऱ्यांपैकीं अरब आप्पाराव म्हणून एक अधिकारी होते. हे जातीचे ब्राह्मण असून, अरबांवरील जमादार होते. यांची प्राप्ति मोठी असून, मानही मोठाच होता. आप्पाराव राजे असेंही त्यांना म्हणत असत. त्यांच्या कुटुंबाचें नांव भीमाबाई असें होतें. या भीमाबाईनें पुत्र व्हावा म्हणून फार नवससायास केले होते. स्त्रियांना एकदा पुत्रप्राप्तीची तळमळ लागली, म्हणजे त्या कोणतेही व कसलेही उपाय करण्याला मागेंपुढें पाहत नाहींत. खडतर व्रतें, उपवास वगैरे करण्यांत तर स्त्रियांची कोणीच बरोबरी करूं शकणार नाहीं. अशा प्रकारचीं अनेक व्रतेंवैकल्यें करूनही उपयोग होत नाहीं असें पाहून, भीमाबाई निराश झाली होती. इतक्यांत कल्याणच्या 'वेडया भाऊची' कीर्ति तिच्या कानावर गेली. वेडा भाऊ बोलतो तें खरें होतें, असा सर्वांना दाखला आला असल्याचें तिला समजलें होतें. आपणही ह्या वेडया भाऊचें दर्शन घ्यावें, अशी उत्कंठा तिला लागून, आपल्या पतीची परवानगी घेऊन, भीमाबाई मेण्यांत बसून, हैद्राबादेहून कल्याणाकडे येण्यास निघाली. समागमें लवाजमाही बराच होता. मेण्याचे भोई,

शिपाई, घोडेस्वार, मोलकरणी व इतर नऊ नोकर यांसह ही बाई निघाली. योग्य ठिकाणीं मुक्काम करीत करीत, बेदर मार्गानें ती कल्याणास येत होती. कल्याणपासून एका मैलावर येतांच रस्त्यानजीकच्या मैदानांत, कांहीं मुलांचा गोंगाट त्या बाईच्या कानावर पडला. तिकडे सहज पाहतांच, कांहीं मुलें, एका मुलाच्या अंगावर पडून, त्याला मारताहेत, असें तिला दिसलें. मुलांची मारामारी सोडवावी या इच्छेनें मेणा त्या मुलांकडे नेण्यास तिनें सांगितलें. जसजसा तो मेणा जवळ येत चालला, तसतसा मुलांचा दंगा अधिकच वाढूं लागला; म्हणून शिपाई लोकांना दंगा बंद करण्यास तिनें सांगितलें. कांहीं मुलें ज्या मुलाच्या अंगावर पडून मारीत होतीं त्या मुलाला सोडवावें, म्हणून शिपाई लोकांनीं प्रयत्न चालविला. परंतु पडलेल्या मुलानें 'तुम्हांला आमच्या भांडणांत येण्याचें कारण काय ? तुम्ही आपल्या वाटेनें चालते व्हा. आमचें मुलांचें भांडण आमचें आम्ही पाहून घेऊं. तुम्ही पंचाईत करूं नका !' असें बोलून त्यांचें निराकरण केलें. शिपाई बिचारे हें चमत्कारिक भांडण पाहून चकित झाले. काय करावें हें त्यांना सुचेना. इतक्यांत पडलेल्या मुलानें मोठ्यानें ओरडून सांगितलें कीं, "मला सोडवावयाची खरी इच्छा असेल, तर आठ कवड्या देऊन सोडवावें. एक एक कवडीस एक एक मुलागा मिळेल." हें विलक्षण भाषण ऐकून, बाई विस्मयचकित झाली. कोणा-जवळ कवड्या आहेत का, म्हणून चवकशी चालली. एवढ्या

बड्या श्रीमंत बाईजवळ त्या वेळीं कवड्या कोठून येणार ! मुलाचे शब्द खरे होवोत म्हणून आठ कवड्या देऊन आपण त्याची सुटका करावी अशी उत्कंठा तिला लागली. पण कवड्या कशा मिळाव्यात ? कवड्यांऐवजीं रुपये दिल्यास चालतील काय ? म्हणून विचारतां समजलें कीं, त्या मुलांचा कवड्यांचा डाव चालला असतां, पडलेल्या मुलाच्या अंगावर आठ कवड्या आल्या त्या देण्याचें तो टाळूं लागला म्हणून मुलांनीं त्याच्यावर हल्ला केला होता. कवड्यांऐवजीं रुपयांची जरूरी नव्हती. कवड्या हा हक्काचा प्रश्न होता. आपणास मुलगे पाहिजेत, तर कवड्याच द्यावयास पाहिजे होत्या. बाईनें पुष्कळ तपास केला. पण कांहीं केल्या कवड्या मिळेनात. निराश होण्याची वेळ आली. इतक्यांत बाईच्या नशिबानें, एका भोयाच्या बटवीस लाविलेल्या कवड्या सांपडल्या. त्या काढून मुलास दिल्या. बाईकडे संतुष्ट दृष्टीनें पाहून 'तुम्हास आठ मुलगे दिले जा' असें म्हणत, उडी मारून तो मुलगा चालता झाला. भीमाबाईस या विचित्र मुलाचें कौतुक वाटलें. पण हा मुलगा कोणाचा कोण, याची विचारपूस करण्यास तिला त्या मुलांपैकीं कोणीही सवड दिली नाहीं. कवड्या मिळतांच सर्व मुलें आनंदानें उड्या मारीत निघून गेलीं.

आपण ज्या कार्याकरितां कल्याणास चाललों आहों, त्यास हा फार उत्तम शकुन झाला म्हणून बाईला हर्ष वाटला. सायंकाळच्या समयीं ती आपल्या लवाजम्यासह कल्याणास

येऊन दाखल झाली. मनोहर नाईकास दत्ताचा अवतार असलेला मुलगा झाला असून त्यासच वेडा भाऊ असें लोक म्हणतात हें तिला माहीत होतें. म्हणून सामानसुमानाची नीट व्यवस्था लावल्यानंतर, दत्तावतार मुलाची तिनें चौकशी चालविली. दर्शन घेऊन नंतर भोजन करावयाचें असें तिच्या मनांत होतें. रात्र बरीच झाली तरी भाऊचा पत्ता नाहीं, असें पाहून ती निराश झाली व अन्न न घेतां तशीच पडून राहिली. दुसऱ्या दिवशीं ब्राह्मणभोजनाची सिद्धता करून, शोध चालविला. भाऊचा पत्ता कोठेंच लागेना. घरच्या मंडळींनाही सांगतां येणें शक्य नव्हतें. तीन तीन दिवस भाऊ अरण्यांत गुप्त होत असे, हें सर्वांना ठाऊक होतें. तीन दिवस ती बाई, निर्धारानें प्रभुदर्शनाकरितां तशीच उपवासी राहिली. अखेर प्रभूंस तिच्याविषयीं करुणा येऊन ते एकाएकीं घरीं आले. भाऊ आल्याची वर्दी मिळतांच, बाई दर्शनास पुढें सरली, तों कल्याणास येण्यापूर्वीं आपण रानांत ज्या मुलाला आठ कवड्या देऊन सोडविलें, तोच हा मुलगा अशी तिची खात्री झाली. बाईस पाहतांच प्रभु म्हणाले, “ बाई, एकदां तुम्हांस आठ मुलगे देऊन चुकलों आहें. आतां पुन्हा ही उठाठेव कां करितां ?” एवढें बोलून आईस म्हणतात, “ अम्मा, भूक लागली आहे. कांहीं खावयास दे. ” आईनें दिलेले चार घांस खाऊन, पाणी पिऊन प्रभू ताडकन् उडी मारून निघून गेले.

बाई हा प्रकार पाहत होती. या वेळीं प्रभूचें रूप विलक्षण असलें, तरी त्यांच्या तेजःपुंज कांतीच्या प्रभावानें बाई दिपून गेली. आपलें काम झालें अशी तिची खातरी झाली. पुढें एक दिवस राहून तिनें दान, धर्म, ब्राह्मणभोजन वगैरे यथासांग करून मातु:श्री बयाम्मांस व मुलांस उत्तम वस्त्रें देऊन, ती संतुष्ट अंतःकरणानें परत हैद्राबादेस गेली. घरीं गेल्यानंतर तिनें आपल्या पतीस हा वृत्तांत निवेदन केला. पण त्यानें तिची थट्टाच केली. एका चरित्रकारानें तर बाईच्या नवऱ्याच्या तोंडीं पुढील वाक्य घातलें आहे. " अशीं गाढवें जर गूळ हगतीं, तर कुंभार भीक मागत कां फिरते?" सारांश, बाईच्या भोळेपणावर यथेच्छ टीका करावयास आप्पाराव यांनीं कांहीं कमी केलें नाहीं. प्रभूंची मूर्ति पाहिल्यावर बाईला मात्र पक्का विश्वास उत्पन्न झाला. असो. पुढें कांहीं मास लोटल्या-नंतर बाईच्या ठिकाणीं गर्भचिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. नवमास पूर्ण होतांच बाई प्रसूत होऊन, पुत्ररत्न झालें. बाईच्या आनंदास सीमा राहिली नाहीं. प्रभु साक्षात् दत्तावतार असल्याची तिच्या अंतःकरणास साक्ष पटली. बाळंतपणांतून उठल्यावर पहिल्यापेक्षां अधिक थाटानें, प्रभुदर्शनास जाऊन, तिनें प्रभूंची यथासांग पूजा करून दानधर्म पुष्कळ केला. याप्रमाणें क्रमानें या बाईस, जसजसे मुलगे होत गेले तसतशी ती सर्व ऐश्वर्यासह येऊन, आपले नवस फेडीत असे. हा कथाभाग पुढील प्रकरणांतही प्रसंगानुरोधानें येणार असल्या-मुळें, येथेंच आटोपतें घेत आहों.

## पांढरा विंचू : : ४

प्रभूंच्या खेळांत जसें वैचित्र्य असे, तसें वेळप्रसंगीं मुलांना योग्य प्रकारचा बोध करण्यासही प्रभु उत्सुक असत. साप, विंचू हे प्राणी घातक आहेत असें आपण सर्वजण मानतों. त्याप्रमाणें प्रभूंचे खेळगडीही मानीत होते. साप दृष्टीस पडला कीं मुलांनीं तो मारण्याचा प्रयत्न करावा; पण प्रभूंनीं त्यांचें निवारण करावें. "या प्राण्याला विनाकारण मारूं नये रे. ते काय करतात बिचारे! आपण त्यांच्या वाटेस गेलों नाहीं, तर आपणास ते कांहीं करणार नाहींत." असें नेहमीं त्यांनीं मुलांना सांगावें. कोणत्याही प्राण्याला त्रास न होईल अशा-प्रकारचे प्रभूंचे खेळ असत. प्रभु कधीं कधीं स्वतः खेळांत सामील असत; कधीं मुलांना खेळावयास लावून आपण स्वस्थ पाहत बसत.

एके दिवशीं कांहीं मुलांनीं, एका वारुळांतून, कांहीं विंचू बाहेर पडत असल्याचें पाहिलें. विंचू दृष्टीस पडतांच मुलांनीं त्यांपैकीं चारपांच ठेंचून मारले. इतक्यांत प्रभु तेथें आले व "अरेरे! हें काय केलेंत! त्या गरीब प्राण्यांना कां बरें मारलेंत! आतां मारणें पुरे करा. आपण जरा दूर जाऊन, पुढें काय होतें तें पाहात बसूं या." असें म्हणून, सर्व मुलांसह दूर जाऊन बसले. त्या बिळांतून आणखीही बरेच विंचू बाहेर पडले. त्यांनीं ते मेलेले आपले जातभाई

पाहिल्यानंतर, त्यांच्यामध्यें धांवपळ सुरू झाली. बऱ्याच वेळानें आणखी विंचू बाहेर आले व पुन्हा परत गेले. असें होत होत शेवटीं एका मोठ्या काळ्या विंचवावर बसून, एक पांढरा पण सर्वांपेक्षां लहान विंचू बाहेर आला. आपल्या सर्व परिवारासह, त्या मेलेल्या विंचवांभोंवतीं फिरून, सर्व सैन्यासह तो पांढरा विंचू परत बिळांत गेला. वर विंचू शिल्लक राहिला नाहीं. मुलांसह प्रभु जवळ येऊन पाहतात तों मेलेल्या विंचवांपैकीं तेथें एकही शिल्लक नाहीं ! मेलेले विंचू काय झाले ? हा प्रश्न मुलांच्या डोक्यांत आला. कोणीं म्हणाले, त्यांना बाकीच्या विंचवांनीं नेलें असावें; कोणी म्हणाले, ते पुन्हा जिवंत होऊन सर्व विंचवांबरोबर, आपल्या ठिकाणीं परत गेले. पण तो पांढरा विंचू कोण ? शेवटीं प्रभूंनीं त्यांना समजावून सांगितलें, कीं पांढरा विंचू हा त्या सर्व विंचवांचा राजा. तो एका मोठ्या काळ्या विंचवावर स्वार होऊन आला होता. आपल्या सैन्यांतले कांहीं सैनिक मेल्याची वर्दी लागतांच हा राजा स्वतः आपल्या परिवारासह बाहेर आला व आपल्याजवळ असलेल्या संजीवनी मण्याचा उपयोग करून, त्यानें मेलेले विंचू जिवंत करून परत नेले. राजाजवळ हा मणि कसा आला ? राजाचें हें सामर्थ्यच आहे. प्रभूनें हें सामर्थ्य प्रत्येक प्राणिमात्राच्या अधिपतिजवळ ठेवलें आहे. प्राण्यांच्या राजाला जर आपले जीवजंतु सजीव राखतां येत नाहींत, तर तो राजा कसला ! अशा प्रकारचें बोलणें चाललें

असतां, एका मुलास एक मरून पडलेला राघू आढळला. 'राघू! राघू! अरेरे मेला! कोणी मारला बरें!' सर्व मुलें त्याच्याभोंवतीं जमा झालीं. त्या गरीब पक्ष्याची सर्वांना करुणा आली. असा सुंदर प्राणी मरून पडलेला पाहून मुलें हळहळलीं. आतां काय करावें? प्रभूंना त्या मुलांचें दुःख पाहवेना. ते खालीं बसले. मेलेल्या पक्ष्याला हातांत धरून कुरवाळूं लागले. 'अरेरे! बाळ, तुला काय झालें; असा पडूं नको. ऊठ. जा आपल्या घरट्याकडे.' असें म्हणून त्या मृत पोपटाला वर फेंकलें. सर्व मुलें पाहत होतीं. जिवंत राघूप्रमाणें तो राघू सर्वांदेखत उडून गेला! मुलें आश्चर्यचकित झालीं. हें सामर्थ्य कोणाचें? मुलांना आश्चर्य वाटलें; तरी या गोष्टीचा फारसा विचार न करितां पुनश्च खेळांत दंग होऊन राहण्यास त्यांना वेळ लागला नाहीं. मुलांच्या या खेळांत असे प्रकार हमेषा घडून येत, तरी याचा बोभाटा मुलांनीं फारसा केला नाहीं. प्रभूंची मुलांना ताकीदच असे कीं, खेळांतल्या गोष्टी कोणाजवळ बोलूं नयेत.



## दगडाचे देव : : ५

प्रभूंचा सहवास सर्व बालगोपालांना अत्यंत प्रिय वाटत होता. त्यांच्या खेळाच्या प्रकारांत अत्यंत विविधता असे. नित्य कांहीं तरी नवा खेळ निघावयाचा. एखादे वेळीं देवांच्या पूजेचाही अपूर्व थाट या खेळांत होत असे. मुलांच्या खेळांतील देव म्हणजे रानांतील स्वयंभु दगड हेच असत. चांगले चांगले गोटे गोळा करून, त्यांना निरनिराळ्या देवतांचीं नांवें देत. पूजा-अर्चा वगैरे सर्व मोठीं माणसें करीत त्याची नक्कल असे. पूजासाहित्य रानांतील पाला, फुलें व वेळेवर सांपडतील त्या प्रकारचीं फळें यांचें असे. ह्या पूजेंत सर्व मुलांनीं सामील व्हावें. पूजा, नैवेद्य, आरति अगदीं यथासांग होऊन सर्वांना तीर्थप्रसाद वांटला जात असे. कधीं कधीं तर या पूजेच्या थाटांत कांहीं लोकांनीं केलेल्या नवसाच्या सामुग्रीची भर पडत असे. प्रभूंना फार लहानपणापासून नवस करणारे पुष्कळ लोक होते. त्या लोकांचें इच्छित कार्य सफल झाल्यानंतर नवस बोलल्याप्रमाणें सर्व साहित्य घेऊन प्रभूंचा शोध करीत, कोणी कोणी रानांत जाऊन नवस फेडीत असत. देवांच्या खेळाच्या वेळीं असे लोक हटकून रानांत यावयाचेच. खेळगडी मुलांना प्रसादाची चंगळ होऊन, सर्वत्र आनंदीआनंद होऊन जावयाचा. प्रभूंचा एक खेळगडी सांगत असे कीं, प्रभुसंगतीं असणाऱ्या जीवांना 'जंगलमें मंगल'

सदैव असे! हें ' जंगलमें मंगल ' प्रभुचरित्रांत सर्व ठिकाणीं व सर्व वेळीं नांदत असे, इतकेंच नव्हे, तर प्रभुसमाधि होऊन गेल्यानंतर आजपावेतों प्रभूंच्या गादीचा हा जिवंत महिमा प्रत्यहीं अनुभवास येत आहे. विद्यमान प्रभुमहाराजांच्या सहवासांत गेल्या तीस वर्षांत आम्ही असे शेंकडों प्रसंग अनुभविले आहेत.



## प्रभुबंधन : : ६

प्रभूंच्या अंगीं असलेलें अद्भुत सामर्थ्य वयोमानाप्रमाणें अधिकाधिक दृग्गोचर होत होतें. हें सामर्थ्य लहान मुलांच्या लवकर लक्षांत येत नसे. खेळांत ज्या साहजिक गोष्टी घडत त्यांनीं मुलें चकित होत. पण कोणी त्यांची फारशी चिकित्सा करीत नसत. कित्येक प्रसंगीं मुलें भ्रमांत सांपडत व घडलेल्या प्रकाराचें त्यांना लगेच विस्मरण होई. खेळतां खेळतां लपावयाची पाळी आली म्हणजे प्रभु लपून बसत ते दोन-दोन तीन-तीन दिवस सांपडत नसत. मुलांनीं सर्व रानें धुंडाळावीं, पण उपयोग होत नसे. दोन-तीन दिवसांनंतर मुलें कंटाळून गेलीं म्हणजे लपलेल्या ठिकाणींच प्रभु हंसत हंसत दृष्टीस पडत, त्या वेळीं मुलांना मोठी मौज वाटे. मुलांच्या डोकीचें पागोटें किंवा धोतर यांनीं प्रभु आपणांस झाडाशीं बांधवून घेत. खूप आंवळून बांधल्यानंतर बघतां बघतां प्रभु त्यांतून निसटून जात. केव्हां केव्हां धोतर प्रभूंच्या कमरेभोंवतीं बांधून दोन्ही टोंकांकडे उभें राहून मुलें खूप खेंचून ताणीत. धोतराच्या गांठींत प्रभूंना जखडून टाकण्याचा प्रयत्न मुलांकडून मोठ्या नेटानें होई. दांतओंठ खाऊन, सर्व शक्ति एकवटून, मुलांनीं दोन्ही बाजूंना धोतर ओढीत असावें. त्यांच्या प्रयत्नाची शिकस्त झाल्यानंतर आतां बरा सांपडला, अशा समजुतीनें प्रभूंकडे पाहतांच प्रभु धोतराच्या शेजारीं उभे असलेले दिसत !

नुसत्या धोतरालाच बळकट गांठ पडलेली असे. ह्या काय चमत्कार आहे! मुलांच्या हें कसें लक्षांत यावें! ह्या प्रकाराची वारंवार उजळणी झाली तरी प्रभूच्या अंगाभोंवतीं गांठ कधींच मारली जात नसे! प्रभूंनीं खूप हंसावें! मुलांनीं पुन्हा प्रयत्न करावा! धोतरास बळकट गांठ, पण प्रभु मात्र जसेच्या तसे मोकळेच!



# खोडकर मुलगा : : ७

रानांतील पशुपक्षी, कृमिकिटक आणि साप-विंचवाप्रमाणें विषारी जंतु इत्यादिकांना उपसर्ग पोहोंचूं नये असें प्रभूंचें सर्वांना सांगणें असे. मुलाप्रमाणें सर्व जीवमात्रांनीं निर्भयपणें विहार करावा अशी प्रभूंची अपेक्षा असे. कोणी कोणाच्या वाटेला जाऊं नये, असें प्रभूंचें म्हणणें असे व तें पुष्कळ मुलांना पटे. पण त्यांत कांहीं खोडकर मुलें खोड्या करीत असत. मुक्या जनावरांना त्रास होतो ही गोष्ट त्यांच्या लक्षांत येण्यास कांहीं उपायही योजावे लागत. तसे उपाय प्रभूकडून प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष अनेक वेळां योजिले जात. एके वेळीं एका गाभण असलेल्या म्हशीच्या अंगावर चढून तिला पळवीत नेणाऱ्या एका खोडकर मुलाची प्रभूंनीं कशी खोड मोडली ती हकीकत आम्हांस जशी समजली तशी देत आहों.

अवघडलेल्या म्हशीस या उनाड मुलाकडून फारच त्रास झालेला पाहून 'असें करूं नको' म्हणून प्रभूंनीं त्याचें निवारण केलें तरी तो मुलगा ऐकेना. शेवटीं 'आतां म्हशीच्या अंगास हात लावून तर पाहा म्हणजे समजेल' असें प्रभु बोलले. 'काय होतें पाहूं' म्हणून मुलानें दोन्ही हात म्हशीच्या पाठीवर ठेवले. प्रभू हंसतच म्हणाले, 'अरे, ती म्हैस फार वाईट आहे, तुझे हात धरून बसेल! पाहा रे बुवा आपला विचार!' प्रभूंच्या तोंडून हे शब्द निघतांच

मुलाचे दोन्ही हात म्हशीच्या पाठीवर चिकटून बसले. त्याला ते मोकळे करतां येईनात; म्हैस उधळली, मुलगा लोंबकळूं लागला. सर्व मुलांना ही गंमत झाली. म्हैस पळते आहे, मुलगा लोंबकळत चालला आहे ! मुलगा रडूं लागला. 'मेलों, मेलों, पुन्हां कधीं असें करणार नाहीं,' असें म्हणूं लागला. प्रभूंना त्याची ती केविलवाणी स्थिति पाहवेना. प्रभूंनीं ताडकन उठून पळत जाऊन त्या म्हशीस थांबविलें. तिच्या पाठीवर हात फिरवून ' बाई, तो पुन्हा तुला त्रास देणार नाहीं. एकवार त्याला क्षमा कर. सोड त्याला.' असें म्हणतांच मुलाचे हात सुटले. सर्व मुलांना मौजच मौज झाली. त्या मुलाला खाशी अद्दल घडली !



## काळंभट : : ८

गुलबर्ग्याचे रहिवासी, पण लहानपणापासून कल्याणास येऊन राहिलेले मेलगिर भट नांवाचे वैदिक ब्राह्मण प्रभूंच्या घरानजीक राहत असत. प्रभूपेक्षां हे वयानें तीन-चार वर्षांनीं अधिक असावेत. तरी प्रभूसंबंधीं त्यांना अत्यंत प्रेम वाटत असे. घरची गरिबी असून, भिक्षुकीवर निर्वाह करून असत. यांना शंकराची उपासना असल्यामुळें श्रावण महिन्यांत दरवर्षी बिल्वार्चन करीत असत. प्रभूंच्या घरानजीकच सोमेश्वराचें देवालय आहे; त्या देवालयांतील पिंडीवर अभिषेक करून सहस्र बिल्वपत्रें वाहिल्यावर नैवेद्य, आरति वगैरे करण्याचा रोजचा परिपाठ होता. एके दिवशीं बिल्वार्चन होऊन आरति करण्याच्या पूर्वीं बाळंभट नांवाच्या एका ब्राह्मणानें मेलगिर भटानें केलेली पूजा मोडून देवास पाणी घातलें. मेलगिरभटास वाईट वाटून ते त्याची कानउघाडणी करूं लागले. दोघांचें भांडण जुंपलें. भांडणाचा आवाज ऐकून प्रभु घरांतून बाहेर येतांच बाळंभट निघून गेला. मेलगिर भटाचें तोंड चाललें होतें. प्रभूजवळ सर्व गाऱ्हाणें निवेदन केलें. प्रभूंना या भटाचा निकट परिचय असल्यामुळें त्यास ते " काळ्या " या नांवानें नेहमीं हाक मारीत असत. वर्णानें अत्यंत काळा असल्यामुळें, प्रभूंनीं त्याला हें टोपण नांव दिलें होतें. पुढें त्याचें आमरण काळंभट हेंच नांव कायम राहिलें.

" काळ्या, दगडाच्या देवाची पूजा मोडली म्हणून इतकें रागावण्याचें कांहीं कारण नाहीं. "

"मग खरा देव आमच्यासारख्याला कसा दिसावा, भाऊ ?"

" तुला खरा देव पाहण्याची इच्छा आहे काय ? "

" इच्छा पुष्कळ आहे, पण तो दिसणार कसा व दाखवणार कोण ?"

प्रभूंना हसूं आलें. त्यांनीं त्याला डोळे मिटून शंकरापुढें बसावयास सांगितलें. कांहीं वेळानें "डोळे उघड" असे शब्द कानावर येतांच काळंभटानें डोळे उघडले. ज्या ठिकाणीं बिल्वार्चन केलेली व पूजा मोडल्यामुळें अस्ताव्यस्त शाळुंका व पिंडी दिसावयास पाहिजे होती, त्याच ठिकाणीं जटाधारी व भस्मचर्चित, कंठास नागाचा विळखा असून डोकीवर फणा दिसत आहे, वक्षस्थळावर रुद्राक्षाच्या माळा लोंबत आहेत व अत्यंत तेजस्वी व प्रकाशमान काया असून चेहरा टवटवीत असलेला एक गौरवर्ण पुरुष दृष्टीस पडला. शंकराचें वर्णन जसें पुराणांतरीं केलेलें असतें, त्याप्रमाणें साक्षात् श्रीशंकराची मूर्ति पाहून काळंभट स्तिमित झाला. अंगावर रोमांच उभे राहिले. साष्टांग नमस्कार घालून हात जोडून उभा राहिला आणि पाहतो तों पूर्वींप्रमाणेंच पूजा मोडलेली दिसली. प्रभू जवळच उभे होते. प्रभूंच्या चेहऱ्यावर हास्य निरखून ही प्रभूंचीच लीला होय अशी त्याची खातरी झाली. त्या दिवशीं तेथेंच त्यानें प्रभूची पूजा करून आरति केली. तेव्हांपासून

प्रभूच्या सामर्थ्याची जाणीव होऊन प्रभूवरील त्याचा विश्वास दृढावला. केव्हांही प्रभूंच्या पूजेचें प्रेम काळंभटास अधिक वाटत असे. नैवेद्य दाखविणें तो प्रभूच्या मुखांत घांस घालूनच दाखवीत असे. प्रभूही तो नैवेद्य मोठ्या संतोषानें खात असत.

काळंभट घरचा गरीब होता. भिक्षुकीवर जें काय मिळेल त्यावर समाधान मानून राही. रोजचें जेवण आतेच्या घरीं होत असे. तेथें पत्रावळी लावाव्या लागत. पळसाच्या पत्रावळीवर नित्य जेवणाचा प्रघात त्या काळीं असे. कल्याणचे आसपास पळसाचीं पानें विपुल मिळत. तीं एकदम बरींच आणून ठेवून रोज कारणापुरत्या पत्रावळी लावावयाच्या. एखादे वेळीं पानें कुजलेलींही असत. काळंभटास पत्रावळी लावण्याचा कंटाळा असे. त्यांत कुजकीं पानें लावावयास मिळालेलीं पाहून त्यानें पत्रावळी न लावण्याचा निश्चय केला. "पत्रावळी लावीत नाहींस, तर जेवण वर्ज्य" अशी तंबी मिळाली. काळंभटाच्या निश्चयाचा परिणाम शेवटीं आतेच्या घरचें जेवण बंद होण्यांत झाला. "पत्रावळीचा टांका मोडणार नाहीं. पण ज्या दिवशीं टांका मोडीन त्याच दिवशीं तुमच्या घरीं जेवीन," अशा प्रतिज्ञेनें त्यानें आतेचें घर सोडलें. काळंभट निग्रही होता. स्वतंत्र रीतीनें उदरनिर्वाह करण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें वागण्यास सुरवात झाली. पुढें श्रावण महिन्याचें बिल्वार्चन समाप्त झाल्यानंतर समाराधना करावयाची होती.

समाराधनेस पत्रावळींची गरज होती. काळंभटाची प्रतिज्ञा बहुतेकांस समजली होती. पत्रावळीशिवाय कसें प्रयोजन करतो तें पाहूं ! असें म्हणून त्याला कोठेंही पत्रावळी मिळूं देऊं नयेत याकरितां कांहीं लोकांनीं खटपट केली. दुकानदार पत्रावळी विकत देण्यास तयार होईनात. आतां काय करावें ! काळंभटास चिंता उत्पन्न झाली. इतक्यांत प्रभूंची स्वारी भेटली. "काळ्या, कसल्या काळजींत आहेस रे ?" हे प्रेमळ शब्द ऐकून काळंभटास गहिंवर आला व त्यानें आपल्या चिंतेचें स्वरूप प्रभूस निवेदन केलें. " अं:, मुळींच भिऊं नकोस; प्रभू सर्व चिंता दूर करील. " एवढें आश्वासन दिलें व प्रभू निघून गेले. ज्या दिवशीं प्रयोजन व्हावयाचें होतें, त्या दिवशीं सकाळीं सूर्योदयाच्या समयीं काळंभटाच्या घरीं दोन महार दाखल झाले. प्रत्येकाजवळ केळीच्या पानाचे बिंडे होते. +++ गांवच्या भाऊसाहेब कुलकर्ण्यांनीं हीं केळींचीं पानें पाठविलीं आहेत असें सांगून, पानें अंगणांत ठेवून महार निघावयास तयार झाले. काळंभटाचा आनंद काय पुसावा ! आयत्या वेळीं अत्यंत जरूर असलेली वस्तु अनायासें प्राप्त झालेली पाहून कोणास आनंद होणार नाहीं ! महारांना नांवें विचारतां एकानें 'भाऱ्या' व दुसऱ्यानें 'माणक्या' अशीं नांवें सांगितलीं. प्रयोजनानंतर जेवण करून जातों असें कबूल करून ते महार निघून गेले.

प्रयोजन यथासांग झालें. काळंभटास आनंद झाला. अखेर

त्या महारांचा तपास केला, पण ते मिळाले नाहींत. काळंभटास चटका लागला. सायंकाळपर्यंत वाट पाहिली, तरी कोणी आले नाहींत. त्या रात्रीं काळंभटास निद्रा लागली नाहीं. सकाळीं ××× गांवास जाऊन त्यांनीं भाऊसाहेब कुलकर्ण्यांची गांठ घेतली.

" आपण दोन महारांबरोबर केळीचीं पानें पाठविलीं तीं वेळेवर मिळून माझें प्रयोजन सांग झालें. फार आनंद झाला. आपले उपकार मज गरीबाकडून कसे फिटणार ? "

" केळीचीं पानें ! आणि तीं मी तुमच्याकडे पाठविलीं ! याचा अर्थच मला समजत नाहीं. माझी केळीची बाग नाहीं व आमच्या गांवांतही पण केळीचें एकही झाड नाहीं. "

" माणक्या व भाव्या या नांवाचे महार केळीचीं पानें घेऊन आले होते. त्यांनीं आपलेंच नांव सांगितलें. "

" फारच आश्चर्य आहे ! तुम्ही म्हणतां त्या नांवाचे महारही पण आमच्या गांवीं नाहींत. "

ज्यानें आपल्यावर अकल्पित उपकार करून बाजू सांभाळली त्या गृहस्थाचा तपास लागत नाहीं असें आढळून आल्यावर काळंभट खट्टू होऊन कल्याणास परत आला. दोनचार दिवस प्रभूंचा पत्ता लागला नाहीं. प्रभूंची गांठ घेण्याची तर त्याला तळमळ लागून राहिली. चैन पडेना. पुढें प्रभूंची गांठ पडल्याबरोबर त्यांना सर्व हकीकत कळविली. प्रभु मुक्तकंठानें हंसले. " काळ्या प्रभूनें तुझी चिंता दूर केली एकूण !

तुझ्याकरितां माझ्या प्रभूला महाराचें सोंग घेऊन पानें आणावीं लागलीं रे ! तीं पानें × × × च्या बागेंतील होतीं. " हें ऐकून काळंभटाच्या नेत्रांतून अश्रुधारा सुरू झाल्या. त्यानें प्रभूचे पाय घट्ट धरले. ही सर्व करणी याच प्रभूची आहे अशी त्याची खात्री झाली. पण ही गोष्ट कोणासही कळवूं नको, असें सांगून प्रभु निघून गेले. काळंभटाचें मुख्य दैवत ' प्रभु ' हेंच झालें. पुढें माणिकनगरास काळंभटाचें मरेपर्यंत वास्तव्य होतें. प्रभु समाधीनंतर समाधीसच बिल्वार्चन करण्याचा परिपाठ त्यानें सुरू केला. काळंभटानें आपल्या मुलास ही हकीकत कळवून, श्रावण महिन्यांत अभिषेक व बिल्वार्चन समाधीस करून, प्रयोजन करीत जा म्हणून सांगितलें. तो क्रम अद्यापपावेतों काळंभटाचे चिरंजीव चंद्रशेखरभट ( हेच सध्यां श्रीसमाधीचे मुख्य पूजारी आहेत ) यांनीं चालविला आहे.



## भालचंद्र दीक्षित : : ९

कल्याणचे पूर्वेस सुमारें आठ कोसांवर हळीखेड या नांवाचें एक गांव आहे. त्या ठिकाणीं त्या वेळीं भालचंद्र दीक्षित या नांवानें प्रसिद्ध असलेले एक अग्निहोत्री ब्राह्मण राहत असत. हे दीक्षित तत्कालीन विद्वानांत अग्रणी होते. पूर्वींच्या वैदिक परंपरेंत यांच्याइतका विद्वान् ब्राह्मण जवळपास कोणी नव्हता, असें म्हणतात. हे जसे वेदशास्त्रसंपन्न तसेच सदाचारसंपन्नही होते. त्यांच्या लौकिकाप्रमाणें त्यांचा शिष्यसमुदायही मोठाच होता. साक्षात् वेदोनारायणाप्रमाणें यांना लोक पूज्य मानीत. हे कधीं कधीं कल्याणास येत. मनोहर नाईकांचा व यांचा घरोबा असून, नेहमीं कल्याणास ते नाईकांच्या येथेंच उतरत असत. मनोहर नाईक निवर्तल्यानंतर ते कल्याणास आले, तेव्हां बयाम्मानें त्यांचा योग्य आदरसत्कार केला. मनोहर नाईकांच्या मुलांपैकीं, माणिक ऊर्फ भाऊ यास पाहून ते चकित झाले. प्रभूंचा चेहरा तेजस्वी होता; त्यांत एक प्रकारचें आकर्षक पाणी होतें. मुलासंबंधीं चौकशी करतां, मुलाचें विद्याभ्यासावर मुळींच लक्ष नसून तो सदोदित रानावनांत फिरत असतो, वेडयाप्रमाणें चाळे करतो, असें बयाम्मांनीं सांगितलें. 'प्रपंचाच्या दृष्टीनें मुलाचें कशावरच लक्ष नाहीं. घरांत असेल-नसेल तें कोणालाही देऊन टाकतो, उघडानागडा फिरतो, कधीं कधीं

अंगास राख लावतो, कधीं कधीं सर्व कपडे घालतो,' असे नाना प्रकारचे त्याचे चाळे अम्मांनीं दीक्षितांस सांगून 'तुम्ही तरी याला हळीखेडास घेऊन जाऊन नीट वळण लावा व कांहीं शिकवा' अशी विनंती केली. दीक्षितांनीं आपल्याबरोबर त्यास हळीखेडास नेण्याचें कबूल केलें. प्रभूही निमूटपणें दीक्षितांच्या समागमें हळीखेडास गेले. तेथें गेले तरी प्रभूंनीं आपलें वर्तन तिळमात्र बदललें नाहीं.कल्याणास जो प्रकार तोच हळीखेडास. भालचंद्र दीक्षित मात्र प्रभूंची योग्यता पूर्णपणें जाणून होते. घरीं प्रभु कशाही तऱ्हेनें वागले तरी कोणीं त्यांना प्रतिबंध करूं नये, अशी त्यांनीं घरच्या सर्व मंडळीस ताकीद दिली होती. तेथें प्रभूंच्या स्वच्छंदाचारास एक प्रकारची मोकळी-कच होती. दुपारच्या वेळीं प्रभु कशाही स्थितींत घरीं आले, तरी दीक्षितांनीं स्वतः सोंवळ्यांत असतांही प्रभूंना शिवून स्वच्छ स्नान घालून गंध लावावें, आणि आपल्यासमागमें जेऊं घालावें. प्रभूंनीं अनेक प्रकारें दीक्षितांचें सत्त्व पाहिलें. शेवटीं तर त्यांच्या होमशाळेंतील अग्निकुंडांत प्रातर्विधि करण्या-सही कमी केलें नाहीं. दीक्षितांच्या कुटुंबानें मात्र या गलिच्छ प्रकाराबद्दल तक्रार केली, पण दीक्षितांनीं चकार शब्दही काढला नाहीं. कोणी असें म्हणतात कीं, प्रभूंनीं अग्निकुंडांत शौच केल्याचें पाहिल्यावर त्यांच्या कुटुंबानें ही गोष्ट दीक्षि-तांच्या कानावर घातली व प्रभूंस असें पुन्हा न करण्याविषयीं ताकीद देण्यास सांगितलें. दीक्षित हें ऐकून म्हणाले, ' अशी

गोष्टच होणार नाहीं. शौच केला असेल तर काढून दाखवा म्हणजे खरें समजेन.' त्यावर बाईंनीं कुंडांत हात घालून पाहतांच सुवर्णाचा एक गोळा तिच्या हातास लागला. दीक्षितांची ही वृत्ति पाहून प्रभु सद्गदित होऊन म्हणाले, "दीक्षित, तुम्ही मात्र मला या अपूर्व प्रेमानें जखडून टाकिलें." या घराण्यावर प्रभूंची पूर्ण कृपादृष्टि होती. भालचंद्र दीक्षितांचे चिरंजीव नारायण दीक्षित हे पुढें प्रभूंच्या पट्टशिष्यांत गणले गेले. भालचंद्र दीक्षित प्रभूंच्या कृपेनें जास्तच धनकनकसंपन्न होऊन आनंदित झाले व अधिक प्रसिद्धीस चढले. प्रभु हा साक्षात् अग्निनारायण आहे असें दीक्षित म्हणत असत. असो. कांहीं काल हळीखेडास राहून दीक्षितांच्या अनुज्ञेनें व संतोषानें प्रभु पुनश्च कल्याणास आले.



## जकातनाकें : : १०

प्रभूंच्या या रानांतील व गांवांतील अनेक लीला प्रभूंचा लौकिक पसरविण्यास कारणीभूत झाल्या, तरी कुटुंबाच्या दृष्टीनें कांहीं फरक दिसून आला नाहीं. जें कांहीं येईल तें लगेच वाहेर जावयाचें हा नित्याचा क्रम. कोणीं उत्तम कपडे दिले तर ते एखादा दिवस प्रभूंच्या अंगावर राहिले तर राहत, नाहीं तर त्यांनीं रस्ता सुधरावयाचाच. हणमंतरावदादा हे मामांच्या इच्छेप्रमाणें वागून, कांहीं उद्योग करून प्रपंच चालवीत, पण तो जेमतेम चाले. ही स्थिति मामांस बरी वाटत नसे. मामांनीं प्रभूंच्या पाठीमागें लागून लागून, त्यांस कांहीं तरी नोकरी करावयास भाग पाडलें. जकातनाक्यावर कारकुनी करावयाची नोकरी मामांच्या हातीं असल्यामुळें, तीवर प्रभूस जोडून दिलें. माल येईल त्याप्रमाणें पैसे वसूल करावयाचे व जमेचें टिप्पण ठेवावयाचें, एवढेंच काम होतें. कांहीं दिवस प्रभूंनीं तें काम केलें. पुढेंपुढें जमलेले पैसे सरकारांत दाखल होण्याऐवजीं, गोरगरीब, दीन-दुबळे यांच्या हातीं जाऊं लागले. मामा कंटाळून गेले. प्रभु नोकरी सोडून मोकळे झाले. प्रपंचाची चिंता प्रभूंस तिळमात्र नाहीं हें पाहून मामा संतापले. प्रभूंच्या शांतींत तिळमात्र फरक झाला नाहीं.



## हणमंतरावदादांचें लग्न : : ११

हळीखेडकर भालचंद्र दीक्षित यांची प्रभुघराण्याशीं आपला शरीरसंबंध घडून यावा अशी फार इच्छा होती. त्याप्रमाणें त्यांनीं बयाम्मांची व मामांची अनुमति मिळवून, आपली उपवर कन्या लक्ष्मीबाई हिला हणमंतरावदादास देऊन आपला इच्छित हेतु पूर्ण केला. लग्नसमारंभ कल्याणासच झाला. हणमंतरावांच्या मनांत लग्नकर्तव्य नव्हतें, पण वडिलांच्या आग्रहावरून व प्रभूंच्या सांगण्यावरून ते लग्नास प्रवृत्त झाले. ते शांत स्वभावाचे, मौनी पण एकमार्गी असत. लग्नाच्या समयीं अकल्पित रीतीनें सर्व साहित्य जमा झालें. कोणतेंही न्यून भासलें नाहीं. भालचंद्र दीक्षितांस मोठें समाधान वाटलें.



# नृसिंहतात्यांची मुंज : : १२

प्रभूंच्या सामर्थ्याचा लौकिक दिवसेंदिवस वृद्धिंगत होत चालला होता, तरी घर मात्र नेहमीं धुतल्यासारखें असे. प्रपंचाची ओढाताण व्हावयाची. हणमंतरावांची कमाई अल्पस्वल्प उपयोगी पडे. पुरवठ्यास मामांच्या मदतीची जरूर असेच. नृसिंहतात्या सहा वर्षांचे झाले. मुंज करणें जरूरच होतें; पण घरीं पैसा नाहीं, सामान नाहीं, कापड नाहीं, मग मुंज कशी पार पडावी ? बयाम्मांस चिंता उत्पन्न झाली. प्रभूंनीं मातेचा विचार जाणून घराजवळच्या सोमेश्वराच्या देवालयांत आसन घातलें. त्या देवळांतील गणपतीपुढें सुपारी ठेवून सांगितलें कीं, आमच्या तात्याची मुंज हा गणपतीच निर्विघ्नपणें पार पाडील; कांहीं चिंता करूं नका. सायंकाळपर्यंत प्रभु त्याच आसनावर बसून राहिले होते. सायंकाळच्या समयीं कोणी व्यंकप्पा नांवाचा वैश्य जातीचा सावकार अकस्मात् येऊन दाखल झाला. तो आपल्यासमागमें मुलाचें बाललेणें, कपडे व चारशें लोकांचें जेवणाचें सामान घेऊन, नवसाची फेड करण्याकरितां आला होता.त्यास प्रभु सोमेश्वराच्या देवळांत असल्याचें समजल्यावरून, त्यानें सर्व सामान तेथें आणून प्रभूंपुढें ठेविलें. व्यंकाप्पानें मुलाकरितां प्रभूस नवस केला होता. त्याप्रमाणें त्याला पुत्रप्राप्ति होऊन, नवस बोलल्याप्रमाणें सर्व साहित्यासह त्यानें प्रभूंची तात्काल पूजा केली. बाललेणें

व कपडे तात्याच्या अंगास बरोबर झाले व सामानही मुंजीस पाहिजे होतें तितकें जमलें, हें पाहून बयाम्मांस अत्यानंद झाला. मुहूर्तनिश्चय होऊन मुंज निर्विघ्नपणें यथासांग झाली. ही मुंज आपल्या गणपतीनें केली असें प्रभु म्हणाले. मुंजीस पुण्याहवाचन करून देवक बसविण्यास हणमंतरावदादांची गरज होती. ते तर हळीखेडास आपल्या कुटुंबास आणण्याकरितां गेले होते. तेसुद्धां ऐन वेळेवर दाखल होऊन,मौंजीबंधन यथासांग झालें. कसलेंही न्यून भासलें नाहीं.



## मामा : : १३

याप्रमाणें या कुटुंबाचा योगक्षेम प्रभूंच्या सामर्थ्यावर चालला होता. तथापि प्रपंचाची ओढाताण कांहीं कमी नव्हती. गरजेपुरतें सामान येई. प्रपंचाच्या दृष्टीनें जो संग्रह असणें जरूर असे, तो मात्र मुळींच नसे. उण्यापुऱ्यास मामांना उपसर्ग पोहोंचे. प्रपंचाच्या दृष्टीनें प्रभूंचे मार्ग मामांना पसंत पडत नसत. प्रभूंनीं कांहीं तरी व्यावहारिक उद्योग करावा, द्रव्य संपादन करावें, लौकिक व अधिकार मिळवावा अशी त्यांची अपेक्षा असे. सर्वस्वीं देवावर हवाला टाकून काळ कंठित जाणें हें आळशी लोकांचें काम, अशी त्यांची समजूत होती. त्यांच्या समजुतीप्रमाणें उद्योग करून पुरुषार्थ मिळवावा, यांतच इतिकर्तव्यता होती. व्यवहाराच्या दृष्टीनें त्यांचें म्हणणें योग्यच होतें. पण प्रभूंनीं व्यवहाराकडे अथवा प्रपंचाकडे कधीं लक्ष दिलें होतें? त्यांचा प्रपंच याहून अगदीं भिन्न स्वरूपाचा होता. कधींकधीं मामांच्या घरीं प्रभू राहत त्याप्रमाणें या वेळीं ते मामांच्या येथेंच असतांना एके दिवशीं दुपारच्या वेळीं मामांच्या पलंगावर दुशाला पांघरून स्वस्थ झोंपी गेले होते. मामा बाहेरून घरीं आल्यानंतर पाहतात तों, वेडा भाऊ निजलेला पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. वेड्याप्रमाणें स्वैर वृत्तीनें वागणाऱ्या मुलानें ऐषआरामाची लालसा धरावी हें नवल खरेंच! प्रभूंची कानउघडणी करण्यास ही संधि उत्तम

आहे, असें समजून त्यांनीं प्रभूंस उठवून त्यांची निर्भर्त्सना आरंभिली. " वा ! एखाद्या जहागिरदाराप्रमाणें अशा थाटांत निजतांना मनास कांहीं लाजलज्जा वाटावयास पाहिजे होती ! तूं कोण, तुझी योग्यता काय, याचा अगदींच विचार न करतां ऐषआरामाची हांव धरावीस हें अत्यंत निंद्य आहे. एवढा मोठा १६ वर्षांच्या घोडा झालास; अजून तुला पोटास मिळविण्याची अक्कल नाहीं. तुझ्याकरितां दुसऱ्यांनीं कष्ट करावे, याची थोडीशी शरम वाटली असती तरी कांहीं तरी हातपाय हालवितास. या वयांत ' लाथ मारीन तिथें पाणी काढीन ' अशी तुझ्यासारख्या तरुणास धमक पाहिजे. पण तुझें जें पाहतों तें सर्वच विचित्र ! अंगांत बुद्धि आहे पण शिकावयाला नको; अक्षर देवदयेनें चांगलें आहे, पण लिहावयाला नको; शरीरसामर्थ्य चांगलें आहे, पण काम करावयाला नको ! दुसऱ्याच्या जिवावर आयतें जगणाऱ्या मूर्खा, कांहीं तरी आपल्या घरच्या स्थितीचा विचार कर. हणमंतानें काबाडकष्ट करावेत, तुझी भर करावी; आणि अम्मानें तुझ्याकरितां राबावें, पण तुला त्याचें काय ? तुमच्या कुटुंबास मीं तरी काय म्हणून संभाळावें ? ज्याचें त्याला हित समजत नाहीं, मग दुसऱ्यांनीं त्याच्याकरितां काय म्हणून कष्टी व्हावें ? आतां इतःपर माझ्या घरांत तुला आसरा मिळणार नाहीं हें ध्यानांत ठेव. इतके दिवस तुमचें पालनपोषण केलें तें व्यर्थ गेलें. तुला घरीं किंवा येथें यापुढें अन्न मिळणार

नाहीं. येथून चालता हो; आयतें अन्न दोन वेळां मिळतें आहे म्हणून या घमेंडी सुचतात, तें अन्नच बंद पडल्याशिवाय तुझे डोळे उघडणार नाहींत. चल, चालता हो माझ्या समोरून !"

हे किंवा या अर्थाचे मामांचे शब्द ऐकून प्रभूंच्या मनास दुःख वाटलें काय? आपण आतां निराधार झालों म्हणून ते रडूं लागले काय? मामांच्या अंतःकरणाची जाणीव प्रभूस होती. मामा व्यवहार जाणणारे होते व व्यवहाराच्या दृष्टीनें मामांनीं आपलें कर्तव्यच केलें होतें. प्रभूंच्या प्रेमळ भक्तांना मामांच्या या कृतीबद्दल त्वेष येणें साहजिकच आहे. पण त्यांनीं विचार केल्यास आढळून येईल कीं, ही मामांची दुरुक्ति प्रभूंच्या भावी कार्यास उपकारक अशीच झाली. प्रभूंचा प्रपंच संकुचित नव्हता. प्रपंचक्षेत्र विस्तृत झालें होतें. व्यावहारिक कुटुंबांतून सर्व पाशमुक्त होऊन त्यांना बाहेर पडावयाचें होतें. ते अनुकूल संधीचीच मार्गप्रतीक्षा करीत होते. मामांनीं ही संधि प्राप्त करून दिली. मनोहर नाईकांना दत्त-साक्षात्कार होऊन स्पष्ट सूचना मिळाली होती कीं, प्रपंचा-करितां सर्वांत धाकटा पुत्र नृसिंह याची योजना केली आहे. प्रभूंना संसार करावयाचा नव्हता. ही जाणीव ज्ञात्या मनोहर नाईकांस होती म्हणूनच त्यांनीं प्रभूंच्या कोणत्याही कृतीला विरोध केला नव्हता. मामांस ही जाणीव नव्हती. ते व्यवहारी होते. म्हणून मामाच आपल्या कार्यास अनुकूल होतील अशी

प्रभूंची अटकळ होती. जी संधि प्रभूंना हवी होती, ती अनायासें मामांनीं घडवून आणिली.

मामांच्या दुरुक्तीस प्रभूंनीं काय उत्तर दिलें, हें जाणण्याची उत्कंठा वाचकांस लागणें साहजिक आहे. प्रभूंचें वास्तविक स्वरूप या उत्तरावरून समजून येणार आहे. अत्यंत शांत व उल्हसित वृत्तीनें प्रभूंनीं नेसलेलें धोतर तेथेंच फाडून, त्याची लंगोटी घातली. मामांस नमस्कार करून रस्ता धरिला. जातांजातां त्यांच्या मुखांतून गंगेच्या निर्मल प्रवाहाप्रमाणें पुढील पदांत दिलेला वाक्प्रवाह बाहेर पडलाः—

पद

प्रभुविण कोण कुणाचा वाली ? ॥ धृ० ॥
कर्ता हर्ता तो करवीता ' मी ' मिथ्या जनबोली ॥ १ ॥
कोण कुणाचा चाकर मालक, व्यर्थंचि आपण खाली ॥ २ ॥
माणिक म्हणे मातेच्या उदरीं नवमास रक्षण केली ॥ ३ ॥

" ज्या प्रभूनें मातेच्या उदरांत ही काया नऊ महिनेपर्यंत संभाळली, त्या प्रभूशिवाय दुसरा कोण वाली जगांत आहे ? ज्यानें मला जन्म दिला, तोच माझा संभाळ करण्यास समर्थ आहे. मामा, आपण विनाकारण कष्टी होऊं नका; आपला आशीर्वाद असावा, मी येतों आतां !"

वरच्या मजल्यावर जाण्याकरितां ज्याप्रमाणें जिन्याचा उपयोग करावा लागतो, त्याप्रमाणेंच मामांच्या दुरुक्तीचा,

असल्या नश्वर ऐश्वर्याला लाथाडून प्रभूंनीं उपयोग करून घेतला. प्रभूंच्या तोंडीं लहानपणापासून 'प्रभु' हा शब्द नेहमीं असे. या पदापासून या प्रभु शब्दाला महत्त्व येऊन, तो माणिक या नांवापुढें जोडला गेला. असो.

येथपर्यंत प्रभूंचा संबंध कल्याणास होता. यापुढें प्रभूंनीं कल्याण सोडलें. पण जगाचें कल्याण हातीं धरलें. प्रभुवियोग कल्याणच्या बालगोपालांना असह्य झाला. प्रभूंनीं कल्याण गांव सोडलें, तरी कल्याण गांवानें प्रभूंना मुळींच सोडलें नाहीं. प्रभूंच्या आवडत्या पट्टशिष्यांमध्यें कल्याणचे लोकच अधिक होते. हा कथाभाग आतां यापुढें येणार आहे.





# पर्यटन

## अमृतकुंड : : १

कल्याणपासून सुमारें तीन कोसांवर 'मंठाळ' या नांवाचें एक गांव आहे. या गांवानजीक चंडकापुर गांवच्या हद्दींत, अमृतकुंड नांवाचें एक अत्यंत प्राचीन तीर्थ आहे. याला हल्लीं " अंबिलकुंड" असें अपभ्रष्ट रूप प्राप्त झालें आहे. पूर्वींच्या आर्य संस्कृतीच्या वैभव काळीं, ह्या पवित्र तीर्थावर कित्येक तपोनिधींनीं तपश्चर्या करून या तीर्थाच्या महत्त्वांत भर घातली होती. आजच्या अवनत स्थितींतही या तीर्थाची निसर्गरमणीयता यत्किंचितही कमी झालेली नाहीं. हें कुंड चोहों बाजूंनीं पक्क्या दगडांनीं बांधविलेलें आहे. पाण्याचा संचय भरपूर असून उन्हाळा-पावसाळा तें सतत एका बांधींव नालींतून बाहेर वाहत असतें. या पाण्याखालीं मंठाळ गांवचे कांहीं उसाचे मळे सध्यां चाललेले दिसत आहेत. कुंडाभोंवतीं झाडी असून कुंडाच्या पश्चिम अंगास एक ओढा वाहत आहे. झाडीमुळें व विपुल जलसंचयामुळें या स्थानाला प्रशांत व आकर्षक सौंदर्य आलें आहे. कुंडाच्या दक्षिणेस व पश्चिमेस उतारूंकरितां

ओंवऱ्या बांधलेल्या आहेत. पूर्व बाजूस श्रीशंकराचें देवालय आहे. हें देवालय हेमाडपंती नमुन्याचें दिसतें. देवालयाच्या दक्षिण बाजूस प्राचीन शिल्पकलेची साक्ष देणारे इमारतीचे खांब व अनेक मूर्ति कोरलेले मोठमोठे दगड आहेत. हा सर्व भाग उध्वस्त झाल्याचें पाहून मनास उद्वेग होतो. येथेंच एक गुहेप्रमाणें जागा आहे. तिला सध्या चवकट व दार लावलेलें आहे. साधु, गोसावी, वैरागी वगैरेपैकीं कोणी तरी येथें राहत असतात. देवाचे पुजारी गुरव असून, ते एका मैलावर असलेल्या, मंठाळगांवीं राहतात. हें स्थान निर्जन असल्यामुळें भयानक दिसलें, तरी सृष्टिसौंदर्याची आवड असणाऱ्याला रमणीय वाटतें. स्थान पाहिल्यास तपश्चर्येची वासना उत्पन्न होते. कुंड वाहतें असल्यानें पाणी स्वच्छ असावयास कांहीं हरकत नाहीं. पण खालीं बराच गाळ सांठल्यामुळें, स्नान करतेवेळीं तो गाळ वर येऊन पाणी गढूळ बनतें व साहजिकच त्याला अंबिलीचें स्वरूप येऊन, आपल्या नांवाप्रमाणें अंबिलकुंड होत असतें ! सध्याच्या कालीं जबाबदार व्यवस्था नसल्यामुळें कुंडांतील गाळ वेळेवर काढला जात नाहीं.

या कुंडापासून सुमारें पाव मैलावर, तक्की सोमण्णाचें देऊळ असलेलें स्थान आहे. पूर्वीं या ठिकाणीं उत्कृष्ट शंकराचें देऊळ असावें, असें सहज अनुमान होतें. देऊळ उध्वस्त करून उत्तम उत्तम नक्षीदार दगडही यवनांनीं लांबविले. देवाची पिंडीच फक्त येथें उभी आहे. पिंडी पांच फूट

उंच असून तिचा घेर आठ फूट भरेल. पिंडीचें घडींव काम फारच सफाईदार आहे. ही पिंडी फोडण्याचा प्रयत्न झाला असावा असें वाटतें. पिंडीच्या डोकीवर घणाचे घाव पडलेले दिसत आहेत, पण पिंडी अद्याप शाबूत आहे.

अंबिलकुंडाच्या उत्तरेस सुमारें एक मैलावर सीतेची न्हाणी असून सीतेची गुंफाही आहे. भोंवतालची जमीन लाल रंगाची असतांही या न्हाणींतील पाणी ताकाच्या पाण्याप्रमाणें शुभ्र रंगाचें आहे. पाण्यांत कांहींसा स्निग्धतेचा अंश असावा असें वाटतें. पाणी निर्मळ असून स्वादिष्ट आहे. ह्या न्हाणीचें पाणी एका बाजूनें वाहत जात आहे. नजीकच्या उसाच्या मळ्यास, या पाण्याचा पुरवठा होत असतो. कुंडाजवळ एक बांधलेली गुहा आहे. तिला सीतेची गुंफा म्हणतात. या गुहेपलीकडे खडकांत खोदलेली एक गुहा आहे. गुहेच्या तोंडास गर्द झाडी आहे. ह्या गुहेच्यावर १५-२० फुटांवर चढून गेल्यानंतर आणखी एक खडकांतील गुहा लागते. वाट फारच अवघड आहे. ही गुहा प्रेक्षणीय आहे. गुहेच्या उत्तर बाजूकडे, (म्हणजे गुहेकडे तोंड केल्यास आपल्या उजव्या बाजूस) एक कमान आहे. कमानीपलीकडे उतरून जाण्यास पायऱ्या आहेत. तेथें उतरून उजवीकडे जाण्यास अरुंद वाट आहे. पंचवीस-तीस फूट बसूनच गेल्याशिवाय, आंत जातां येत नाहीं. त्याच्यापुढें काय आहे तें समजत नाहीं. अत्यंत एकांत-वासांत राहून तपश्चर्या करण्यास हें स्थान सर्वोत्तम आहे.

मंठाळचे एक गृहस्थ नित्य अंविलकुंडास देवदर्शनास येत असत. हे मंठाळचे कुलकर्णी असून भाविक होते. एके दिवशीं नित्याप्रमाणें हे श्रीशंकराच्या दर्शनास आले. दर्शन घेऊन प्रदक्षिणेच्या वाटेवर पाहतात तों दूर अंतरावर एक सोळा-सतरा वर्षांचा तरुण त्यांच्या दृष्टीला पडला. त्या तरुणाची तेजःपुंज अंगकांति पाहून हे गृहस्थ विस्मित झाले. नुसती लंगोटी घालून, सर्वांगाला भस्म लाविलें आहे असें त्याचें स्वरूप पाहून हा साक्षात् शंकरच आहे कीं काय असें त्यांना वाटलें; पण खातरी पटेना. शेवटीं जवळ जाऊन, कोण, कुठला व या भयाण निर्जन अरण्यांत कशाकरितां आला, याची चौकशी करावी म्हणून, हे गृहस्थ त्या मुलाकडे जाऊं लागले. तो तरुण मुलगा पुढें पुढें जाऊं लागला. त्याला गांठण्याचा हेतु धरून, हे त्याच्या मागोमाग जाऊं लागले. ओढ्याच्या पलीकडील झाडींत जाऊन, तो तरुण दिसेनासा झाला. हेही पुढें चालले; वळणावर जात असतां त्या ठिकाणीं एक भयंकर वाघ गुरगुरत उभा असल्याचें पाहून यांची पांचावर धारण बसली. या ठिकाणीं भर दिवसा व्याघ्रादिक हिंस्र पशूंचा संचार असतो, ही गोष्ट त्यांना ऐकून माहीत होती. पुढें जाण्याचा नाद सोडून हे लगेच मागें परतले. स्वतःचा जीव वांचविण्याशिवाय दुसरें महत्त्वाचें काम नव्हतें. परत फिरून कसेंबसें त्यांनीं गांव गांठलें. पण त्या तरुणाचें तें रूप त्यांच्या अंतःकरणांतून

गेलें नाहीं. तो देव होता काय? वाघाची भीति त्याला नव्हती काय? मनुष्य असता तर "वाघ वाघ" म्हणून तो मुलगा ओरडला असता! आज भगवान् शंकरानें आपणास दर्शन दिलें असूनही आपण वाघाच्या भयानें त्याला सोडून परत फिरलों, ही गोष्ट फार वाईट झाली असें त्यांच्या मनानें घेतलें. मनाची ओढ त्या स्थानाकडे लागून राहिली; पण वाघाच्या भीतीनें त्यांचे पाय त्यांना कित्येक दिवस अंबिलकुंडाकडे नेऊं शकले नाहींत.

पुढें महिन्या दोन महिन्यांनीं एक वेडसर वृत्तीचा तरुण काठीचा घोडा करून मंठाळ गांवांत आला. काठीचा घोडा पाहून मुलांना नवल वाटलें व गांवचीं मुलें त्याच्याभोंवतीं जमा झालीं. ह्या मुलांच्या घोळक्यासह हा तरुण मंठाळच्या कुलकर्ण्याच्या घरीं दाखल झाला. कुलकर्ण्यानें जवळ येऊन पाहतांच हा कल्याणचा माणिकप्रभु म्हणून त्यानें ओळखिलें. आपणास दोन महिन्यांपूर्वीं अंबिलकुंडावर आढळलेला हाच तो मुलगा अशी त्यांची खात्री झाली. कल्याणचा माणिकप्रभु म्हणतांच सर्व गांवभर ही बातमी हां हां म्हणतां पसरली. प्रभूचें दर्शन घेण्यास सर्व गांव लोटलें. कुलकर्ण्याच्या घरीं त्यांचें कुटुंब अडलें होतें. कुलकर्णी मोठया चिंतेंत होते. पुष्कळ उपाय केले तरी सुटका होईना; म्हणून ते घाबरून गेले होते. इतक्यांत माणिकप्रभूंना पाहून त्यांच्या जिवांत जीव आला. त्यांनीं प्रभूंना प्रार्थना केली. प्रभूंनीं त्यांना सांगितलें

"काहीं चिंता करूं नका. चार ब्राह्मणांचें तीर्थ बाईला आतांच्या आतां पाजा, म्हणजे लगेच सुटका होईल." ही प्रभूंच्या तोंडची अमृतवाणी ऐकून त्यांनीं त्याप्रमाणें केलें. बाईची सुटका होऊन मुलगा झाला! मग त्या आनंदाला काय विचारावें! प्रभू जाण्यास निघाले. त्यांनीं मोठ्या आग्रहानें प्रभूंच्या हातावर एक गुळपापडीचा लाडू ठेविला. तो प्रभूंनीं खाऊन ढेकर दिली. गांवांत माणिकप्रभूंचें हें वर्तमान समजतांच प्रभूभोंवतीं गर्दी जमली. पण तितक्यांतून प्रभूंनीं काठीच्या घोड्यावर स्वार होऊन दौड मारली. प्रभूंचा पाठलाग कोण करूं शकणार?

प्रभु एकाएकीं कल्याणहून नाहींसे झाल्याचें पाहून घरची सर्व मंडळी शोकाकुल झाली होती. मामांनाही फार दुःख झालें. आपण करायला गेलों एक व झालें भलतेंच, असें त्यांना झालें. सर्व मंडळींनीं प्रभूंचा चोहोंकडे शोध केला; परंतु कोणासही यश आलें नाहीं. बरेच दिवस शोध करूनही काहीं तपास लागत नाहीं असें पाहून, सर्व निराश झाले होते. प्रभूंच्या संगतीं खेळणाऱ्या मुलांनाही अत्यंत दुःख झालें. त्यांनींही आपल्यापरी पराकाष्ठा केली, पण उपयोग झाला नाहीं. प्रभु कल्याणहून निघून गेल्यानंतर, तीनचार महिन्यांनीं, त्यांना प्रभू मंठाळ येथें प्रकट झाल्याचें वर्तमान समजलें. बयाम्मा, हणमंतरावदादा, व नृसिंहतात्या यांना समागमें घेऊन, मामा मंठाळास आले. तेथें एक वेळच प्रभु

आल्याचें समजल्यावरून अंबिलकुंडास गेले. तेथेंही प्रभूंचा पत्ता लागेना. सीतेच्या गुंफेकडे जाऊन तपास केला, पत्ता नाहीं. कंटाळून गेले ! तरी सर्वजण मंठाळ येथेंच मुक्काम करून राहिले. शेवटीं प्रभूंना त्यांचें अंतरंग समजून दया आली. अंबिलकुंडावर प्रभु प्रकट झाले. हें वर्तमान मंठाळास पोंचतांच, सर्व मंडळी अंबिलकुंडावर गेली. प्रभूंची भेट होऊन, सर्वांना आनंदीआनंद झाला. तेथेंच दोनतीन दिवस मुक्काम करून राहिले. त्या वेळीं अंबिलकुंडावर 'नित्य श्री नित्य मंगल' चाललेलें पाहून सर्वांना धन्यता वाटली. प्रभुदर्शनाकरितां शेंकडों लोक नित्यश: येऊं लागले. भोजनसमारंभ सुरू झाले. पेढयांचीं व खारीक, नारळ, खडीसाखर इत्यादिकांचीं दुकानें, त्या निर्जन स्थळीं थाटलीं गेलीं. पूजा, अर्चा, नैवेद्य, ब्राह्मण-भोजन इत्यादि प्रकार पाहून मामा दंग झाले. प्रभूंच्या अचाट सामर्थ्याची कल्पना आतां सर्वांना पटली व सर्वांनीं धन्योद्गार काढले. प्रभूंनीं सर्वांची समजूत करून, त्यांना कल्याणास परत पाठविलें. हणमंतरावदादा, प्रथमपासूनच मौनी होते. ते मामांच्या आज्ञेंत राहून कालक्रमणा करीत. नृसिंहतात्या अल्पवयी असल्यामुळें विद्याभ्यासाशिवाय त्यांच्याकडे दुसरें कांहीं काम नव्हतें. विद्याभ्यास मात्र तात्यांनीं उत्तम रीतीनें चालविला होता. 'प्रपंचाचे कामास नृसिंहाची योजना आहे, आमची अपेक्षा मुळींच धरूं नका,' असें प्रभूंनीं सर्वांना निक्षून सांगितलें. प्रभूंच्या इच्छेच्या आड येऊं नये म्हणून सर्व मंडळी कल्याणास संतोषानें परत गेली.

प्रभूंच्या चरित्राला स्वतंत्रपणें सुरवात झाली ती अंबिल-कुंडापासूनच होय. या ठिकाणीं प्रभूंचा वास सहा महिने एकसारखा होता. कधीं गुप्त,कधीं प्रकट अशा रीतीनें प्रभूंनीं येथें सहा महिने काढले. या निसर्गरमणीय स्थळाचें महात्म्य, प्रभूंच्या वास्तव्यापासून फार वाढलें. निर्जन, ओसाड व भयानक भासणारें हें स्थान, लोकांनीं गजबजून गेलें; पूजा, अर्चा इत्यादिकांच्या निनादानें, दुमदुमून गेलें व ठिकठिकाणीं दुकानें व पालें उभीं राहिल्यामुळें शोभायमान झालें ! या जंगलांत मंगल वाद्यें सुरू झालीं. भोजनाच्या पंक्तीवर पंक्ति उठूं लागल्या. सर्वत्र जयजयकाराचा ध्वनि घुमूं लागला. प्रभूंच्या दर्शनास येणाऱ्या भाविकांचे चार प्रकार कल्पितां येतील. आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी. या चार प्रकारांमध्यें सर्वांचा समावेश होण्यासारखा आहे. हे चतुर्विध लोक प्रभूंच्या मागें येण्यास खरी सुरवात या आंबिलकुंडापासूनच झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. वेडा भाऊ बोलतो तें खरें होतें, एवढया समजुतीनें आजपर्यंत जे लोक प्रभूकडे येत त्यांचीं कामें होत असत. कोणास रोग झालेला असे, कोणावर संकट असे, कोणास पुत्राची अपेक्षा असे; असे नाना प्रकारच्या कामनेनें भरलेले किंवा आपत्तीनें त्रस्त झालेले लोकच आजवर येत. त्यांच्या पुढच्या पायरीचे लोक म्हणजे जिज्ञासु हे होत. प्रभूजवळ कांहीं योगसामर्थ्य आहे, ज्ञानसंग्रह आहे, तो हस्तगत करावा या हेतूनें येणारे लोक ते जिज्ञासु

होत. या वर्गांत सर्व शिष्यांचा समावेश होतो. केवळ द्रव्य मागण्याचा हेतु धरून कांहीं लोक येऊं लागले, ते अर्थार्थी या सदरामध्यें येतात. आणि स्वतः ज्ञानसंपन्न असतांही प्रभुदर्शनास येत, ते चवथ्या सदराखालीं मोडतात. प्रभूंचा उत्कर्ष जसजसा होत गेला तसतसे क्रमाक्रमानें हे चारी प्रकारचे लोक प्रभूभोंवतीं जमा होऊं लागले. यांत आर्त व अर्थार्थी लोकांचें संख्याधिक्य होतें.

प्रभूंच्या स्वतंत्र सामर्थ्यास सुरवात अंबिलकुंडापासूनच झाली असें आम्हीं वर म्हटलेंच आहे. सहा महिने या ठिकाणीं एकसारखा वास झाल्यामुळें लोकसमाज जमूं लागला. 'वुत्ति जात्री'स येथूनच सुरवात झाली. 'बुत्तिजात्री' हा शब्द कानडी आहे. याचा अर्थ वाढपाची जत्रा, असा होतो. आसपासच्या खेडयापाडयांतील शेंकडों लोकांनीं प्रभूंच्या आवडीचे निरनिराळे पदार्थ तयार करून आणावयाचे आणि प्रभूंना अर्पण करावयाचे. सर्व बालगोपालांचा मेळा जमवून प्रभूंनीं सर्वांच्या वाढपांतील पदार्थ स्तुति करीत ग्रहण करावयाचे. या प्रकारच्या भोजनांत विविधता असून फारच मौज असे. नाना प्रकारचे खमंग व रुचकर पदार्थ सर्वांना मिळून भोजन चमचमीत होई. खिचडी, वडे, भर्जीं, घपाटे, निरनिराळीं थालिपीठें, भाज्या, उसळी, यांची विविधता व निरनिराळ्या लोकांनीं केल्यामुळें रुचिविचित्रता नित्य अनुभवास येई. अशा प्रकारचे आनंदाचे दिवस त्या निर्जन अरण्यांत जाऊं लागल्यामुळें तें

अरण्य आनंदाचें स्थान बनलें. ‘ नित्य श्री नित्य मंगल ’ हें प्रभुसंन्निध सदैव राहूं लागलें. तथापि प्रभु मधून मधून चारआठ दिवस गुप्त होत असत, तेव्हां कोणासही त्यांचा पत्ता लागत नसे; तरी प्रभूंच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत लोकसमुदाय तसाच राहत असे. प्रभुसमागमें सदैव निर्भयता असे.

चितापुरचे विठ्ठलराव पेषकार यांचें स्वदस्तुरचें एक पत्र आम्हास पाहावयास मिळालें आहे. त्यांत त्यांच्या वडिलांकडून समजलेली पुढील हकीकत त्यांनीं लिहिली आहे. प्रथम कल्याणांतून बाहेर पडून अंबिलकुंडाकडे प्रभु चालले, त्या वेळीं त्यांच्या मागोमाग विठ्ठलरावचे वडील व आणखी एक समवयस्क गृहस्थ असे दोघेजण निघाले. विठ्ठलरावचे वडील कल्याणास राहत होते, तेही प्रभुसमागमांतील खेळगडी होते असें त्यांच्या हकीकतीवरून दिसतें. दुसऱ्या मनुष्याचें नांव विठ्ठलरावांनीं दिलें नाहीं; पण प्रतापपुरानजीकच्या निकवे गांवचा कुळकर्णी अंबादासराव यांचे ते सासरे होते असें म्हटलें आहे. त्यांनीं दिलेल्या हकीकतीचा सारांश असा आहे कीं, कल्याणांतून प्रभु बाहेर पडले, त्या वेळीं त्यांच्या पाठोपाठ हे दोघेजण निघाले. कल्याणपासून तीन कोसांवर असलेल्या मंठाळनजीकच्या अरण्यांत प्रभु शिरले त्या वेळीं या दोघांनीं प्रभूंना तसें न करण्याबद्दल परोपरीनें सांगितलें. अरण्याची भीति त्यांना वाटत आहे असें पाहून प्रभूंनीं “ भिऊं नका; माझ्यामागोमाग या, तुमचं भाग्य उदयाला

येईल." असें सांगितल्यावरून ते प्रभूंच्या मागोमाग चालूं लागले. अंबिलकुंडानजीकच्या गुहेजवळ आल्यावर प्रभूंच्या सांगण्यावरून हे दोघेही प्रभूमागें गुहेंत शिरले. कांहीं पावलें गेल्यावर एक शिळा दिसली, ती प्रभूसुद्धां या तिघांनीं खालीं पाडली व सर्वजण तिच्या आंतील गुहेंत शिरले. त्या गुहेंतील जागा अत्यंत स्वच्छ असून त्यांत एक आगटी दिसली. आगटीनजीक एक चिमटा पडला होता. आगटींतील राख रसरशीत होती. थोडेंसें पुढें जातांच पहिल्यापेक्षांही मोठी अशी एक काळी शिळा दृष्टीला पडली. ती खालीं पाडण्याचा प्रयत्न दोघांनीं करून पाहिला; परंतु यश आलें नाहीं. शेवटीं प्रभु हंसून म्हणाले, "आतां पुरे करा; फक्त माझ्या धोतराचा पदर घट्ट धरून उभे रहा; भिऊं नका." असें म्हणून प्रभूंनीं एक जोराचा हिसडा देतांच ती प्रचंड शिळा उलथून पडली. पण आंतील गुहेंतून एक भयंकर गर्जना ऐकूं आली. ती एखाद्या प्रचंड वाघाची असावी असा त्या दोघांना भास होऊन, ते घाबरून गेले व प्रभूंच्या धोतराचा धरलेला पदर सोडून मागच्या पावलीं पळत सुटले ! पळतां पळतां कांहीं तरी धाडकन् पडल्याचा आवाज त्यांना ऐकूं आला व त्याबरोबरच वाघाची गर्जनाही झाली. त्यांनीं अनुमान केलें कीं प्रभूंवर त्या वाघानें झडप घालून त्यांना खाऊन टाकलें असावें. भीतीनें गर्भगळित होऊन ते धांवत सुटले व थोडक्याच अवधींत त्यांनीं कल्याण गांठलें ! परंतु ह्या झालेल्या प्रकाराबद्दल कोणाजवळ 'ब्र' सुद्धां

काढण्याची त्यांना छाती झाली नाहीं. या गोष्टीला कांहीं महिने गेले, तरी अंबिलकुंडाकडे जाण्याचें धैर्य त्यांना होईना. पुढें कल्याणची बरीच मंडळी अंबिलकुंडास स्नानास निघालेली पाहून हे दोघेही बरोबर दशम्या घेऊन निघाले. डोंगर चढून अंबिलकुंडाजवळ येतांच यांना प्रभूंचें स्मरण होऊन पूर्वींच्या घडलेल्या प्रकाराबद्दल ते बोलत आहेत इतक्यांत समोर प्रभूंची स्वारी दृष्टीस पडली. वाघाच्या गुहेंतून प्रभु जिवंत बाहेर आल्याचें पाहून त्यांना अत्यंत नवल वाटलें. आणि जवळ जवळ दोन महिने प्रभूंना अन्न मिळालें नसतांही, पूर्वींपेक्षांही प्रभूंचा चेहरा तेजस्वी व प्रफुल्लित असलेला पाहून ते विस्मित झाले. हें असें कसें झालें ? असा त्यांनीं प्रभूंना प्रश्न केला; त्यावर प्रभु म्हणाले, "तुम्ही न घाबरतां माझ्यामागें आला असतां, तर त्याचें मर्म समजलें असतें. आतां काय उपयोग ?" नंतर अंबिलकुंडावर आलेल्या सर्व लोकांचीं स्नानें झाल्यावर प्रभूंसह या दोघांनीं स्नान केलें व एका बाजूस बसून बरोबर आणलेल्या दशम्या खाऊंया अशी इच्छा प्रदर्शित केली. इतक्यांत समोरून एक बैरागी येत असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. या बैराग्याची अंगकांति अत्यंत तेजःपुंज होती. त्याच्या समागमें दोन कुत्र्या होत्या, हातांत एक कटोरा होता व कांखेला झोळी लटकत होती. या बैराग्याला पाहून प्रभु म्हणाले, "आज महाप्रसादाचा योग आहे. प्रसाद घेतल्यावर मगच दशम्या खाऊं."

हा काय चमत्कार आहे हें त्या दोघांच्या लक्षांत आलें नाहीं. त्या बैराग्यानें आपल्या कटोऱ्यांत कुत्र्यांचें दूध काढलें व झोळींतील भाकरीचे तुकडे त्यांत कालवले. जवळच एक मेलेला साप पडला होता, तोही उचलून त्या कटोऱ्यांत घालून भाकरींबरोबर कालविला. हे दोघे विस्मित होऊन हा प्रकार पाहत होते. सर्व काला कालविल्यावर त्या बैराग्यानें प्रभूंना हाक मारून कटोऱ्यांतील मूठभर काला त्यांच्या हातांत दिला. त्याप्रमाणें या दोघांनाही जवळ बोलावून त्यांच्याही हातांत काला दिला. प्रभूंनीं तो काला चटकन् तोंडांत घालून खाऊन टाकला. पण प्रत्यक्ष पाहिलेल्या किळसवाण्या प्रकारामुळें या दोघांनीं तो काला तसाच हातांत धरून ठेविला. बैराग्यानें शांतपणें कटोऱ्यांतील सर्व काला खाल्ल्यानंतर, बैरागी निघून गेला. प्रभूंनीं या दोघांना काला खाल्ला काय, असें विचारलें तेव्हां त्यांनीं झालेली गोष्ट सांगितली व मूठ उघडून प्रभूला दाखविली. पण मुठींत कांहींच दिसलें नाहीं ! बैरागी आला कोठून, व गेला कोठें हें त्यांना समजलें नाहीं. तसेंच मुठींत धरलेल्या काल्याचें तरी काय झालें हेंही त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. "तुमचें भाग्यच नाहीं त्याला तुम्हीं काय करणार ?" एवढेच उद्गार प्रभूंनीं काढले.

वरील हकीकत विठ्ठलराव पेष्कार यांना त्यांच्या वडिलांकडून समजली असें ते म्हणतात. हें कथानक अद्भुत आहे. याच पत्रांत विठ्ठलरावांनीं असेंही म्हटलें आहे कीं,

प्रभूंनीं एकदां ‘ आ ’ पसरून, आपल्या तोंडांत दत्तात्रयाचें रूप आपल्या मातु:श्रीस दाखविलें !

प्रभु अमृतकुंडावर सहा महिने राहिले होते हें मागें कळविलेंच आहे. या सहा महिन्यांत अनेक पंथांचे लोक नित्यश: प्रभुदर्शनार्थ येत असत. एकदां असाच कांहीं लिंगायत लोकांचा समुदाय तेथें आला. लोकसमुदायाच्या अजमासानें स्वयंपाकाची सिद्धता झाली. सर्वांचीं पानें वाढावयाची तयारी झाली तेव्हां आढळून आलें कीं, अन्नाच्या मानानें लोकांची संख्या फारच मोठी आहे. आतां काय करावें या विवंचनेंत मुख्य पुढारी पडले. कांहीं लोकांनीं प्रभूंकडे जाऊन हें वर्तमान कळविलें. तेव्हां प्रभूंनीं आज्ञा केली कीं, “कांहीं चिंता करूं नका; सर्वांचीं पानें मांडून वाढावयास सुरवात करा.” असें म्हणून प्रभु चटकन् उठून शिजलेल्या अन्नाकडे जाऊन त्यावर त्यांनीं आपली अमृतदृष्टि फेकली. प्रभुनामाचा जयजयकार करून भक्त मंडळींनीं सर्वांचीं पानें मांडून एकदम वाढावयास प्रारंभ केला. शेवटीं सर्वांना भरपूर प्रसाद मिळून, त्यांची आकंठ तृप्ति झाली. सर्वांचीं जेवणें झाल्यावरही बरेंच अन्न शिल्लक राहिलें. नंतर तें अन्न घेऊन जाणाऱ्या लोकांसही देऊन टाकलें. अशा प्रकारें आपल्या भक्तांची चिंता दूर करून प्रभूंनीं सर्वांना सुखी केलें.

अमृतकुंडांवर एकदा रात्रीच्या समयीं तेल संपून गेलें व दिवे लावण्याची सोय नसल्यामुळें फारच अंधार पडला. लोक

भयभीत झाले. पण दिव्याची सोय कशी करावी,हें कोणालाच सुचेना. भयंकर अरण्य, श्वापदांची सदैव भीति, शिवाय चोर, लुटारू लोकांचा उपसर्ग; यामुळें प्रभूंकरितां राहिलेले ते भक्तलोक भयविव्हल होऊन हें संकट दूर व्हावें म्हणून प्रार्थना करूं लागले. त्यांचें मनोगत ओळखून प्रभूंना त्यांची करुणा आली. इतक्यांत तुपाचे बुधले घेऊन कांहीं माणसें तेथें येऊन दाखल झालीं. मग प्रभूंनीं आज्ञा केली कीं, "तेलाच्या जागीं तुपाचे दिवे लावावे." आज्ञेप्रमाणें देवालयांत व चोहोंकडे तुपाचे दिवे लावण्यांत आले. अशा रीतीनें प्रभूंनीं भक्तलोकांना निर्भय करून संतोषित केलें.

अशा तऱ्हेच्या अनंत कथा ऐकण्यांत आहेत. त्या सर्वांचा समावेश या ठिकाणीं करतां येणें शक्य नाहीं. प्रभूंचा मुक्काम अंबिलकुंडावर सहा महिने झाल्यानंतर, कल्याणच्या लोकांच्या आग्रहास्तव, प्रभु पुनश्च कल्याणास गेले. परंतु प्रभूंचें वास्तव्य कायमपणें कल्याणास यापुढें कधींच झालें नाहीं. यापुढील बारा वर्षांत, प्रभूंचा संचार सर्व मणिचूल पर्वतावर झाला असला, तरी मधून मधून कांहीं काळ प्रभु कल्याणास येऊन राहत असत. प्रभु कोठेंही गेले, तरी त्यांच्या समागमें थोडासा शिष्यगण राहत असेच. हे सर्व बहुतेक कल्याण किंवा आसपासच्या गांवांतीलच होते. यांत चिमाणाजी नांवाचा शिष्य प्रभुसमागमें सदोदित राहूं लागला. सटका व झोळी यांची दीक्षा प्रथम संपादन करून घेणारा हाच ब्रह्मचारी होय.

आपल्या समागमें सतत राहणाऱ्या शिष्यवृंदांस सर्व प्रकारें सौख्य प्राप्त होऊन त्यांना पारमार्थिक श्रेष्ठता मिळावी, अशी योजना सहजगत्या प्रभूकडून होत असे. शिष्यांनीं आचरण्याचे नियम, यथायोग्य रीतीनें पाळले जातात कीं नाहींत, हें प्रभु सूक्ष्म रीतीनें पाहत असत. कोणाची चूक झाल्यास त्याची जाणीव करून देऊन प्रेमानें त्यापासून परावृत्त करण्याची विलक्षण हातोटी प्रभूंना साधून गेली होती. सर्व शिष्यमंडळ कडकडीत ब्रह्मचर्य पाळीत असे व आपापल्या मार्गाचें साधन करण्यास तत्पर असे. यत्किंचित् बाबींतही प्रभु लक्ष देत असत व कोणासही मानसिक अथवा शारीरिक पीडा होऊं नये अशी व्यवस्था ठेवीत. प्रभुसहवासांत कोणाला कसलेंच भय नसे; तथापि मधून मधून कांहीं पीडा उत्पन्न झाल्यास, प्रभूकडून तिचा परिहारही तात्काळ होत असे.

एकदा एका शिष्याच्या पोटांत दुखूं लागलें. पोटांतील असह्य वेदनांनीं तो गडबडा लोळूं लागला. पोटशूळ भयंकर प्रकारचा असल्यामुळें, कसल्याही उपायांनीं तो शमेना. शेवटीं प्रभूंकडे याची वर्दी पोंचली. प्रभु त्या शिष्याजवळ गेले व त्याची विचारपूस करूं लागले. पोटांतील त्या तीव्र वेदना त्या बिचाऱ्याला बोलून दाखवितां येईनात व त्याची तळमळ राहीना. शेवटीं प्रभूंनीं त्याच्या पोटावर हात फिरविण्यास सुरवात केली. प्रभूंच्या हाताचा स्पर्श होतांच वेदना कमी होऊं लागल्या. कांहीं वेळानें पोटदुखी बंद होऊन त्याची तळमळ शांत झाली.

वरीलप्रमाणें शारीरिक विकार असंख्य लोकांचे बरे होत असत. कांहीं लोकांची पिशाचबाधा नाहींशी झाली, कांहीं लोकांचें दारिद्र्य दूर पळालें, कांहीं लोकांना पुत्रप्राप्ति झाली, अशा एक ना दोन, हजारों गोष्टी नित्यशः दृष्टोत्पत्तीस येऊं लागल्या. प्रभुसामर्थ्याचा लौकिक पसरूं लागला,व प्रभुदर्शनाला येणारा लोकसमाजही दिवसेंदिवस वाढूं लागला. जमलेल्या लोकांच्या अन्नोदकाची व्यवस्था प्रभूजवळ उत्तम होऊं लागली. दत्ताची झोळी हीच प्रभूजवळ कामधेनु होती; ती सर्वांच्या अन्नोदकाची भरपूर सोय करून ठेवी. प्रभु तर साक्षात् भक्तकार्यकल्पद्रुमच होते !



## तात्यांचें लग्न : : २

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें, अमृतकुंडावर सहा महिने वास्तव्य करून प्रभूंची स्वारी पुनश्च कल्याणास येऊन राहिली. कल्याणास परत चलण्याविषयीं प्रभुभक्तांनीं फारच आग्रह चालविला होता. याकरितां प्रभूंनीं त्यांच्या इच्छेप्रमाणें वागून त्यांना संतुष्ट केलें. प्रभूंच्या घरची स्थिति म्हणण्यासारखी समाधानकारक नव्हती. वडील बंधु हणमंतराव-दादा यांचा विवाह झाला होता. भालचंद्र दीक्षितांनीं आपली कन्या हणमंतरावदादास दिली होती. ही साध्वी परम भाविक होती. इतक्या अल्पवयांतही तिच्या लोकोत्तर गुणांनीं सर्वांना संतोष वाटून असली पत्नीं लाभल्याबद्दल दादांना धन्यता वाटत असे. प्रभूंवर या साध्वीची अनन्य भक्ति होती.

> **श्रीगुरु माणिकावरी ॥ भक्ति असे भारी ॥**
> **म्हणे हा मधुकैटभारी ॥ प्रत्यक्ष होय ॥ १ ॥**
> **त्रिभुवनाचा नायक ॥ हा श्रीगुरु माणिक ॥**
> **एवं असे निश्चयात्मक ॥ मन तिचें ॥ २ ॥**
> **श्रीगुरुराजावांचून ॥ न गमे तिजसी एक क्षण ॥**
> **म्हणे हाचि चिद्धन ॥ गुरु कोठें हा मिळेल ? ॥ ३ ॥**

अशा प्रकारचें तिचें गुणवर्णन मनोहर महाराजकृत माणिक चरित्रांत केलें आहे. पूज्य भावनेनें प्रभूंवर प्रेम करून प्रभु मागतील ते जिन्नस, त्यांना मोठ्या आनंदानें करून देण्यास ती सदैव तत्पर राही. संसार गरीबीचा होता, तथापि अशा

स्थितींतही आपल्या सासरच्या सर्व मंडळींची मर्जी राखून आपल्या सद्वर्तनानें तिनें तो सुखमय केला होता. घरांतील कोणताही जिन्नस याचकांना देण्यास प्रभु दक्ष असत; पण या साध्वीनें कधींही त्याबद्दल कुरकुर केली नाहीं. इतकेंच नव्हे, तर प्रभूंना संतोष होईल असेंच वर्तन तिनें ठेविलें होतें.

**मग कांहीं दिवसांत ॥ गुरु प्रसादें हनुमंत जायेंत ॥**
**आत्मज्ञान प्राप्त ॥ जाहलें असे ॥ १ ॥**
**देहाचा जाहला अभान ॥ तेव्हां कोण करी पोषण ॥**
**म्हणोनियां देहावसान ॥ जाहलें त्या सतीचें ॥ २ ॥**
**एवं ती हनुमंत जाया ॥ साक्षात् जाण आर्या ॥**
**समर्थ महात्म्या या ॥ वर्णावया नसे कोणी ॥ ३ ॥**

ऐन तारुण्याच्या भरांत अशा तऱ्हेचा शेवट झाल्याचें वर्णन वाचून तिच्यासंबंधानें कोणीही धन्योद्गारच काढतील.

सुशील, सदाचारसंपन्न व अनुरूप अशा पत्नीचा वियोग हनुमंतरावदादांस असह्य होऊन त्यांनीं तीर्थयात्रा करण्याचा संकल्प करून घराबाहेर प्रयाण केलें. ते बरेच दिवस बाहेर प्रदेशींच फिरत होते. प्रभूंची वडील भगिनी चिमणाई यापूर्वींच निवर्तली होती. हनुमंतरावानंतर चिमणाबाईचा जन्म झाला. ही मातु:श्रीची फारच आवडती होती. अष्टवर्षाची होतांच हिचें कन्यादान झालें होतें. चिमणाबाईचें आपल्या कनिष्ठ बंधूवर अलोट प्रेम होतें. इतर चरित्रकारांनीं चिमणाबाईसंबंधानें कांहींच उल्लेख केलेला नाहीं. मनोहरमहाराजांनीं मात्र ओंवीबद्ध चरित्रांत उल्लेख केला आहे. लग्न झाल्यानंतर

थोड्याच महिन्यांनीं चिमणाबाईचें देहावसान झालें. यासंबंधीं—

> एक बैसोनी आसनीं ॥ चित्त लाविलें गुरु चरणीं ॥
> आत्मा ब्रह्मरंध्राहुनी ॥ नेती झाली मनोहरसुता ॥ १ ॥

असें मनोहर महाराज म्हणतात.

अमृतकुंडांहून प्रभु कल्याणास आल्यानंतर गांवांतील लोकांची श्रद्धा प्रभूवर अधिकच जडली. प्रभूंच्या खेळगड्यांतील कांहीं लोक निकटवर्ति शिष्य बनले. या वेळीं प्रभूंच्या घरीं मातु:श्री व कनिष्ठ बंधु नृसिंहतात्या एवढेच होते. हनुमंतराव तीर्थयात्रेस गेले होते. त्यांच्याबरोबर मामाही निघून गेले होते असें कित्येक म्हणतात. नृसिंहरावतात्यांचा विद्याभ्यास चालला होता. लहानपणापासून ते हुशार म्हणून गणले गेले होते. प्रपंच करून कुटुंब उदयाला आणणारा हाच मुलगा असल्यामुळें मातु:श्री बयाम्मांचें त्याच्यावर फार प्रेम होतें. ते दोघेही एक विचारानें राहत असत. कल्याणच्या लोकांपैकीं जसे कांहीं लोक प्रेमळ प्रभुभक्त होते, तसेच कांहीं लोक निष्कारण द्वेष्टेही पण होते. सत्पुरुषावर अकारण प्रेम करणारे असतात, त्याचप्रमाणें निष्कारण वैरभाव धरणारेही असतात, ही नवलाची गोष्ट असली,तरी चिरपरिचयाची आहे.वेळीं-अवेळीं प्रभूंची कुचेष्टा करण्यांतही कांहीं लोकांना कृतकृत्यता वाटत असे. अशा कुचेष्टेखोर मंडळींचा एक जमाव बनत चालला होता व कांहीं तरी निमित्तानें प्रभूंचें सत्त्व पाहण्याचा त्यांनीं विचार चालविला होता.

कल्याण येथील देशपांड्यांचे गुमास्ते लक्ष्मणराव या नांवाचे एक गृहस्थ होते. ते या टवाळ कंपूचे अग्रणी जरी नव्हते, तरी या कंपूचें प्रावल्य त्यांच्यावर असल्यामुळें, त्यांच्या वैठकींत ते वारंवार सामील होत असत. हे प्रभुदर्शनार्थ प्रभूकडे येत असत, पण यांचें येणें केवळ वरकरणी असे. अंत:करणापासून तशी त्यांची श्रद्धा नव्हती. गांवांतील वराच शिष्ट समाज प्रभूंच्या सामर्थ्याचा परिचय असल्यामुळें, प्रभूवर प्रेम करणारा होता.

एके दिवशीं प्रभू आपल्या शिष्यगणांसह वसले असतां, इतर लोकांबरोवर लक्ष्मणरावही प्रभुदर्शनास आले. इकडच्या तिकडच्या गोष्टी कांहीं वेळ चालल्यानंतर नृसिंहतात्यांच्या लग्नाचा प्रश्न निघाला.

"आम्ही देखत ऐकत फकीर. आमच्याजवळ पैसा ना अडका. गांवांत घर नाहीं, रानांत शेत नाहीं, अशी आमची स्थिति! असें असतां तात्याला मुलगी कोण देणार?" लक्ष्मणरावानेंच उपस्थित केलेल्या प्रश्नास हें प्रभूचें उत्तर होतें. 'नरसिंहराव आतां वयांत आले असतां, त्यांचें लग्न कां करीत नाहीं?' असा तो प्रश्न होता. प्रभूंचें वरील उत्तर ऐकून लगेच लक्ष्मणराव म्हणतो—

"असें कसें होईल? लग्नास लागणारा योग्य तो खर्च करावयास आपण तयार असाल, तर कोणीही मुलगी देईल."

त्याचा नाच पाहूनी । आनंदती आपुले मनीं ॥
त्यासी श्रीकृष्ण लीला सांगुनी । हळू हळू सोडविती ॥ १ ॥
पुढें तोचि नटधारी । गाउनी नाचे परोपकारी ॥
श्रीहरि लीला परी । नाना परी वर्णू लागे ॥ २ ॥

अशा प्रकारें भगवान् श्रीकृष्णाच्या प्रेमळ भक्तीची त्याला गोडी लावून दिल्यानंतर तो त्यांत रंगून गेला व श्रीप्रभूंच्या कृष्णपर पदांनीं नानाचें मूळचें स्वरूप पालटून त्याच्या प्रेमळपणांत दिव्य तेज उत्पन्न झालें.

नानाच्या द्वेष्ट्यांनीं प्रभूंनीं त्याला आश्रय दिला आहे हे वर्तमान ऐकल्यावर, त्याच्यावरील बहिष्काराला व्यापक स्वरूप द्यावें म्हणून जगद्गुरूकडे त्याची फिर्याद नेली, म्हणून प्रभूंच्या आज्ञेवरून तो जगद्गुरूकडे गेला. तेथें काय झालें याचें वर्णन खालील ओव्यांत फारच बहारीचें केलें असल्यामुळें आम्ही त्या तशाच देत आहों.

नाना येऊनी लागे चरणीं । स्वामीस विनवी दीनवदनीं ॥
महाराज मजला यावांचूनी । अन्य गोडी न वाटे ॥ १ ॥
परी मज पोटीं एक हेत । स्वामींनीं ऐकावें माझें गीत ॥
नंतर मजला प्रायश्चित्त । जें देणें तें द्यावें ॥ २ ॥
ऐसें ऐकून करुणावचन । द्रवलें सर्वांचें अंतःकरण ॥
स्वामीची आज्ञा घेऊन । विचार केला गाण्याचा ॥ ३ ॥
आज्ञा होतांचि पाही । आनंद वाटला नानाचे हृदयां ।
चरणीं ठेवोनी डोई । तयारी करीत असे ॥ ४ ॥

" ठीक आहे तर. या तुमच्या बोलण्यांत खरेपणा असेल तर आतांच्या आतां यादीच करून टाका, तुमच्या सर्व अटी आम्हांस मान्य आहेत."

त्याच बैठकींत लग्नाची यादी तयार होऊन, उभयतांच्या सह्या झाल्या. बोलल्याप्रमाणें सर्व कराराची यादी, लक्ष्मण-रावानें स्वतः लिहून तयार केली. व सामानाची व्यवस्था होतांच मुहूर्त नेमावयाचें ठरून गेलें. लग्नाची यादी होऊन गेली, पण घरांत काय ? सर्व प्रेमी शिष्यगणांस मोठी चिंता उत्पन्न झाली. एकदम अचानक इतकी सामुग्री व पैसा कसा यावा याचा उलगडा कोणास होईना. प्रभुभक्तांस त्या दिवशीं रात्रभर चैन पडलें नाहीं. सामानाची व पैशाची व्यवस्था नाहीं झाली, तर प्रभूंचा दुर्लौकिक होऊन सर्वत्र छी थू होणार यांत शंका नाहीं, अशी भीति त्यांना वाटूं लागली. सर्वजण अशा पेंचांत सांपडले असतां, रात्रीं त्यापैकीं कांहीं जणांना ग्रामदैवत हनुमंताचें दर्शन झालें व मारुतिरायानें प्रसाद दिला. ह्या दृष्टांतानें ते संतुष्ट झाले, परंतु विवंचना दूर झाली नाहीं. या वेळीं त्या गांवीं एक बसप्पा नांवाचा वैश्य सावकार होता. तो प्रभुभक्त होता. त्यानें ही मंडळी चिंतातुर असल्याचें पाहून विचारपूस केली. झालेली सर्व हकीकत ऐकून तो वैश्य स्वयंस्फूर्तीनें म्हणाला, " कांहीं चिंता करूंनका, असें महत्त्वाचें कार्य आहे तर लागेल ती सामुग्री व द्रव्य मी

एकटाच देतों. प्रभूच्या कृपेनें माझें परम कल्याण होईल." असें बोलूनच तो थांबला नाहीं, तर सर्व सामान गाडीवर भरून लगेंच त्यानें प्रभुगृहीं आणून लाविलें. मातुःश्रीसह सर्व शिष्यवृंदाची चिंता दूर होऊन त्यांना आनंद झाला. प्रभु आपल्या ठिकाणीं स्वस्थ पडून होते. त्यांजकडे जाऊन एकानें सामानाच्या सिद्धतेची वार्ता कळविली. प्रभु हास्य करून म्हणाले, "दत्ताची कृपा !"

तात्काल लक्ष्मणरावाकडे निरोप गेला. तो बुचकळ्यांत पडला; पण वचनांत सांपडल्यामुळें त्याला आतां 'नाहीं, होय' म्हणावयाची सोयच नव्हती. नाइलाज म्हणून त्यानेंही तयारी चालविली. मुहूर्त कायम झाला व लग्नसमारंभाला मोठ्या कडाक्यानें सुरवात झाली. प्रभूंच्या घरीं मूर्तिमंत कामधेनु वास करीत होती, त्यामुळें त्यांना कशाचीच वाण पडली नाहीं. ठरलेल्या करारापेक्षांही सर्व व्यवस्था अधिक होऊन, लग्न-समारंभ बहारीचा झाला. अशा प्रकारें या बैराग्याच्या घरचा लग्नसमारंभ कांहीं एक न्यून न पडतां उत्तम रीतीनें यथासांग झाल्याचें पाहून लक्ष्मणरावाच्या टवाळ मंडळीला बरें वाटलें नाहीं. या समारंभाला कांहीं तरी गालबोट लावावें ही उत्कंठा त्यांना चैन पडूं देईना. सर्वांचीं डोकीं एकत्र जमून त्यांनीं एक युक्ति योजिली. या युक्तींत प्रत्यक्ष लक्ष्मणरावाचें फारसें अंग नव्हतें; तथापि ती मंडळी त्याच्या कह्यांतही नव्हती. मुली-कडील मंडळीला प्रयोजन द्यावयाचें त्या दिवशीं आपलीं फार

थोडीं माणसें भोजनाला येतील असें कळविण्यांत आलें. इकडे प्रभुभक्तांनीं येणाऱ्या मंडळींच्या अजमासानें स्वयंपाकाची सिद्धता केली. स्वयंपाक तयार होऊन व्याह्यांना बोलवणें गेलें. व्याह्याकडील माणसें अजमासापेक्षां अधिक येऊं लागलीं. आमचीं माणसें दहा-वीस येणार आहेत असें पूर्वीं सांगून, आयत्या वेळीं तीनचारशें माणसें भोजनास न्यावयाचीं असें त्यांनीं निश्चित केलें होतें. त्याप्रमाणें भोजनानिमित्त लोकसमाज अनिवार येऊन लोटला. प्रभुशिष्य चिंतातुर झाले. इतक्या लोकांना अन्नाचा पुरवठा कसा होणार ? सत्त्व जाण्याचा समय होता. आतां काय करावें ?

या वेळीं प्रभु गाढ झोपेंत होते. शिष्यांनीं धांदल करून प्रभूंना जागृत केलें, आणि सर्व वृत्त निवेदन केलें. प्रभूंच्या चेहऱ्यावर यत्किंचितही चिंतेचें लक्षण दिसून आलें नाहीं. शिष्य मंडळीला धीर देऊन प्रभु म्हणाले, “ कांहीं चिंता नाहीं; सर्व गांव येऊं दे, लाज राखणारा दत्तप्रभु समर्थ आहे. ”

असें बोलून प्रभु उठले व स्वयंपाकघरांत जाऊन त्यांनीं सर्व तयार केलेलें अन्न डोळ्यांनीं पाहून, सर्व पदार्थांना आपल्या हातांतील योगदंडाचा स्पर्श केला आणि बाहेर येऊन पात्रें मांडावयास आज्ञा दिली. “ सद्गुरु माणिकप्रभु महाराज की जय ” अशी गर्जना करून, शिष्यांनीं पानें मांडून वाढण्यास प्रारंभ केला. सर्व पदार्थ वाढून झाल्यावर उदक सोडलें व प्रभु-जयजयकारांत भोजनास सुरवात झाली.

टवाळ मंडळी सत्त्वहरण करण्याच्या प्रबल इच्छेनें एकजमावानें आली होती. तिनें अन्नाचा वाटेल तितका फन्ना करण्यास कमी केलें नाहीं. खाऊन अन्न संपणार नाहीं असें पाहून, नासाडी करण्यासही ते चुकले नाहींत. त्यांचे सर्व चाळे शिष्य मंडळींनीं बिनबोभाट चालूं दिले व त्यांच्या म्हणण्या-प्रमाणें भरपूर अन्न वाढलें. एका मनुष्यानें वडे पाहिजेत असा बोभाटा केला. त्याच्या पानांत वडे होते, पण आणखी पाहिजेत म्हणून गलबला करतांच टोपल्यांनीं वडे वाढण्यांत आले ! अन्नाची कमतरता मुळींच पडली नाहीं. कसलेंही व्यंग काढतां येईना म्हणून आलेली मंडळी ओशाळी झाली. प्रभुशिष्यांनीं एकसारखा प्रभुनामाचा जयजयकार चालविला होता. अशा अपूर्व थाटानें भोजनसमारंभ उरकला. त्यानंतर पंगतीवर पंगती उठूनही बरेंच अन्न शिल्लक राहिलें. शेवटीं गांवांतील गाईंना अन्न दिलें आणि उरलेलें अन्न जलचरांना मिळावें म्हणून तळ्यांत टाकून दिलें.

हा प्रकार पाहून, व ऐकून बऱ्याच वृद्ध व समंजस लोकांना परम दुःख झालें. लक्ष्मणराव तर अत्यंत ओशाळा झाला. वड्यांसंबंधीं बोभाटा करणारा मनुष्य लज्जित झाला होता. त्याला कांहीं तरी प्रायश्चित्त मिळावयास पाहिजे होतें, म्हणून दुसऱ्या दिवशीं त्याच्या पोटांत दुखूं लागलें.उदरव्यथेनें व्याकुळ होऊन तो तळमळूं लागला. प्रभूंचा आपण घोर अपराध केला असल्याची जाणीव उत्पन्न होऊन, प्रभूंना

शरण जाण्यास आतुर होऊन, हरप्रयत्नानें प्रभूंजवळ येऊन पोंचला. अनन्यभावें प्रभुपुढें दंडवत पडून क्षमेची याचना करूं लागला. करुणाघन प्रभूंनीं त्याला स्पर्श करून उठविलें आणि चार बोधाच्या गोष्टी सांगून त्याचें दुःख निवारण केलें आणि त्याला संतोषानें परत पाठवून दिलें. बाकीची टवाळ मंडळी लज्जित होऊन, आपापल्या ठिकाणीं गार बसली.

कांहीं चरित्रकार असें लिहितात कीं, या टवाळ कंपूची ही अश्लाघ्य कृति, कल्याणच्या ग्रामदेवतांना आवडली नाहीं. सर्व देवता क्रुद्ध होऊन गेल्या. हें जाणून प्रभु आपल्या शिष्यगणांस म्हणाले कीं, "बाबांनों, संभाळून राहा; या गांवावर कांहींतरी अरिष्ट येऊन आदळणार आहे." असें बोलून प्रभु कांहीं दिवस गुप्त झाले. प्रभु कोठें गेले हें कोणालाच समजलें नाहीं. नंतर कांहीं दिवसांनीं गांवांतील कांहीं ठिकाणीं आगी लागूं लागल्या; चोऱ्या होऊं लागल्या; अशा प्रकारचा उपद्रव सुरू होऊन फार दिवस गेले नाहींत तोंच महामारीनें कल्याणांत प्रवेश केला. फारच कहर उसळून सर्वत्र हाहाःकार उडाला! वृद्ध लोक याबद्दल तरुण टवाळांना दोष देऊं लागले. या वेळीं सर्व लोकांना प्रभूंची आठवण झाली; पण प्रभूंचा पत्ता लागण्यासारखा नव्हता. नरसिंहरावतात्यांनाही महामारीनें गांठलें, तेव्हां मातुःश्री शोकाकुल झाली. प्रभूंचा धांवा करून आक्रोश करूं लागली. तेव्हां प्रभु एकाएकीं प्रकट होऊन, मातुःश्रीस धीर देऊन म्हणाले, " अम्मा, भिऊं नको. तात्याला कांहीं

होणार नाहीं." असें म्हणून तात्याला तीर्थ दिलें. तात्यांची प्रकृति लवकरच सुधारून ते बरे झाले. त्यांचें नवविवाहित कुटुंब मात्र आपल्या माहेरीं होतें. तेथें त्याला उपद्रवानें गांठलें. त्यांतच बहिणाबाईचा अंत झाला. लग्न होऊन पुरा एक महिनाही झाला नाहीं तोंच, बहिणाबाई निवर्तल्याचें पाहून लक्ष्मणरावाला अत्यंत दुःख झालें. प्रभूंचें स्मरण वारंवार होऊं लागलें. पण प्रभुदर्शनाचा योग आला नाहीं. बहिणाबाईच्या निधनामुळें बयाम्मालाही अत्यंत दुःख झालें. परंतु मातुःश्रीची समजूत पुढें प्रभूंनीं घालून, तिचें सांत्वन केलें. त्या वेळेपासून पुढें लक्ष्मणराव प्रभूंचा परम भक्त बनला व गांवांतील टवाळ लोकांचा नूर उतरून जाऊन, ते प्रभुसामर्थ्याला वचकून राहूं लागले.

प्रभूंचा लौकिक दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत जाऊन, प्रभुदर्शनार्थ सर्व प्रकारचा व जातीचा लोकसमाज जमूं लागला. हिंदु लोकांप्रमाणेंच मुसलमानी धर्माचे लोकही नित्यशः प्रभूंकडे येऊं लागले. कल्याणांत मुसलमान लोकांचें या वेळीं राजकीय प्राबल्य असल्यामुळें, या लोकांची वस्ति बरीच असून, मोठमोठया विद्वान लोकांचाही भरणा बराच होता. प्रथम प्रथम प्रभूंची परीक्षा पाहण्याच्या हेतूनें, आपल्या धर्मातील उच्च तत्त्वांबद्दल प्रभूंशीं वादविवाद करण्याचा उपक्रम त्यांनीं मांडला. कोणत्याही धर्मातील श्रेष्ठतर तत्त्वावर प्रभु मोकळ्या मनानें भाषण करीत. प्रभूंच्या भाषणाची छाप

लोकांवर तत्काळ पडत असे. यवनलोकांच्या मोठमोठ्या मौलवींना चकित करण्याइतकें त्या धर्माचें ज्ञान प्रभूंना आहे हें पाहून सर्व यवनसमाज विस्मित होत असे. प्रभूंच्या अगाध व दिव्य ज्ञानानें दिपून यवनांमधील पुष्कळ विचारी पुरुष प्रभुभजनीं लागले होते. परंतु कांहीं आडदांड व हेकट लोकांना प्रभूंचा हेवा वाटूं लागला. आपण इतका अभ्यास केला असून आपणांस कोणी विचारीत नाहीं व प्रभूंच्या शब्दाला आपले यवनलोकही मानतात, हें पाहून त्यांना वैषम्य वाटलें. प्रभूंचें वर्चस्व त्यांना खपेना. म्हणून हरप्रयत्नानें प्रभूंना हाणून पाडण्याचा त्यांनीं संकल्प केला. त्यांमधील एका अविचारी मनुष्यानें, मारण प्रयोगानें प्रभूंचा शेवट करण्याचें मनांत आणिलें आणि त्याप्रमाणें सर्व सामुग्री जमवून प्रयोगास प्रारंभ केला.

हा त्या मूढ यवनाचा आत्मघातकी प्रयोग त्याच्या जातभाईंना देखील पसंत पडला नाहीं. त्यांनीं परोपरीनें त्याचा निषेध केला. प्रभूंसारख्या असामान्य सामर्थ्याच्या पुरुषाला मारण्याचा प्रयत्न साध्य तर होणार नाहींच, उलट त्याचीच गठडी वळेल, अशी भीति कित्येकांना वाटली. पतंगानें दिवा विझविण्याचा अट्टाहास केल्यास त्या दिव्याच्या प्रखर तेजानें पतंगाचाच नाश होतो, हें उघड आहे. अशाच प्रकारचा हा आत्मघातकी प्रयत्न होता. या मारणप्रयोगासंबंधीं पुष्कळच चरित्रकार लिहितात. मनोहर महाराजांनींसुद्धां याचा उल्लेख केला आहे.

मग दुष्टाचे चित्तांत । ऐसें ठसलें निश्चित ॥
कीं श्रीगुरुसार्वभौमातें । मारण प्रयोग करावा.॥ १ ॥

असो या प्रकारें करून । दुर्बुद्धीनें तो यवन ॥
स्वगृहालागीं जाऊन । प्रयोगार्थ इच्छा धरी ॥ २ ॥

मृत्यूनें प्रेरित होऊन तो यवन । सकळ सामुग्री मिळवून ॥
प्रयोग गुरुवरीं करावया कारण । आसनीं बैसला ॥ ३ ॥

अशा प्रकारें मनाचा निर्धार करून बसला असतां, त्याच्या मंत्रदेवतेला भयंकर चिंता उत्पन्न झाली. याची करणी त्या देवतेला देखील विपरीत दिसून आली. प्रभूंवर देवता सोडावयाची म्हणजे, अग्नीवर तृण टाकण्याप्रमाणेंच होय ! तृणाला भस्मसात् करावयास काय वेळ लागणार आहे ? असा विचार करून त्या मंत्रसिद्ध देवतेनें त्या यवनावरच झडप घातली.

जेवीं अग्नींत पडतां तृण । तेंवीं मी नाश होईन ।
हा विचार करून । यवनावरीच धांवली ॥ १ ॥

आपल्या इच्छेला अनुकूल करून घेण्याकरितां, ज्या शक्तीचें त्यानें आराधन केलें, तीच शक्ति त्याच्यावर उलटली. मग त्याच्या त्या दुर्दशेला काय पुसावें ?

असो मग तो दुष्ट यवन । भूमीवरी पडे मूर्च्छा येऊन ।
अहोरात्र एक क्षण । चैन नसे ॥ १ ॥

या यवनाची अशी स्थिति झाल्यानंतर, सर्व गांवभर बोभाटा झाला. त्याच्या भावाला हें वर्तमान समजलें. तो घाबरून गेला. आपल्या बंधूवर देवताक्षोभ झाला, याची

खातरी होऊन आतां याला काय उपाय करावा हें त्याला समजेना. तो विचारी होता व प्रभुसामर्थ्यावर त्याचा भरंवसा होता. प्रभूंशिवाय आतां आपल्या बंधूस मुक्त करणारा दुसरा कोणी समर्थ नाहीं, हें त्याला माहीत होतें. म्हणून प्रभूंनाच शरण जावें असा त्यानें निश्चय केला.

हा वृत्तांत कळला त्याचे बंधूला । म्हणे दैवता क्षोभ झाला याला । आतां शरण जाऊं कवणाला । श्रीगुरुवांचोनि ॥ १ ॥
एवं विचार करूनी मनीं । श्रीगुरुजवळी धांवूनि येवोनि । मिठी घातली चरणीं । दृढ हृयकरें ॥ २ ॥

प्रभूकडे येऊन त्यानें चरण घट्ट धरिले व 'मला अभय द्या, क्षमा करा, क्षमा करा' असें विनवूं लागला. प्रभूंनीं काय वर्तमान आहे अशी पृच्छा केली. पण तो कांहीं सांगेना. नुसतें " मी आपला दास आहें. आपल्याला शरण आलों आहें. मजवर कृपा करा व माझ्या घरापर्यंत चला " असा त्यानें आग्रह धरिला. प्रभूंनीं त्याची समजूत करण्याचा प्रयत्न केला. पण तो आपला हेका सोडीना.

श्रीगुरु बहुतप्रकारें करून । समजावी त्या कारणें । परि आग्रह धरिता झाला तो यवन । गृहा चलावें म्हणोनी ॥ १ ॥
माझे बंधूनें अपराध । केला असे अगाध । म्हणोनियां चरणारविंद । यावेत तेथवरी ॥ २ ॥

आपल्या बंधूनें प्रभूंचा भयंकर अपराध केला असल्यामुळें तो मरणोन्मुख स्थितींत आहे; करितां सर्व अपराध पोटांत

वालून प्रभूंनीं घरापर्यंत येऊन बंधूवरील संकट दूर करावें अशी त्याची विनंति ऐकून दयाघन प्रभूंना त्याची करुणा आली.

मग तो श्रीगुरु दीनदयाळ। शरणागत जाणोनि तात्काळ।
गृह पवित्र करावया पदकमळ। त्या गृहांत नेता झाला॥

प्रभु सदय अंतःकरणानें, आपल्या शिष्यांसमवेत त्या यवनाच्या विनंतीप्रमाणें त्याच्या घरीं गेले.

मग यवनें श्रीगुरुकारण। आसनादि देवोनि केलें नमन।
म्हणे माझे बंधूसी जीवदान। द्यावें श्रीगुरुराजा॥ १॥

प्रभु घरीं येतांच आसन देऊन त्यांना परम सन्मानानें बसवून हात जोडून विनंति करूं लागला कीं, "माझ्या बंधूला जीवदान द्या; यानें घोर अपराध केला आहे; तो याच्याच मुखांतून आपण ऐका." असें बोलून त्यानें आपल्या भावाला झालेला सर्व वृत्तांत प्रभूंच्या कानावर घालवयास सांगितलें. प्रभूंना पाहतांच तो दुष्टबुद्धि यवन लज्जित होऊन कृतकर्माचा पाढा वाचण्यास भिऊं लागला. शेवटीं त्याच्याच भावानें त्याची कानउघाडणी केली. "मरणाच्या दारांत उभा आहेस, आतां तरी सारें खरें सांगून मोकळा हो. यांतून तुझी सुटका होणें कठीण आहे. प्रभूंना शरण जाऊन केलेले सर्व अपराध निवेदन कर व प्रभूंची क्षमा माग. म्हणजे तुझी करुणा येऊन प्रभुच तुला या यातनेंतून सोडवितील." असें त्यानें निक्षून सांगितल्यानंतर त्या दुष्टानें आपलें दुष्कृत्य अथपासून इतिपर्यंत

निवेदन केलें व आतां यांतून सोडविण्याविषयीं प्रभूंना विनवणी करूं लागला.

> ऐसें यवनाचें दीनवचन । कृपाघन करोनि श्रवण ।
> भिऊं नको एसें अभयवचन । देता झाला ॥१॥

" तुझाच दुष्टपणा तुला बाधला आहे, तुझेंच दैवत तुझ्यावर क्षुब्ध झालें आहे, याचा विचार कर. आतां आजपासून अशी दुष्ट मनोवृत्ति पार सोडून दे. दुसऱ्याचें अकल्याण करण्याची इच्छा धरल्यानें आपलेंच अकल्याण होत असतें हें ध्यानांत ठेव. आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा धरणाऱ्यानें सदैव दुसऱ्याचें कल्याणच चिंतीत जावें." असा बोध करून प्रभूंनीं त्याला आपल्या अमृतदृष्टीनें दु:खमुक्त केलें.

> ऐसें बोलोनि निवारिलें अरिष्ट । तात्काळ वाचविला
> दुष्ट । हें चरित्र सकळांला स्पष्ट । कळों आलें ॥१॥
> याप्रकारें यवनास तुष्ट करून । श्रीगुरुसार्वभौम स्थळा-
> कारण । सकळ शिष्य सर्वें घेऊन । झडकरीं पातला ॥२॥

प्रभूंना अरि-मित्र समान होते. तथापि दुष्ट लोकांचा दुष्टपणा जावा व त्यापासून कोणाला उपद्रव होऊं नये एवढी गोष्ट साध्य करणें, हें प्रभुकर्तव्यांपैकींच एक होतें. प्रभूंच्या दैवी सामर्थ्याचा परिचय असल्यामुळें कल्याणांत, प्रभुद्वेष्टयांची संख्या कमी कमी होऊं लागली. कल्याणाला कांहीं काल वास्तव्य करून प्रसंगविशेषीं कित्येक दिवस प्रभु गुप्त होत असत. त्या वेळीं ते कोठें गेले याचा कोणासही पत्ता लागत नसे. नृसिंहरावतात्यांचें प्रथमलग्न होऊन कुटुंबही लौकरच निवर्तलें, या गोष्टीची तळमळ मातु:श्रींच्या

मनाला लागली. आपल्या तीन पुत्रांत कुल वृद्धिंगत करणारा एकच पुत्र असल्यामुळें त्याच्या प्रपंचाची हुरहुर बयाम्मास लागली. त्याप्रमाणें बयाम्मानें प्रभुजवळही अनेकवार गोष्ट काढली. ' योग येईल तेव्हां आपोआप लग्न होईल ' असें म्हणून प्रभूंनीं स्वस्थ असावें. पण या वाक्यानें मातु:श्रींचें थोडेंच समाधान होणार होतें ! मातु:श्रींच्या अंत:करणाची जाणीव असणाऱ्या प्रभूंना मातु:श्रींची चिंता दूर करण्याचें काम फारसें कठीण नव्हतें. हळीखेडचे भालचंद्र दीक्षित यांच्या घराण्याचा व यशवंतराव कोरेकल यांच्या घराण्याचा अत्यंत निकट परिचय होता. यशवंतराव हैद्राबादेस नोकरीवर होते. ते कोरेकल येथील वतनदार कुलकर्णी होते. पण सरकारी कामावर असल्यामुळें त्यांचें वास्तव्य बहुतेक हैद्राबादींच असे. दीक्षितांच्या निधनानंतर त्यांच्या कुटुंबांतील मंडळींचा ओढा प्रभूंकडे मनस्वी होता. नारायण दीक्षित प्रभूंचे निकटवर्ति शिष्य बनले होते.त्यांच्या मातु:श्री जयाम्मा या प्रभूंवर पुत्रवत् प्रेम करीत असत. असो; नृसिंहरावतात्यांची पत्नी लग्न होतांच निवर्तल्याचें समजून जयाम्मास अनिवार दु:ख झालें. नृसिंहरावतात्यांच्या कुटुंबाची झालेली हानि भरून निघावी अशी उत्कट इच्छा जयाम्मास होऊन मुलगी पाहण्याचें काम त्यांनीं परस्पर चालविलें. कोरेकल यांचें घराणें जयाम्माच्या घरोब्याचें होतें. यशवंतरावांस दोन पुत्र व दोन कन्या होत्या. कन्यांचीं लग्नें व्हावयाचीं होतीं. दोन कन्यांपैकीं वडील कन्या

विठाबाई नृसिंहरावास अनुरूप पत्नी होईल असें जाणून त्यांनीं यशवंतरावांजवळ तशी मागणी केली. त्याप्रमाणें यशवंतरावांची अनुमति संपादन करून लग्नाचा बेतही त्यांनीं ठरवून टाकला. आणि इकडे कल्याणास प्रभूंकडे ही हकीकत कळविली. नृसिंहाचें लग्न ठरलें हें समजून मातु:श्रींस परमानंद वाटला.

हा लग्नसोहळा अपूर्व थाटानें पार पडला. उभय बाजूंची मंडळी पूर्ण समंजस असल्यामुळें, वैगुण्य कसलेंही राहिलें नाहीं. सर्व शिष्यवर्ग अति संतोषानें या मंगल कार्यांत झटत होता. प्रभुघरची कामधेनु सदैव जागृत राहून तिनें सर्व समारंभ यथासांग पार पाडला. पूर्वीच्या प्रसंगाचें स्मरण कल्याणांतील ग्रामस्थांना ताजें असल्यामुळें तसा मूर्खपणा पुन: न करण्याबद्दल त्यांनीं निश्चय करून सर्व विवाहसमारंभ यशस्वी रीतीनें पार पाडण्यास त्यांनींही यथाशक्ति हातभार लावला. या मंगल समारंभासंबंधीं एका चरित्रकारानें असें लिहिलें आहे कीं, कल्याणच्या नबाब-साहेबांनीं सुद्धां आपल्याजवळील सर्व राजैश्वर्यासह सरंजाम पाठवून याप्रीत्यर्थ हजारों रुपये खर्च केले. सारांश, प्रभूंच्या घरचें मंगलकार्य म्हणजे सर्व कल्याणनगरीचें कल्याणच होतें अशी प्रेमळ भावना आबालवृद्धांची झाली होती. प्रभूंवरील निरुपम प्रेमामुळें सर्व प्रकारचा लोकसमाज पराकाष्ठेची मेहनत घेऊन प्रभूंना सर्वतोपरि संतुष्ट करण्यास तत्पर होता, हें या प्रसंगीं सहज दिसून आलें.



## चाळकापुर :: ३

यापूर्वीं सांगितल्याप्रमाणें कल्याण येथें कांहीं काल राहून, प्रभूंची स्वारी कल्याण सोडून निघून गेली. कल्याणहून असे अचानक रीतीनें प्रभु कित्येक प्रसंगीं बाहेर निघून जात असत. प्रभु निघून गेल्यानंतर कित्येक दिवस त्यांचा ठावठिकाणा न समजल्यामुळें घरांतील मंडळी व प्रेमी भक्तजन चिंतातुर राही. प्रभुवियोगाचे असे प्रसंग नेहमींच त्यांच्यावर येऊं लागल्यामुळें, त्यांनाही त्याची संवयच होऊन गेली होती. हणमंतरावदादा मामांसह तीर्थयात्रेहून परत आले होते. घरप्रपंचाचें काम साधारणपणें बरें चाललें होतें. यामुळें प्रभूंच्या सान्निध्याची आवश्यकता होतीच असें नाहीं. आपल्या मनांतील हेतु कोणालाही न सांगतां प्रभु एकाएकीं गुप्त होऊन जात असत. या कारणास्तव बऱ्याच वेळां शिष्यमंडळीपैकींही कोणी त्यांच्याबरोबर राहूं शकत नसत.

प्रभूंचें वास्तव्य कल्याणास कांहीं कालपावेतों झालें असल्यामुळें प्रभूंचा लौकिक पसरत जाऊन दूरदूरचे लोक प्रभुदर्शनार्थ एकसारखे येऊं लागले. आणि कल्याणास एखाद्या क्षेत्राचें महत्त्व प्राप्त झालें. एका चरित्रकारानें लिहिलें आहे कीं, " दिवसेंदिवस प्रभुदर्शनाकरितां यात्रा फार लोटत चालली. कित्येक रोग बरा होण्याच्या इच्छेनें येऊं लागले, कित्येक, द्रव्य मागण्याच्या इच्छेनें, आणि कित्येक, अंगांतील

पिशाच्च दूर होण्याकरितां, अशीं हजारों माणसें नित्य नवीं नवीं, नव्या नव्या निमित्तानें प्रभूंकडे येऊं लागलीं व तितक्यांनाही प्रभूंकडून कांहीं ना कांहीं तरी प्रसाद होऊं लागला. शेकडों योगी लोक सेवेकरितां प्रभूंजवळ येऊन राहिले होते. कित्येकांनीं माधुकरी मागून निर्वाह करावा, कित्येकांनीं प्रभूंच्या छत्रांत जेवावें, जे श्रीमंत होते त्यांनीं पदरचें खावें, अशा रीतीनें हजारों मनुष्यें राहिलीं होतीं. प्रत्येकानें कांहीं ना कांहीं प्रभूंची सेवा करावी. स्त्रियांनीं अश्वत्थाला प्रदक्षिणा घालाव्या आणि प्रभूंजवळून तीर्थप्रसाद घ्यावा. कित्येक स्त्रियांनीं मुलाकरितां केलेले नवस पूर्ण झाले म्हणून प्रभूंजवळ येऊन नवसाची सांगता करावी. कोणी शेरण्या वांटाव्या, कोणी ब्राह्मणभोजनें घालून प्रभूंपुढें नैवेद्य आणावे, असा प्रकार चालू होता, तो कोठवर वर्णन करावा ? शेंकडों जनांच्या अंगांत असलेल्या पिशाच्चाला प्रभूंजवळ मुक्ति मिळावी."

ज्या भागांत प्रभूंचा जन्म झाला, ज्या ठिकाणीं प्रभु लहानाचे मोठे झाले व ज्या गांवीं त्यांनीं आपल्या समवयस्क सवंगडयांसह अनेकविध खेळ खेळले, त्याच कल्याणांत प्रभु साक्षात् देव बनून आबालवृद्धांना पूज्य होऊन गेले, हा प्रभुचरित्रांतील एक अद्भुत विशेष आहे. प्रभूंचे बहुतेक खेळगडी पुढें परम भक्त बनले होते. घरची मंडळी व सर्व आप्तवर्गही त्यांना परमपूज्य मानीत. या वेळीं प्रभूंचें वय

पहिल्या पंचविशीच्या आंतच होतें. अशा या तारुण्याच्या कालांत प्रभूंचें दिव्य सामर्थ्य प्रकट होऊन, त्यांचा प्रभाव सर्वत्र पसरला होता व चारी मुलखांतले लोक त्यांजकडे धांवून येण्याचा क्रम एकसारखा सुरू होता.असो. कल्याणांत लोकसमाज फार जमला होता, व 'नित्यश्री, नित्यमंगल' उल्हासानें नांदत होतें. अशा समयीं प्रभु एकाएकीं गुप्त झाले; प्रभु कोठें गेले, कां गेले हें कोणासच समजण्यासारखें नव्हतें. त्यामुळें नाइलाज होऊन, प्रभु केव्हां प्रकट होतील याची मार्गप्रतीक्षा करीत लोक राहिले होते.

इकडे चाळकापुरांत प्रभु एकदम प्रकट झाले तो प्रकार असाः—कल्याणहून सुमारें सहा-सात कोसांवर, चाळकापूर नांवाचें एक गांव आहे. तेथें श्रीमारुतीचें जाज्वल्य दैवत असल्याचें सर्वप्रसिद्ध आहे. हा मारुति फार उग्र असून देऊळ गांवाबाहेर अरण्यांत असल्यामुळें तेथें सहसा कोणी वसति करून राहत नसत. जवळपास दाट जंगल असल्यामुळें,रात्रीं श्वापदांची भीति, शिवाय मारुतिराय उग्र स्वरूप असलेले, मग कसलाही भाविक भक्त रात्रीचा त्या ठिकाणीं कशाला राहील? देवाचे पूजारी गुरव होते; ते दिवसाउजेडीं पूजा आटोपून, आरति वगैरे झाल्यानंतर, नंदादीपांत एकदम रात्रभर पुरेल इतकें तेल ओतून सायंकाळ होण्याच्या आधींच आपल्या घरचा रस्ता सुधारीत. सेवेकरी मंडळीपैकीं रात्रीं तेथें कोणीच राहत नसे. मारुति फार कडक असून रात्रीं तेथें कोणास राहूं देत

नाहीं, अशी सामान्य समजूत होती. परंतु खरें पाहूं जातां रात्रीच्या वेळीं तेथें राहण्याची कोणास छाती होत नव्हती. दिवसादेखील तेथें जाण्यास लोक भीत असत, मग रात्रीचें नांव कशाला ? या मारुतिरायावर भोंवतालच्या लोकांची फार श्रद्धा होती. म्हणून लोकसमुदाय दिवसा कां होईना, पुष्कळ जमत असे. मारुतीचे उत्सवही बारा महिने होत असत. दर शनिवारीं पालखी निघे, त्या वेळीं पुष्कळ लोकांचा जमाव जमत असे. चैत्र महिन्यांत जन्मोत्सव मोठा होऊन यात्रा भरत असे. यात्रा किंवा लोकसमाजानें चालविलेला उत्सव खेरीज करून इतर वेळीं संध्याकाळ झाल्यानंतर कोणी मारुतीचें नांवही काढीत नसत. मारुतिराय नित्य रात्रीच्या वेळीं निरामय एकांतात असत. या एकांतसमयीं मारुतीची भेट घेण्याकरितां प्रभु देवळांत गेले. प्रभूंच्या व मारुतीच्या या अपूर्व भेटींत काय काय घडलें हें आम्हांस समजण्यास मार्ग नाहीं व कोणत्याही चरित्रकाराला तें लिहितां येणार नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळच्या प्रहरीं पूजारी पूजा करण्याकरितां देवळांत येऊन पाहतात तों एक वाटसरू देवळांतील एका कोपऱ्यांत स्वस्थ निजला आहे असें त्यांना आढळून आलें. मारुतीजवळ जातांच मारुतिराय डोकीवर एक गांठोडें घेऊन उभे असल्याचें पाहून, त्यांना नवल वाटलें

गांठोडें सोडून पाहतां त्यांत सर्व कपडे होते असें दिसून आलें. हे कपडे कोणाचे ? देवाच्या डोकीवर आपले कपडे ठेवणारा कोण दुष्ट पापी असावा म्हणून ते शोध करूं लागले. प्रभु स्वस्थपणें घोरत पडले होतें. प्रभूंना जागें करून विचारपूस करतां ते कपडे आपले असल्याचें प्रभूंनीं सांगितलें. या निर्जन अरण्यांत चोरटे लोक असतात, ते आपले कपडे चोरून नेतील, सबब संभाळून ठेवण्यास मारुतीजवळ दिले होते, असें प्रभूंनीं म्हणतांच, गुरव लोक संतापून लाल झाले. प्रभूंवर शिव्यांचा वर्षाव करून त्यांना मारहाण करूं लागले. मारतां मारतां मारुतीचा कबा व गळ्यांतील माळ प्रभूच्या अंगावर अचानक आलेली पाहून, सर्वजण चकित होऊन गेले ! प्रभूंच्या अंगावर मारलेल्या माराचे वळही मारुतीवर उठलेले स्पष्ट दिसूं लागतांच सर्वजण भयभीत झाले. हा काय चमत्कार आहे ? याचा उलगडा कोण करणार ? प्रभु आपल्या ठिकाणीं हंसत उभे होते. हा गलबला ऐकून माणसेंही पुष्कळ जमलीं. शेवटीं त्यांतील एकानें निरखून पाहतांच आपण मारींत आहों तो मनुष्य कोणी वेडा किंवा दुष्ट नसून कल्याणचा माणिकप्रभु असल्याची त्याची खातरी झाली.

'कल्याणचा माणिकप्रभु' हा शब्द कानावर पडतांच सर्व लोक निरखून पाहूं लागले; तों खरोखरीच माणिकप्रभु ! आपण अज्ञानपणानें काय भयंकर अपराध केला हा, याची जाणीव त्यांना होऊन त्यांची पांचावर धारण बसली. ते

गर्भगळित झाले ! प्रभूंचा लौकिक त्यांना माहीत होता. दगडाच्या मारुतीचा अभिमान धरून आपण या मूर्तिमंत परम समर्थ अवधूताचा उपमर्द केला याचें त्यांना दु:ख होऊन पश्चात्तापानें उत्पन्न झालेली अंत:करणाची लाही शमविण्याच्या हेतूनें त्यांनीं प्रभूंपुढें साष्टांग नमस्कार घातला आणि गडबडां लोळून अपराधाची क्षमा करण्याकरितां प्रभूंची विनवणी करूं लागले. प्रभूंनीं हास्यवदन करून, त्या सर्वांना उठवून त्यांचें सान्त्वन केलें.

प्रभु चाळकापुरांतील मारुतीच्या देवळांत आले आहेत हें वर्तमान वायुवेगानें सर्वत्र फैलावून दर्शनाकरितां लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या. खारका, सुपाऱ्या, नारळ, फुलें, माळा, बतासे, लाह्या इत्यादि अनेक पदार्थ बरोबर घेऊन प्रभुदर्शनास लोक धांवून येऊं लागले. कोणी कापूर जाळून ओंवाळूं लागले, कोणी माळा घालूं लागले, कोणी पूजा करूं लागले; अशी एकच धांदल उडून गेली. कोणी पेढे, खडीसाखर इत्यादि पदार्थ वांटूं लागले. सारांश, हां हां म्हणतां त्या निर्जन स्थानाला प्रचंड यात्रेचें स्वरूप प्राप्त झालें. लगेच पेढे-बर्फीचीं दुकानें थाटलीं गेलीं. इतर अनेक पदार्थांचीं दुकानें उघडलीं जाऊन चोहोंकडे यात्रेंतील गडबड सुरू झाली. अनेक प्रकारचे रोगी लोक, मुके, आंधळे, पांगळे, यांची गर्दी जमून याचकवर्ग गोळा झाला. थोडक्याच अवधींत भोजनसमारंभ सुरू होऊन अन्नपूर्णादेवी आनंदानें वावरूं

लागली. 'जंगलमें मंगल' सुरू व्हावयास फार दिवस लोटले नाहींत. प्रभु प्रकट झाल्याचें वर्तमान बेदर, हैद्राबाद, कलबुर्गा, कल्याण इत्यादि शहरांत तेव्हांच पसरून, चोहोंकडून भाविक लोक जमा होऊं लागले. कल्याणास हें वर्तमान समजतांच मातु:श्रीसह सर्व प्रेमी मंडळीला आनंद होऊन प्रभूंकडे येण्यास सर्वजण आतुर झाले. मातु:श्री बयाम्मा, नृसिंहतात्यास समागमें घेऊन निघाल्या. बाप्पाचार्य, नारायण दीक्षित, चिमण्या ब्रह्मचारी इत्यादि प्रभूंच्या कृपेंतील शिष्यगण तात्काळ प्रभूंकडे जाण्यास सिद्ध झाला. त्याशिवाय कल्याण येथील शेंकडों रहिवासी प्रभुदर्शनास निघाले. सर्व लोक चाळकापुरांत येऊन प्रभुदर्शनानें आनंदित झाले. या ठिकाणीं प्रभूंचें वास्तव्य चार महिनेपावेतों होतें. एवढया मुदतींत तें भयानक अरण्य सर्व सौख्य व आनंद यांचें निवासस्थान बनलें होतें. या अवधींत हैद्राबादेहून राजे राय रायान् यांची स्वारी प्रभुदर्शनाकरितां या ठिकाणीं आली होती. चिदंबरराव नांवाचे एक तालुकदार होते. त्यांनीं प्रभु तेथें असेपर्यंतचा सर्व बंदोबस्त उत्तम ठेवून सर्वांना निर्भय केलें.

हैद्राबादेस राजे राय रायान् या नांवानें प्रसिद्ध असलेलें एक मोठें घराणें आहे. ते ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण असून, निजामशाहींत त्यांच्या पूर्वजांनीं मोठी कामगिरी केल्यामुळें, निजामकडून त्यांना चार-पांच लाखांची जहागीर मिळाली आहे. निजामचे हे दप्तरदार होत. यांच्या पूर्वजांनीं मुत्सद्देगिरींत व

तरवारबहादुरींत श्रेष्ठता संपादन करून, निजामच्या राज्याची बहुमोल सेवा केली आहे. म्हणून 'सर्व राजांचे राजे' (राजे राय रायान्) असा त्यांना किताब मिळाला आहे. त्या वेळीं गादीवर असलेल्या राजे राय रायान् यांनीं कर्णोपकर्णीं प्रभूंची कीर्ति ऐकिली होती. प्रभूंवर राजेसाहेबांचें अतोनात प्रेम जडत चाललें होतें. अशा संधीला प्रभूंचें आगमन चाळका-पुरांत झाल्याचें ऐकून, राजेसाहेब प्रभुदर्शनार्थ आले. प्रभूंचें दर्शन झाल्यानंतर त्यांना परम संतोष झाला व प्रभुसन्निध कांहीं काल वास करून प्रभूंची सेवा त्यांनीं उत्तम प्रकारें केली. राजेसाहेबांच्या भक्तीला प्रभु वश झाले. राजेसाहेबांचें वय अधिक झालें होतें, तरी त्यांना पुत्रलाभ झाला नव्हता. आपणास पुत्रप्राप्ति होऊन आपल्या संस्थानची परंपरा अखंड चालावी अशी त्यांनीं प्रभूंकडे प्रार्थना केली. प्रभु त्यांच्या सेवेनें संतोषित होऊन गेले होते. प्रसन्न अंतःकरणानें प्रभूंनीं राजेसाहेबांना फुलें, खारका व भस्माचा एक गोळा यांचा प्रसाद दिला. प्रभूंनीं दिलेला तो प्रसाद घेऊन राजेसाहेब कृतकृत्य होत्साते हैद्राबादेस परत गेले. प्रभूंच्या हातचा प्रसाद हाच अपूर्व लाभ असें समजून राजेसाहेब नित्यशः त्या प्रसादाची पूजा करीत. पुढें कांहीं काल गेल्यानंतर राजेसाहेबांना पुत्रलाभ झाला. या वेळीं त्यांचा आनंद गगनांत मावेना. टाकोटाक हें वर्तमान प्रभूंकडे कळविलें आणि प्रभूंच्या आज्ञेनुसार मुलाचें नांव शंकरराव असें ठेविलें. शंकरराव राजांची

प्रभूवर अत्यंत निष्ठा होती. शंकरराव राजे वयांत आल्यावर त्यांचे वडील निवर्तले. परंतु जहागिरीच्या बाबतींत सरकारनें ओढ धरल्यामुळें कांहीं काल त्यांना चिंता लागली होती. आपल्यावरील संकट दूर करण्याविषयीं प्रभूंकडे त्यांनीं विज्ञप्ति केल्यानंतर, त्यांची जहागीर मोकळी होऊन, ते गादीवर बसले. या समयीं ते प्रभूंना विसरले नाहींत. प्रतिवर्षी हजारों रुपये ते प्रभूंकडे पाठवीत असत. शंकरराव राजे यांना प्रभूंनीं लिहिलेल्या एका पत्राची नक्कल आम्हांस मिळाली असून तिचें छायाचित्रही आम्ही या ठिकाणीं देत आहों. राजेसाहेबांना पाठविलेल्या पत्राचा हा मसुदा असून, हस्ताक्षर स्वतः प्रभूंचें आहे. या पत्रावरून प्रभूंचें हस्ताक्षर कसें होतें हें आमच्या वाचकांना समजून येऊन, प्रभुसंस्थान व राजे राय रायान् यांचा कसा प्रेमाचा संबंध होता हेंही स्पष्ट दिसणार आहे. हा प्रेमाचा संबंध आजपर्यंत अव्याहत चालत आलेला आहे. हल्लींचे श्रीमंत शामराजासाहेब यांच्या ठायीं असलेलें प्रभुप्रेम आम्हांला अनेक प्रसंगीं पाहावयास मिळालें असून राजेसाहेब हे हिंदु धर्माचे आणि विशेषेंकरून ब्राह्मणवर्गाचे आधारस्तंभ असल्याची त्यांची कीर्ति निजामच्या राज्यांत सर्वतोमुखीं आहे.

प्रभूंचें वास्तव्य चाळकापुरांत असतांना मारुतीची पूजाअर्चा, पालखी वगैरेची व्यवस्था उत्तम प्रकारें चालली होती. प्रभूंनीं मारुतीची आरति करून शिवाय कांहीं पदें आणि

एक अष्टकही केलें आहे. ही आरति व अष्टक प्रभुसांप्रदायिक भजनांत समाविष्ट केलें असून, शनिवारीं म्हणण्यांत येत असतें. "चाळकापुरांत भीम यापरीनें देखिला" हें अष्टकांतील प्रत्येक श्लोकाचें शेवटलें चरण असून त्या कालीं दिसणाऱ्या मारुतीच्या स्वरूपाचें यथातथ्य वर्णन यांत आहे. सातवारांच्या भजनाच्या छापील पुस्तकांत वरील अष्टक व आरति पाहावयास मिळणार असल्यामुळें या ठिकाणीं आम्हीं त्याचा उतारा दिला नाहीं.

अशा रीतीनें चाळकापुरांत चार महिने मोठया उत्सवानें व आनंदानें वास केल्यानंतर मार्गशीर्ष मास जवळ आला म्हणून प्रभूंची स्वारी मैलारकडे जाण्यास निघाली. प्रभूंचा वियोग होणार ही कल्पना मनांत आल्यानंतर सर्व चाळकापूर शोकाकुल झालें. प्रभुसहवासांत गेलेला चार महिन्यांचा काल नंदनवनाप्रमाणें रमणीय झाला असल्यामुळें ते दिवस केव्हां निघून गेले याचें कोणालाच भान राहिलें नाहीं. प्रभूंचा सहवास आपल्यास चिरकाल लाभावा अशी सर्वांची अपेक्षा होती. पण ती गोष्ट शक्य नसल्यामुळें प्रभूंनीं यथायोग्य शब्दांनीं सर्वांची समजूत करून त्यांना प्रसाद देवून संतुष्ट केलें. मातुःश्री बयाम्मा व बंधु तात्याराव यांना समागमें घेऊन प्रभु मैलारास निघाले.



## मैलार : : ४

मैलार हें अति प्राचीन क्षेत्र आहे. येथें सर्व देवता वास करीत असून त्यांत खंडेराव प्रमुख आहेत. इकडील लोक या क्षेत्राला दक्षिणकाशी असें म्हणतात. मल्हारीमहात्म्यांत या क्षेत्राचें महत्त्व वर्णन केलें आहे. मणिचूल पर्वतावरील हें क्षेत्र त्या काळीं अत्यंत भरभराटींत होतें. देवाचे पुजारी धनगर-जातीचे आहेत. गांवांतील क्षेत्रोपाध्याय ब्राह्मण वर्गांतील आहेत. देवाला सरकारांतून बरेंच उत्पन्न आहे. पेशव्यांनीं या देवाला दोन गांवें जहागीर दिलीं आहेत. पेशव्यांनीं निजामवर चौथाईचा हक्क बसविला होता, त्या चौथाई रकमेच्या हिशेबांत या गांवचा वसूल वजा घालीत असत. अशा रीतीनें निर्वेधपणें देवाकडे नियमित उत्पन्न पोंचावें अशी व्यवस्था पेशव्यांनीं करून ठेविली होती. देवळाबाहेर पेशव्यांनीं बांधलेल्या कांहीं ओवऱ्याही आहेत. निजामचा अंमल सुरू झाल्यानंतरही कांहीं काल म्हणजे अजमासें पाऊणशें वर्षें इकडील प्रांतावर मराठे सरदार चंद्रसेनराव जाधव व त्याचा पुत्र राजा रामचंद्र यांचें प्राबल्य असल्यामुळें हें देवस्थान वैभवाच्या शिखरावर पोंचलें होतें. या ठिकाणीं एकशें आठ तीर्थें असून सर्व कुंडें उत्तम बांधलेलीं आहेत. देवालयाचें कामही उत्तम आहे. क्षेत्र अगदीं पुरातन असल्यानें यानें जगांतील अनेक घडामोडी अवलोकन केल्या आहेत. परंतु हल्लीं या क्षेत्राची

अत्यंत दुर्दशा झाली आहे. पूर्वीं एके काळीं जें क्षेत्र हजारों माणसांनीं गजबजलेलें दिसत असे, त्या ठिकाणीं आतां चिटपाखरूंही दिसून येत नाहीं. गांव ओसाड होऊन निर्जन झालें आहे. गांवाच्या वेशी मोठ्या आहेत. आंतील घरेंही मोठमोठीं असून सर्व इमारती चुनेगच्चीच्या आहेत. रस्ते फरसबंदीचे असून या गांवांत सर्व प्रकारच्या सोई होत्या असें आजही दिसून येत आहे. घरांच्या रचनेवरून व आकारावरून शेंकडों श्रीमान् लोकांची वस्ती येथें असावी असें सहज अनुमान होतें. एवढें मोठें सधन गांव ओसाड झालेलें कोठेंही दृष्टीस पडणार नाहीं. सर्व देवालयें व तीर्थें गांवाच्या वेशीबाहेर आहेत. त्या ठिकाणींसुद्धां आज रोजीं कोणी राहत नाहीं. हें गांव ओसाड होण्याचीं अनेक कारणें लोक सांगतात. त्यांतील एक प्रमुख कारण म्हणजे येथील पाणी फारच बिघडून जाऊन, हातपाय बारीक होऊन पोट मोठें होण्याचा रोग सुरू झाला आणि माणसें पटापट मरूं लागलीं हें होय. सारांश मलेरियानें सर्व लोकांचा फडशा पाडून या गांवाची दुर्दशा केली आहे. गांव सोडून बाहेर गेले ते कसेबसे वांचले आहेत. अद्यापही या मलेरियाचें साम्राज्य या ठिकाणीं तीव्रतेनें अधिकार गाजवीत आहे.

प्रभु या क्षेत्रांत आले त्या वेळीं याची पूर्ण भरभराट होती. ब्राह्मण, व्यापारउदीम करणारे लोक व शेट सावकार यांची वस्ति भरपूर असून चोहों मुलखांतील द्रव्य या ठिकाणीं

जमत असल्यामुळें, सर्व लोक संपन्न स्थितींत होते. अन्नाची व वस्त्राची कोणालाच ददात नव्हती. प्रभु आपल्या मंडळीसह आले, ते गांवाबाहेरील मूळलिंगाच्या देवालयांत उतरले. या वेळीं प्रभूजवळ मातु:श्री, तात्यासाहेब, चिमण्या ब्रह्मचारी, नारायण दीक्षित अशी मंडळी होती. प्रभु आल्याचें वर्तमान समजतांच हजारों लोकांची गर्दी प्रभुदर्शनाला जमली. मार्गशीर्ष शुद्ध षष्ठीस येथें मोठी यात्रा जमते. या वेळीं प्रभुनिमित्तानें या यात्रेंत भर पडून, चोहोंकडे माणसेंच माणसें होऊन गेलीं. प्रभूंनीं खंडेरायाची पूजा केली व देवाला बहुमोल वस्त्रें व अलंकार घातले. प्रभूंचीं खंडेरायावरील सर्व पदें व आरति याच ठिकाणीं तयार होऊन पुढें त्यांचा समावेश रविवारच्या भजनांत करण्यांत आला.

प्रभु येथें आल्यावर पूर्ववत् 'नित्य श्री नित्य मंगल' या ठिकाणीं आनंदानें नाचूं लागलें. रोज हजारों लोक दर्शनाला येऊं लागले. चोहोंकडे जयजयकाराचा ध्वनि दुमदुमूं लागला; भोजनाच्या पंक्तीवर पंक्ति उठूं लागल्या. प्रभूंच्या गळ्यांत नाना प्रकारच्या फुलांच्या माळा पडूं लागल्या व पुढें खारीक, सुपारी, नारळ, पेढे बर्फी यांचे ढीग दिसूं लागून अगणित द्रव्यही जमा होऊं लागलें. आलेले पदार्थ व द्रव्य त्याच दिवशीं खलास होऊं लागलें. दुसऱ्या दिवसाची काळजी करण्याचें कारणच नव्हतें. प्रभूंजवळ नवस करणारे लोक जमत, तसेच पूर्वींचे नवस फेडणारेही लोक जमत. ही

नवसाची घडामोड नित्य नवी होत असे. नाच, गाणें, पुराण, कथाकीर्तन, भजन इत्यादिकांचे थाटही उडूं लागले. एखाद्या राजाच्या तळासारखा तळ पडून नित्य नवा रंग आढळूं लागला.

खंडोबाची यात्रा संपून गेली, तरी प्रभुदर्शनार्थ जमलेले लोक अद्याप राहिलेच होते. प्रभूंजवळ चाललेल्या ‘ नित्य श्री नित्य मंगलानें ’ दंग होऊन गेल्यामुळें प्रभुसहवासापासून दूर जावें असें कोणालाही वाटत नसे. शक्य तितका काळ प्रभुसान्निध्यांत काढून नाइलाज झाल्यानंतर मोठ्या कष्टी अंतःकरणानें लोक आपआपल्या गांवीं परत जात. परत जाण्यापूर्वी प्रभुदर्शन घेऊन त्यांच्या हातचा प्रसाद घेतल्याशिवाय सहसा कोणी जात नसे. असा प्रसाद घेण्याच्या अपेक्षेनें आलेल्या लोकांची बरीच गर्दी जमत असे. कित्येक प्रसंगीं बारीनें बसून, लोक प्रसादाची वाट पाहत असत. मैलारची यात्रा होऊन गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं प्रभूंकडील यात्राही कमीकमी होऊं लागली. एके दिवशीं प्रभुहस्तें प्रसाद घेणाऱ्या लोकांमध्यें तोबा झडत असतां तसल्या गर्दींत कोमटयाची एक स्त्री प्रभुदर्शनार्थ आली. ही स्त्री तरुण असून विधवा होती. शरीरानें धिप्पाड व वर्णानें काळीभोर असलेल्या या तरुणीच्या अंगावर सुवर्णाचे अलंकार बरेच होते. गर्दीतून वाट काढून आलेल्या या स्त्रीनें दर्शन घेऊन प्रसाद घेण्याकरितां एकदम प्रभूंपुढें न जातां बाजूच्या एका कोंपऱ्यांत जागा

धरून तेथेंच आपलें आसन थाटलें. तिच्या पाठीमागून आलेल्या शेंकडों लोकांनीं प्रभुदर्शन घेऊन प्रसाद हातीं पडल्यावर आपला मार्ग धरिला. परंतु या तरुणीनें प्रभुदर्शनाची किंवा प्रसादाची मुळींच काळजी केली नाहीं. कोंपऱ्यांतील आपल्या जागीं वसून तिनें आपली दृष्टि प्रभुस्वरूपावर लावली. ती प्रभूच्या सगुण स्वरूपाचें अखंड पान करीत बसून राहिली. तिची दृष्टि प्रभुस्वरूपावर इतकी खिळून गेली कीं, तिला आपल्या देहाचें भानसुद्धां राहिलें नाहीं. आपण कोण, आलों कोठें व हा समाज काय करीत आहे, याचें विस्मरण होऊन ती जागच्या जागीं वसून प्रभूंच्या स्वरूपाशीं समरस झाली. तिच्याकडे प्रथम कोणाचेंही लक्ष गेलें नाहीं. शेवटीं सर्व गर्दी मोडल्यावर परक्या माणसांपैकीं ही एकटीच शिल्लक राहिली तरी प्रसाद कां घेत नाहीं याचें नवल वाटून, शिष्यांपैकीं एकानें प्रसाद घेण्यास पुढें येण्यास तिला सांगितलें.शिष्याचा शब्द ऐकून ती शुद्धीवर आली आणि प्रभूंपुढें येऊन तिनें साष्टांग नमस्कार घातला व प्रसादा-करितां ओंजळ पुढें धरिली.प्रभूंनीं दोन खारका व कांहीं फुलें तिच्या हातावर टाकिलीं. प्रभूंचा प्रसाद घेऊन ती बाहेर पडली खरी, परंतु कोठें जावें हें तिला सुचेना. सर्व जग शून्यवत् होऊन गेलें. बाहेर आल्यानंतर पायांनीं नेलें तिकडे ती जाऊं लागली. तिचें अंतःकरण प्रभूंशीं एकरूप झालें असल्यामुळें, प्रभूंची मूर्ति तिला सर्व ठिकाणीं दिसूं लागली. ती प्रभुमय

झाली. आपल्या स्वतःच्या स्थितीची तिला कल्पना येईना. दोन दिवस कोठें तरी बाहेर भटकत राहून, ती पुनः तिसऱ्या दिवशीं प्रभूंच्या दर्शनाला आली. ही एकदां प्रसाद घेऊन गेली असतांही पुन्हां कां आली याचें कित्येकांना नवल वाटलें. या वेळीं प्रभूंनीं तिला जवळ बोलावून हातावर पूर्वीप्रमाणें दोन खारका टाकल्या व निघून जाण्यास सांगितलें. प्रभुआज्ञेप्रमाणें ती तात्काल निघून गेली. परंतु तिचा देह कोठें तरी भटकत राहिला. तिच्या अंतःकरणानें तें ठिकाण सोडलें नाहीं. अशा प्रकारच्या शारीरिक व मानसिक ओढाताणींत सांपडून ती भुलून गेली. काय करावें ? कोठें जावें ? अंतःकरणाची तळमळ कशानें शांत होईल ? या प्रश्नांचें उत्तर तिला सांपडेना. दिशाभूल होऊन देहभान हरपून गेलेल्या सावजाप्रमाणें कांहीं काल इतस्ततः भटकत राहून पुनश्च प्रभूंपुढें येऊन उभी राहिली.

"बाई, अशी वरचेवर कशाला येतेस ? तुला प्रसाद मिळाला असून आपल्या गांवीं कां जात नाहींस ?"

"महाराज, माझें गांव कोणतें हें मला माहीत नाहीं. या चरणाशिवाय सगळें जग मला शून्य भासूं लागलें आहे. हे चरण सोडून मी आतां कोठेंही जाणार नाहीं."

"बाई, तूं अगदीं तरुण; आमच्या समागमें नानाप्रकारचे लोक नित्यशः येत असल्यामुळें तुझा निभाव येथें लागणें फार कठीण आहे. आम्ही फटिंग, गोसावी, आमच्या सहवासांत

राहून तुझे फार हाल होतील. करितां शहाणी असशील तर आल्या वाटेनें आपल्या घरीं जा."

"माझें घर कोठें आहे, माझे आईबाप कोण आहेत, याचें भान मला राहिलें नाहीं. आपणच माझी आई, आपणच बाप, आप्त, इष्ट, सगे, सोयरे सर्व कांहीं आपणच आहां. मी आतां येथून मुळींच कोठेंही जाणार नाहीं."

"आमच्याजवळ राहिल्यास अंगावरील हे जिन्नस बाळगतां यावयाचे नाहींत. हे जिन्नस गोरगरिबांना देऊन टाकावे लागतील. शिवाय अंगाला राख लावण्याचा प्रसंग येणार आहे."

"महाराज या जिनसांचें मला आधींच ओझें होऊं लागलें आहे. हे मी आनंदानें काढून टाकीत आहें. आपल्यास वाटेल त्या मनुष्यास हे आपणच देऊन टाकावेत."

असें बोलून त्या तरुणीनें आपल्या अंगावरील सर्व जिन्नस तात्काळ काढून प्रभूंपुढें ठेविले. त्या बाईचा निर्धार पाहून प्रभु प्रसन्न झाले. द्रव्यलोलुप कोमटयाच्या कुलांत जन्म घेतलेल्या या तरुणीचें औदार्य पाहून सर्व लोक थक्क झाले! प्रभूंनीं त्या बाईचें अंतःकरण जाणलें होतें. निःसीम व शुद्ध प्रेमानें ती ओथंबून गेली होती. ती तरुण होती तरी वैषयिक स्वार्थी प्रेमाचा तिच्या ठायीं पूर्ण अभाव होता हें प्रभूंनीं पक्कें ओळखलें होतें. प्रभुदर्शनानें त्या बाईच्या अंतःकरणांतील शुद्ध, निःस्वार्थी व दिव्य प्रेमानें उचल खाल्ली होती. या

प्रेमापुढें द्रव्याची, देहाची किंवा लोकापवादाची तिला मुळींच क्षिति वाटत नव्हती. प्रभूंनीं प्रसन्न अंतःकरणानें तिजकडे दृष्टिक्षेप करून, अम्माजवळ तिला घेऊन जाण्यास एका शिष्यास सांगितलें. त्याप्रमाणें शिष्यानें तिला मातुःश्री बयादेवीकडे पोंचविलें. प्रभूंवरील उत्कट प्रेम व भक्ति पाहून मातुःश्रीसही आनंद झाला व त्यांनीं तिला आपल्या कन्येप्रमाणें जवळ बाळगिलें. या तरुणीच्या अंतःकरणाची परीक्षा प्रभूंनीं नानाप्रकारें करून पाहिली. कित्येक दिवस तिला नुसत्या खारकेवर ठेविलें, तरी ती डगमगली नाहीं. तिचा धिप्पाड देह खारकेप्रमाणें वाळून गेला, हें पाहून तिची सर्वांना करुणा आली. पण प्रभुआज्ञा उल्लंघण्याचें तिनें मनांत देखील आणलें नाहीं. एके समयीं स्त्रीस्वभावाला अनुसरून ही नग्न होऊन स्नान करीत होती. अशा प्रसंगीं प्रभूंकडून निरोप आला कीं, " असशील तशी निघून ये. " हा निरोप कानावर पडतांच ती देहभान विसरून जाऊन तशाच स्थितींत प्रभूंकडे यावयास निघाली. सर्व लोक विस्मित झाले. मातुःश्री अम्मास हें वर्तमान कळल्याबरोबर त्याही मागोमाग निघाल्या. आणि त्यांनीं तिला मध्येंच थोपवून धरलें. प्रभूंनीं ही भलतीच आज्ञा कशी केली म्हणून त्यांना बोलण्याचा त्यांचा हेतु होता. स्त्रियांचें खरें भूषण लज्जा हें होय. तें एकदा नाहींसें झाल्यावर स्त्रीत्व कसें राहणार ? असो; तशाच स्थितींत ही स्त्री, प्रभुआज्ञा प्रमाण मानून प्रभूंपुढें येऊन उभी राहण्यास तयार झाली हें

समजल्यावर तिची ती अनुपम भक्ति पाहून तो प्रेमाचा निधि उचंबळूं लागला. अनिवार प्रसन्न अंःकरणानें आपल्याशीं डोलूं लागला. ती जवळ येण्याची वाट देखील न पाहतां, चटकन् प्रभूंनीं आपल्या अंगावरील शुभ्र वस्त्र काढून तिच्या अंगावर घालण्याकरितां मातुःश्रीकडे पाठविलें; त्याच वेळीं खरोखर तिचा उद्धार झाला !

वर सांगितलेली तरुण स्त्री हीच भगवती व्यंकम्मा होय. ही पूर्वजन्मींची कोणी तरी परम थोर योगिनी होती. प्रारब्धभोगानें तिला वैश्य कुलांत जन्म प्राप्त झाला. पण तिचें दुरित लयाला जाऊन ती प्रभुकृपेनें परमावधीच्या भाग्यस्थानावर आरूढ झाली. हिचा पूर्ववृत्तांत बहुतेक सर्व चरित्रकारांनीं दिला आहे. प्रभुसान्निध्यानें पुनीत होऊन गेलेल्या व्यंकम्माचें चरित्र बहुतेक चरित्रकारांनीं यथार्थ दिलें असून महत्त्वाच्या बाबतींत सर्वांची एकवाक्यता आहे. व्यंकम्माचें पुढील चरित्र यथानुप्रसंग आम्ही देत आहोंच; पण पूर्वचरित्रही आम्ही आमच्या समजुतीप्रमाणें कथन करीत आहों.

व्यंकम्माची निरुपम भक्ति पाहून प्रभु संतुष्ट झाले व आपल्या अंगावरील शुभ्र वस्त्र तिच्यावर घातलें. त्या प्रसंगीं व्यंकम्माची मनःस्थिति कशी बनली होती हें प्रभूंच्या मुखांतून त्याच वेळीं सहज स्फूर्तीनें निघालेल्या एका पदावरून उघड होणारें आहे. या वेळीं व्यंकम्मा निःसंग झाली होती; तिला लोक काय म्हणतील याची पर्वा नव्हती हें या पदांत दर्शविलें आहे.

### पद

निःसंग मी झाल्यें ग बाई ॥
कोणा बरें दिसो कोणा वाईट दिसो ॥ धृ० ॥
चुकल्यें मी होत्यें आपुल्या घरासी ॥
पूर्व स्थळा प्रति आल्यें ॥ १ ॥
लाज नसे मर्यादा कशाची ॥
मीपण माझें विरालें ॥ २ ॥
माणिक म्हणे श्रीगुरुपदीं लागुनीं ॥
पूर्णबोधें मन धालें ॥ ३ ॥

व्यंकम्माच्या अंगावर प्रभूंच्या अंगावरील निर्मळ वस्त्र पडलें त्याच वेळीं तिचा पुनर्जन्म झाला. तिचें दुरित पार जळून जाऊन ती धुतलेल्या तांदळाप्रमाणें सोज्वळ बनली. तेव्हांपासून पुढें तिनें शुभ्र वस्त्र परिधान करण्याचा परिपाठ ठेविला. कपाळास शुभ्र भस्म चर्चून शुभ्र वस्त्र परिधान केलेली व्यंकम्मा हातीं रुद्राक्षांची माळ घेऊन प्रभुनामाचा अखंड जप करीत असलेली सदैव दृष्टीस पडत असे. व्यंकम्माला परमेश्वरानें उच्च कुल दिलें नव्हतें, तिला सौंदर्य मिळालें नव्हतें, विद्येचा गंधही पण तिला नव्हता. पण, या सर्वांना लाजविणारें पवित्र अंतःकरण तिला प्राप्त झालें होतें; आणि या अंतःकरणाच्या जोरावरच त्या सर्वसमर्थ प्रभूला आकळण्याचें तिला सामर्थ्य आलें होतें.

व्यंकम्माचे वडील कोमटी जातीचे होते. कोमटी लोक आपल्यास वैश्य म्हणवून घेतात. त्यांनीं आपली परंपरा

अबाधित राखिली असून, धर्मशास्त्रविहित असे सर्व संस्कार ते आजपर्यंत पाळीत आले आहेत. निजामच्या राज्यांतील कोमटी लोक बहुधा व्यापार करणारे असून श्रीमान् वर्गांत त्यांची गणना होते. व्यंकम्माचे वडील धनकनकसंपन्न व्यापारी असून अत्यंत भाविक होते. व्यंकम्माचें लग्न त्या कालाला अनुसरून फार लहानपणीं झालें होतें. पण दुर्दैवानें तिचा पति लग्नानंतर लौकरच निवर्तल्यामुळें तिला वैधव्य आलें होतें. ती बाला असतांच विधवा झाली. वैधव्यामुळें कोसळलेली आपत्ति सर्व काल देवध्यानांत घालविण्यानें टाळतां येण्यासारखी असल्यामुळें तिनें तो मार्ग स्वीकारला होता. तिच्या आईबापाचेंही तिला साहाय्य मिळालें. व्यापार करून धन संपादन करणारें हें कुटुंब पूर्ण ईशभक्त बनलें. परमेश्वरप्राप्तीचा मार्ग दुष्कर असला तरी सर्वस्वाचा त्याग करूनही ईशकृपा संपादन करावी या पवित्र हेतूनें हें कुटुंब अहोरात्र भजनानंदांत घालवूं लागलें. देवध्यानीं लागलेल्या या भोळ्या भाविक कुटुंबाला नागविण्यास दांभिक लोकांना आयतेंच फावलें. कित्येकांनीं त्यांना नाना प्रकारच्या भुलथापा देऊन आपल्या नादीं लाविलें. एका दांभिक गुरूनें तर सर्व कुटुंबासुद्धां सदेह कैलासाला जाण्याची अद्भुत विद्या आपणांस अवगत असल्याचें व्यंकम्माच्या पित्यास सांगितलें. सर्व ऐहिक आधिव्याधींतून मुक्त होऊन देहासकट स्वर्गसुख भोगावयास सांपडावें म्हणून व्यंकम्माचा बाप त्या गुरूच्या नादीं लागला. तो दांभिक महा चतुर होता. त्यानें

नाना प्रकारच्या नव्या युक्त्या योजून यांच्या धनाचें हरण करण्यास प्रारंभ केला. शेवटीं सर्वांना एकाच वेळीं स्वर्गाला पोंचविण्याचा दिवस निश्चित करून त्यांजकडून कांहीं अनुष्ठान करविलें. अनुष्ठान समाप्त झाल्यानंतर मैलार येथील रुद्रकुंडावर व्यंकम्मा सुद्धां घरांतील सर्व लहानथोर माणसांना आणून त्या अथांग जलाशयांत एकदम उडी मारण्याची सर्वांना आज्ञा केली. गुरुआज्ञेनुसार त्या कुटुंबांतील सर्व मुलां-माणसांनीं पटापट उडया घेतल्या. पोहतां न आल्यामुळें सर्वजण बुडून जाऊन प्राणास मुकले. व्यंकम्मानें सुद्धां सर्वांबरोबर कुंडांत उडी घेतली. तिला पोहण्याचें ज्ञान नव्हतें. पाण्यांत पडल्यामुळें घाबरून जाऊन एकदोन वेळां गटंगळ्या खाऊन ती वर आली. तिसऱ्या वेळीं बुडण्याच्या मार्गांत असतांच कोणी तरी हातीं धरून तिला वर काढिलें. या वेळीं ती बेशुद्ध होती. पण त्यांतल्या त्यांत तिला वर काढणाऱ्या पुरुषाचें तोंड पाहण्याइतकी शुद्धि येऊन आपल्या प्राणदात्याचें स्वरूप तिच्या मनांत पूर्णपणें ठसलें. असो; सर्व कुटुंबांतील इतर माणसांना स्वर्गास पाठवून दिल्यानंतर त्या दांभिकानें त्यांचा ऐवज लांबवून यःपलायन केलें. व्यंकम्मास शुद्धीवर आणण्याची खटपट करणाऱ्या लोकांना त्या दांभिकाचें हें कृत्य पाहून फार संताप आला; पण व्यंकम्माप्रमाणें दुसऱ्या माणसांना बाहेर काढण्याचें सामर्थ्य कोणांत नसल्यामुळें त्यांनीं तो नाद सोडून दिला.

यथायोग्य उपचार झाल्यानंतर व्यंकम्मा पूर्ण शुद्धीवर आली. तिचें सर्व ध्यान आपल्यास पाण्यांतून वर काढणाऱ्या पुरुषाकडे लगून राहिलें असल्यामुळें मातापितरांच्या वियोगाचें स्मरण तिला राहिलें नाहीं. वैश्य कुलांतील जन्माचा शेवट जलाशयांत झाल्यानें या वेळींच तिचा पुनर्जन्म झाला होता. तिचे स्वकीय कोणी राहिले नव्हते. पाठीमागें कसलाही पाश उरला नव्हता. मातापितर सदेह स्वर्गावर आरूढ झाले आहेत अशी कदाचित् तिची भावना होऊन त्यांच्यासंबंधानें तिनें विचार करण्याचें सोडून दिलें असावें. असो; अशा मन:स्थितींत पृथ्वीवर भटकत फिरत असतां व्यंकम्माला प्रभुदर्शनाचा लाभ झाला. प्रभुदर्शन होतांच आपल्यास रुद्रकुंडांतून अचानक बाहेर काढणारा हाच तो तरुण पुरुष होय अशी तिच्या मनाची खातरी होऊन प्रभुस्वरूपावर तिचें मन खिळून गेलें. पुढील कथाभाग आमच्या वाचकांस विदित आहेच.

कांहीं चरित्रकार यासंबंधानें जरा वेगळी हकीकत देतात. व्यंकम्माच्या मातापितरांना प्रभूंचा लौकिक समजल्यावर प्रभुदर्शन घेण्याची परम उत्कंठा लागली. प्रभु मैलारास आल्याचें वर्तमान समजतांच व्यंकम्मा आणि लहान मुलें बरोबर घेऊन तिचे आईबाप बैलगाडी करून प्रभूचें दर्शन घेण्याकरितां आपल्या गांवाहून निघाले. मैलारपासून कांहीं कोसांवर येतांच मार्गांत अचानक जोराची पर्जन्यवृष्टि होऊन

नदीनाल्यांना भयंकर पूर आला. अशा वेळीं एका नाल्याजवळ यांची गाडी आली असतां एकाएकीं जोराचा लोंढा आल्यामुळें गाडीसुद्धां हीं सर्व मुलेंमाणसें वाहून गेलीं. त्यांत व्यंकम्माही वाहत असतां एका तरुण ब्रह्मचाऱ्यानें आपल्या हातीं धरून तिला प्रवाहाबाहेर काढून जमिनीवर ठेविलें आणि तो तेथें गुप्त झाला. या अपघातांत सांपडल्यामुळें धक्का बसून बेशुद्ध झालेली व्यंकम्मा पुढें कांहीं कालानें पूर्ण शुद्धीवर आल्यानंतर मैलारास येऊन पोंचली. प्रभुदर्शनानंतरचा प्रकार वर कथन केला आहेच.

वरील दोन्ही कथानकांत बराच विरोध आहे; तथापि पाण्यांत पडून अथवा वाहून जाऊन मरणोन्मुख स्थितींत असतां तिला एका दिव्य व समर्थ विभूतीनें या संकटांतून मुक्त केलें ही गोष्ट निश्चित दिसते. अशा भयंकर प्रसंगीं संकटांत उडी घालून आपला उद्धार करणारा तो पुरुष एकाएकीं अदृश्य झाला याचा विस्मय तर तिला वाटलाच, पण त्या थोर पुरुषाचा करस्पर्श होतांच तिच्या अंगांतल्या ज्या अद्भुत तेजाचें स्फुरण झालें, त्या योगानें तिची अवस्था एखाद्या वेडयाप्रमाणें झाली. ज्यानें आपणास जलांतून अचानक वर काढलें तोच या प्रपंचरूपी जगड्व्याळ मायाजलांतून उद्धरून नेण्यास समर्थ आहे अशी तिची खातरी झाली. त्या उद्धारकर्त्याच्या शोधांत ती वेडयाप्रमाणें फिरूं लागली. या काळच्या तिच्या अवस्थेचें यथार्थ वर्णन प्रभूंच्याच एका पदांत आलें असल्यामुळें तें पद आम्हीं येथें देत आहों.

पद

वेडी पिशी मी जहाल्यें बाई ग ॥
गुरुचरणीं लीन झाल्यें कीं ॥
गृहधंदा मज कांहीं सुचेना ॥
इंद्रियधाम निमालें कीं ॥ धृ० ॥

कानाचें ऐकणें राहिलें । नेत्र असुनि न दिसे कांहीं ॥
स्पर्श विषयाचें भान उडालें । घ्राणीं ग्रहणत्वचि नाहीं ॥ १ ॥
मलमूत्र होउनियां न होय । पाय असुनि पंगु झाले ॥
जिव्हेचा रसास्वाद उडाला । हात असुनि व्यवहार न चाले ॥२॥
मन हें पांगुळलें बाई ग । वाचा बोबडी वळली कीं ॥
बुद्धीची निर्बुद्धि झाली । अहंकृति हेही गळाली कीं ॥
माणिक म्हणे गुरुचरणीं । लीन झाल्यें कीं ॥ ३ ॥

व्यंकम्माचे ऐहिक आप्त नाहींसे झाल्यामुळें पारमार्थिक आप्त शोधण्याच्या ती मार्गे लागली. एखादें चुकलेलें पाडस आपल्या आईच्या शोधार्थ सैरावैरा धांवत सुटतें, त्याप्रमाणें ती हा उद्धारक आप्त शोधून काढण्यास फिरूं लागली. तिच्या अंतःकरणाची तळमळ हा दिव्य गुरु भेटल्याशिवाय शमणारी नव्हती. म्हणून सर्व इंद्रियें असूनही ती व्यापारशून्य झाल्यामुळें वेडी झालेली व्यंकम्मा कांहीं दिवस भटकत राहिली. पण तिचें भाग्य उदयास येण्याचा योग्य समय प्राप्त झाल्यामुळें तिला प्रभुदर्शन घडलें! तिची चुकलेली माता सांपडली, अदृश्य झालेला पिता दृष्टीस पडला, बंधुभगिनींची भेट झाली, हरवलेलें निधान हातीं आलें! प्रभूंच्या दर्शनानें

या सर्व गोष्टींचा लाभ एकदम झाल्याप्रमाणें तिला आनंद झाला. तिच्या त्या प्रसंगाच्या अपूर्व सौख्याचें वर्णन करण्यास कोण समर्थ आहे ?

मैलारास प्रभूंचा मुक्काम पुष्कळ दिवस होता. या ठिकाणीं प्रभूंच्या गादीची स्थापना झाली. त्या समयीं मोठाच उत्सव झाला. देवालयानजीकच्या अरण्यांत एका वृक्षाखालीं प्रभु बसले असतां हातीं धरलेल्या काडीनें त्यांनीं थोडेंसें जमिनीवर उकरतांच पाणी लागलें. हीच गंगा समजून सर्व शिष्य मंडळींनीं भाविकपणें मार्जन केलें आणि भोंवतालची जमीन उकरून काढली. कुंड तयार करण्याइतका पाण्याचा संचय आहे असें पाहून त्या ठिकाणीं एक लहानसें कुंड तयार केलें आणि या तीर्थाला 'माणिक कुंड ' असें नांव प्राप्त झालें. अद्यापपावेतों या माणिक कुंडाचें महात्म्य चालू आहे. या समयीं देखील फारच मोठा समारंभ होऊन हें कुंड चालू करण्यांत आलें.

दुबळगुंडीचे कुळकर्णी रामाजीपंत नांवाचे होते. त्यांना प्रभूंचें दर्शन मैलारासच झालें. रामण्णापंत या वेळीं अगदीं पूर्ववयस्क ब्रह्मचारी होते. प्रभुदर्शनानंतर प्रभुचरणीं यांची निष्ठा बसली ती त्यांच्या अखेरपर्यंत कायमच होती. याच ठिकाणीं आपल्याजवळ राहतोस काय म्हणून प्रभूंनीं रामण्णापंतास विचारलें; पण त्या वेळीं राहण्यासारखा योग

नव्हता म्हणून त्यांना राहतां आलें नाहीं. त्यांची वडील भगिनी सुंद्रम्मा मात्र याच ठिकाणीं प्रभुसन्निध राहिली. सुंद्रम्मा विधवा होती. तिचें अंतःकरण शुद्ध भक्तीनें पुनीत झालें असल्यामुळें प्रभूंनीं तिला राहण्याची परवानगी दिली. पुढें तिच्यावर अनुग्रह करून तिला प्रभूंनीं दिव्य दृष्टि दिली होती असें कित्येक म्हणतात.

प्रभूंच्या वास्तव्यानें मैलार क्षेत्राच्या महात्म्यांत अधिकच भर पडून ग्रामवासी सकल जनसमुदाय नित्य नव्या महोत्सवाच्या प्रसंगानें हर्षनिर्भर होऊन गेला. आपल्यास प्रभुपदाचा सहवास चिरकाल लाभावा अशी त्यांची अपेक्षा होती. पण हें कसें शक्य होतें ? कारण कीं, मणिचूल पर्वतावरील यच्चयावत् तीर्थें, क्षेत्रें, गुहा, तपश्चर्येचीं असंख्य स्थानें व अरण्यें यांना भेटी देण्याचा प्रभूंचा संकल्प होता. आणि त्यांतल्या त्यांत सवड काढून, सडया स्वारीनिशीं आर्यावर्तातील बहुतेक सर्व प्रमुख तीर्थांना व क्षेत्रांना जावयाचा त्यांचा मनोरथ होता. इतक्या गोष्टी साध्य झाल्याशिवाय कोणत्याही एकाच ठिकाणीं पुष्कळ दिवस राहणें संभवनीय नव्हतें. आपल्या पुढील उद्देशाला अनुसरून मैलारहून मुक्काम हालविण्याचा विचार प्रभूंनीं चालविला. मातुःश्री बयादेवी व नृसिंहरावतात्या यांची रवानगी कल्याणास करून दिल्यानंतर कांहीं निवडक शिष्यमंडळी समागमें ठेवून बाकी लोकांना आपापल्या स्थानीं परत जाण्याची आज्ञा झाली. कसल्याही

घोर अरण्यांत अथवा खडतर जागीं राहण्याचा प्रसंग आला तरी आपण डगमगणार नसून प्रभुचरण सोडून हालणार नाहीं असा व्यंकम्माचा निर्धार पाहून तिला बरोबर घ्यावें असें ठरलें. मैलार सोडून प्रभु जात आहेत हें पाहून सर्व मैलारवासी लोक खिन्न झाले. पण प्रभूंनीं गोड भाषणानें सर्वांचें समाधान करून सर्वांना प्रेमानें प्रसाद दिला.



## भालकी : : ५

मैलारहून प्रभु निघाले ते भालकी येथें आले. भालकीस कां एकाएकीं येणें झालें हें प्रथम कोणाच्याही लक्षांत आलें नाहीं. भालकी हा गांव पूर्वीं मराठा सेनापति चंद्रसेन जाधव याचे जहागिरीचा असल्याबद्दलचा उल्लेख यापूर्वीं आलाच आहे. चंद्रसेनास खासगी खर्चाकरितां सात लाखांची जहागीर निजामाकडून मिळाली होती. त्या जहागिरीचें मुख्य स्थान भालकी हें असल्यामुळें चंद्रसेन व त्यानंतर राजा रामचंद्र यांच्या राजधानीचें भाग्य या गांवाला लाभलें होतें. या ठिकाणीं अद्यापपावेतों किल्ला व राजवाडा जीर्ण दशेंत उभा असलेला दिसत आहे. पेशवे व निजाम यांच्यामध्यें एके वेळीं लढाई होऊन तिचें पर्यवसान तहामध्यें झालें. तो तह भालकीस झाल्यामुळें भालकीचा तह म्हणून इतिहासांत प्रसिद्ध आहे. या गांवचा इतिहास फार प्राचीन आहे. पूर्वीं याला भद्रपुरी अथवा भद्रावती असें नांव होतें. येथें भद्रेश्वर नांवाचें शंकराचें देवालय आहे, त्याला आतां भालकेश्वर म्हणतात. हें देवालय फार प्राचीन आहे. प्रभु येथें आले ते या शंकराच्या मंदिरांत उतरले. अरणाप्पा नामें एक ब्राह्मण या शंकराचा पुजारी होता. तो पुष्कळ दिवसांपासून उदराच्या व्यथेनें पीडिला होता. नानाप्रकारचे औषधोपचार करूनही कांहीं गुण येईना, तेव्हां मंत्रतंत्रादिक साधनें करून पाहिलीं. पण कशाचाही उपयोग

झाला नाहीं, म्हणून हा ब्राह्मण जिवाला अगदीं कंटाळून गेला होता. लवकर जीव गेला तर या असह्य यातनेंतून सुटका तरी होईल अशा विचारानें तो मरणाच्या दारांत पडून राहिला होता. अशा समयीं प्रभूंची स्वारी तेथें येऊन दाखल झाली. प्रभूंना पाहून " महाराज, या यातनेंतून मला लवकर सोडवाल तर फार बरें होईल. मला हे कष्ट आतां सोसवत नाहींत. आपणच आतां या दीनावर दया करा व या दुःखांतून मला मुक्त करा, " असें विनवूं लागला. यावर प्रभु हंसून म्हणाले, "अरुणाप्पा, अरे तूं मेल्यावर या देवाची वाट काय होईल? याची पूजाअर्चा कोण करील?"

प्रभूंनीं त्या ब्राह्मणाची परिस्थिति जाणून त्याला बरें करावें असें योजिलें. प्रभूंचे उपचार सामान्य वैद्याप्रमाणें मुळींच नव्हते. तीळ; खोबरें व पोहे दह्यांत कालवून त्याचे लाडू बनविण्यास प्रभूंनीं आज्ञा केली. आणि त्यांतील एक लाडू खाण्यास त्याला सांगितलें. हें विलक्षण औषध पाहून लोकांना आश्चर्य वाटलें. कित्येकांना तर तो ब्राह्मण उद्यां मरायचा तो आजच मरेल असें वाटलें. तथापि प्रभुवाक्यावर विश्वास ठेवून ब्राह्मणानें तो लाडू प्रभूंच्या हातांतून घेऊन भक्षण केला. त्यावर प्रभूंनीं आपल्या हातांतील सोटा त्याच्या पोटावरून फिरविला. पोटावरून सोटा जसजसा फिरत गेला, तसतशा त्याच्या वेदना कमी होऊं लागल्या. प्रभुकृपेनेंच आपण बरे होऊं अशी त्या ब्राह्मणास आशा उत्पन्न झाली. दोन-तीन दिवसांत त्याला

पुष्कळ गुण येऊन प्रभूंचा मुक्काम तेथें असेतोंपर्यंतच तो खडखडीत वरा झाला.

यमाच्या दाढेंतून प्रभूंनीं या ब्राह्मणास बाहेर काढून त्याला जीवदान दिलें. त्याच्या आनंदाला पारावार नव्हता. तो प्रभुभक्त बनला हें सांगणें नकोच. ब्राह्मणाच्या विनंतीला मान देऊन प्रभूंनीं भालकीस गादी स्थापन केली. गादीची नित्य पूजा करण्याचें काम या ब्राह्मणानें स्वसंतोषानें पत्करिलें. पुढें प्रभूंचें वास्तव्य त्या ठिकाणीं कांहीं दिवस होऊन पुष्कळ लोकसमुदाय प्रभुभजनीं लागला. भालकीचे आवाराव नायबही प्रभूचे परम भक्त वनले.

या भालकीच्या मुक्कामाविषयीं कांहीं चरित्रकार वेगळी हकीकत सांगतात ती अशी: —

"यानंतर प्रभु भालकी ग्रामाजवळच्या एका घोर अरण्यांत जाऊन कांहीं दिवस राहिले. बरोबर अवघी पांच-सात मंडळी होती. त्यांत बाप्पाचार्य, नारायण दीक्षित, आणि च्चिमण्या ब्रह्मचाऱ्यासहित चार ब्रह्मचारी, इतक्या मंडळीसह स्वारी भालकीच्या अरण्यांत जाऊन वर्ष दीड वर्षपर्यंत राहिली होती. त्या वेळीं बाकी सर्व खटला मातु:श्रीसह कल्याणासच ठेविला होता. कोमटयाची मुलगी जी व्यंकम्मा मैलारापासून प्रभुसेवेकरितां प्रभूंजवळ राहिली होती, तिला मंत्रोपदेश व एक रुद्राक्षाची माळ जपासाठीं व भस्म लावण्याची आज्ञा देऊन मातु:श्रींच्या व दादासाहेबांच्या सेवेंत राहावें म्हणून घरींच

ठेविली होती. भालकीचे रानांत असतां प्रभु बऱ्याच अंशीं गुप्त असल्यासारखे होते. प्रभूंनीं आठआठ दिवस समाधि लावून बसावें. मधून मधून समाधीचें विसर्जन करून नारायण दीक्षितास सामवेद पढवावा व बाप्पाचार्यास वेदांतनिरूपण करावें. ब्रह्मचारी चार होते, त्यांनीं गावांत जाऊन माधुकरी मागून आणावी आणि प्रभूंसहित सर्वांनीं त्यावर निर्वाह करावा. अशी स्थिति सुमारें वर्षभर चालू असतां या रानांत कोणी सिद्ध पुरुष येऊन राहिले आहेत, अशी भालकी ग्रामाचे आसपास वदंता पसरली आणि थोडे थोडे लोकही दर्शनास येऊं लागले. तथापि हे कल्याणचे प्रभु आहेत असें कोणाला समजलें नाहीं. त्या प्रांताच्या नायबास हें वर्तमान समजलें तेव्हां त्याचीही भक्ति या सिद्धपुरुषावर बसली. तो आठ-चार दिवसांनीं दर्शनाला येऊं लागला. तथापि हे सिद्धपुरुष कल्याणकर माणिकप्रभु आहेत हें त्यालाही समजलें नाहीं.''

एकदां येथें प्रभूंच्या दर्शनाकरितां म्हणून एक यात्रेकरू ब्राह्मण आपली बायको व पांच वर्षांच्या मुलासहवर्तमान भालकी गांवीं येऊन पोंचला. मनांत प्रभुदर्शनाची इच्छा दृढ होती, म्हणून द्रव्य नसतांही स्त्रीसहित चालत व मुलाला पाठीवर बांधून हळूहळू मोठ्या कष्टानें प्रभु राहत होते त्या ठिकाणीं नजीकच्या तळ्यावर येऊन दमून थकून बसला. स्त्रीपुरुषांच्या पोटांत दोन दिवसांपासून अन्न नव्हतें. आणि

मुलाला देवीनें गांजिलें होतें. देवी इतक्या दाट होत्या कीं, अंगावर तीळ ठेवण्यास देखील जागा नव्हती ! देवीच्या योगानें मुलगा चारपांच दिवसांपासून हैराण होता, तरी तसाच पाठीवर बांधून आणिला होता. वाटेच्या श्रमानें मुलगा फारच कासावीस होऊन गेला होता. शेवटीं या तळ्यावर येऊन पोंचल्याबरोबर त्याचें प्राणोत्क्रमण झालें. हें पाहून हें जोडपें मूर्च्छित होऊन पडलें. त्या वेळीं हें वर्तमान कोणी प्रभूंना येऊन सांगितलें. प्रभूंजवळ आबाराव नायब, मच्छिंदरराव आणि गुरुराव वगैरे मंडळी बसली असून इतर लोकही बरेच होते. हें वर्तमान ऐकतांच प्रभु तात्काळ उठले व तळ्यावर येऊन पोंचले. मागोमाग सर्व मंडळीही आली. मग प्रभूंनीं खालीं बसून मुलाला मांडीवर घेऊन त्याच्या अंगावरून आपला अमृतहस्त फिरविला. प्रभुकरस्पर्श होतांच मुलगा डोळे उघडून खाड्दिशीं उठून बसला ! हें पाहून त्या स्त्री-पुरुषास परमानंद होऊन तीं प्रभुचरणावर गडबडां लोळूं लागलीं. आपल्या आनंदाश्रूंनीं त्या उभयतांनीं प्रभुचरणास स्नान घातलें. मग प्रभूंनीं ह्या उभयतांस उठवून पोटाशीं धरून आलिंगन दिलें आणि विचारिलें कीं, तुम्ही कोणीकडे जावयास निघालां आहां ? तेव्हां ते म्हणाले, “ आम्ही माणिकप्रभूंच्या दर्शनाकरितां कल्याणास जात आहों. देवानें आम्हांस फार विपत्तींत पाडलें आहे. प्रभु आम्हांवर कृपा करील या आशेनें चाललों असतां वाटेंत आम्हांवर हा प्रसंग गुदरला; परंतु

प्रभूलाच आमची करुणा आली; म्हणून त्याच्याच कृपेनें येथें हें आपलें कृपादर्शन होऊन, आम्हांस पुनरपि पुत्राचा लाभ झाला."

उभयतांचें हें बोलणें ऐकल्यावर प्रभूंच्या नेत्रावाटे प्रेमाश्रु येऊन ते म्हणाले, "तुम्हांस प्रभूचें दर्शन कल्याणास न जातां येथेंच झालें तर कसें होईल ?" हें भाषण ऐकून दीनवाणीनें ब्राह्मण बोलला, "एवढें आमचें भाग्य कोठें आहे ? आज तीन दिवस झाले, पोटांत अन्न नाहीं; तरी प्रभूस आमची करुणा येत नाहीं, असें तर आमचें भाग्य आहे." यावर प्रभु बोलले कीं, "असें कां म्हणतां ? प्रभु तर तुमच्या दर्शनाकरितां आज वर्षभर, आपलें कल्याण गांव सोडून तुमच्याकरितां वाटेवर येऊन बसला आहे. आणि उलट तुम्हीं प्रभूवर शब्द ठेवितां हें काय ?" प्रभूच्या दर्शनाकरितां ब्राह्मण फार आतुर झाला होता. परंतु त्याला तीन दिवसांचा उपास पडला असल्यामुळें आधीं जेवूं घालावें व मग दर्शन द्यावें या हेतूनें प्रभूंनीं आपल्या ठिकाणीं नेलें. तेथें चिमण्यासहित चार ब्रह्मचाऱ्यांनीं माधुकरी आणली होती, तिचा नैवेद्य श्रीदत्तास समर्पण करण्यास सांगून पात्रें मांडण्याची आज्ञा केली. आणि आबाराव नायब, मच्छिंदरराव व गुरुराव इत्यादि बडी मंडळी तेथें होती, त्यांसहित तेथें असलेल्या सर्व मंडळीस भोजनास बसण्याची आज्ञा झाली. आज्ञा प्रमाण मानून सर्वजण पात्रांवर बसले. सुमारें शें-दोनशें पात्रें मांडलीं गेलीं; तेव्हां प्रभु म्हणाले कीं, आज मोठी समाराधना आहे. याकरितां भालकी ग्रामांतील

व आसपासच्या तीन कोसांच्या सीमेंतील सर्व जातींच्या लहानथोर मंडळीस भोजनास बोलवा. याप्रमाणें आज्ञा होतांच आबाराव नायबांनीं चोहोंकडे माणसें पिटाळलीं. दोन घटकेच्या आंत चार हजार माणसें जमा झालीं. सर्व ज्ञातींतील बायका, मुलें आणि आंधळेपांगळे झाडून सर्व जमा झाले. मग ब्राह्मण, वैश्य, शूद्र, अतिशूद्र वगैरे ज्ञातींचीं पानें यथाशास्त्र रीतीनें मध्यंतरीं योग्य अंतर ठेवून घातलीं. याप्रमाणें पात्रें पडल्यावर प्रभूंनीं आपल्यासमोर चारी ब्रह्मचाऱ्यांच्या झोळ्या आणवून ठेविल्या. आणि त्यांतील नाना प्रकारचें अन्न म्हणजे भात, भाकरी, कण्या, पोळ्या, भाज्या आणि वडे इत्यादि विविध पदार्थ वेगवेगळे काढून ठेवण्यास सांगितलें. तेव्हां चमत्कार असा झाला कीं, झोळ्या अगदीं लहान असतांही त्यांतील वेगवेगळाल्या पदार्थांचे पर्वतप्राय ढीग पडले. जों जों अन्न आंतून काढावें, तों तों निघतच गेलें. वाढणारे निरनिराळ्या जातीचे पृथक् पृथक् उभे केले होते. ते आपापल्या पंगतीस वाढूं लागले. याप्रमाणें वाढणें झाल्यावर 'अवधूत चिंतन श्रीगुरु देवदत्त' अशी प्रभूंच्या मुखांतून आरोळी होऊन, भोजनास बसण्याची आज्ञा झाली. सर्वांचीं भोजनें यथासांग झालीं, तरी झोळ्या पूर्ववत् तशाच भरलेल्या होत्या. शेवटीं प्रभूंनीं त्यांतील पांच ग्रास सेवन करून ब्रह्मचाऱ्यांना जेवण करण्याची आज्ञा दिली. याप्रमाणें चमत्कार व सामर्थ्य पाहून आबाराव नायबांसहित सर्व लहानथोर मंडळी चकित होऊन

यज्ञासंबंधीं व त्यांत होणाऱ्या पशुवधासंबंधीं आजकाल बरीच चर्चा चालू आहे. त्याच्याशीं आम्हांला येथें कांहींच करावयाचें नाहीं. सकलमतस्थापक सद्गुरूला वैदिक मार्गानुयायी लोकांचाही संग्रह करणें अवश्य होतें. त्याला अनुसरूनच प्रभूंनीं यज्ञ करविला. यज्ञामध्यें जेवढे उत्तम भाग आहेत, त्यांचें ग्रहण करावें हें युक्तच होय. एक पशुहत्या वगळली, तर यज्ञासारखा उत्तम विधि दुसरा कोणताच नाहीं. पशुहत्या वाईट; पण तेवढ्याकरितां त्यांमधील चांगले भागही वगळावे असें होत नाहीं. शिवाय वैदिक धर्मप्रमाणें ही हत्या समजली जात नसल्यानें हा विधि अवश्यमेव केला पाहिजे असेंही म्हणणारे सहस्रावधि लोक आहेत. असो; प्रभुदरबारीं सर्व मतांतील उत्तमोत्तम भागाला स्थान असल्यामुळें यज्ञांतील जेवढा उत्कृष्ट भाग असेल, त्याचा लाभ इतर जनांना करून देणें अवश्य होतें. यज्ञ सांग होण्याकरितां जितके श्रम व पैसा यांची जरूरी होती, तेवढ्यांत कसलेंही न्यून पडूं नये याविषयीं प्रभूंनीं व इतर सर्व शिष्यवृंदांनीं अत्यंत दक्षता घेतली होती. या यज्ञानंतर अशा प्रकारचा प्रचंड यज्ञ इकडील भागांत किंवा संपूर्ण आर्यावर्तांत देखील झाला नाहीं असें सर्वांचें म्हणणें आहे. जी गोष्ट मोठमोठ्या राजेरजवाड्यांना सुद्धां द्रव्याची अनुकूलता असूनही साधत नाहीं, ती गोष्ट प्रभुदरबारीं सहजसाध्य होत असते, हें यज्ञावरून दिसून येणारें आहे.

पाहण्याकरितां ही समाधि दिली होती म्हणतात. या परीक्षेंत व्यंकम्मा उत्कृष्ट रीतीनें उत्तीर्ण होऊन प्रभूंची शाश्वत कृपा संपादन करती झाली. हा कथाभाग यथावकाश कथन करण्यांत येईल. व्यंकम्मांची तपश्चर्या दिवसेंदिवस अधिकाधिक प्रभावशाली होऊं लागली. वारा, ऊन, पाऊस, थंडी यांच्यापासून व्यंकम्मास कधींही बाधा न होतां, तिची तपश्चर्या फलद्रूप होत चालली. क्षुधा, तृषा तिनें जिंकल्या होत्या. रागद्वेषादि षड्रिपु तिच्यावर अधिकार गाजविण्यास असमर्थ होऊन गेले. आपल्या दृढ निश्चयानें सर्व विकारांवर विजय मिळवून व्यंकम्मा क्रमाक्रमानें उत्क्रांत स्थितीची पायरी चढत चढत शेवटीं परमोच्च स्थानावर आरूढ होऊन देवीपद पावली. हें हृदयंगम चरित्र पुढें येणारच आहे.



## संग्रामखां : : ६

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें प्रभूंची स्वारी भालकीस कांहीं काल महानंदांत काढून चिटगोप्यास आली. प्रभूंच्या आगमनास कारणीभूत झालेला एक वैश्य जातीचा देशमुख गृहस्थ चिटगुप्यास राहत असे. या गृहस्थाचें सरकारांत व तसेंच लोकांतही फार वजन असे. ह्या घरचा फार श्रीमान् असून सदोदित सशस्त्र फिरत असे. आपल्या पदरीं पुष्कळ लढवय्ये लोकांची पलटण यानें ठेवून दिली होती. परंतु याचें धोरण गोरगुरिबांना त्रास देण्याचें नसून, उन्मत्त लोकांना शासन करून, गरीब लोकांना सहाय्य करण्याचें होतें. यामुळें याचा लौकिक वाढून दुष्ट लोकांना याचा दराराही वाटूं लागला. सरकारी अधिकारी याला वचकून राहून रयतेला त्रास देत नसत. याचे नांव **संग्रामराव** असें होतें. पण याच्या शिपाई बाण्यामुळें याला **संग्रामखां** असें टोपण नांव प्राप्त झालें होतें. धनकनकसंपन्न असलेल्या संग्रामखांनें पुष्कळ सत्कृत्यें करून सत्कीर्ति संपादन केली होती. या वेळीं मोगलाईंत आतांप्रमाणें कायद्याचा अंमल नसल्यामुळें चार लोकांच्या मदतीनें कोणासही प्रबल होतां येत असे. प्रबल लोक बहुधा गरिबांचे काळ असावयाचे. पण संग्रामखांची तशी प्रवृत्ति नव्हती. तो अनाथाचा नाथ व दीनाचा सहकारी होता. म्हणून

त्याच्यावर लोक खुष असत. अशा रीतीनें सरळपणानें वागून त्यानें लौकिक मिळविला होता. पण त्याच्या दुर्दैवानें त्याच्या शरीराला एक व्याधि जडली. चातुर्थिक हिंवज्वरानें त्याला पछाडलें. यांतच पुढें उदररोगाचा उद्भव होऊन त्याच्या शक्तीचा ऱ्हास होऊं लागला व सर्व सौख्य अनुकूल असतांही शारीरिक पीडा असह्य होऊं लागली. त्यानें नाना प्रकारचे औषधोपचार करून पाहिले, पण गुण आला नाहीं. दिवसेंदिवस शक्ति क्षीण होत चालली. शेवटीं एका मांत्रिकानें सांगितलें कीं, ही पिशाचबाधा आहे. या पिशाचबाधेला उपाय म्हणून श्रीशंकराला रुद्राभिषेक करून नित्य गोरगरिबांस व ब्राह्मणांस अन्नसंतर्पण करण्याचा त्यानें क्रम सुरू केला. या उपायानेंही त्याला आराम वाटेना. शेवटीं एके दिवशीं श्रीशंकरानें स्वप्नांत येऊन त्याला कळविलें कीं, तुला या पीडेंतून मुक्त व्हावयाचें असेल, तर कांहीं दिवस तूं माणिकप्रभूंचें चरणतीर्थ घेत जा. या ईश्वरी वाक्यावर भरंवसा ठेवून त्यानें प्रभूंचा शोध चालविला. भालकीजवळच्या रानांत प्रभु असल्याचें समजल्यावर आपल्या परिवारासह त्यानें भालकीचा रस्ता सुधारला. तेथें प्रभुसन्निध जाऊन सर्व वृत्तांत कळविण्यापूर्वीं प्रभूंनींच त्याचें अंतरंग ओळखून सांगितलें कीं, "शंकराची आज्ञा आम्हास मान्य आहे. मी तुमची वाट पाहतच या ठिकाणीं बसलों आहें." हें ऐकून संग्रामखांस फार आनंद वाटून आपला इच्छित हेतु निःसंशय सफल होणार

अशी त्यानें खूणगांठ बांधून ठेविली. प्रभूंची सर्वोपचार-पूजा करून त्यानें आपल्या गांवीं चलण्यास प्रभूंना विनंति केली. त्याच्या विनंतीला मान देऊन प्रभूही चिटगुप्यास जाण्यास निघाले. या वेळीं प्रभूंची स्वारी उत्तम शृंगारलेल्या म्यान्यांत बसून चालली होती. एखाद्या राजाला योग्य अशा आदरातिथ्यानें संग्रामखांनें अपूर्व समारंभानें आणून, त्यांची मोठ्या प्रेमानें पूजा केली. पूजेनंतर चरणतीर्थ घेतलें. या दिवशीं त्यांच्या घरीं भोजनाचा मोठा समारंभ झाला. आलेल्या सर्व ब्राह्मणांस भोजन घालून सर्वांना रुपरुपया दक्षिणा दिली व आपण ब्राह्मणांनीं केलेल्या अन्नाचा प्रसाद घेतला. असा क्रम कित्येक दिवस चालला होता. प्रभूंचा मुक्काम असेतोंपर्यंत संग्रामखां पूर्ण रोगमुक्त झाला. प्रभुचरणावर त्याची दृढ भक्ति बसली. हें त्याच्या जातभाईस मानवलें नाहीं. सर्वजण संग्रमखांस याबद्दल दोष देऊं लागले. पण संग्रामखांस कोणाची पर्वा नव्हती. प्रभूंनींसुद्धां आपल्या जातिधर्माप्रमाणें वागावें म्हणून त्याला सांगितलें. शेवटीं एके दिवशीं त्यानें आपल्या सर्व ज्ञातिबांधवांस आमंत्रण दिलें. त्याच्या मर्जीप्रमाणें त्या दिवशीं सर्व स्वयंपाकाची तयारी केली होती. स्वयंपाकाची सिद्धता झाल्यावर लिंगायत धर्मास अनुसरून त्यानें प्रभूंची पूजा केली. या प्रसंगीं तेथें जमलेल्या सर्व लिंगायत लोकांना प्रभूंच्या ठायीं बसवेश्वराचें रूप दिसून आलें व त्यांनीं परम उल्हासानें

पूजेंत भाग घेऊन आरति केली आणि तीर्थप्रसाद घेतला. अशा प्रकारें सर्व प्रेमी लोकांना आनंद देऊन प्रभूंनीं त्या गांवीं अखंडेश्वराची स्थापना केली. या वेळीं फारच अपूर्व समारंभ होऊन सर्वत्र आनंदाचें साम्राज्य नांदूं लागलें. शंकराची आरति याच ठिकाणीं तयार झाली असें कोणी म्हणतात. प्रभूंच्या पूजेच्या समयीं प्रभूंनीं केलेलें बसवेश्वरावरील अष्टक येथेंच प्रथम म्हणण्यांत आल्याचेंही तेच चरित्रकार लिहितात. संग्रामखानें आपल्या शेरी जमिनीपैकीं एक मोठी जमीन प्रभूंच्या नांवें करून दिली. ती जमीन अद्याप संस्थानाकडे चालत आहे.



## तीर्थाटन : : ७

प्रभूंचा लौकिक या वेळीं फार वाढत चालला होता; त्यामुळें गुळाच्या खड्याला मुंग्या चिकटून बसतात, तद्वत् लोकसमूह प्रभुसान्निध्यांत सदैव राहत असे. या वाढत्या लोकसमाजाला आळा घालण्याच्या हेतूनें प्रभूंनीं लांब प्रदेशीं तीर्थाटन करण्याचें योजिलें. आपल्या बरोबरच्या सर्व मंडळीस कल्याणास पाठवून दिलें, आणि समागमें फक्त दोन शिष्य घेऊन, स्वारी पायींच दूरदेशीं जाण्याकरितां निघाली. या वेळीं बरोबर घेतलेले शिष्य कोणकोण होते, याचा नामनिर्देश कोठेंही आढळत नाहीं. यावरून ते कोणी तरी नवखेच लोक असावेत असें अनुमान होतें. मणिचूल पर्वतावरील चाळकापूर व मैलार हीं दोन क्षेत्रें प्रभूंनीं पुनीत केलीं याची हकीकत पूर्वीं आलीच आहे. चाळकापुरीं प्रभु साक्षात् रामदास मारुतिराय बनले होते. भजन, पूजन, आरति वगैरे रामसेवक मारुतीच्या नांवानेंच चालत असे. प्रभूंनीं सहज स्फूर्तीनें केलेलीं पदें, अष्टकें, आरति वगैरे एकत्र करून त्यांचें शनिवारचें भजन बनलें. चाळकापुरच्या मारुतीच्या स्वरूपाचें व सामर्थ्याचें साग्र व सूक्ष्म वर्णन यांत आलें आहे. मैलारास म्हाळसाकांत खंडेरायाच्या स्वरूपाची पूजा होऊं लागली. या ठिकाणीं खंडोबाचें संपूर्ण वर्णन करून गुणकथन केलेलें आहे. रविवारच्या भजनांत या सर्वांचा समावेश केलेला

आहे. पुढें प्रभु ठिकठिकाणीं शंकरस्वरूप बनून त्या स्वरूपाचेंच भजन झालें आहे. भालकीनंतर प्रभु निघाले ते परळी वैजनाथ येथें येऊन पोंचले. समागमें फार थोडे लोक होते. येथें कांहीं काल गुप्तपणें काढून, सोमवारच्या भजनाची सामुग्री जमविली. नंतर तुळजापुरास भवानीजवळ आले. प्रभु भवानीशीं कसे तादात्म्य पावले हें मंगळवारच्या भजनावरून सहज दिसून येणार आहे. प्रभु कितीही गुप्तरूपानें गेले, तरी त्यांचें तेज झांकलें जात नसे. प्रथमभेटींतच हा कोणी तरी दिव्य सामर्थ्याचा महात्मा आहे अशी पाहणाराची खात्री होत असे.

लहानपणापासून अरण्यांत राहून सृष्टीशीं समरस होण्याची विद्या प्रभूंना अवगत असल्यामुळें मार्गांतील प्रवास प्रभूंना कधींच त्रासदायक झाला नाहीं. थंडी, वारा, ऊन, पाऊस इत्यादि पंचभूतांपासून होणाऱ्या पीडेला त्यांनीं कधींच जुमानलें नाहीं. तुळजापुरानंतर पंढरीस प्रभूंची स्वारी गेली. गांवाजवळ जातात तों चंद्रभागा दुथडी भरून चालली आहे ! बरोबरची मंडळी चिंताग्रस्त झाली. रात्रीचा समय; नदी तर भरून वाहते आहे. अशा स्थितींत पलीकडे कसें जावें ? अलीकडे राहण्यास जागा नाहीं; त्यामुळें शिष्य भयग्रस्त झाले. प्रभु हास्यवदन होत्साते स्वस्थ उभे होते. इतक्यांत आकस्मिक एका नावाड्यानें सर्वांना हाक मारून सांगितलें कीं, तुम्ही कांहीं काळजी करूं नका. मी तुम्हां सर्वांना पलीकडे पोंचवितों.

हें ऐकून सर्वजण हर्षित झाले. नावाड्यानें नाव आणून सर्वांना आंत बसविलें आणि सुरक्षितपणें सर्वांना पलीकडच्या तीरावर उतरविलें. पलीकडच्या तीरावर सर्व उतरून पाहतात तों नावही नाहीं आणि नावाडीही नाहीं ! सर्व विस्मयचकित होऊन गेले ! !

**चंद्रभागे तीरीं जातां । पूर्ण आली ती सारिता ॥**
**मग पंढरीश स्वयं दत्त । मानवरूपें उतरोनि नेई ॥ ९ ॥**

असें मनोहर महाराजांनीं लिहिलें आहे. पलीकडे गेल्यावर प्रभु वाळवंटांतच कांहीं दिवस राहिले. पांच दिवसपर्यंत सर्व मंडळीसह भजनानंदांत काढून मग गावांत राहवयास गेले. पंढरीनाथाच्या दर्शनास प्रभु गेले ते एकटेच गेले. बरोबर कोणासही घेतलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर दर्शनास जात असल्याची वार्ता कोणालाच कळूं दिली नाहीं. प्रथम महाद्वारांतून आंत प्रवेश केला त्या वेळीं प्रभूंनीं अत्यंत कुश्चल रूप धारण केलें होतें, असें एक चरित्रकार म्हणतात. डोकीस एक फाटकी चिंधी गुंडाळली होती. अंगांत गलिच्छ व फाटकें अंगरखें असून लंगोटीही तशीच घाणेरडी होती. असला हा गलिच्छ वस्त्राचा मनुष्य अंत्यज वर्गांतील असावा असा कयास करून बडवे लोकांच्या मंडळींनीं त्यांना आंत जाऊं दिलें नाहीं. प्रभु जबरदस्तीनें तुरमंडी देऊन आंत शिरण्याचा प्रयत्न करूं लागले. ते लोकही हट्टास पेटून प्रभूला गचांडी देऊन मारहाण करून हाकून

देऊं लागले. इतक्यांत प्रभूंच्या गळ्यांत एक हार येऊन पडला. आणि पंढरीनाथाची मूर्ति थरथर कांपूं लागली. पूजारी भयभीत झाले. हा काय चमत्कार आहे ! या दंग्यांत प्रभूंना पाहिलेल्या एका मनुष्यानें ओरडून सांगितलें कीं, हे कल्याणकर प्रसिद्ध माणिकप्रभु आहेत ! पंढरपुरास येण्यापूर्वींच कर्णोपकर्णीं प्रभूंचा प्रताप सर्व लोकांना समजून आला होता. अशांत प्रभु साक्षात् येथेंच आले आहेत हें ऐकून सर्वांना आनंद वाटला. ज्यांनीं प्रभूशीं मारहाण केली होती, ते तात्काळ नम्र होऊन प्रभूंच्यापुढें दंडवत घालूं लागले. प्रभूंनीं हास्यवदन करून सर्वांना अभय दिलें. यानंतर प्रभूंनीं पांडुरंगाचें दर्शन घेतलें. त्या वेळचा तो आनंद सोहळा काय वर्णावा ! प्रभूंनीं केलेल्या एका पदांत याचें वर्णन केलें आहे. "कडकडोनि माणिकदास विठ्ठलासि भेटले." ही भेट अपूर्व होती. दीर्घकाल चालली होती. या भेटींच्या योगानें सर्व वातावरण आनंदभरित झालें होतें.

प्रभूंचा मुक्काम प्रथम गोपाळपुऱ्यांत होता. तेथून प्रेमळ भक्तांच्या इच्छेप्रमाणें अनेक स्थानीं प्रभूंचें वास्तव्य झालें. दादा मनोहर बडव्यानें प्रभूंना आपल्या घरीं मोठ्या आग्रहानें नेलें. पंढरीस असतांना प्रभु पांडुरंगरूप बनले होते. या ठिकाणीं अनेक पदें, अष्टकें, आरति, शेजारती वगैरे करून प्रभूंनीं पांडुरंगाची महापूजा केली. या प्रसंगीं हजारों रुपयांचा खर्च झाला. प्रभूंचा लौकिक सर्व गावांत पसरून हजारों

लोक नित्य दर्शनास येऊं लागले. अशा रीतीनें कांहीं काल भजनानंदांत काढल्यावर प्रभूंची स्वारी पंढरपुराहून निघाली. सांप्रदायिक बुधवारच्या भजनांत मुख्य दैवत पांडुरंग असून प्रभूंच्या पदांचा, अष्टकाचा, आरतीचा वगैरे समावेश त्यांत केला आहे.

पंढरीहून प्रभूंची स्वारी पुणें रस्त्यानें गिरनार पर्वतावर गेली. पुण्यास जंगली महाराजांनीं प्रभूंना ठेवून घेतलें होतें. प्रभूंचा व जंगली महाराजांचा कित्येक दिवस एकांत चालला होता असें पुण्यास भांबुर्ड्यावर त्यांच्या मठांत असलेल्या एका वृद्ध मनुष्यानें सांगितलें आहे. प्रभूंची खूण म्हणून भांबुर्ड्यास एका लहानशा प्रवाहाला माणिक असें नांव असल्याचेंही त्यानें सांगितलें होतें. गिरनार पर्वतावर प्रभूंचें वास्तव्य बरेच दिवस होतें. गुरुवारचें भजन दत्ताचें आहे; त्याची योजना गिरनारच्या वास्तव्यांतील स्फूर्तिनेंच झाली आहे.

पुण्याहूनच बहुधा सर्व शिष्यांना परत पाठवून देऊन आपण फक्त सडया स्वारीनिशीं पुढील तीर्थाटनास गेले असें कांहीं लोक सांगतात. उत्तर दिशेकडील तीर्थयात्रा अत्यंत कष्टाच्या असल्यामुळें आपल्या समागमें पायीं चालण्यास कोणी निभणार नाहीं अशी प्रभूंची खातरी असल्यामुळें, त्यांना तसदी देऊं नये अशा हेतूनें प्रभूंनीं परत पाठविलें असावें. उत्तरेकडील बहुतेक सर्व तीर्थांना भेटी देऊन प्रभु परत दक्षिणेकडे वळले. प्रयाग, काशी, गया, हरिद्वार,

गंगोत्री, बदरीकेदार व बद्रीनारायण अशीं हीं प्रमुख तीर्थें होत. दक्षिणेकडील माहूर क्षेत्रासही प्रभु विसरले नाहींत. जगन्नाथपुरी झाल्यानंतर सर्व दक्षिण पथांतील तीर्थें झाल्यावर स्वारी व्यंकटगिरीवर आली. व्यंकटेशाजवळ प्रभूंचा मुक्काम कांहीं दिवस होता. त्या अवधींत व्यंकटेशावरील पदें, अष्टक, आरति वगैरे तयार होऊन त्यांचा समावेश शुक्रवारच्या भजनांत झाला. अशा प्रकारें सर्व तीर्थाटन संपल्यावर गाणगापुरास प्रभूंची स्वारी आली. कोल्हापुर, नृसिंहवाडी वगैरे ठिकाणींही प्रभु गेले होते असें कांहीं चरित्रकार लिहितात. दरम्यान मुधोळ संस्थानांतही प्रभूंनीं कांहीं दिवस वास्तव्य केलें असें एकजण म्हणतात. सारांश, प्रभूंच्या हातून महत्त्वाचें तीर्थ अथवा क्षेत्र चुकलें असें झालें नाहीं. शारीरिक कष्ट सहन करण्यांत प्रभूंची बरोबरी करणारा त्या वेळीं कोणीही नव्हता. गाणगापुरास असतांना लोकसमाज पुष्कळ जमूं लागला, असें पाहून ते परत कल्याणास येऊन दाखल झाले.

अकस्मात रीतीनें प्रभूंची स्वारी परत आल्याचें पाहून कल्याण गांव आनंदमय झालें. घरच्या मंडळीला आनंद झाला हें सांगणें नकोच. सर्व शिष्य मंडळी प्रभूंजवळ जमा झाली आणि पूर्ववत् सर्वत्र 'नित्य श्री नित्य मंगल' सुरू झालें. प्रभु तीर्थाटनास गेलेल्या अवधींत घरच्या मंडळींचा योगक्षेम उत्तम रीतीनें चालला होता. चिदंबरराव तालुकदाराच्या आग्रहावरून तात्यासाहेब हैद्राबादीं गेले होते. तेथें त्यांचा बहुमान होऊन

पुष्कळ द्रव्यप्राप्तिही झाली. प्रभुपरंपरेला अनुसरून तात्यासाहेबांनीं औदार्यपूर्ण वर्तन ठेविलें होतें. तात्यासाहेबांनीं फारसी विद्येचा अभ्यास उत्तम रीतीनें केला होता. संस्कृतचें अध्ययनही त्यांचें पूर्ण झालें होतें. वेदांतग्रंथाची आवड त्यांना फार होती. गुरुगीतेवर, ज्ञानशिखा नामें टीकात्मक ग्रंथ त्यांनीं लिहिला आहे. तो छापूनही निघाला आहे. शिवाय 'अनिर्वाच्य' नांवाचा एक लहानसा स्वतंत्र वेदांतपर ग्रंथ त्यांनीं लिहिला आहे. सांप्रदायिक भजनाची व्यवस्था पुढें यांनींच लावून दिली; त्यांत बऱ्याच ठिकाणीं, तात्यासाहेबांचींही पदें आहेत. एकंदरींत तात्यासाहेब आपल्या व्यवहारचातुर्यानें व विद्वत्तेनें लोकांना आदरणीय झाले होते. दादासाहेब मौनी, तपस्वी होते. त्यांनीं घरची व्यवस्था तात्यासाहेबांकडे सोंपविली होती. ते कसल्याही व्यावहारिक भानगडींत पडत नसत. शिष्य मंडळींना जे साधनमार्ग प्रभूंनीं लावून दिले होते, ते त्यांनीं आस्थापूर्वक संभाळून त्यांत बरीच प्रगति केली होती. व्यंकंमाचा समाधियोग पूर्णावस्थेस पोंचला होता.

आपल्या पाठीमागें सर्व व्यवस्था ठाकठीक असल्याचें पाहून प्रभूंना संतोष झाला. सर्व शिष्यवृंदाला कांहींतरी संप्रदायपद्धति लावून द्यावी असा प्रभूंचा विचार होता; त्याला मूर्तस्वरूप प्राप्त होण्याची अनुकूल वेळ कल्याणासच जमून आली. एके दिवशीं प्रभु पलंगावर स्वस्थ पडून आत्मानंदांत निमग्न झाले होते. या संधीस तात्यासाहेब यांना सहजस्फूर्ति होऊन हल्लीं

संस्थानांत प्रचलित असलेली ब्रीदावलि त्यांच्या अंतःकरणांत प्रविष्ट झाली. पुढें ही ब्रीदावलि त्यांनीं लिहून काढून प्रभुदर्शनार्थ आलेल्या सर्व शास्त्रीपंडितांना दाखविली. सर्वांना ती अत्यंत पसंत पडून सर्वांनीं एकमतानें ती प्रभूंना अर्पण केली. कल्याणास गादी स्थापन करण्यांत येऊन या ब्रीदावलीची गर्जना मोठ्या उल्हासानें झाली. कोणी असें म्हणतात कीं, तात्यासाहेब पाय चुरीत बसले असतां त्यांना देहाचें विस्मरण होऊन, चित्त प्रभूशीं तादात्म्य पावलें. अशा प्रसंगीं अनेक देवतांनीं प्रभूंकडे येऊन, ब्रीदावळींतील शब्दसमुच्चयानें प्रभूंचा जयजयकार केला! हे शब्द तात्यासाहेबांच्या अंतःकरणांत घोळूं लागले. स्मृतीवर येतांच त्यांनीं या ब्रीदावलीचा घोष केला. ही ब्रीदावलि पुढें माणिकनगरास गादीची स्थापना झाल्यावर सुरू करण्यांत आली असेंही कित्येक म्हणतात. असो.

कांहीं काल कल्याणच्या भक्तमंडळाच्या सहवासांत घालविल्यावर मणिचूल पर्वतावरील शेष राहिलेल्या स्थळांना भेट देण्याच्या हेतूनें शिष्यांसहवर्तमान प्रभु कल्याणाहून निघून गोट्टम्‌गोट्टीच्या भयंकर अरण्यांत प्राप्त झाले. करकनळ्ळीस बक्कप्रभूंची समाधि आहे, त्या स्थळीं प्रभु गेले. बक्कप्रभूंची महापूजा करून अष्टक व पद केलें. लोकसमुदाय समागमें फारच होता. या अरण्यांत सटके तयार झाले. लौकरच मोठें युद्ध होणार असून लोकांना उपद्रव होणार असल्याची वार्ता सर्वत्र पसरली होती. युद्धाचे परिणाम सर्वांना माहीत असल्यामुळें

मोठी चिंता उत्पन्न झाली. या युद्धाचा उपसर्ग आपल्यास पोंचणार नाहीं, असें प्रभूंनीं सांगितलें. तथापि भक्तलोकांस धीर यावा म्हणून सटके तयार करण्याची आज्ञा झाली. आज्ञेप्रमाणें हजारों सटके तयार झाले. प्रभूंच्या हातून हा सटका मिळाला म्हणजे सर्व आपत्ति व पीडा दूर होतात, असा भक्तांचा भरवंसा होता. हा सटका घेऊन देव्हाऱ्यांत पूजेस ठेविल्यानें सर्वारिष्ट निरसन होऊन, सौख्य लाभतें अशी श्रद्धा वाढून सटक्याची मागणी अनिवार होऊं लागली. भक्तांची दृढतर श्रद्धा आहे असें पाहूनच प्रभु सटक्याचा प्रसाद देत. वाटेल त्यास तो मिळत नसे. अशा तऱ्हेनें सामर्थ्य देऊन तयार केलेल्या सटक्यांपैकीं, शेंकडों सटके अद्याप संस्थानांत असून त्यांची पूजा होत असते. सटक्यांची एक स्वतंत्र खोली आहे. अशुद्ध व अस्वच्छ स्थितींत त्या खोलींत कोणासही जाऊं देत नाहींत. प्रभूंचा करस्पर्श या सटक्यांना झाला असल्यामुळें, त्यांत सर्व संकट दूर करण्याचें सामर्थ्य भरलें आहे, अशी भाविकांची भावना आहे.

करकनळ्ळीस कांहीं काल राहिल्यावर प्रभु रेकुळगीस आले. गोपाळबुवा ब्रह्मचारी या ठिकाणीं प्रभूजवळ आला. गोपाळबुवाचे वडील बक्कप्रभूचे भक्त होते. बक्कप्रभुजवळील दोन विश्वासू कुत्रे आपल्या पोटीं आले आहेत अशी त्यांची भावना होती. आणि प्रभूही बक्कप्रभूचाच अवतार होय असें ते म्हणत. प्रभूंची पूजा त्यांनीं बक्कप्रभु म्हणूनच केली

व प्रभूंच्या मागणीप्रमाणें गोपाळबुवास प्रभूला अर्पण केलें. गोपाळबुवा शरीरानें बळकट असून, तरुण होता. याचें आयुष्य ब्रह्मचर्यांतच गेलें. याच्या बंधूचा वंश सध्यां रेकुळगीस आहे. तोही प्रभुभक्तींत निरत आहे. यापुढील सर्व पर्यटनांत गोपाळबुवा प्रभुसमागमें सतत राहूं लागला. त्याच्या शक्तीच्या पुष्कळ गोष्टी सांगतात. एकदां एका प्रसंगीं प्रभूंना पाठीवर घेऊन तो चारपांच कोस चालून गेला असें कोणी सांगतात.



## केतका संगम : : ८

रेकुळगीहून प्रभूंची स्वारी केतकीसंगमास आली. हें एक प्राचीन क्षेत्र आहे. येथें शंकराचें लिंग आहे. शंकरास केवडा वाहणें निषिद्ध होय. परंतु येथें केवडा वाहूनच पूजा करावी लागते. केवडयानें वरप्रदान मिळवून या ठिकाणीं शंकराच्या पूजेंत स्थान मिळविलें असल्याची कथा आहे. प्रभु येथें आले तेव्हां एका अश्वत्थ वृक्षाखालीं एक लिंग व तीर्थ बुजून गेलें असल्याचें पाहून प्रभूंनीं तें लिंग व तीर्थ लोकांकरवीं खणून बाहेर काढलें. गाळांत फसून गेलेलें लिंग प्रभूस कसें समजलें याचें सर्वांना आश्चर्य वाटलें. प्रभु येथील शंकराच्या देवळांत पूजेस गेले असतां केवडयाची मागणी करूं लागले. ते दिवस केवडा मिळण्याचे नव्हते, म्हणून केवडा आतां कोठेंही मिळणें शक्य नाहीं असें लोकांनीं सांगितलें. केवडयाशिवाय पूजा सांग होणें शक्य नसल्यामुळें केवडयाचें एक पान तरी मिळावें म्हणून लोकांची धडपड चालली. पण केवडा कोठेंच सांपडेना. सर्वांना चिंता उत्पन्न झाली. इतक्यांत एक लिंगाईत मनुष्य डोकीवर कसला तरी भारा घेऊन येत आहे असें दिसलें. जवळ येतांच तो भारा केवडयाचा असल्याचें पाहून सर्वांना आनंद झाला. त्यानें प्रभूंपुढें सर्व केवडे ओतले. प्रभूंनीं त्यास मोठया सन्मानानें वस्त्रेंभूषणें देऊन तोषविलें व लिंगाईत निघून गेला. तो लिंगाईत कोण, कोठला, हें कोणासच

समजलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्याच्याशीं बोलून माहिती काढावी या हेतूनें त्याच्या मागें लागलेल्या मनुष्यास, तो एकाएकीं अदृश्य झाल्याचें पाहून फार आश्चर्य वाटलें!

प्रभूंनीं संगमास राहून देवालयाची व सर्व तीर्थांची व्यवस्था उत्तम प्रकारें करविली. संगममहात्म्य लोकांना कथन केलें व लुप्तप्राय झालेलीं आणखी कांहीं तीर्थें दाखवून दिलीं. प्रभुवास्तव्यामुळें या तीर्थास व क्षेत्रास नंदनवनाची शोभा प्राप्त झाली. नित्य नवा नवा लोकसमूह जमून, प्रभुनामाचा जयजयकार सर्वत्र दुमदुमूं लागला. टोळ यांनीं लिहिलेल्या पुस्तकांत पुढील कथा लिहिली आहे.

अशा प्रकारें केतकीसंगमीं प्रभूंची लीला चालू असतां काशीक्षेत्रीं कोणी एक ब्रह्मचारी आपल्या गुरूस झालेल्या कुष्टरोगाच्या परिहाराकरितां चिंताग्रस्त होत्साता,अनेक प्रकारचे उपाय करूं लागला. परंतु त्या योगें कांहीं गुण येईना. हें पाहून काळजींत असतां एके दिवशीं काशीविश्वनाथाचा दृष्टांत झाला कीं, "केतकीसंगमीं माझा अवतार माणिकप्रभुनामें आहे, तेथें जाऊन त्यांची सेवा करून प्रसाद घेतल्यास त्या रोगाचा परिहार होईल." विश्वेश्वर आज्ञेवरून तो ब्रह्मचारी संगमीं येऊन पोंचला. पण प्रभूंचें दर्शन घेतल्यावर त्याचा कांहीं भरंवसा बसेना. हा कोणी तरी वेडा आहे अशी त्याची समजूत झाली. कोणीं प्रभूंचें गुणवर्णन करूं लागला, कीं या ब्रह्मचाऱ्यास बरें न वाटून तो प्रभूंची निंदाही करूं लागला.

अशा रीतीनें त्याचे वीस दिवस निघून गेले. एके दिवशीं नित्याप्रमाणें तो ब्रह्मचारी देवाची पूजा करीत असतां, डोळे मिटून ईशचिंतन करूं लागला, तेव्हां त्यास शंकराचे जागीं प्रभूंची स्वारी दिसूं लागली. तथापि प्रभूंवर त्याचा भरंवसा बसेना. विश्वेश्वराचा दृष्टांतही त्याला खरा वाटेना. प्रभूंसारखा वेडा माणूस आपल्या गुरूच्या दुःखाचा परिहार कसचा करणार, असा विकल्प त्याच्या मनांत येऊं लागला. अशा संशयग्रस्त स्थितींत असतां संगमेश्वराचें स्वरूप भयंकर उग्र झालेलें त्याच्या दृष्टीस पडलें. "मूर्खा, अशा विकल्पानें तुझ्या गुरूची पीडा निवारण होणार नाहीं आणि शिवाय तूं उलट प्राणाला मात्र मुकशील" असा ध्वनि त्याच्या कानांवर आला. तेव्हां त्याची गाळण उडाली आणि तो रडूं लागला. ब्रह्मचाऱ्याच्या रडण्याचा आवाज ऐकून लोक धांवून देवालयांत गेले. यांत संगमेश्वरचा सांब सोमयाजीही होता. त्यांनीं रडण्याचें कारण विचारून घेतलें. त्यानें सांगितलेली हकीकत ऐकून घेऊन त्यांनीं त्याचें समाधान केलें कीं, झालें तें झालें; आतां तूं प्रभूंस शरण जा म्हणजे ते कृपाळु होऊन तुझें दुःख दूर करतील. हें ऐकून तो ब्रह्मचारी घडलेल्या अपराधाचा पश्चात्ताप करीत प्रभुदर्शनास निघाला. "आमच्यासारख्या उन्मत्त वेड्याच्या हातून काय व्हावयाचें आहे?" हा खुणेचा प्रश्न ऐकून ब्रह्मचारी ओशाळा होऊन अधिकच रडून क्षमा मागूं लागला. प्रभूंना

क्षमा न केल्यास आपण प्राणत्यागही करण्यास अनमान करणार नाहीं, असें त्याचें निर्वाणीचें वाक्य ऐकून प्रभु गहिंवरले आणि त्यांनीं त्याला पूर्ण क्षमा करून, तीर्थप्रसाद दिला. ज्या दिवशीं त्या ब्रह्मचाऱ्यावर अशी कृपा होऊन तीर्थप्रसाद मिळाला, त्याच दिवशीं तिकडे काशीक्षेत्रीं त्याच्या गुरूचा विकार नाहींसा होऊन तो व्याधींतून मुक्त झाल्याचें पत्र आलें. पुढें तो ब्रह्मचारी बरेच दिवस मोठ्या प्रेमभावें सेवा करून प्रभूंची आज्ञा घेऊन श्रीक्षेत्र काशी येथें निघून गेला.

प्रभूंची स्वारी संगमेश्वरीं असतां कोणी एक यवन जातीचा मिरजा हसनबेग नांवाचा गृहस्थ प्रभूंकडे आला. प्रभुदर्शन होतांच प्रभूंवर निष्ठा जडून तो भक्त बनला. त्यानें बहुमोल उंची वस्त्रप्रावरणें प्रभूंस देऊन प्रभूंची मोठ्या प्रेमानें पूजा केली. प्रभु त्याच्या शुद्ध भक्तीनें संतुष्ट झाले आणि त्याला तीर्थप्रसाद देऊन म्हणाले, "पुढें तुमचा अधिकार वाढून तुम्हांस सुख प्राप्त होईल." प्रभूंच्या आशीर्वादाप्रमाणें हसनबेगसाहेबास अधिकाराची बढती मिळून त्याचा उत्कर्ष झाला. या गृहस्थानें आमरण प्रभूंची सेवा केली. आपल्या प्राप्तींतील चतुर्थांश भाग तो दरसाल प्रभूकडे पोंचविण्यास कधींही विसरला नाहीं.

सांब सोमयाजी आदिकरून सर्व प्रेमी मंडळींनीं प्रार्थना केल्यावरून प्रभूंनीं या ठिकाणीं गादीची स्थापना केली. त्या दिवसापासून संगमेश्वरीं गादीची नित्य पूजाअर्चा होऊन

झोळी फिरूं लागली. तो क्रम आजपर्यंत यथाप्रकार चालू आहे. या ठिकाणीं न्यालकलचे अण्णाराव देशमुख प्रभुदर्शनास आले. त्यांनीं आपल्या समागमें म्याना, पालखी, घोडे, हत्ती वगैरे सरंजाम आणिला होता. हें पाहून प्रभु म्हणाले, "आम्हीं गोसावी, आम्हास असला थाट काय करावयाचा आहे?" पण अण्णाराव यांचा आग्रह फारच झाल्यावरून, प्रभु म्यानांत बसून निघाले. मोठ्या समारंभानें देशमुखानें प्रभूंस आपल्या गांवीं नेऊन तेथें त्यांची प्रेमानें पूजा केली. हें न्यालकलचें देशमुख-घराणें अद्यापपावेतों प्रभूंचें परम भक्त आहे.आपल्या ऐश्वर्ययुक्त परिवारासह चिरंजीवास घेऊन श्रीमती लक्ष्मीबाईसाहेब दरवर्षीं माणिक नगरास येऊन आपल्या पूर्वजांप्रमाणें प्रभुसेवा करीत असत. सध्यांही त्यांचे चिरंजीव दरसाल माणिकनगरास येऊन सेवा करीत आहेत.



# झरणीनृसिंह

: : ९

प्रभूंची स्वारी न्यालकल येथें असल्याचें वर्तमान बेदरच्या लोकांनां समजलें, तेव्हां तेथील हिंदुमुसलमान इत्यादि अनेक धर्मांच्या व पंथांच्या लोकांनां प्रभूंचें दर्शन घेण्याची उत्कंठा लागली. याकरितां सर्व प्रमुख गृहस्थांनीं एकविचारें प्रभूंना बेदरास घेऊन जाण्याचा बेत केला. प्रभूंच्या स्वागताची सर्वोत्कृष्ट तयारी करून त्यांनीं प्रभूंना मोठ्या समारंभानें घेऊन जाण्याच्या हेतूनें प्रमुख मंडळीस सर्व लवाजम्यासह न्यालकल येथें रवाना केलें. बेदरास बरेच श्रीमान गृहस्थ त्या वेळीं होते. देशमुख, सरदेशमुख, अनेक जहागीरदार, नवाब व पीरजादे इत्यादि सर्वांची इच्छा प्रभूंनीं आपल्या शहरांत पायधूळ झाडावी अशी होती. बेदर शहर इतिहासप्रसिद्ध आहे, हें आमच्या वाचकांना माहित आहेच. एके काळीं हें शहर एका प्रबल बादशाहीच्या राजधानीचें ठिकाण होतें. या शहरानें अनेक राजकीय घडामोडी अवलोकन केल्या आहेत. यांत धार्मिक उलाढालीही पुष्कळच होत्या. दत्तावतार श्रीपादश्रीवल्लभ स्वामींनीं रजकाला या ठिकाणचेंच राज्य दिलें होतें. स्वामीमहाराजांच्या कृपेनें रजकाचा यवन राजा झाला होता. या यवनराजास मागील जन्माचें स्मरण नरसिंह सरस्वतीस्वामीमहाराजांनीं करून दिलें होतें. यवन असतांही

त्यानें महाराजांची प्रेमभावें सेवा केली. महाराजांनीं त्याच्या भक्तीस संतोषून, त्याच्या राजवाड्यास पुनीत केलें. पूर्वीच्या कालीं यवनराजानें ज्या अपूर्व समारंभानें महाराजांचें स्वागत केलें, तशाच थाटानें आपणही प्रभूंस घेऊन जावें असा सर्व बेदरकर ग्रामस्थांनीं हेतु धरिला होता.

बेदरास प्राचीन कालीं 'विदुरनगरी' असें म्हणत असत. मणिचूल पर्वतावरील हें प्रख्यात शहर अनेक प्रकारें महत्त्वास चढलें होतें. बेदरचा किल्ला पाहण्यासारखा आहे. विजापूरच्या मुलुखमैदान तोफेची एक छोटीशी आवृत्ति या किल्ल्यांत अजूनही दृष्टीस पडते. हा किल्ला अजून लढला नाहीं, असें म्हणतात. प्रत्यक्ष लढाई करून तो घेतां येण्यासारखा नाहीं. तो अजिंक्य असल्यानें त्याचें अद्याप लग्न झालें नाहीं अशी सामान्य समजूत आहे. या किल्ल्याच्या मुख्य वेशींत पांडुरंगाचीं पावलें उमटलीं आहेत असें म्हणतात. मंगळवेढेकर दामाजीपंतावरील संकट निवारण्याकरितां पांडुरंगानें महाराच्या वेशानें राजवाड्यांत रसद भरली अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे. निजामच्या राज्यांत समावेश झाल्यावर बेदरला एका जिल्ह्याच्या ठाण्याचें स्वरूप मिळालें. पूर्वीचें सर्व वैभव नष्ट झाल्यामुळें या शहरास अवनत स्थिति प्राप्त झाली आहे. किल्ल्याप्रमाणेंच पूर्वीच्या सर्व जुन्या इमारती विषण्ण वदनानें खालीं मान घालून भूमातेस ठाव मागत आहेत, असा देखावा आज दृष्टीस पडत आहे. आम्ही लिहीत आहों त्या काळीं

बेदरची जनता आजच्यापेक्षां संपन्न असून धर्मपरायण होती. कांहीं थोडया व्यक्तींशिवाय करून प्रभूंवर सर्वांचीच निष्ठा होती. गांव तेथें महारवाडा असावयाचाच या न्यायानें, सज्जनांप्रमाणें दुर्जनही त्या ठिकाणीं होते. परंतु दुर्जनांच्या दुर्जनपणाला नामशेष करावयाचें प्रभूंचें कर्तव्य असल्यामुळें प्रभूंच्या मनांतही बेदरास जावयाचें होतें. अशांतच सन्मानपूर्वक घेऊन जाण्यास बेदरचे लोक आले आहेत हें पाहून, प्रभूंनीं त्यांच्या विनंतीस मान देऊन येण्याचें कबूल केलें.

न्यालकलचा मुक्काम सुटल्यानंतर मध्यंतरीं असलेल्या गांवीं लोकांच्या विनंतीस अनुसरून मुक्काम करीत करीत स्वारी बेदरकडे चालली. या वेळीं प्रभूंची स्वारी म्यान्यांतून चालली होती. म्यान्यासमागमें हत्ती, घोडेस्वार, शिपाई इत्यादि सर्व सरंजाम होता. वाटेंत प्रभुनामाचा जयघोष चालला होता. अशा थाटानें स्वारी बेदरपासून एकदोन मैलांवर आली; परंतु तेथून बेदरकडे सरळ न वळतां, भोई लोकांचे पाय त्यांच्या इच्छेविरुद्ध त्यांना दुसऱ्याच मार्गाकडे नेऊं लागले. बेदरच्या लोकांनीं पुन्हा प्रयत्न करून त्यांना बेदरच्या रस्त्यावर आणलें, तरी पुन्हा तोच प्रकार होऊं लागला. कांहीं तरी अदृश्य शक्ति म्यान्यास दुसऱ्या मार्गानें नेत असावी असें भोई लोकांना वाटलें. इतक्यांत रस्त्यावर एक मोठा भुजंग आडवा पसरलेला पाहून भोई लोक घाबरून गेले. त्यांचा पाय पुढें पडेना. शिष्यांपैकीं कांहीं लोक समागमें चालत होते,

त्यांनींही तो प्रचंड सर्प पाहिला. आणि प्रभूंना हें वृत्त कळविलें. प्रभूंनीं भुजंगाकडे पाहिलें, तेव्हां तो फणा पसरून अर्धा खडा उभा राहिला होता. प्रभूंच्या दृष्टीस दृष्टि मिळविल्यानंतर त्यानें फणा खालीं केली आणि पुढें चालूं लागला. प्रभूंनीं घाबरून गेलेल्या भोई लोकांना व शिष्यमंडळीस धीर देऊन सांगितलें कीं, "हा सर्प कोणासही उपद्रव देण्यास आला नाहीं. तुम्हीं त्याच्या वाटेस जाऊं नका; उलट तो जिकडे वाट दाखवील त्या मार्गानें म्याना घेऊन चला. बेदरास जाण्यापूर्वीं आपल्याकडे आम्हीं यावें, अशी विनंती करण्याकरितां कोणी एक सिद्ध पुरुष या सर्पाच्या वेषानें येथें आला आहे. त्याची इच्छा आहे तर, तो दाखवील त्या स्थलीं आपण जाऊं या."

प्रभूंचें हें बोलणें ऐकून लोकांस धीर येऊन, त्यांनीं त्या सर्पाच्या मागोमाग म्याना चालविला. प्रभूंची स्वारी सर्व लोकांसह झरणी नरसिंह या क्षेत्राजवळ येतांच तो सर्प गुप्त झाला. तेव्हां प्रभूंनीं झरणीवर मुक्काम करण्याचें निश्चित ठरविलें. झरणी नरसिंहाचें स्थान प्रेक्षणीय आहे. बेदरच्या आग्नेय दिशेस दोन तीन मैलावर हें क्षेत्र आहे. येथें नृसिंहाची मूर्ति आहे. ही मूर्ति एका अंधकारमय गुहेंत आहे. या गुहेचें तोंड सहा-सात फूट रुंद व आठ फूट उंचीचें असून, लांबीलाही सहज एक फर्लांग होईल. गुहेंतील मार्ग सरळ नसून नागमोडी आहे. आंत दिव्याशिवाय मुळींच जातां येत

नाहीं. : पुष्कळ ठिकाणीं वळणें घ्यावीं लागत असल्यामुळें वाटाड्याशिवाय आंत शिरण्याचें कोणास धैर्य होत नाहीं. गुहेच्या तोंडांतून स्वच्छ पाण्याचा प्रवाह बाहेर पडत असतो. कमरेइतकें पाणी सदा-सर्वकाळ या गुहेंत उभें असतें. देवाकडे कमरेइतक्या पाण्यांतूनच जावें लागतें. अंधारमय व वळणावळणाची वाट असून शिवाय पाण्यांतून एक फर्लांग चालून गेल्याशिवाय देवदर्शन होत नाहीं. देवापुढें जातांच घाटाप्रमाणें कांहीं पायऱ्या चढून वर कोरडी जागा लागते. डाव्या उजव्या बाजूस एक एक कमान असून तेथें बसावयास कोरडी जागा आहे. समोरच्या कमानींत नृसिंहाची उग्र मूर्ति आहे. नृसिंहापुढें नंदी आहे याचें नवल वाटतें. नवखा मनुष्य जातांना भयभीत होऊन जातो; पण आंत देवापुढें जाऊन पोंचल्यावर निर्भय होतो असा अनुभव आहे.

गुहेंतून जो जलप्रवाह निघतो त्याचा उगम नृसिंहाचे चरणापासून आहे असें म्हणतात. हें स्थान जागृत असून येथें कसलेंही अनुष्ठान लवकर सफल होत असतें, अशी भावना आहे. या जागृत स्थानाचें महत्त्व जाणूनच अवरंगझेब बादशहानें हें उध्वस्त केलें नाहीं किंवा त्याला तसें करतां आलें नाहीं. आपण या ठिकाणीं आल्याची खूण म्हणून येथें जवळच वरील बाजूस त्यानें एक मशीद मात्र बांधिली आहे. गुहेच्या बाहेरच्या बाजूस बरींच देवालयें आहेत. नाना प्रकारच्या वृक्षवेलींनीं या जागेला विलक्षण शोभा आली

असून जलसंचयही चोंहोंकडे विपुल आहे. तपश्चर्येस अत्यंत अनुकूल असें हें स्थान पाहून कोणाच्याही मनास प्रसन्नता येते. याच पवित्र क्षेत्रांत प्रभूंच्या पूर्वजांपैकीं केशव नाईक यांनीं अनुष्ठान करून श्रींचा प्रसाद मिळविला होता. नृसिंहाच्या प्रसादानें पुत्रलाभ झाला म्हणूनच त्याचें नांव नृसिंह असें ठेविलें होतें हें यापूर्वीं कथन केलेंच आहे. आपल्या पूर्वजांनीं ज्या ठिकाणीं अनुष्ठान केलें, त्या ठिकाणीं आपण जावें हाही प्रभूंचा येथें येण्याचा एक उद्देश असावा.

बेदरजवळ येऊन प्रभु एकाएकीं झरणीनृसिंहाकडे वळले हें वर्तमान सर्व बेदर शहरांत तात्काळ पसरलें. प्रेमी लोकांनीं आपापलीं घरें सजवून व गुढ्या उभारून प्रभूंच्या स्वागताची तयारी केली होती. परंतु प्रभु बेदारास न येतां परस्पर झरणीस गेल्याचें ऐकून त्यांची निराशा झाली. पण झरणी काय किंवा बेदर काय दोन्ही एकच अशा विचारानें, प्रभुदर्शनार्थ सर्वजण झरणीसच आले. प्रभु एका झाडाखालीं उघड्या हवेंत बसले होते, म्हणून लोकांनीं आपापल्या वस्त्रांनीं त्या जागेवर आच्छादन केलें. लोकसमूह हजारांनीं मोजण्याइतका थोडक्याच अवधींत जमा झाला. प्रभूंच्या समोर असंख्य लोकांचा जमाव उभा असून दर्शनासाठीं तोबा झडूं लागला. प्रभूंच्या गळ्यांत हजारों हार पडून पुढें पेढे, खारका, नारळ, सुपाऱ्या यांचा ढीग चढूं लागला. आपल्या दर्शनानें व मधुर वाणींनें सर्वांना संतुष्ट करून प्रभूंनीं स्नान करून नरसिंहाचें

यथासांग पूजन केलें. पूजनानंतर आरत्या वगैरे झाल्यावर सर्वांस भोजनाचा प्रसाद मिळाला. हें लहानसें निसर्गसुंदर क्षेत्र पूर्वी निर्जन होतें; पण प्रभु आल्यापासून तें माणसांनीं फुलून गेलें. एखाद्या राजाच्या तळाप्रमाणें हें शोभायमान होऊन आनंदाचें रमणीय स्थान बनलें. राजकीय दरबाराचें स्वरूप प्राप्त होऊन या ठिकाणीं कथा, कीर्तन, भजन, शास्त्रचर्चा, वेदपठण आणि नृत्यगायन इत्यादिकांचे रंग उडूं लागले !

यापूर्वींच्या मानानें झरणींस प्रभूंच्या समागमें लोकसमूह अतोनात जमा होऊन ‘ नित्य श्री नित्य मंगला’चें स्वरूप व क्षेत्र विशाल बनलें. आसपासच्या गांवांतील आबालवृद्ध प्रभूंच्या दर्शनास नित्यश: येऊं लागले. बेदरचे लोक तर सदैव झरणीसच राहूं लागले. अशा रीतीनें नित्य प्रभूंचें दर्शन घडत असतांही लोकांची इच्छा एका बाबतींत अतृप्त राहिली. आपल्या घरास प्रभूंचे पाय लागावेत अशी सर्व बेदरवासी जनांना तीव्र उत्कंठा होती. त्याप्रमाणें प्रभूंनीं आपल्या घरीं येऊन पायधूळ झाडावी म्हणून सर्वजण प्रभूंना विनवूं लागले. प्रभूंनीं त्यांचें प्रेमळ मनोगत जाणलें आणि “जो कोणी आपल्या घरीं चला म्हणून म्हणेल त्याच्या घरीं मी उद्यां दोनप्रहरीं येऊन पूजा घेईन” असें सांगितलें. एवढें आश्वासन मिळाल्यावर काय विचारतां ! प्रत्येकजण अहमहमिकेनें पुढें येऊन आपल्या घरीं येण्याविषयीं हात जोडून विनंती करूं

लागला. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र इत्यादि सर्व जातीच्या हिंदु लोकांनीं, तसेंच कांहीं मुसलमान भाविक भक्तांनीं एकाच वेळीं प्रार्थना केली. या वेळीं प्रभु आत्मानंदांत राहून हर्षभरानें डुलत होते. सर्वांचें आमंत्रण स्वीकारून बरोबर वेळेवर येण्याचें प्रभूंनीं सर्वांना अभिवचन दिलें. आमंत्रण दिलेल्या प्रत्येक मनुष्यानें आपल्या घरीं दुसरे दिवशीं कडेकोट तयारी केली आणि सर्वजण प्रभूंच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत बसले.

इकडे झरणीस प्रभूंच्या शिष्यमंडळांत एकच धांदल सुरू झाली. प्रभूंनीं बेदर येथील लोकांना आश्वासन दिल्याप्रमाणें प्रभूंच्या स्वारीच्या तयारींत सर्वजण होते. भोईलोक म्याना वाहून नेण्यास सिद्ध झाले. चिमणाजी ब्रह्मचारी व गोपाळबुवा इतर लोकांना बरोबर निघण्यास तयार राहा असें सांगूं लागले. बेदरला आज जावयाचें आहे हें सर्वांना समजलेंच होतें. त्याप्रमाणें सकाळपासून सर्वच आपापले नित्यविधि उरकून तयार होऊन बसले होते. मध्यान्ह काळ समीप येऊं लागला, तसतसे लोक निघण्याची घाई करूं लागले. सर्व शिष्यगण, भोई व इतर लोक सिद्ध झाले. पण प्रभु काय करीत होते ? सर्व मंडळींची गडबड उडून गेली होती; पण प्रभु आपल्या शय्येवर गाढ निद्रेंत घोरत पडले होते ! त्यांना उठवावें कोणीं ? प्रभूंच्या निद्रेचा भंग करण्यास कोण समर्थ आहे ? जसजसा मध्यान्ह काळ समीप आला, तसतसे हे निकटवर्ति शिष्य अधिकच चिंतातुर

झाले. वचनाप्रमाणें प्रभु बेदरास गेले नाहींत, तर लोकापवाद येऊन प्रभूंच्या कीर्तीस काळिमा लागणार आहे, अशी भीति त्यांना वाटूं लागून ते अधिकच काळजींत पडले. व्यंकमा प्रभूंच्या निद्रास्थानापासून मर्यादित अंतरावर जप करीत स्वस्थ बसली होती. तिच्या मनाची धांदल मुळींच झाली नव्हती. ती अगदीं शांतपणें प्रभूंकडे अवलोकन करीत जपांत मग्न झाली होती. दोनप्रहर झाले ! प्रभु गाढ निद्रिस्त ! आजच भलत्या वेळीं प्रभू कां निद्रामग्न झाले हें कोणासच कळेना ! प्रभूंच्या निद्रेचा एक एक क्षण युगाप्रमाणें त्यांच्या प्रेमळ शिष्यांना भासूं लागला ! पण करतात काय ?

इकडे बेदरास दोनप्रहरीं प्रत्येक घरीं अपूर्व उत्सव चालला होता. प्रभूंची स्वारी प्रत्येक घरीं बरोबर मध्यान्ह समयीं दत्त म्हणून उभी राहिली. प्रभुसमागमें नित्याचे एकदोन शिष्यही होते. कोठें पूजा चालली आहे, कोठें आरति होत आहे, कोठें फुलांच्या माळा प्रभूंच्या गळ्यांत घालीत आहेत, कोठें प्रभु पेढा खात आहेत, कोठें फळें चाखीत आहेत, कोठें भोजन चाललें आहे, कोठें तांबूलभक्षण करीत आहेत; कोठें प्रभुपुढें गायन चाललें आहे, कोठें नाच होत आहे, कोठें आनंदानें भजनाचा थाट चालला आहे, कोठें शास्त्रचर्चा चालू आहे, कोठें वेदपाठ सुरू आहे, अशा प्रकारचा आनंदोत्सव बेदरच्या लोकांच्या घरीं चालला होता ! सर्व बेदर शहर प्रभूंच्या आगमनानें हर्षित झालें होतें. अशा प्रकारें

आमंत्रण दिलेल्या प्रत्येक घरीं बरोबर वेळेवर येऊन त्यांनीं यथाशक्ति अर्पिलेला उपचार प्रभु ग्रहण करीत होते. प्रत्येकाच्या घरीं अशी धांदल चालली असल्यामुळें जो तो आपापल्या आनंदांत निमग्न होता. शेवटीं प्रभूंनीं सर्वांना प्रसाद देऊन आपला रस्ता सुधारला.

इकडे झरणीस प्रभु गाढ निद्रेंतून एकाएकीं जागे झाले. त्या वेळीं त्यांच्या अंगास दरदरून घाम सुटला होता व अत्यंत श्रम झाल्याप्रमाणें त्यांचा जोरानें श्वास चालला होता. एकाएकीं असें कां झालें, हें कोणास कळणार ? शिष्यांनीं गडबडीनें घाम पुसून काढल्यावर कांहीं वेळानें व्यंकम्मानें विनयपूर्वक हात जोडून विचारलें,"महाराज, आपली अवस्था अशी कशानें झाली ?" पण प्रभूंनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं.

पुढें बेदर येथील लोकांची परस्पर भेट झाल्यानंतर प्रभु आपल्या घरीं आल्याचें रसाळ वृत्त एकमेकांस कथन करूं लागले. प्रत्येकजण म्हणे बरोबर दोनप्रहरीं प्रभु आपल्या घरीं होते. यांतील खरा कोण याचा निर्णय कसा व्हावा ? एकच व्यक्ति एकाच वेळीं सर्वांच्या घरीं असणें शक्य नसल्यामुळें, सर्वजण बुचकळयांत पडले व प्रभूंकडे गेल्याशिवाय याचा निर्णय होणार नाहीं; सबब सर्व आबालवृद्ध प्रभूंकडे जावयास निघाले. सर्वजण झरणीस येऊन पाहतात तों, प्रभु पलंगावर स्वस्थ पहुडले आहेत ! लोकांनीं सकल शिष्यजनांस प्रभूंनीं

एकसमयावच्छेदेंकरून सर्वांस दर्शन देऊन पूजा घेतली आणि प्रसाद दिला असें सांगितलें, तेव्हां शिष्यांस विस्मय वाटून प्रभूंच्या एकाएकीं आलेल्या घामाचा व श्रमाचा उलगडा झाला. हा अद्भुत चमत्कार पाहून सर्व बेदर शहर थक्क झालें ! या प्रकरणावर श्रीमार्तंड माणिक प्रभुकृत एक पद आहे. तें या ठिकाणीं दिल्यास वाचकांस या कथेंतील खरी गोडी चाखावयास मिळेल असा आम्हांस भरंवसा आहे.

पद

योगशक्तिचा वर्णिन महिमा, वंदुनि गुरु माणिका,
झाला विश्वरूप आयका ॥ धृ० ॥

विदुरग्रामीं सकल जातिंनीं प्रार्थियलें प्रभुवरा ॥
यावें श्रीप्रभु आमुचे घरा ॥

ब्राह्मण हो अतिशूद्र स्त्रिया बहु वाइट अथवा बरा ॥
परंतु सेवक जन हा खरा ॥

सकल मतासी स्थापक तूं जरि, शमवी आमुच्या भुका ॥
घ्यावें अद्भुत या लौकिका ॥ १ ॥

ऐकुनि श्रीप्रभु हास्य वदन करि, बोले मधुर ध्वनी ॥
न व्हावें निष्ठुर आपुल्या मनीं ॥

एका कालिंच सदनीं तुमच्या शिष्यांसह येउन ॥
द्याल तें घेइन प्रिय मानुनी ॥
ऐकूनि सर्व, गेले निज घरा ॥
पाहती त्या कौतुका ॥ २ ॥

योगशक्तिनें तो प्रभु आपणाचि, अनेक स्वरुपां धरी ॥
प्रगटला सर्वांच्या मंदिरीं ॥
कोठें वस्त्र धन पुष्पचि घेतो, कोठें भोजन करी ॥
परि तो एकचि सर्वां घरीं ॥
अद्भुत लीला श्रीप्रभुची ही न वर्णवे ब्रह्मांदिकां ॥ २ ॥
अन्य गृहाप्रति अन्यें येऊनि श्रीप्रभुसी पाहिलें ॥
पाहतां स्वगृहीं ही देखिलें ॥
विदुरग्रामीं विश्वरूपधृतश्रीप्रभु अवलोकिले ॥
ऐका अद्भुत हें वर्तलें ॥
ज्ञानरूप मार्तांड गुरु हा खेळ दाविला निका ॥ ४ ॥



## बेदरचे यवन :: १०

प्रभूंची अद्भुत लीला पाहून बेदरच्या रहिवासी जनांची प्रभूंवरील श्रद्धा दृढावत चालली. ज्या श्रद्धावान मुसलमान लोकांनीं प्रभूंच्या अलौकिक सामर्थ्याचा अनुभव घेतला होता, ते प्रभुभक्तींत रत होऊन, नित्य प्रभुदर्शनास्तव शरणीस येऊं लागले. यांत त्या जातींतील उच्च लोकांचा भरणा अधिक होता. सामान्य वर्गांतील कांहीं मुसलमान लोकांस प्रभूंचा हा वाढता उत्कर्ष सहन झाला नाहीं. आपल्या धर्माचे लोक प्रभूंस इतके पूज्य मानतात हें पाहून ते प्रभूंचा कशा तरी रीतीनें पाडाव करावा म्हणून उपाय योजूं लागले. प्रभूंचें सामर्थ्य त्यांना ऐकून माहीत होतें. परंतु यापेक्षांही कांहीं अधिक करामत प्रभूंच्या अंगीं आहे कीं काय याचाही ठाव त्यांना घ्यावयाचा होता. कांहीं तरी 'करिष्मात' दाखविल्याशिवाय मुसलमान लोक साधूस मानीत नाहींत. तशी एखादी करिष्मात प्रभु दाखवितील तर ठीकच, नाहींपक्षीं प्रभूंच्या अंगीं खरें सामर्थ्य नसून, ते इतर सामान्य कोटींतील फकीराप्रमाणेंच एक हिंदु फकीर आहेत, असा पुकारा तरी करतां येईल, व पुढें सहजच प्रभूंच्या वाढत्या लौकिकास आळा घालतां येईल, असा विचार करून ते प्रभूंपुढें आले. अंतरंगांत कांहीं कपटयोजना ठरवून,

दांभिकपणानें प्रभूंपुढें हात जोडून विनवूं लागले कीं, प्रभूंनीं इतर लोकांस पावन केलें तसें आम्हांलाही पावन करावें. उदईक आमच्या घरीं प्रभूंनीं सर्व शिष्यवर्गासह येऊन, आमची पूजा घ्यावी. प्रभूंनीं त्यांच्या मनांतील आशय जाणिला होता;' तथापि मोठ्या आनंदानें म्हणाले, "मी तुमच्या समाजांत अथवा घरीं तुम्ही सांगाल तेथें येईन व तुम्ही जी सेवा कराल ती मान्य करून, द्याल त्या वस्तूचा स्वीकार करीन." प्रभूंचें असें वचन मिळाल्यावर ते आपल्या ठिकाणीं येऊन, प्रभूंच्या सत्काराची तयारी करूं लागले. दुसऱ्या दिवशीं ठरल्या वेळीं आपल्या शिष्य-जनांसह प्रभूंची स्वारी योजिलेल्या ठिकाणीं येऊन दाखल झाली. या यवन लोकांनीं वरपांगीं प्रभूंचें उत्तम स्वागत केलें आणि मोठ्या सन्मानानें त्यांना उंच सिंहासनावर नेऊन बसविलें. या वेळीं गांवचा बहुतेक यवनसमाज जमला होता. सर्वांनीं प्रभूंच्या गळ्यांत हार घालून, हातांत गजरे देऊन, पागोट्यांत तुरे खोंविले. यवनी चालीप्रमाणें सन्मानांत कोठेंही न्यून दिसूं दिलें नाहीं. शेवटीं निरनिराळ्या तबकांत, निरनिराळे खाण्याचे पदार्थ घालून, तीं तबकें झांकून प्रभूपुढें आणून ठेविलीं. यांतील कांहीं तबकांत मांसाचे शिजविलेले पदार्थ मुद्दाम प्रभूंच्या हातीं खावयास देण्याकरितां ठेविले होते. प्रभूंना हिंदु व मुसलमान दोघेही सारखेच. हिंदूंच्या हातचें खाण्यास प्रभु अनमान करीत नाहींत, तसेंच आपल्याही हातचें प्रभूंनीं

खावें, असा त्यांचा पेंच होता. प्रभूंनीं हे मांसाचे पदार्थ खाल्ले, तर अनायासेंच आपलें कार्य साधलें. प्रभूंची जात बाटली जाऊन ते आपल्यांत येऊन मिसळतील, नाहीं खाल्लें तर, त्यांच्या ठिकाणीं आपपरभाव आहे हें दिसून येऊन, आपल्या लोकांची श्रद्धा अनायासें उडून जाईल. या दुहेरी हेतूनें त्यांनीं असा डाव योजिला होता. यवन लोकांत सर्वच कांहीं अशा मनोवृत्तीचे नव्हते. त्यांतील कांहींना या लोकांचें हें कृत्य आवडलें नाहीं. पण त्यांचा इलाज चालण्यासारखा नव्हता म्हणून ते स्वस्थ बसले.

प्रभूंनीं यवनांचें कपट पूर्णपणें ओळखिलें होतें. अनेकपरीच्या पदार्थांचीं ताटें येतांच प्रभूंनीं हास्यवदन करून, आपल्या शिष्यांपैकीं चिमणाजीस सर्व तबकांवरील झांकणे दूर करण्यास आज्ञा दिली. सर्व शिष्यवर्ग या वेळीं भयभीत झाला होता. त्यांना या यवनी कपटाची गुणगुण लागली होती. प्रसंग मोठा आणीबाणीचा होता. पण करतात काय? चिमणाजीनें भीत भीत एकएका तबकावरील झांकण काढण्यास सुरवात केली. पण आश्चर्याची गोष्ट कीं, त्यांतील एकाही तबकांत मासांचे पदार्थ आढळून आले नाहींत! फुलें, खारका, पेढे इत्यादि पदार्थच सर्वांत भरलेले पाहून, सर्व शिष्यगण व सज्जन मुसलमान यांना परम हर्ष झाला. प्रभूंनीं तो प्रसाद सर्वांना वांटण्याची आज्ञा दिली व आपण मौज पाहत आनंदानें डुलूं लागले! कपटी यवनांचीं तोंडें सुकून गेलीं. प्रभूंच्या

अंगांत दैवी सामर्थ्य आहे अशी त्यांची खातरी झाली व ते सर्वजण प्रभूंस अनन्यभावें शरण गेले. प्रभूंनीं दयाळूपणानें त्यांना क्षमा करून देवाचें सत्त्व अशा रीतीनें पाहूं नये असा मधुर शब्दांनीं उपदेश केला.

प्रभूंचें तें दैवी सामर्थ्य व मनाचा मोठेपणा पाहून सर्व मुसलमान लोकांनीं प्रभूंवर तात्काळ पुष्पवृष्टि केली व 'पीरान्पीर दस्तगीर' अशा शब्दांनीं प्रभूंचा गौरव करून जयजयकार केला, आणि त्यांची म्यान्यांतून मोठ्या समारंभानें मिरवणूक काढिली. हे सर्व लोक प्रभूंचे प्रेमी भक्त बनले. बेदर येथील प्रभूंची गादी अगदीं मुसलमानी मोहल्यांत आहे, याचें कारण प्रभूंवरील त्या लोकांचें प्रेम हेंच होय. पुढें प्रभूंचा मुक्काम बेदर येथें बराच काळपर्यंत राहून सर्वत्र आनंदीआनंद झाला.

रामचंद्रबोवा सोलापुरकर बेदर येथील घडलेल्या चमत्काराचें वर्णन कांहीं वेगळ्या प्रकारें करतात. तथापि मुख्य कथेमध्यें त्यांचा मत भेद दिसत नाहीं. हा चमत्कार झाल्यानंतरची स्थिति ते पुढीलप्रमाणें लिहितात: "प्रभूंचें हें सामर्थ्य पाहून सर्व लहानथोर अगदीं चकित होऊन गेले व हा लौकिक सर्व मोंगलाई प्रांतांत हैद्राबादपर्यंत होऊन, त्या दिवसापासून सर्व मुसल्मान लोकही प्रभूंस अत्यंत मान देऊं लागले व प्रभूंच्या भजनीं लागले. उपरांत दोन महिनेपर्यंत प्रभु बेदरांत राहिले. नित्य नवी यात्रा, नवा समारंभ,

ब्राह्मणभोजनें, नाच, गाणीं, कथा, कीर्तनें, पुराणें, सप्ताह, अनुष्ठानें, भजनें, आरत्या वगैरे समारंभ रोज चालून, लाखों रुपये प्रभूंस लोकांनीं अर्पण केले व प्रभूंनीं तितकेही तेथेंच दानधर्म करून उडवून टाकले. प्रभूंस रोजरोज शेंकडों लोकांच्या निरनिराळ्या मागण्या असत. आणि प्रभूंनींही सर्वांना जें जें मागतील तें तें देऊन सर्वांचे मनोरथ पूर्ण करावे. कोणी काशीपासून रामेश्वरापर्यंत वाटखर्ची मागावी, कोणी लग्नाकरितां पांचशें रुपये द्या म्हणून धरणें धरून बसावें, कोणी मला हजार रुपये ब्रह्मस्व ( कर्ज ) झालें आहे त्यांतून मुक्त करा म्हणून प्रभूंपुढें खळ धरून बसावें, कोणी मुलगा झाला पाहिजे असें संकट घालून प्रभूंची सेवा करीत राहावें. याप्रमाणें कोणी कांहीं, कोणी कांहीं, अशा मागण्या मागून प्रभूंना त्रास देत असावें. याशिवाय हरिदास, पुराणिक, वैदिक, याज्ञिक, शास्त्री, पंडित, गाणारणी वेश्या, भाट, काशीकापडी, मोठमोठे लिंगाईत जंगम आणि यवन जातींतील मोठमोठे पीरजादे, फकीर इत्यादि लोकांच्या संभावना सहस्रावधि रुपयांच्या, नित्य प्रभूंकडून होत असावयाच्या. याप्रमाणें प्रभूंचा खर्च आणि सर्व डामडौली इतमाम, अठरा कारखाने प्रभूंबरोबर असावयाचे. शेंपन्नास अरब, रोहिले, शिपाई, स्वार, हत्ती, घोडे, पालख्या, म्याने, शेंकडों शास्त्री, वैदिकादिकरून विद्वान् ब्राह्मण, तसेंच आंधळे, पांगळे, गोसावी, बैरागी, आदिकरून लोक, इतका खटला प्रभूंबरोबर असावयाचा. यांखेरीज

सहस्रावधि यात्राही बरोबर असावयाची ती निराळीच. असा प्रभूंचा थाट नेहमीं असे. जेथें उतारा होऊन तळ पडेल, तेथें तंबू, डेरे, राहुटया, इत्यादि राजकीय व्यवस्था होऊन, बाजार, बर्फीपेढयांचीं दुकानें बरोबर चालावयाचीं असा समारंभ नेहमींचा असे. आणि कधीं तर यांपैकीं कांहीं एक थाट नसून, केवळ एखादद्दुसऱ्या माणसासहित, एका लंगोटीनिशीं जंगल जंगल फिरत असत. कल्याण, भालकीचें अरण्य, चाळकापुर, मैलार इत्यादि ठिकाणापेक्षांही प्रभूंचीं बेदर मुक्कामीं अलौकिक कृत्यें विशेष होऊन, कीर्तिही फारच झाली. याप्रमाणें दोन महिने आनंदोत्सव झाल्यावर, प्रभूंनीं तेथून निघण्याची तयारी केली. बेदरांत नबाबाच्या व देशमुखाच्या आग्रहावरून, गादी स्थापन करून तेथील व्यवस्था चालण्यास एका ब्रह्मचाऱ्याची तेथें स्थापना केली. देशमुखास व नबाबास एक एक सटका प्रसाद दिला आणि सर्वांना संतुष्ट करून तेथून निघाले. "

प्रभु बेदराहून निघाले, ते रस्त्यांतील प्रमुख गांवीं भक्तांच्या इच्छेप्रमाणें मुक्काम करीत करीत, राजुरी, भालकी, मंगलगी या वाटेनें कल्याणास यावयास निघाले. आपल्यापुढें आपला सर्व खटला, सटक्यांच्या गाडया, आणि व्यंकंमासह सर्व शिष्यमंडळी यांना रवाना करून आपण सडी स्वारी म्यानांत बसून निघाली. फक्त म्याना वाहणारे भोई व प्रभु असे येतांयेतां हुमणाबादनजीकच्या दोन ओढयांच्या संगमाजवळ

आले आणि गडवंतीच्या वाटेस लागले. या ठिकाणीं त्या वेळीं फार दाट झाडी होती. त्यांत कांहीं बोरीप्रमाणें कांटेरी झाडांचीं जाळीं बनलीं होतीं. अशा एका जाळीला प्रभूंचा म्याना लागून अडकून पडला. भोई लोकांना पुढें म्याना घेऊन जातांच येईना, म्हणून त्यांनीं तेथेंच म्याना थांबविला आणि प्रभूंना खालीं उतरवून आपण म्याना सोडविण्याच्या गडबडींत गुंतून गेले. प्रभु म्यान्यांतून खालीं उतरले आणि एकटेच जवळील सर्वेश्वराच्या देवळापासून कांहीं अंतरावर असलेल्या एका कट्ट्यावर बसले. या कट्ट्यास लागून दोन वेलाचीं झाडें होतीं. त्या झाडांच्या सावलींत कट्ट्यार आसन घालून प्रभूंची स्वारी विराजमान झाली. प्रभु येथेंच कां आले व पुढें काय काय वर्तमान घडलें हा कथाभाग अत्यंत रमणीय व विस्तृत असल्यामुळें उत्तरार्धांत स्वतंत्रपणें आम्हीं तो देत आहों.



॥ श्रीसद्‌गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥




# माणिकनगर

कल्याणच्या पूर्वेस पांच कोसांवर हुमनाबाद या नांवानें प्रसिद्ध असलेलें एक गांव आहे. या गांवाच्या पश्चिमेस एक मैलावर दोन लहान नद्यांच्या संगमाजवळ 'माणिकनगर' या गांवाची स्थापना झाली. या गांवाच्या स्थापनेचा काळ नक्की सांगतां येणें कठीण आहे. तथापि शके १७६७ अथवा सन १८४५ इसवी या वर्षीं प्रभूंची स्वारी येथें येऊन कायमची राहिली असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. यांपूर्वीं दोनतीन वेळां प्रभु या ठिकाणीं आले होते. दोनतीन वेळच्या सूक्ष्म निरीक्षणानें कायम वसतिस्थान करण्यास हेंच स्थळ योग्य आहे असें पाहून प्रभूंनीं येथेंच वास्तव्य केलें. हें माणिकनगर. भोंवतालच्या तीन गांवांच्या मध्यें वसलेलें आहे. तीन्ही गांवांच्या सीमा ज्या ठिकाणीं मिळाल्या आहेत, तेथेंच प्रभुमहाराजांची समाधि आहे. तीन्ही गांवांनीं आपापल्या हद्दींतील थोडथोडया जमिनी दिल्यामुळें हें स्वतंत्र गांव बनलें आहे. पूर्वेस हुमनाबाद, पश्चिमेस

गडवंती, दक्षिणेस नदी व उत्तरेस धुमणसूर अशी या गांवची चतु:सीमा आहे. हीं तीन्ही गांवें वेगवेगळ्या मालकांच्या जहागिरीपैकीं असल्यामुळें हे सर्व, माणिकनगर आपल्याच हद्दींत आहे असें म्हणतात. परंतु या गांवचा हुमनाबाद गांवाशीं व्यवहारत: निकट संबंध आहे. दुकानें, बाजार, पोस्ट ऑफिसें, वाहतुकीचीं साधनें वगैरे अनेक बाबींमुळें हुमनाबाद निकटवर्ति झालें आहे.

हुमनाबाद हें गांव इतिहासप्रसिद्ध आहे. एके काळीं हें 'जयसिंगनगर' म्हणून प्रसिद्ध होतें. धनाजी जाधवाचा मुलगा चंद्रसेन जाधव यानें हें जयसिंगनगर वसविलें. इसवीसनाच्या अठराव्या शतकाच्या प्रारंभीं म्हणजे सन १७२५ च्या सुमारास या जयसिंगनगरची स्थापना झाली आहे. धनाजी जाधव, महाराष्ट्राच्या इतिहासांत शिवाजी महाराजांचा एक मोठा सेनापति म्हणून प्रसिद्ध आहे. अवरंगजेब बादशहास शेवटपर्यंत भंडावून सोडणाऱ्या मराठा सेनापतींमध्यें धनाजी अग्रणि होता. धनाजी हा घोडेस्वारांचा सेनापति असून प्रचंड योद्धा होता. शिवाजीनंतर शाहूमहाराज मोंगलांच्या कैदेंतून सुटून परत येईतोंपर्यंत, मराठ्यांचें नांव राखणाऱ्या अग्रणींपैकीं हा एक होता. राजाराममहाराज जिंजीवर असतां त्यानें मोंगल सरदार इस्मायल मक्काचा पराभव करून धूळधाण उडविली, म्हणून राजाराममहाराजांनीं त्यास 'जयसिंगराव' ही पदवी दिली होती (१६९०). या

जयसिंगरावाचें स्मारक म्हणून त्याचा मुलगा चंद्रसेन यानें जयसिंगनगर वसविलें. चंद्रसेनही धनाजीप्रमाणें प्रसिद्ध योद्धा होता. धनाजीनंतर शाहूमहाराजांनीं त्यास सेनापति नेमिलें होतें; पण ताराबाईकडे त्याचा ओढा असल्याचें पाहून शाहूची त्याजवर इतराजी झाली. धनाजीच्या आश्रयास असलेल्या बाळाजी विश्वनाथावर शाहूमहाराजांची कृपा झाली. चंद्रसेनास बाळाजी विश्वनाथ व त्याचा मुलगा बाजीराव यांचा हेवा वाटूं लागला. १७१३ मध्यें मोंगलाईंतून चौथाई व सरदेशमुखी आणि घासदाणा हे हक्क वसूल करण्याकरितां चंद्रसेनाची योजना झाली. त्याच्याबरोबर बाळाजी विश्वनाथही होता. चंद्रसेनाचा बाळाजीसंबंधानें द्वेषाग्नि भडकला. क्षुल्लक कारणावरून तंटा उपस्थित झाला. शाहूच्या आज्ञेवरून बाळाजी पांडव गडांत गेला होता. त्यास चंद्रसेनानें वेढा दिला. शाहूमहाराजांचा उपमर्द केला म्हणून त्यानें हैबतराव निंबाळकराकडून चंद्रसेनाचा पराभव केला. यानंतर उघडपणें शाहूस सोडून तो कोल्हापुराकडे मिळाला. त्यानंतर पुढें थोडक्याच दिवसांत कोल्हापूर सोडून, स्वतंत्र नशीब काढण्याकरितां आलेल्या निजामउलमुल्काचा तो सहकारी झाला. तिकडून त्यास इ. स. १७२० मध्यें भालकीची जहागिर मिळाली. चंद्रसेनाजवळ बारा हजार स्वार होते. तो बापाप्रमाणें शूर व धाडसी होता. निजामाच्या मराठेशाहीविरुद्ध झालेल्या अनेक लढायांत तोच प्रमुख होता. १७५१ मध्यें

चंद्रसेन वारल्यानंतर त्याचा मुलगा राजा रामचंद्र हा सेनापति झाला.

हल्लींचें हुमनाबाद व भोंवतालचा वराच भाग यांवर चंद्रसेनानंतर राजा रामचंद्राची सत्ता होती. इकडील भागांत राजा रामचंद्र याचें नांव प्रसिद्ध आहे. हुमनाबाद ऊर्फ जयसिंगनगर येथें राजा रामचंद्राचा राजवाडा होता. गांवासभोंवार तटबंदी असून चारी दिशांस मोठमोठ्या वेशी होत्या, त्या अद्याप दिसत आहेत. जयसिंगनगर हें पुढें व्यापाराचें केंद्र बनलें. गांव वसविण्याकरितां सर्व प्रकारची मदत चंद्रसेन जाधव यानें करून चारी मुलखांतले प्रसिद्ध व्यापारी आणवून शहराची भरभराट केली. गांवांतील सर्व रहिवाश्यांनीं चंद्रसेनास दिलेलें राजीनामापत्र आम्हीं पाहिलें आहे. तें पाहिल्यास पूर्वींच्या काळीं राज्यकर्ते प्रजेच्या स्वास्थ्याकरितां किती परिश्रम करीत होते हें दिसून येणार आहे. आमच्या वाचकांकरितां व इतिहासप्रेमी लोकांकरितां तें आम्ही खालीं देत आहों.

श्री

राजीनामा बेसमी श्रीमंत राजे चंद्रसेन जाधवराव प्रगणे भालकी यांसी. समस्त दैव मौजे हुमनाबाद लिहून दिले राजीनामा ऐसाजे. तुम्ही आम्हांस मौजे मजकूरचे रानांत येथें येऊन उभें राहून ' जागा चांगली आहे, आमचे चित्तांत आहे जे पेठ .वसवून आबादी करावी. आम्ही सात वर्षांचा कौल सरकारांतून देतो. जयसिंग जाधवराव यांचे नांवीं पेठ आबाद करावी. म्हणोन आमचे चित्तांत आहे.

यांस येथें आड विहिरी खटलिया पाणी विशेष निघेल व ओढा जवळ आहे. पाणी जितें बरें पाणी याचा आहे व झाड लांकूड फाटे वगैरे सर्वही अनुकूल आहे ऐसें जाणून तुम्ही अवघे दैवास पेठेस येऊन आबाद होणें म्हणून सर्व प्रकारें आमचा सांभाळ केला जाईल. तुम्ही अवघे दैव मिळून कौल मागाल तसे कौल शिरस्तेप्रमाणें देऊं. म्हणून तुम्हीं सांगितला. तरी तुमचे वचनावरून आम्हीं समस्त देशोदेशींचे दैवास बोलावून आणून आपले जागा पेठ आबाद करावयाचा विचार मनास आणून १।२ हे जागा लांकूडफाटे गवत वगैरे अनुकूल ऐसें पाहून पेठ आबाद करावयाचा इत्यर्थ केला जाईल. तो तुम्ही थोर वतनदार आहां. दुसरे मौजे हुमनाबादचे मुकादम आहां. ऐसे सर्व गोष्टीस विश्वास जाणून आम्ही सर्व दैव मिळून पेठ आबाद करावयास सात साल कौल हाकीमास सांगून देवविला. तुमचे हाकीमाचे कौलावरून पेठची वस्तीसाठीं देशो देशींचे दैवास आणून पेठ आबाद केले व कित्येक लोक गरीब लोकांस दुकान व घर बांधावयास अनुकूल नव्हता यासाठीं तुम्हांपासून नगद रुपये घेऊन घर दुकान बांधविलें. आमच्या रक्षणासाठीं सर्व प्रकार सांभाळ करावयासाठीं प्यादे वगैरे शिबंदी वगैरे ठेविले. पेठे भोंताल आपले पदरचे रुपये बेमोबलग रुपये खर्च करून खंदक व गांवकोस ( गांवकुसव ) व पेठ पन्हा हद्दकुंज व दरवाजा आमचे रक्षणासाठीं बांधविले व आम्हीं सर्व दैव मिळून उदीम व्यवसाय करून बहुत खुशाल होऊन समाधान पावलों. कोन्हे ( कोणे ) गोष्टीचा आम्हांस आजार तोसीस लागूं दिल्हे नाहीं. वेळेस चोरांनीं आमचें वस्त घेऊन २।३ गेले ते तहकिकात करून आम्हांस रुपये दिले. ऐसें असतां सात सालचा कौल पुरल्यावर आम्हीं समस्त दैव मिळून तजवीज केलेजे. आमचे वचनाप्रमाणें कौल निभावले. तुम्हीं आम्हांसाठीं बेमबलग रुपये खर्च करून आम्हांस सर्व प्रकारें सांभाळ केला. आम्हीं पेठेमध्यें उदीम करून बहुत समाधान पावलों. ऐसेयास हाकिमाशिवाय तुम्हास हक्क लवाजिमा खुष रजावंदीने मान करून दिले.—

## तपशील जैल.

त ॥

हक्क रुसूम सेठ महाजन पेठ जयसिंगनगर परगणे भालकी सन ११४२

| | |
|---|---|
| गोणी दर आमद बरामद | कबाड दरामद बरामद |
| भुस नगारचे | ।१ दर वझेस रुक्के |
| ८४ दर गोणीस रुक्के | -।४ तुप दर वझेस रुक्के |
| | -।- तेल दर वझेस रुक्के |
| | -।- कापड गूळ व भूस वगैरे " |

चंद्रसेन जाधवानें नवीन पेठ वसविण्यास कशा प्रकारें मदत केली होती, हें वरील उतऱ्यावरून स्पष्ट दिसत आहे. त्यानें केलेल्या सहाय्यास फूल नाहीं फुलाची पाकळी देऊन पेठकरी लोकांनीं उतराई होण्याकरितां हें हक्कपत्र त्यास राजीखुषीनें दिलें आहे. हुमनाबाद येथील लिंगायतांच्या हिरेमठांत हा कागद आम्हांस पाहावयास मिळाला. पेठ वसविण्यास प्रारंभ करतांना या हिरेमठास प्रथस जागा देऊन, नंतर इतर लोकांस जागा आंखून दिली असें म्हणतात. वरील हक्कपत्रक मोडी लिपींत असून, क्वचित् काना, मात्रा व विरामचिन्हें यांशिवाय आम्हीं मूळ भाषेंत कांहीं फेरफार केलेला नाहीं.

राजा रामचंद्र याची जन्मपत्रिका हुमनाबाद येथील एका ब्राह्मणाच्या घरीं आहे. पूर्वीच्या चिवट कागदाची ही एक प्रचंड गुंडाळी झाली आहे. हिची लांबी कमींत कमी एक

फर्लांग होईल. यावर संपूर्ण गणित असून सर्व ग्रहांचीं सुबक पक्क्या रंगाचीं चित्रें ठिकठिकाणीं दिलीं आहेत. ऐतिहासिक संग्रहांत ठेवण्यास योग्य अशी ही पत्रिका आहे. या पत्रिकेवरून राजा रामचंद्र याचा जन्म "**शके १६५४ परिधावी नाम संवत्सरे, भाद्रपद मासे, शुक्लपक्षे, द्वादश्यां तिथौ इंदुवासरे**" झाला असल्याचें उघड होत आहे. या पत्रिकेंत चंद्रसेन जाधवास लाविलेली विशेषणमालिका विस्तीर्ण आहे. सर्व विशेषणांच्या शेवटीं "**महाप्रभोश्चंद्रसेनस्य भार्या उभयकुलानंददायिनी, पतिप्राणप्रिया, सौभाग्यवती, सुरूपा, पतिव्रता, लक्ष्मीबाईनाम्नी पुत्ररत्नमजीजनत्**" असें आहे. ही पत्रिका पाहून पूर्वीचे लोक पत्रिकेवर अत्यंत परिश्रम करीत होते हें स्पष्ट दिसतें. या पत्रिकेवरून राजा रामचंद्राचा जन्म हुमनाबाद ऊर्फ जयसिंगनगर येथील राजवाडयांत झाला असावा, असें वाटतें. या वेळीं जयसिंगनगरची वसाहत पूर्ण झाली असावी, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. इकडील प्रदेशांतील कित्येक दानपत्रांवर व सनदांवर राजा रामचंद्राचा शिक्का दृष्टीस पडतो. त्यानें आपल्यामागें महाराजा ही पदवी लावून घेतली होती. आज हैद्राबाद संस्थानमधील जे मोठमोठे अमीरउमराव आहेत,त्यांमध्यें याचा दर्जा बराच वरिष्ठ प्रतीचा असावा असें दिसतें. याच्याकडे पूर्वी असलेल्या मुलुखास 'पायगा' असें म्हणत असत व हेंच नांव आजही रूढ आहे. चंद्रसेन १७५१ मध्यें वारल्यावर हा सेनापति झाला.

पुढें इ. स. १७६१ सालीं तो परत मराठ्यांकडे गेल्यावर रघुनाथराव पेशव्यानें त्यास गुजरातची सुभेदारी दिली व सेनापति केलें. पण दाभाड्याचा सर्व मुलुख त्यास पाहिजे होता तो मिळाला नाहीं म्हणून तिकडून निघून पुन्हा निजामअलीखांकडे परत आला. यापुढील कालांत त्यानें बऱ्याच लढयांत भाग घेतला होता. पेशवे व निजाम या दोघांनाही त्याची जरूरी होती. वऱ्हाडच्या स्वारींत तो निजामाकडून गेला होता. पुढें तो ठार झाल्यावर त्याच्या दत्तक पुत्राकडे मालकीची जहागिर कांहीं वर्षें चालली. श्रीपतराव जाधव १७९१ मध्यें टिपू सुलतानाशीं झालेल्या लढाईंत कामास आला. पण नंतर त्याची जहागिरी खालसा होऊन ती मुसलमान सरदार 'शमसुल उमरा' हल्लींच्या पायगाच्या नबाबांचा मूळ पुरुष यास देण्यांत आली.

इतिहासावरून हुमनाबाद ऊर्फ जयसिंगनगर हें इ. स. १७९१ पर्यंत मराठ्यांच्या कबजांत होतें हें सिद्ध होत आहे. आज रोजीं हुमनाबादेस राजा रामचंद्राचा राजवाडा, जीर्ण स्थितींत उभा आहे. तेथें आतां सरकारी कचेरी झाली आहे. पूर्वींच्या राजधानीचीं सर्व चिन्हें हल्लीं स्पष्ट दिसत आहेत. मराठ्यांच्या अमदानींत हें गांव अत्यंत भरभराटीस चढलें होतें. तेथील व्यापारी अत्यंत श्रीमान् होते. हिंदुस्थानांतील सर्व मुलखांतला माल येथें ठोक खरेदीनें आणीत असत. त्या वेळीं व्यापाऱ्याजवळ शेंकडों बैलांचे तांडे असत.

त्यावरून सतत मालाची आवकजावक चालत असे. सर्व प्रकारचा किराणा माल येथें भरपूर असें. येथूनच हैद्राबादेकडे हा माल रवाना होत असे. महाराष्ट्रांतील पुणें, सोलापूर या शहरांवरून हैद्राबादेस जाणारा मोठा रस्ता हुमनाबादेवरून जात आहे. त्या वेळीं हा रस्ता रहदारीचा असे. प्रत्येक व्यापाऱ्याजवळ फक्त एकच जिन्नस भरपूर सांठविलेला असे; व तो जिन्नस मूळ उत्पत्ति–ठिकाणांतून आणविला जात असे. प्रचंड व्यापार चालला असल्यामुळें, हुमनाबाद हें साहजिकच लक्ष्मीचें माहेरघर बनलें होतें.

यासंबंधीं अद्यापपावेतों सर्वतोमुखीं असलेली येथील एक आख्यायिका पुढें देत आहों. येथें बोप्पणवाले व कोणेवाले या नांवाचे दोन मोठे व्यापारी होते. त्यांच्याजवळ अगणित संपत्ति होती. भाजी खरेदी करण्याकरितां त्यांच्या घरच्या दासी बाजारांत जात असत. एके दिवशीं दोन्ही व्यापाऱ्यांच्या दासी एकाच वेळीं भाजी-बाजारांत गेल्या.इतर भाज्या पुष्कळ होत्या; पण सर्व बाजारांत एकच भोपळा राहिला होता. तो आपण घ्यावा अशी त्या दोघींनाही इच्छा होऊन त्याच्या किंमतीबद्दल चढाओढ सुरू झाली. आणा-दोन आण्यांपासून हा भोपळा चढत चढत सातशें रुपयांपर्यंत चढला. शेवटीं बोप्पणवाल्याच्या दासीनें तो घेतला. गांवांत ह्या चढाओढीची बातमी लागून, मौज पाहण्यास सर्व गांव जमा झालें. कोणेवाल्याची दासी हरली! बोप्पणवाल्याच्या दासीनें

भोंपळा जिंकला ! मालकास ही बातमी समजली तेव्हां त्यानें आपल्या दासीनें विजय मिळविला म्हणून तिला भोंपळ्यासह वाजतगाजत घरीं आणलें. कोणेवाल्यानें आपल्या दासीला कामावरून कमी केलें. अशा प्रकारच्या गोष्टी अलोट संपत्ति पदरीं असल्याशिवाय घडत नाहींत. सांप्रत अमेरिकेसारख्या संपन्न राष्ट्रांत अशा गोष्टी कधींकधीं घडत असतात.

असो; प्रभुमहाराज येथें आले, त्या वेळीं हुमनाबाद हें शमसुल उमराच्या ताब्यांत होतें. व्यापार भरभराटीचा चालला होता.त्या वेळीं येथें विशेषेंकरून अफूचा व्यापार फार जोरांत होता. भोंवतालच्या जमिनींत अफूचें पीक उत्कृष्ट होत होतें. प्रभूंच्या समाधीपर्यंत या गांवाची चलती बरी होती. पुढें गुलबुर्ग्यास रेल्वे झाली व अफूही बंद पडली, त्यामुळें हें गांव मोडकळीस आलें. येथील व्यापारी दुसरीकडे निघून गेले. व्यापार बसून गेला. पूर्वींच्या उत्तम इमारती आजही कोठें कोठें दिसतात. मोठमोठ्या श्रीमंतांचीं घरें पडक्या स्थितींत कां हांईना, पण अजून उभीं असलेलीं दिसत आहेत. कोणेवाल्यांच्या दरवाजाची चौकट पाहण्यासारखी आहे. हल्लींच्या काळीं हजार रुपयांतही अशी चौकट होणार नाहीं. या मानानेंच सर्व घर आहे. काम मजबूत व फारच उत्तम. यांतील संपत्ति मात्र कोठें गेली तें माहीत नाहीं. बहुतेक सर्व घरें आम्हीं एके काळीं श्रीमंत होतों असेंच सांगत आहेत. येथील वीरभद्राचें देवालयही प्रेक्षणीय आहे. तें एका

हलवायानें बांधलें म्हणतात. देवालयानजीकची भव्य व बांधींव विहीर पाहून तर 'अबब!' असे उद्गार साहजिकच बाहेर पडतात.

प्रभुमहाराज हुमनाबादनजीकच्या संगमावर येऊन राहिले, त्या वेळीं सर्वत्र बेबंदशाही माजली होती.राज्यव्यवस्थेंत कायदा म्हणजे काय हें माहीत नव्हतें. मोंगलाईचें स्वरूप पूर्णपणें पहावयास मिळे. त्यांतून हें तर मोंगलाईमधील एका पोट-जहागिरदाराचें स्थान! मग काय,व्यवस्थेच्या नांवानें पूज्यच! त्या वेळीं खरा नबाब म्हणजे 'तालुकदार' हा अंमलदारच असे. ठरीव वसूल नबाबसाहेबांकडे पोंचवून दिल्यानंतर इतर सर्व बाबतींत तालुकदारच खरा राज्यकर्ता होता. तालुकदार हा सांप्रत जिल्ह्याचा अधिकारी असतो, तसाच तो पूर्वीही होता. पण पूर्वीं त्याची सत्ता अनिर्बंध चाले. वसुलाशिवाय इतर बाबतींत तो कोणालाही जबाबदार नसे. प्रजेस वाटेल त्या रीतीनें पिळून लवकर वसूल करील तो हुषार अधिकारी मानला जात असे. त्या वेळचे बडे बडे जहागिरदार, नबाब, राजेरजवाडे इत्यादि सर्व कर्जबाजारी असत. आपल्या जहागिरीपैकीं गांवें अथवा तालुके कर्जाच्या फेडीला लावून देत असत. त्यामुळें तालुकदाराच्यावरचे खरें मालक ते सावकारच होत. चोऱ्या, दरवडे, खून इत्यादि गुन्ह्यांची चौकशी करण्यास कोर्टें स्थापिली गेली नव्हतीं. दिवसाढवळ्या खून करणाऱ्यासही योग्य शासन होत नसे. 'बळी तो कान-

पिळी ' अशा प्रकारची स्थिति सर्वत्र नांदत होती. ज्याचा तो आत्मसंरक्षण करण्यास समर्थ असल्याशिवाय त्याचा निभाव लागत नसे. बहुतेक सर्व सावकार, श्रीमंत व व्यापारी लोकांजवळ भाडोत्री शिपाई अरब, रोहिले,शीख इत्यादि ठेवावे लागतच. या भाडोत्री शिपायांपैकीं कांहीं असंतुष्ट होऊन बेकार बनले कीं, त्यांनीं टोळी करून चोऱ्या दरवडे व लूट करावयास सुरवात करावयाची, असाच प्रकार फार असे. त्या वेळीं हे लोक सशस्त्र फिरत असत, त्यांना विचारणारा कोणी नसे. राजसत्तेचा धाक नसल्यामुळें ते सदैव निर्भय असत.

हल्लींच्या काळीं ही स्थिति राहिली नाहीं. दिवसेंदिवस राज्यकर्ते व जनता यांचा ब्रिटिश राज्यव्यवस्थेशीं संबंध येत असल्यामुळें, मोंगलाईचें पूर्वीचें स्वरूप पार पालटून गेलें आहे. हें स्वरूप पालटण्यास प्रभूंच्या समाधीनंतर सुरवात होऊन आजतागायत बरीच प्रगति झाली आहे. माणिकप्रभु नांवाचा योगी होऊन गेल्यानंतर दहा वर्षांनीं मोगलाईचें स्वरूप पालटून जाणार असल्याचें भविष्य कर्नाटकांतील प्रसिद्ध सत्पुरुष **सर्वज्ञ** यानें वर्तविलें होतें, तें खरें ठरलें आहे. सर्वज्ञाच्या सर्व म्हणी अथवा वाक्यें कानडी भाषेंत आहेत. इकडील प्रांतांतील कानडी बोलणारांच्या तोंडून खालील सर्वज्ञाचें वाक्य आम्हीं असंख्य वेळां ऐकिलें आहे. तें असें आहे:— “ **बसवन हळद म्याल कुसरागि पट्टण हुट्टी,**

माणिक्य प्रभु योगी आगी देह इद्दु दश वर्षक्के मोगलाई कणिकाण सर्वज्ञा " याचा शब्दशः अर्थ असा आहे:— " बसवाच्या ओढयावर नवीन नगर होऊन तेथें माणिकप्रभु नांवाचा योगी होऊन जाईल. त्याच्या समाधीनंतर दहा वर्षांनीं मोगलाई राज्याला वेगळें वळण लागेल. " अडीचशें अथवा त्यापेक्षांही अधिक वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या सर्वज्ञाला माणिकप्रभूच्या अवतारासंबंधीं दिव्य ज्ञान झालें याचें नवल वाटतें. 'बसवप्ण हळ्ळा' म्हटलें आहे तेंही खरें आहे. माणिकनगरानजीकच्या दोन नद्यांपैकीं एक बसवतीर्थापासून उगम पावून येथें येते. दुसरी राजेश्वरावरून येते. या दोन्ही नद्या लहानच आहेत; पण पावसाळा नेहमींप्रमाणें झाल्यास त्यांचा प्रवाह सतत वाहत असतो. 'गुरुगंगा' व 'विरजा' अशीं या दोन नद्यांचीं नांवें आहेत.

प्रभूंनीं आपल्या नांवाचें गांव वसविण्यास हेंच स्थान कां पसंत केलें, हें समजणें कठीण आहे. अनेक चरित्रकारांनीं अनेक प्रकारचीं कारणें दिलीं आहेत. त्यांतील खरें कोणतें व खोटें कोणतें हें आज ठरविणें दुरापास्त आहे. प्रभुमहाराज येथें बऱ्याच वेळां आले असल्याचें सर्वांना माहित आहे. त्यांपैकीं कोणत्या वेळीं कोणती हकीकत घडली हें मात्र सांगतां येत नाहीं. रामचंद्रबोवा नाशीककर यांनीं कथन केलेल्या व त्यांनीं स्वतः रचिलेल्या ओंवीबद्ध चरित्रावरून एका अनाथ

कुटुंबाच्या रक्षणार्थ प्रभु येथें आले होते असें दिसतें. ती कथा त्यांच्याच शब्दांत आम्ही देत आहों.

" कोणी एक गृहस्थ बायकामुलें बरोबर घेऊन दहा-पांच कुटुंबांच्या माणसांसहित हुमनाबादेजवळ गडवंती गांव ओलांडून हुमनाबाद व गडवंतीच्या मधल्या अरण्यांत येऊन पोंचला. तेथून हुमनाबाद सुमारें मैलभर असून तेथें एक जुनाट शिवालय होतें व एक कुंड होतें. भोंवतालीं अरण्य व दाट झाडी असून वाटसरू लोकांस लुटून घेण्याची व ठार मारण्याची ही जागा होती. शिवालयांत जिकडे तिकडे हाडें पडलेलीं असून पूजाअर्चा मुळींच होत नसे. नेहमीं चोरटे अरब व रोहिले लोक तेथें टपत राहून वाटसरूंचें वित्त व जीवन हरण करीत असत. याप्रकारें हें ठिकाण असून, बिचारा वर सांगितलेला कुटुंबवत्सल गृहस्थ माणसांसहित येथें येऊन दाखल झाला. आणि दोनप्रहर होऊन गेले होते म्हणून स्वयंपाकास सर्वांसह तेथें उतरला. कोणीं कुंडावर स्नानें करूं लागले, कोणी साहित्य काढूं लागले; ही मंडळी प्रभूंच्या दर्शनाकरितां कल्याणास जाणार होती. इतक्यांत चोरट्यांनीं येऊन त्यांच्यावर हल्ला केला. चोरटे पांचपन्नास असून हत्यारबंद अरब व रोहिले जातीचे होते. त्यांनीं त्या गरीब लोकांचा सर्व वित्तविषय लुटून घेऊन शेवटीं त्यांचे प्राण घेण्यासही ते तयार झाले. सर्व बायकामुलें एकमेकांच्या गळ्यांत पडून रडूं लागलीं. एकच गोंधळ व

हलकल्लोळ होऊन गेला! चोरट्यांनीं मारण्यास आरंभ केला, तेव्हां सर्व मंडळींनीं प्रभूंचा धांवा करण्यास आरंभ केला. आतां या अरण्यांत प्रभूवांचून आमचें रक्षण करण्यास कोण समर्थ आहे, असें म्हणून सर्वजण प्रभूंचा धांवा करून मोठ्यानें रडूं लागले. तेव्हां संकटसमय जाणून प्रभु आपल्या त्या भक्तांकरितां एकाएकीं तेथें प्रकट झाले. प्रभूंचें स्वरूप या वेळीं फार मजेदार होतें. तें असें कीं, डोकीस भरजरी मंदिलाची हैद्राबादी कळी ( पागोटें ), अंगांत भरजरी शाल-नाम्याचा झुबा, कंबरेस भरजरी हिरवा शेला, गळ्यांत हिऱ्यांच्या व मोत्यांच्या कंठ्या, कानांत चौकडा, हातांत पोची, दुसऱ्या हातांत गुडाखु पिण्याचा नैचा, पाठीशीं ढाल, कमरेस तमंच्या व बिचवा, गळ्यांत भरजरी किनखापी पट्टयांत अडकविलेली सुरेख तरवार, कपाळीं भव्य सुंदर केशरी गंध आणि मध्यें कस्तुरीतिलक, असें रूप धारण करून प्रभु एकाएकीं तेथें शिवालयांत चौथऱ्यावर प्रकट होऊन नैचा पीत बसले! त्यांना पाहतांच चोरांनीं विचार केला कीं, या गरीबांस मारण्याच्या खटपटींत पडून वेळ मोडावा, त्यापेक्षां त्या श्रीमंत गृहस्थास मारून मोठी लूट मिळवावी हें चांगलें. असें म्हणून सर्वजण प्रभूंचे अंगावर धांवले. आणि हात वर करून शस्त्रें मारूं लागले. तेव्हां ज्यांनीं ज्यांनीं मारण्यास हात वर केले होते, त्यांचे त्यांचे हात वरतीच राहिले! खालीं येईचनात. कित्येक मागें होते ते धांवून पुढें येऊं लागले,

तों त्यांचे पायच गळाले ! ! कोणी वर डोकीं केलीं होतीं, त्यांचीं डोकीं खालींच येईनात; आणि सर्वांचा मुख्य जमादार होता, त्याच्या पोटांत मोठा शूळ उठला ! मग सर्व चोरटे गयावया करूं लागून तोबा तोबा व जमादार हाय हाय करून गडबडां लोळूं लागले. इतक्यांत प्रभूनें भयंकर रूप धारण करून एकमेकांच्या दाढीमिशा उपटण्यास आरंभ केला. तेव्हां सर्व दीन होऊन पटपटां पायां पडूं लागले. मग जमादार बोलूं लागला कीं, "एक वेळ महाराजांनीं आम्हांस क्षमा करावी. पुन्हा आम्हीं या अरण्यांत कधीं वाटसरांना लुटणार नाहीं. आतां आम्हांस जीवदान द्यावें. याप्रमाणें स्थिति झाल्यावर प्रभूंना दया आली. आणि त्यांनीं पूर्वींप्रमाणें सौम्य रूप धारण केलें व नैचा पीत बसले. तें रूप पाहून त्यांतील एकानें हे प्रभु आहेत असें ओळखलें आणि सर्वांना सांगितलें कीं, हे कल्याणकर प्रभु आहेत. इतक्यांत त्या प्रवाशांनींही प्रभूंना ओळखलें आणि ते सर्वजण येऊन पायांवर लोळूं लागले. मग जमादार बोलला कीं, आजपासून आम्ही प्रभूंची कधीं बेअदबी करणार नाहीं. प्रभूंची तल्लाक ( द्वाही ) आजपासून आम्हीं व आमच्या पिशाबीचे (वंशाचे) सर्वजण फिरवूं. प्रभूंच्या नांवास आमचे लोक मान देत जातील. मात्र आतां एक वेळ प्रभूंनीं आमचा गुन्हा माफ करावा. आणि आमच्यावर दया करावी.

मग सर्वांचे हातपाय नीट झाले आणि जमादाराचा पोटशूळही राहिला. तेव्हां प्रभूंस वंदन करून ते लोक

आपल्या ठिकाणीं आनंद मानूं लागले.प्रभूंनीं त्या दिवसापासून आपलें नेहमीं राहण्याचें ठिकाण तेथेंच करून पुढें समाधिकाळपर्यंत भक्तजनांचा उद्धार करीत राहिले. ज्या ठिकाणीं पूर्वीं वाटसरूंच्या रक्ताचे सडे पडत असत,त्या ठिकाणीं भक्तांकरवीं नित्य हजारों लोकांच्या पंक्ति उठून तुपाचे पाट वाहूं लागले. ज्या मुशाफर ब्राह्मणाच्या संकटनिवारणार्थ प्रभु या जागीं प्रकट झाले, त्या कुटुंबवत्सल ब्राह्मणास प्रभूंनीं, अक्षयीचें दारिद्र्यांतून मुक्त केलें व आनंदित करून त्यास आपल्या घरीं पाठवून दिलें. ”

दुसरे एक चरित्रकार कांहीं वेगळीच हकीकत देतात, तीही जशीच्या तशीच आम्हीं देत आहों. “ पुढें कांहीं कालानंतर झरणीनृसिंह, बिदर–कोठी वगैरे स्थलें पावन करून प्रभूंची स्वारी भालकी ग्रामाहून परत कल्याणास जावें या हेतूनें समागमें असलेल्या सामानासह सर्व शिष्य मंडळीस रवाना करून आपण भागाहून कल्याणीस सडया स्वारीनिशीं जावें या हेतूनें फक्त मेणा वाहणाऱ्या भोयांसह मेण्यांत बसून स्वारी चालली असतां गुंडफत्तर व दाट झाडीचा तो आडमार्ग, त्यांतून ते भोईलोक मोठ्या कष्टानें मार्ग काढीत काढीत चालले, तों अकस्मात् प्रभूंचा मेणा एका मोठ्या बोरीचे झाडांत अडकला. परतून मागें जावें तों मार्ग नाहीं, पुढें जाण्यास मोठा दगड आडवा आलेला, तो चढून जातां येईना. अशी स्थिति पाहून भोईलोक विनंती करूं लागले कीं,

महाराज, या मोठ्या बोरीच्या झाडामुळें मेणा पुढें किंवा मागें जाण्यास मार्ग दिसत नाहीं. त्यावर आज्ञा झाली कीं, 'बरं तर आतां आपण इथेंच राहूं.' असें म्हणून स्वारी मेण्याबाहेर आली. तों नथ्थडशावली मुळासंगप्पा व मुलगी मारप्पा हे त्रिवर्ग योगी येऊन सांगूं लागले कीं, 'महाराज, हें आपलें राहण्याचें स्थळ आहे. आपल्यास यापुढें आतां येथें राहिलें पाहिजे.' असें म्हणून दोन बेलाचीं झाडें होतीं त्या ठिकाणीं प्रभूंना त्यांनीं राहण्याची जागा दाखविली. त्याप्रमाणें प्रभूंची स्वारी स्थित झाली असतां एकाएकीं त्या दोन बिल्ववृक्षांना आग लागून ते धडाधड जळूं लागले. दोनचार दिवसांनंतर पुन्हा त्या वृक्षास पालवी फुटूं लागली. त्या वेळीं या स्थळीं सर्वेश्वर नांवें महादेवाची स्थापना केली. हल्लीं त्या महादेवाचें स्थळ पाहण्यांत येतें."

अशा प्रकारें दोन चरित्रकार प्रभूंच्या या स्थळीं येण्याचे प्रसंग भिन्न असल्याचें सांगतात; परंतु दोघांच्याही मतें प्रभु या ठिकाणीं कायमचे येण्यापूर्वीं दोन-तीन वेळां आले असल्याचें उघड होत आहे. यावरून आम्हांस असें वाटतें कीं, दोघांनीं वर्णिलेले प्रसंग सत्यास धरूनच आहेत. किंबहुना या दोन्ही प्रसंगांची एकवाक्यता उत्तम होण्यासारखी आहे. प्रभु या स्थलीं पूर्वीं आले असतां या जागेच्या महत्त्वाची कल्पना त्यांना आली असावी. चोर, दरवडेखोर या लोकांनीं जरी या ठिकाणीं आपले अड्डे केले होते, तरी सर्व सोयींच्या दृष्टीनें पाहतां जागा उत्तम होती. जलसंचय मुबलग, हवा

उत्तम व वसाहत करावयास प्रशस्त मैदान; हीं अत्यंत आकर्षक लक्षणें पाहिल्यानंतर कुणीही ह्याच जागेची निवड केली असती. निसर्गसुंदर व सर्व प्रकारच्या सोयींनीं युक्त असलेलें हें स्थल पापप्रवृत्त लोकांनीं अपवित्र केलें होतें. या स्थलाला अनंत पापसंपर्कानें भयंकर स्वरूप प्राप्त झालें होतें. ही गोष्ट प्रभूंना पूर्णपणें माहीत होती. मग ह्याच ठिकाणीं प्रभु कायमचें ठाण देऊन कां राहिले ? यापेक्षां अत्यंत पवित्र व सुंदर जागा त्यांना मिळाली नसती काय ? प्रभुसमागमें आलेल्या शिष्य व भक्तवर्गास ही मारेकऱ्याची आवडती जागा पसंत पडली नाहीं. त्यांनीं अनेक प्रकारें प्रभूंना विनवून दुसरीकडे जाण्याची सल्ला दिली. पण प्रभु येथील बिल्ववृक्षाच्या कट्टयावर जे बसले ते बसले. सर्वांचाच नाइलाज झाला.

प्रभूंच्या अवतारकृत्यांतील अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणजे पतितोद्धार हा होय. वसाहत करण्यास योग्य अशी जागा, पापकृत्यांनीं दूषित झाली होती, म्हणूनच तिचा उद्धार करणें योग्य होतें. नुसती जागा पवित्र करून भागण्यासारखें नव्हतें; तर तिच्याठायीं वसती करणाऱ्याच्या अंतःकरणांतील पापप्रवृत्ति नाहींशी करणें हें कामही तितकेंच महत्त्वाचें होतें. हीं दोन्हीं महत्त्वाचीं कामें प्रभूंनीं कशीं उत्तम प्रकारें घडवून आणलीं हा कथाभाग अत्यंत मनोरंजक आहे.

कोणत्याही कारणाकरितां आले असोत, पण प्रभु येथें आल्यानंतर बेलाच्या झाडाखालीं बसले आहेत हें वर्तमान

हां हां म्हणतांच भोंवतालच्या खेड्यांत व हुमनाबादेंत पसरलें. प्रभूंचा लौकिक या वेळीं सर्वतोमुखीं झाला होता. कल्याणांतून निघून प्रथम अमृतकुंडावर कांहीं महिने राहिल्यानंतर मणिचूल पर्वतावरील बहुतेक सर्व व इतरही अनेक प्रेक्षणीय स्थानें व तीर्थें यांना भेटी देऊन दिग्विजय करण्यामध्यें जवळ जवळ एक तप खर्च झालें होतें. या वेळीं प्रभूंच्या वयाचें मान सुमारें अठ्ठावीस वर्षांचें असावें. हें वय भरज्वानीचें मानलें जातें. अशा वयांत प्रभूंचा मनोदय कोठें तरी एके ठिकाणीं स्थित व्हावें असा होता व त्याप्रमाणें योग्य स्थान व अनुकूल परिस्थिति पाहून प्रभु येथील कट्ट्यावर बसून निजानंदांत डुलत राहिले. वारा, ऊन, पाऊस इत्यादिकांच्या पीडेचा त्यांनीं कधींच विचार केला नव्हता, त्याप्रमाणें या वेळींही विचार करण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें. येथें कायमचें वसतिस्थान करावयाचा संकल्प इतर कोणासही प्रथम समजला नव्हता. प्रभु येथें येऊन बसले आहेत हें सर्वत्र समजल्यावर आसपासच्या गांवांतील लोकांच्या झुंडीच्या झुंडी दर्शनास लोटूं लागल्या. एकसारखी रहदारी सुरू झाली. हुमनाबादेहून मोठमोठे व्यापारी लोक व नायब, अमीन इत्यादि सरकारी अधिकारी दर्शनास आले. लगेच देवालयासभोंवतालच्या जागेची साफसफाई सुरू झाली. दुकानदारांचीं दुकानें लागलीं. चोंहोंकडे मोठ्या जत्रेचें स्वरूप दिसूं लागलें. देवाची पूजा, अर्चा, अभिषेक, प्रयोजन यांचा थाट लगेच जमला!

साखर दृष्टीस पडल्यांबरोबर ज्याप्रमाणें मुंग्यांचीं धांदल सुरू होते तद्वत् सर्वत्र धांदल उडून गेली. शिष्यलोक प्रभुसमागमें नव्हते; पुढें गेले होते. त्यांना प्रभूंचें हें वर्तमान समजतांच ते परत आले. प्रभु कट्टयावर बसले आहेत व भोंवतालीं दर्शनेच्छु लोकांची गर्दी झाली आहे, हा देखावा शिष्यगणांनीं पाहिला. त्यांना हा प्रकार पाहण्याचा नित्याभ्यासच होता.अशा प्रकारें प्रभु या ठिकाणीं उघडया कट्टयावर बरेच दिवस बसले होते. ऊन, वारा, थंडी यांचें निवारण करण्याकरितां व कांहीं आसरा करण्याकरितां शिष्यवृंदांनीं मोठ्या कष्टानें परवानगी मिळविली. व्यंकंमाही अशाच एका झाडाच्या सावलीखालीं बसून होती. ‘ नित्यश्री नित्यमंगल’ सतत चालू झालें. भक्त लोकांना दर्शन देऊन त्यांची कायिक,वाचिक व मानसिक पीडा नाहींशी करून सर्व मनोरथ पूर्ण करणाऱ्या प्रभूस भक्तांच्या प्रेमाची गोडी अधिक होती. त्यापुढें अन्न, उदक किंवा आसरा यांची त्यांना महती वाटत नव्हती.

प्रभुमहाराज या स्थळीं येऊन बसल्यानंतर थोडयाच दिवसांत या स्थलास विलक्षण शोभा आली. दिवसासुद्धां ज्या ठिकाणीं येण्यास लोकांना भीति वाटे, तें स्थल रात्रंदिवस लोकांनीं गजबजून गेलें व सर्वत्र प्रभुनामाचा जयजयकार दुमदुमूं लागला. कल्याणहून मातुःश्री बयाम्मा व दादासाहेब भेटीस आले. या वेळीं कनिष्ठ बंधु तात्यासाहेब हें व्यावहारिक शिक्षण उत्तम रीतीनें संपादून कल्याणच्या

नबाबाचे पदरीं चांगल्या मान्यतेच्या जागीं रुजू झाले होते. तेही प्रभुदर्शनास मातु:श्री व वडील बंधुसमवेत आले. दादामहाराज यांच्या प्रयत्नास यश येऊन त्यांना गवताची झोंपडी करून राहण्याची परवानगी झाली. ठिकठिकाणीं लहान लहान झोंपड्या तयार झाल्या. दर्शनास येणारे लोक प्रथम हुमनाबादेस रात्रीचा मुक्काम करीत. तेथून येणेंजाणें त्रासाचें दिसल्यावरून कांहीं लोकांनीं प्रभुसंनिधच राहण्याचा संकल्प करून तो शेवटास नेला. दिवसेंदिवस प्रभु येथें आल्याची वार्ता पसरूं लागली, तसतशी दर्शनास येणाऱ्यांची अतोनात गर्दी होऊं लागली. या लोकांमध्यें सर्व जातींच्या व पंथांच्या लोकांचा समावेश होत असे. मुसलमान अधिकारीही भेटीस येत असत. प्रभूंचें एकवार दर्शन झाल्यावर प्रभूंच्या अगाध सामर्थ्याची प्रतीति येऊन तेही भजनीं लागत.

या वेळीं हुमनाबाद, गडवंती व धुमणसूर हीं तीन्ही गांवें पायगा इलाख्यांतील एकाच नबाबाच्या मालकीचीं होतीं. या तीन्ही गांवांची शीव प्रभु बसलेल्या ठिकाणीं एके ठिकाणीं मिळाली असल्यामुळें प्रत्येक गांवच्या गांवकऱ्यास प्रभु आपल्याच गांवाच्या हद्दींत आहेत असें वाटून त्याबद्दल मोठा अभिमान वाटत होता. प्रभूंनीं याच ठिकाणीं कायमचें वास्तव्य करावें, अशी त्यांना विनंती करण्यास त्या त्या गांवच्या लोकांना प्रेरणा होऊन त्याप्रमाणें सर्वांनीं प्रभुचरणीं प्रार्थना केली.

प्रभुसमागमें असलेल्या लोकांना हें स्थान पसंत होतें असें नाहीं. पण प्रभूंच्या इच्छेपलीकडे कोण जाऊं शकत होता? तीन्ही गांवच्या दैवांनीं अर्थात् ग्रामदेवतांनीं केलेल्या प्रार्थनेस यश मिळालें. त्या गांवांनीं मोठ्या आनंदानें आपल्या हद्दींतील कांहीं जमीन प्रभूंच्या नवीन नगराकडे दिली व माणिकनगर स्थापनेला सहाय्य केलें. मुसलमान अधिकारी यांनाही ही गोष्ट पटून सर्वांची अनुकूलता मिळाली.

मोठ्या समारंभानें नगरस्थापनेचा विधि होऊन श्रीदत्ताची गादी तयार झाली व एका गवताच्या झोंपडीत तिची प्रतिष्ठा झाली. गादीशेजारीं प्रभूंकरितां एक झोंपडी तयार झाली. त्या ठिकाणीं प्रभु राहूं लागले. प्रभूंकरितां शिष्यमंडळींनीं गादी तयार केली व तिजवर बसण्यास प्रारंभ केला. तो दरबारचा थाट अपूर्व झाला! ओसाड जंगलांतील गवती झोंपडीच्या पुढील गवती मांडवास दरबारचें स्वरूप प्राप्त झालें. हा प्रसंग राजदरबारास लाजविणारा असाच होता. यापुढें असे दरबार या स्थानीं शतावधि झाले. या दरबारी वैभवाचें वर्णन पुढें यथाप्रसंग देण्यांत येईल. एखादें नवीन गांव वसविण्यास येणाऱ्या अनंत अडचणींचा विचार केला, तर कसलाही त्रास न पडतां हें गांव वसलें गेलें असेंच म्हणावें लागतें. प्रभूंच्या अचाट सामर्थ्यामुळें सर्व कामें व समारंभ निर्विघ्नपणें यथासांग होऊन नगरस्थापना झाली. नगररचनेचें कार्य दादामहाराजांनीं प्रभूंच्या अनुज्ञेनें हातीं घेतलें व दरबारी शिस्त

बसवून देण्याचें काम तात्यामहाराजांनीं पत्करिलें. सर्वत्र चौक्या-पहारे ठेवून बंदोबस्तही करण्यांत आला. प्रभूंच्या झोंपडीपुढें पहारा करण्याचें काम पदमसिंग नांवाच्या रजपूताकडे देण्यांत आलें व तें त्यानें मरेपर्यंत अत्यंत निष्ठेनें व प्रामाणिकपणानें बजावलें. अठरा कारखान्यांची व्यवस्था लागली. भंडारखाना सुरू झाला. भंडारखाना म्हणजे सेवेकरी लोकांना अन्नाचा प्रसाद देणारें अन्नपूर्णागृह होय. भंडारखान्यांत प्रारंभापासून मूर्तिमंत अन्नपूर्णा वास करूं लागली.या अन्नपूर्णादेवीचा दिव्य साक्षात्कार आजही अनुभवास येत आहे. भंडारखान्यांत नित्य शेंकडों लोकांचें अन्न शिजत होतें, तरी प्रभु कधीं पंक्तींत बसून भोजन करीत नसत. पंचपक्वान्नांचें भोजन भक्तजनांकरितां तयार झालें, तरी प्रभु कधीं जेवले नाहींत. प्रभूंनीं झोळींत आलेल्या अन्नामधून भाकर घेऊन तीवरच क्षुधा निवारण करावी. झोळीकडे दोन ब्रह्मचाऱ्यांची योजना होऊन त्यांनीं हुमनाबाद येथें जाऊन शिजलेल्या अन्नाची भिक्षा आणावी. गादीस मुख्य नैवेद्य झोळींतील पदार्थांचाच असे. या झोळींतील ज्वारीची भाकर व लसणाची चटणी हेच प्रभूंचे आवडीचे पदार्थ होते. राजैश्वर्यासह अष्टसिद्धि प्रभूंपुढें हात जोडून उभ्या असतांही त्यांच्या विदेह विरक्त स्थितींत तिळमात्र फरक पडला नाहीं. झोळी फक्त हुमनाबादेंतच फिरत असे. इतर भोंवतालच्या गांवीं जात नसे. हुमनाबादचे ब्राह्मण लोक मोठ्या

प्रेमानें झोळीची मार्गप्रतीक्षा करीत व नित्य नवे नवे पदार्थ प्रभूंच्या मुखांत पडावेत म्हणून झोळींत घालीत. लोकांना या झोळीसंबंधीं अत्यंत आदर असे. अद्यापही ही झोळी हुमनाबादेला जाते. तिजबद्दलचें लोकांचें प्रेम वाढतें आहे. इतर गांवच्या लोकांनीं नेहमीं प्रभूंकरितां निरनिराळे खमंग पदार्थ तयार करून सोंवळ्यानें चार-चार कोस डोकीवर वाहून आणावेत व प्रभूंना अर्पण करावेत. प्रभूंनीं सर्व पदार्थांचा प्रेमपूर्वक स्वीकार करावा. मात्र सर्व पदार्थ दृष्टीनें पाहून फार उत्तम आहेत अशी स्तुति करावी. कोणी असेंही सांगतात कीं, प्रभूंच्या आज्ञेवरून ठराविक घरांतच झोळी फिरत असे. नवीन एखादें घर झाल्यास त्यास परवानगी मिळवावी लागे. एखादा सर्वांच्या दृष्टीनें दोषी ठरला असल्यास शिक्षा म्हणून त्याच्याच तेवढ्या घरांत झोळी बंद करण्याचा हुकूम, तत्कालीन भक्त, प्रभूंकडून यत्नानें मिळवीत असत. याबद्दल एक आख्यायिकाही प्रसिद्ध आहे कीं, नानाशास्त्री नांवाचा एक गृहस्थ प्रभूंचा अत्यंत भक्त होता. एका खासगी निंद्य वर्तनावरून त्याच्यावर दीक्षित मंडळी रुष्ट झाली व त्यांनीं वरचेवर त्याच्या कागाळ्या सांगून गळ घालून त्याच्या घरीं झोळी बंद करण्याची आज्ञा मिळविली. त्याला ही हकीकत तो घराबाहेरील विहिरीवर पाय धूत असतां समजली. तेव्हां झोळी सुरू झाल्याशिवाय घरांत पाऊल व तोंडांत शीत टाकणार नाहीं अशा निग्रहानें सहा दिवसपावेतों तसाच

उपाशीं राहिला. नंतर मोठ्या कष्टानें त्याच दीक्षित लोकांनीं रदबदली करून पुन्हा त्याची झोळी सुरू करविली. तेव्हां त्यानें अन्नग्रहण केलें. असो. झोळी ही संस्थानची कामधेनु असून भंडारखाना हें अन्नपूर्णागृह आहे. या झोळीचाच प्रभुसमाधीस मुख्य नैवेद्य असतो. याच भंडारखान्यांत आजपर्यंत लक्षावधि लोकांचे अंतरात्मे संतुष्ट झाले आहेत.

प्रभूंच्या बैठकीची ढब चित्रांत दाखविल्याप्रमाणें नेहमीं असे. ते सदैव आनंदसागरांत डोलत राहिलेले दिसत. भाषण फारच मृदु व अत्यंत मधुर असे. क्वचित् विनोदही रेलचेल असे. प्रभूंच्या भाषणाची छाप परधर्मीयांवर इतकी बसे कीं, त्यांच्या मुखांतून 'वाहवा ! वाहवा !' असे उद्गार तात्काळ निघत. या वेळीं हुमनाबादेस गुलाम मुस्तफाखां नांवाचा तालुकदार होता. त्याचा अंमल अत्यंत कडक असे. प्रभूंची कीर्ति ऐकून तो एकदा दर्शनास आला. बराच वेळ प्रभूंशीं संभाषण झाल्यानंतर अत्यंत खुष झाला. असा वली जगांत सांपडणें कठीण, अशी त्याची खात्री झाली. कोणत्याही मौलवीपेक्षां अरबी व फारसी या भाषांचें ज्ञान प्रभूंना अधिक असलेलें पाहून तो चकित झाला. मुसल्मानी धर्माचें रहस्य खरोखर प्रभूंनाच समजलें आहे अशी त्यांची खात्री झाली. प्रभूंच्या संबंधांत त्याच्या मनांत अत्यंत आदरभाव उत्पन्न झाला. पण आपण मुसलमान व प्रभु हिंदु याचें विस्मरण त्याला झालें नाहीं. प्रभु मुसलमान असते तर फार उत्तम

झालें असतें असें त्याला वाटलें. तो प्रभूंना मोठ्या विनयानें म्हणाला, "महाराज, आपण मुसलमान असतां तर मी ह्याच क्षणीं आपला शिष्य बनलों असतों." यावर प्रभु हंसून म्हणाले, "होय हो, मलाही मुसलमान व्हावें असें वाटतें. पण काय करूं ? 'रब्-उल्-आलमीन' असें अल्लाला कुराणामध्यें म्हटलें आहे, हें मला ठाऊक आहे. परंतु 'रब्-उल्-मुसलमीन' असें म्हटलें असल्याबद्दल मात्र कुराणांत कोठेंही दाखला सांपडत नाहीं. तसें वचन कोठें असेल तर मला कळवा." या उत्तरानें तो निरुत्तर होऊन आपल्या कोत्या समजुतीबद्दल ओशाळा झाला. हें उत्तर अत्यंत मार्मिक आहे. 'रब्-उल्-आलमीन्' म्हणजे विश्वाचा अधिपति. परमेश्वर हा विश्वाचा अधिपति आहे असें कुराण म्हणतें. पण तो 'रब्-उल्-मुसलमीन' म्हणजे मुसलमानांचाच तेवढा अधिपति आहे असें वचन मिळाल्याशिवाय मुसलमान होऊन काय उपयोग ? परमेश्वर मुसलमानेतर जगाचा वाली नसल्याचा दाखला कोत्या समजुतीशिवाय मिळणें शक्य नाहीं. एका वचनानें परमेश्वरास विश्वाचा धनी करून लगेच दुसऱ्या वचनानें पहिल्या वचनास बट्टा लावणें विसंगत आहे. पण हटवादी लोक धर्म अथवा मताभिनिवेशानें अंध होऊन आपला धर्म चांगला व दुसऱ्याचा वाईट म्हणत असतात. अशा हटवादी मतवाल्यांनीं प्रभूंच्या समर्पक उत्तराचा अवश्य विचार करावा. असो.

गुलाम मुस्तफाखां हटवादी मुसलमान होता; तथापि समंजस होता. प्रभूंच्याविषयीं त्याचा आदर दृढ झाला व त्यानें

माणिकनगर वसाहतीच्या कामीं शक्य ती मदत केली. प्रभु प्रथम ज्या दोन बिल्ववृक्षांखालीं बसले होते ते वृक्ष एकाएकीं दिवसा सर्वांसमक्ष जळून गेले, असें कित्येक चरित्रकार म्हणतात. अकस्मात् उभे वृक्ष जळत असतांना पुष्कळांनीं पाहिलें व पाहणारे विस्मयचकित झाले ! एकाएकीं हिरवे गार वृक्ष जळतात ह्याला काय म्हणावें ! कोणासही याचें गूढ उकलेना. प्रभु जेथें प्रथम बसले त्याच जागेवरील वृक्ष जळणें हें कांहीं तरी अरिष्टसूचक चिन्ह आहे असें कित्येकांना वाटलें व ही जागा सोडून प्रभूंनीं दुसरीकडे जावें असेंही म्हणणारे लोक निघाले. हुमनाबादच्या लिंगायत लोकांना याचें वैषम्य वाटलें. प्रभु एवढे समर्थ असतां बिल्ववृक्ष जळावेत हें बरें नव्हे असें त्यांना वाटून कांहीं लोकांनीं प्रभूंच्यापुढें याचा उल्लेखही केला. प्रभु त्यांचा आशय ओळखून म्हणाले, "पाहा बुवा, तुम्ही शंकरभक्त आहां. तुम्हीच कांहीं प्रयत्न केला तर जळालेलीं बेलाचीं झाडें सजीव होतील. आठ दिवस नित्य दुधाचा अभिषेक झाडाच्या खालीं करून पाहा. तुमच्या नशिबानें शंकर प्रसन्न झाला व झाडें पूर्ववत् बनलीं तर आमच्यावरील आक्षेप तरी दूर होईल." प्रभूंच्या वचनावर भरंवसा ठेवून कांहीं लोकांनीं तसा प्रयत्न केला व आश्चर्याची गोष्ट ही कीं, तीं झाडें पूर्वीप्रमाणें टवटवीत झालीं ! ही गोष्ट पुष्कळ लोकांनीं समक्ष पाहिली होती. कांहीं पाहणाऱ्यांच्या समजुतीप्रमाणें त्या वृक्षावरील दोन ब्रह्मसमंध प्रभुदर्शनानें व स्पर्शानें मुक्त होऊन उद्धरून गेले.

प्रभु सदैव आपल्या निवासस्थानांत स्थित झाल्यापासून सर्व शिष्यगणांस स्थिरता वाटून नित्याचा कार्यक्रम ठरविण्यांत आला. प्रभुमहाराजांच्या उभयतां बंधूंच्या विचारें नित्य पूजा, आर्चा, नैवेद्य, आरति इत्यादि प्रकार गादीकडे व प्रभूंकडे होऊं लागले. सातवारांचें भजन तयार झालें. प्रत्येक वारीं त्या त्या देवतेचें भजन गादीपुढें होऊन ठरींव आरत्या होऊं लागल्या. शेजारति झाल्यानंतर त्या दिवसाचा कार्यक्रम संपावयाचा. भजन, आरति, शेजारती इत्यादिप्रमाणें नित्यपाठाचे ग्रंथही नेमून देण्यांत आले. भजनास सर्व शिष्य समुदाय व सेवेकरी हजर असत. सर्व कामें वेळेवर व पद्धतशीर रीतीनें व्हावींत म्हणून तात्यामहाराजांनीं शिस्त लावून दिली व त्याप्रमाणें सर्व वागूं लागले. गादीपुढें जें कांहीं द्रव्य येईल, त्याचा विनियोग मातुःश्री बयादेवीनें कुटुंबाच्या योगक्षेमाकडे करावा अशी योजना झाली. भंडारखान्यांतील अन्नपूर्णादेवीनें सर्वांना अन्नाचा पुरवठा करावयाचें काम पत्करलें व तें यथासांग रीतीनें उत्तम प्रकारें बजाविलें. नद्यांच्या दोन प्रवाहांनीं उदकाच्या पुरवठ्याचें काम आपल्याकडे घेतलें. उन्हाळ्यांत उदकाचा अभाव भासूं लागतांच लहान लहान विहिरी तयार होऊन वाटेल तेवढें पाणी मिळूं लागलें. येथें पाणी अगदीं जवळ असून पिण्यास रुचकर आहे. अन्नोदकाची भरपूर व्यवस्था झाली. प्रभूंच्या सामर्थ्यानें वस्त्राला कांहीं कमी नव्हतें. अशा प्रकारें

अन्नाच्छादनाची तरतूद करून प्रभूंनीं आपल्या भक्तजनांचा योगक्षेम चालविण्याचें कार्य सुरू केलें. ओसाड व भयाण अशा जागेंत सर्व बाजूंनीं संपूर्ण स्वर्गसौख्य नांदूं लागलें. जेथें मनुष्यांच्या अस्थींची रास पडत होती तेथें हत्ती झुलूं लागले. भरदिवसा ज्या जागीं गळे कापले जात, त्या ठिकाणीं रात्रंदिवस पाळणें हलूं लागले असतां आयांच्या कोमल व मधुर गळ्यावरचीं गाणीं ऐकूं येऊं लागलीं.

गादीची स्थापना झाली तो दिवस अत्यंत महत्त्वाचा होय. श्रीप्रभु व त्यांचे दोन बंधु या त्रिवर्गाच्या वेगवेगळ्या कार्याचें तें केंद्रस्थान होतें. श्रीदत्तात्रेयाची गादी म्हणजे आधिभौतिक, आधिदैविक व अध्यात्मिक सत्तेंचें केंद्रीकरण जिच्यामध्यें झालें आहे अशी सत्ता होय. ही त्रिविध सत्ता या बंधुत्रयाच्या रूपानें भिन्न भिन्न असतांही गादीच्या रूपानें एकत्रित झाली आहे. अवधूत दत्तात्रेय हेच प्रभु होत. त्या प्रभूची गादी ज्या वेळीं येथें स्थापन झाली, तो दिवस अत्यंत भाग्याचा व श्रेष्ठ मानला जाणें साहजिक आहे. या महत्त्वाच्या प्रसंगीं श्रीप्रभूंची श्रीदावलि प्रसिद्ध झाली. या दिव्य शक्तीच्या सत्तेचा तो जाहिरनामाच होय. यासंबंधीं अशीही एक आख्यायिका ऐकिवांत आहे कीं, कोणी एका अदृश्य दिव्य पुरुषानें ही श्रीदावलि उच्च स्वरांत म्हटली. संप्रदायास मूर्त स्वरूप आलें तें त्याच दिवशीं. प्रभूंचें दर्शन होतांच भिन्न मतें व भिन्न विचार यांची एकवाक्यता होत असे. हाच सर्वांत अद्भुत

चमत्कार होय. शैवमतवादी लोकांना शंकररूप प्रभु दिसावेत, लिंगायत लोकांनीं प्रभु साक्षात् बसवच आहेत असें म्हणावें, वैष्णवांना ते विष्णु वाटावेत व शाक्तांना प्रत्यक्ष देवीच्या रूपानें दर्शन मिळावें. अग्निहोत्री लोकांना अग्निनारायण मूर्तिमंत प्रभूंच्या ठायीं वसत असल्याचा अनुभव यावा, तर सौरांना ते सूर्याप्रमाणें दैदीप्यमान भासावेत. परधर्मीयांना त्यांच्या धर्माचें उज्ज्वल स्वरूप प्रभूंच्या ठायीं पहावयास मिळावें, हाच लोकोत्तर चमत्कार होय. सर्व धर्म, सर्व मतें प्रभूंच्या सन्निध आपापले हटवाद विसरून जाऊन आत्मीय भावनेनें प्रभूंकडे पाहत असत. प्रभूंच्या ब्रीदावळींतील प्रथम ब्रीद भक्तांचे मनोरथ पूर्ण करणें हें आहे. त्याचा अनुभव प्रभूंच्या बालपणापासूनच लोकांना आला होता. शेवटचें पद 'सकल-मतस्थापित सद्गुरु' याचा अनुभव पूर्णपणें आतां पटला आहे. ब्रीदावळींतील प्रत्येक विशेषण प्रभूंच्यासंबंधीं अन्वर्थक होतें. लोकांनीं त्याचें प्रत्यंतर पाहिलें होतें; म्हणून सर्व लोकांनीं या ब्रीदावळीचा उच्चार एकमुखानें, एकविचारानें व एक प्रेमळ अंतःकरणानें करून ही ब्रीदावलि जाहीर केली.

माणिकनगर—स्थापना, गादीस्थापना व संप्रदायस्थापना अशा रीतीनें मोठ्या उत्साहानें व अपूर्व समारंभानें होऊन आज जवळ जवळ त्र्याऐशीं वर्षें होऊन गेलीं. आज रोजीं प्रभूंचा लौकिक पूर्व-पश्चिम समुद्रामधील प्रांत व्यापून आसेतुहिमाचल पसरला आहे; ब्रीदावळीची गर्जना अखंड चालू आहे व

संप्रदाय वरचेवर अव्याहत वर्धमान स्थितींत आहे. मातीच्या भिंती व गवताचें आच्छादन असलेल्या जागीं गादीची स्थापना झाली होती; पण त्याच गादीवर आज लक्षावधि रुपये खर्चून तयार केलेली सुंदर दगडी इमारत उभी आहे व सुवर्ण कळस नभोमंडळांत चकाकत आहेत.

ठिकठिकाणीं गवती झोंपड्यांनीं तयार झालेलें माणिकनगर सर्वांना आकर्षण करणारें सर्वोत्तम क्षेत्र तात्काल बनलें. प्रथम प्रथम लोक याला 'प्रभूचा कट्टा' म्हणत असत. अजूनही इकडील खेडवळ लोकांत 'परभुनकट्टी' अथवा प्रभूचा कट्टा हेंच नांव रूढ आहे. प्रभु येथें आल्यानंतर एका कट्ट्यावर बसले होते म्हणून या स्थानास कट्टा असें सामान्य जनतेनें नांव दिलें. सध्यां वाड्यांत तुलसीवृंदावनाचा चौक आहे, त्या ठिकाणीं पूर्वीपासून असलेला एक उंच कट्टा आहे, तेथें प्रभु प्रथम येऊन बसले असें कोणी म्हणतात. कोणी सर्वेश्वराच्या देवळानजीकच्या बेलाच्या झाडाखालीं बसले असेंही म्हणतात. प्रथमचीं बेलाचीं झाडें आतां दिसत नाहींत. सर्वेश्वराच्या देवळाजवळ आतां सर्व बाजूंस इमारती झाल्या आहेत. सर्वेश्वरापुढील पाण्याचें कुंडही बुजविण्यांत आलेलें आहे. आज ज्या ठिकाणीं प्रभूंची समाधि आहे, तेथेंच प्रभूंची बसावयाची खोली होती व त्यानजीक गादी होती. प्रथमावस्थेंतील माणिकनगरांत व आतांच्या माणिकनगरांत जमीनअस्मानचें अंतर झालें आहे.

भविष्यकाल यापेक्षांही उज्ज्वल होईल, त्या वेळीं या नगराचें स्वरूप कसें असेल याचा तर्क कोणीं करावा ?

गांव वसविल्यानंतर गांवास जरूर असणाऱ्या सर्व गोष्टींची तरतूद करण्यांत आली. ठिकठिकाणीं चौक्या, पहारे, शिपाई यांची योजना होऊन लोकांच्या गैरसोई दूर करण्याचा प्रयत्न झाला. देवस्थानी संस्थान ज्याप्रमाणें असावयास पाहिजे होतें, त्याप्रमाणें सर्व गोष्टी साध्य झाल्या. कल्याणहून प्रभूंचे भक्त बनलेले खेळगडी आले. त्यांनीं आपापल्या अधिकाराप्रमाणें जबाबदारीचीं कामें पत्करलीं. वापाचार्य हे कट्टे वैष्णव असूनही प्रभूंचे निस्सीम भक्त होते. ते येऊन जाऊन असत. प्रभुसमागमें सतत असणारे ब्रह्मचारी चिमणाजी, गोपाळबुवा, लंगोटी रामण्णा व इतर अनेक लोक नित्य सहवासांत राहूं लागले. रामण्णा दुबळगुंडी व त्यांची बहीण सुंदरम्मा हेही समागमें राहत असत. व्यंकम्माचें राहण्याचें स्थान स्वतंत्र होतें. या योगिनीची चरित्रकथा यापूर्वींच दिलेली आहे. हिचें सामर्थ्य दिवसेंदिवस वाढत जाऊन शेवटीं ती परम पदास पोंचली हा भाग सविस्तर पुढें येणार आहे.

तात्यामहाराज कल्याणच्या नवाबाजवळ महत्त्वाच्या कामावर होते हें वर सांगितलेंच आहे. राजदरबारांतील रीतिरिवाज यांना पूर्णपणें अवगत असल्यामुळें प्रभुदरबारास शिस्तीचें वळण यांनींच लाविलें. हे अधाप कल्याणास जाऊन-येऊन असत. तथापि त्यांच्या शब्दास भक्त व सेवक

मंडळींकडून फारच मान मिळत असे. ते शिस्तीचे भोक्ते असल्यामुळें व्यवहारांत त्यांचा फार दरारा असे. त्यांचें द्वितीय कुटुंब अद्याप लहान होतें. मातु:श्री बयादेवींच्या आज्ञेंत राहून सौ. विठाबाईअंमानीं त्यांना संतुष्ट राखिलें होतें. दादामहाराज तर मातु:श्रींच्या अर्ध्या वचनांत असत. अशा प्रकारें मातु:श्रींचा काल या ठिकाणीं फारच संतोषांत गेला. त्या माउलीला आपल्या जन्माचें सार्थक्य झालें असें वाटलें. जगताला वंद्य असलेले तीन सुपुत्र आपल्या आज्ञेंत राहून सर्वकाल संतोष देत आहेत हें पाहून कोणती माता कृतकृत्य होणार नाहीं ? आपलें जीवितसाफल्य झालें, यापेक्षां जन्मांत अधिक प्राप्तव्य तें काय राहिलें, अशा विचारानें त्या माउलीला स्वत:ची धन्यता वाटूं लागली. स्त्रीस्वभाव-धर्माप्रमाणें आपण आजवर केलेल्या अनेक व्रतांचें उद्यापन करावें अशी बयाम्मांनीं इच्छा प्रदर्शित केली. मातु:श्रींच्या इच्छेला अनुसरून व्रतांचें उद्यापन करण्याची तयारी चालली. राजेश्वर, कल्याण, हळिखेड, बोरोळ, हुमनाबाद इत्यादि ठिकाणच्या प्रसिद्ध वैदिक ब्राह्मणांना निरोप पाठवून बोलावून आणलें. तात्यामहाराजांच्या हातून पुण्याहवाचन करवून सर्व व्रतांचें यथासांग उद्यापन करविलें. या वेळीं ब्राह्मणभोजन, दक्षिणा, ब्राह्मणांस वस्त्रें इत्यादि खर्च तात्यामहाराजांनीं आपल्या कल्याणच्या कमाईतून केला, असें एका चरित्रकारानें लिहिलें आहे. हजारों रुपयांचा खर्च

करून, मातु:श्रींस संतुष्ट करण्यास त्रिवर्गबंधूंनीं कधीं कमी केलें नाहीं. प्रभूंच्या दानशूरत्वाचा लौकिक दूरवर पसरला होता. त्यास अनुरूप असा हा नवीन समारंभ माणिकनगरांत घडून आला, म्हणून याचें महत्त्व कांहीं लोकांना वाटतें. याचें तपशीलवार वर्णन देऊन वाचकांना शीण देणें योग्य नव्हे असें आम्हांस वाटतें.

अन्नानें, वस्त्रानें व भरपूर दक्षिणेनें ब्राह्मणवर्ग संतुष्ट झाला. बाकी सर्व लोकांना महाप्रसादलाभ झाला म्हणून आनंद झाला. प्रभूंच्या कुटुंबांत झालेला येथील प्रथम समारंभ इतक्या हौसेनें व यशस्वी रीतीनें यथासांग झाला म्हणून मातु:श्रींसह सर्व प्रेमी मडंळीस आनंदीआनंद झाला !

अशा प्रकारें झालेल्या आनंदसमारंभाचे भागीदार भक्तजन व व्रतोद्यापनाकरितां पुष्कळ गांवचे जमलेले स्त्री-पुरुष यांना दिवसभर झालेल्या श्रमामुळें रात्रीच्या समयीं गाढ झोंप लागली व जिकडे तिकडे सामसूम झालें. प्रभु-दरबारांतील उदार देणगी मिळाल्यामुळें संतोषित वृत्तीनें निद्रावश झालेले लोक स्वस्थपणें घोरूं लागले. ही संधि अनुकूल आहे असें पाहून कांहीं चोरटया लोकांनीं सर्वांचा ऐवज लांबविण्याचें मनांत आणून त्याप्रमाणें कृति करण्यास आरंभ केला. यासंबंधानें एका चरित्रलेखकानें मनोरंजक हकीकत दिली आहे ती आम्हीं त्याच्याच शब्दांत देत आहों.

"व्रतोद्यापनाचे निमित्तानें येथें पुष्कळ लोक आपापल्या कुटुंबानिशीं जमले आहेत व त्यांजजवळ ऐवजही बराच आहे अशी संधि पाहून रात्रौ वीस-पचंवीस चोरटे लोकांनीं येथें येऊन आपलें काम बजावलें. दिवसा श्रम झाल्यामुळें बायकामुलांसुद्धां सर्व लोक खुशाल ठिकठिकाणीं आपापलीं गांठोडीं उशाशीं घेऊन झोपी गेले होते. जवळ चीजवस्त किंवा नगदी म्हणून जो कांहीं ऐवज होता, तो त्या गांठोडयांत सर्वांनीं ठेविला होता. हे दिवस कृष्णपक्षाचे असून या ठिकाणीं पुष्कळ झाडी असल्यामुळें, त्यांतल्या त्यांत कोठें थोडी रिकामी जागा पाहून, ज्यानें-त्यानें आपलें बिऱ्हाड लावलें होतें. यामुळें सर्वांनाच दुसऱ्या लोकांची सोबत होती असें नाहीं. बरें, बिऱ्हाड तरी काय, बहुधा साफ केलेल्या उघडया जागेवरच ! तेथें मजबूत दरवाजा, कोठडया अथवा संदुका वगैरे रक्षणाची सोय म्हटली म्हणजे गाठोडयाची गांठच ! मग अशा ठिकाणीं प्रवेश करून डल्ला मारण्यास चोरांना कितीशी अडचण किंवा खटपट पडेल ? जातां जातां रस्त्यानें झाडाचीं फळें तोडून घ्यावीं, तशीं त्यांनीं एकेकाच्या उशाखालचीं गांठोडीं पळवून नेण्याचा क्रम आरंभिला ! कोणी हुशार मनुष्य तात्काळ जागा झाला, तरी हे चोर त्याच्याशीं दांडगाई करून गांठोडें नेत. आरडाओरड करून दहा-पांच माणसें जमलीं, तरी काळोखामुळें व झाडीच्या योगानें कोणी सांपडेना. धरूं जाणाऱ्यास मात्र इजा होऊं लागली. शेवटीं जिकडे तिकडे सर्व नगरभर

'चोर, चोर' असा गलबा होऊन लोकांची धांवपळ सुरूं झाली. कित्येक लोक प्रभूंना जागें करावें म्हणून त्यांजपाशीं धांवत आले. प्रभु बिल्ववृक्षाखालीं पलंगावर स्वस्थ घोरत निजले होते. या कलकल्यानें ते ताबडतोब जागे झाले. पण त्यांनीं तेव्हांच चोरांना पकडण्याचा कांहींच विचार केला नाहीं किंवा कोणास कांहीं इलाज करण्यासही सांगितलें नाहीं. पुष्कळ लोक भोंवतीं जमून आपापलें गांठाडें गेल्याबद्दल दुःख करून रडूं लागले. तेव्हां प्रभु एवढें मात्र म्हणाले कीं, 'सद्गुरूला सर्वांची सारखी काळजी आहे. खऱ्या श्रमानें आणि न्याय्य मार्गानें मिळविलेला जिन्नस हिरावून नेण्यास कोण समर्थ आहे. त्याचा तो आपोआपच चोरांस धरून योग्य शासन करील. मग रिकामा खटाटोप कशाला?' एवढें बोलून ते पुन्हा पांघरूण घेऊन निजले. तेव्हां लोकांनीं 'झालें तें झालें' पण आणखी तरी चोरांना सवड सांपडूं नये म्हणून आपल्या हातून होईल तितका प्रयत्न आरंभिला. कोणी आगट्या पेटवून जागत बसले, कोणी चुड्या पेटवून घेऊन इकडे तिकडे हिंडून लोकांना सावध करूं लागले. अशा रीतीनें कसा तरी मध्यरात्रीपासून अरुणोदयापर्यंत वेळ काढला. इकडे प्रभु आपल्या गूढ भाषणानें सर्वांना आश्वासन देऊन पुन्हा निजले; तेव्हांपासून प्रभूंच्या जागेच्या ईशान्य कोपऱ्याजवळ सुमारें पांच-सातशें पावलांच्या अंतरावर, राहून राहून 'प्रभो, चुकलों; आम्ही सर्वस्वी अपराधी आहों, क्षमा करा. आमच्या हातून असें पुन्हा कधीं व्हावयाचें नाहीं; आपल्या हद्दींत

पुन्हा आम्ही पाय घालणार नाहीं.' अशा प्रकारचे विलापाचे शब्द ऐकूं येऊं लागले; पण प्रभूंकडे आलेल्या लोकांपैकीं दिवसा कोणी या अंगास उतरलें नाहीं असें सर्व प्रमुख मंडळीस माहीत होतें. आणि काळोखामुळें हिंडण्याचीही अडचण होती. यामुळें अरुणोदय होऊन चांगलें दिसूं लागेतोंपर्यंत तिकडे कोणी लक्षच दिलें नाहीं. आतां जों जों उजाडत चाललें, तों तों हे रडण्याचे शब्द अधिक अधिक व स्पष्ट असे सर्वांच्या कानीं पडले. तेव्हां कोणी लोक या अंगास काय् झालें आहे व कोण कशाकरितां विव्हळत आहे हें पाहावें म्हणून इकडे येण्याचा विचार करूं लागले. इतक्यांत खुद्द प्रभूही उठले आणि एकदोन शिष्य बरोबरच घेऊन त्या आवाजाच्या धोरणानें त्याच बाजूस शौचास म्हणून निघाले. बिल्ववृक्षापासून सुमारें सातशें कदमांवर एक बुजलेल्या विहिरीचा खड्डा होता. त्या खड्ड्यांत हे वीस पंचवीस चोर पडले असून तेच प्रभूंचा धांवा करीत होते. रात्रौ लोकांचा लांबविलेला सर्व ऐवजही त्यांच्याजवळच होता येथपर्यंत प्रभु स्वतः येऊन दाखल झाले; तोंच मागाहून आणखी कित्येक शोधक शिष्य मंडळीही येऊन ठेपली. तेव्हां खड्ड्यांत पडलेले हेच रात्रीचे चोर असून आतां प्रभूंचा धांवा करीत आहेत असें सर्वांना कळून आलें. आतां प्रभु प्रत्यक्ष जवळ पुढें उभे राहिल्यावरही कोणी त्यांना पाहीना व वरही येईना; तेव्हां

त्यांना दिसत नसावें असा कोणी कोणीं तर्क केला. प्रभु त्या लोकांस 'तुम्ही कोण? या खड्यांत कसे पडलां? आणि आतां हळू हळू बाहेर कां निघत नाहीं?' असें विचारूं लागले. तेव्हां चोरांनीं आपली हकीकत सांगितली. ते म्हणाले, 'या रानांत राहून आल्यागेल्यास लुटावें व आसपास गांवोगांव चोऱ्यामाऱ्या करून आपला निर्वाह करावा हा आमचा धंदा आहे. हल्लीं येथें माणिकप्रभु नांवाचा कोणी साधु येऊन राहिला आहे. त्याच्याकडे नित्य शेंकडों लोक येतात; तेव्हां आपल्यास आतां सहजच केव्हां तरी चांगला डल्ला मारावयास सांपडेल, असा आनंद वाटून आम्ही तशी संधि पाहावयास टपलों होतों. काल रात्रीं आम्हीं आपला पापी विचार साधला. प्रभूंजवळ चांगले ऐवजवाले लोक जमले आहेत; तेव्हां अगदीं नाहीं म्हटलें तरी महिन्या दोन महिन्यांची खर्ची सांपडेल म्हणून आम्ही वीस-पंचवीस जण रात्रीं या तळ्यांत शिरलों आणि सांपडेल तें लुबाडून घेऊन जाण्याइतकें ओझें प्रत्येकाजवळ झाल्यावर परत जाण्यास निघालों. ते सर्वजण कोणी मुद्दाम धरून बांधून टाकल्यासारखे या खड्ड्यांत येऊन पडलों. बरें, आतां उठून पळून जावें म्हटलें, तर आमच्या डोळ्यांस मुळींच दिसत नाहींसें झालें आहे. मग येथून उठून जावें तरी कसें? आणि करावें तरी काय? खरोखर तो माणिकप्रभु प्रत्यक्ष देव असून त्याच्या दरबारांत आम्ही असा गुन्हा केल्यामुळें त्यानेंच आम्हांस ही

जबरदस्त शिक्षा देऊन आमची खोड मोडली, अशी आमची खातरी झाली आहे. आतां कृपा करून त्यानेंच आम्हां इतक्या जणांस सोडिलें तर सुटलों; नाहीं तर असेंच मरावें लागणार ! तेव्हां कोणी तरी आमच्याकरितां प्रभूला एवढी आमची विनंती सांगाल, तर आपल्याला जीवदान दिल्याचें पुण्य लागेल आणि आमच्यावर मोठे उपकार होतील.' असें म्हणून ते गयावया रडूं लागले. त्यांतील कोणी भोळसट वेडपीर या प्रभूबरोबरच्या लोकांना आपल्यासारखेच कोत्या विचाराचे समजून त्यांना द्रव्याची लालुचही दाखविण्यास चुकले नाहींत. 'प्रभूंनीं कृपा करून आमचे डोळे पूर्ववत् करून आम्हांस या संकटांतून मुक्त केल्यास आम्ही जन्मभर त्यांचे उपकार विसरणार नाहीं. माणिकनगरच्या वाटेसही कोणी जावयाचा नाहीं. पण उलट दुसरीकडे हात चालवून प्रभूंचा दरबार पैशानें भरून काढूं आणि प्रभूला आमची खबर सांगणाराला तर आम्हीं आपले मालक बनवूं.' इत्यादि आर्जवी भाषणाचें पांडित्य आरंभिलें ! ही चोरांची दैन्यावस्था पाहून प्रभूंच्या परम कोमल अंतःकरणाला तात्काल दया आली व पुढच्या त्यांच्या अल्पविचाराबद्दल हसूंही आलें. त्यांनीं आपल्या शिष्यमंडळीकडून अगोदर सर्वांना उचलून वर आणिलें, व मग ते आपल्या परिवारास म्हणाले 'पाहा, सद्गुरूला आपल्या भक्तांचें रक्षण करणें कसें भाग पडतें तें ! मनुष्य उगीच काळजी वाहतो; पण कर्ताकरविता गुरुमहाराज

समर्थ आहे. तो कधींही अन्याय होऊं द्यावयाचा नाहीं. ” अशा प्रकारें शिष्य मंडळीचें समाधान करून त्यांनीं पापपुण्याबद्दल चोरांनाही चांगला बोध केला. मग अशा अधिकारवाणीचा असा अनुभवशीर उपदेश न ठसण्याइतका वेडा त्या अट्टल चोरांत तरी कोण असणार ? सर्वांस कृतकर्माबद्दल खरोखरच पश्चात्ताप होऊन त्यांनीं अतःपर अशा निंद्य धंद्याचें नांवही न काढण्याबद्दल तात्काळ शपथा घेतल्या. मग प्रभूंनीं त्यांच्याजवळील गांठोडीं लोकांना आपापलीं ओळखून घेण्यास सागितलें. नंतर आपला अमृतहस्त फिरवून त्या लोकांना निर्भयपणाचें आश्वासन दिलें. ज्याचा माल त्याच्या स्वाधीन होतांच चोरांचे डोळे आपोआप पूर्वींसारखे झाले ! मग त्यांनीं प्रभूलाच नव्हे, तर प्रभूंच्या सर्व परिवारापुढें अनेक नमस्कार घातले आणि आपल्या घरचा रस्ता सुधारला. ह्यांपैकीं कित्येकजण तर आमरण प्रभूंजवळच सेवा करण्याच्या उद्देशानें राहिले. प्रभूंनीं त्यांच्या कुटुंबासुद्धां चरितार्थाची तजवीज करून दिली. बाकी घरीं गेलेले लोकही पुन्हा कोणत्याही नीच कामांत न पडतां चांगला उद्योगधंदा करून सदाचरणानें वागूं लागले व मरेतोंपर्यंत प्रभूस विसरले नाहींत. चोरांची खोड प्रभूंनीं अशा रीतीनें मोडल्यामुळें परिवारांतील लोकांस त्यासंबंधानें मुळींच काळजी राहिली नाहीं. ज्या खड्डयांत हे लोक पडले होते, तो पुढें जास्त खोदवून दादासाहेबांनीं सर्व लोकांकरितां विपुल

पाण्याची सुरेखशी विहीर बनविली आणि तिला 'माणिकबावडी' असें नांव दिलें."

अशा रीतीनें अन्नवस्त्र व स्वास्थ्य यांची प्रभूंच्या सत्तासामर्थ्यानें,या नूतन वसाहतींत व्यवस्था लागली.पण एका गोष्टीचा निर्णय अद्याप व्हावयाचा होता. ती गोष्ट म्हणजे या ठिकाणीं सहकुटुंब वसति करण्याचा प्रतिबंध हीं होय. येथें येऊन राहणाऱ्यांनीं ब्रह्मचर्याचे कडक निर्बंध पाळले पाहिजेत असा प्रथम दंडक निघाला होता. वसाहतीच्या भावी अभ्युदयाला हा दंडक घातक असाच होता. कोणीही स्त्री-पुरुषांनीं नैसर्गिक कर्तव्यें या ठिकाणीं करूं नयेत अशी इच्छा असणाऱ्यांनीं माणिकनगरची सीमा ओलांडून पलीकडे जावें या नियमाची कडक अंमलबजावणी चालली होती. कोणी एका जोडप्यानें विकारवश होऊन हा दंडक उल्लंघिल्यानंतर त्याला कसें शासन झालें व त्याची फजिती किती झाली याचें एका चरित्रलेखकानें वर्णन दिलें आहे. तें येथें द्यावें अशी आमची इच्छा नाहीं. गुप्त गोष्टी चवाठ्यावर आल्यानंतर होणारी फजिती काय वर्णावी ? अशा एक-दोन प्रसंगांमुळें सर्वांना या बाबतींत विलक्षण दहशत बसली. पण माणिकनगरांत प्रजावृद्धि कशी व्हावी या प्रश्नाचें महत्त्व वाढूं लागलें. धर्मशास्त्रानें परस्पर बद्ध झालेल्या स्त्रीपुरुषांना स्वाभाविक आकांक्षा तृप्त करण्याची परवानगी मिळणें न्यायाचें आहे व तें माणिकनगरच्या उत्कर्षाला

उपकारक आहे अशी सर्वांची खातरी असतांही प्रभूंजवळ या गोष्टीचा उपक्रम करून इष्ट हेतु साध्य कसा करून घ्यावयाचा हा मोठा विकट प्रश्न होता. परंतु सर्वांच्या सुदैवानें या गोष्टीचा निर्णय लावून घेण्यास अनुकूल अशी संधि अनायसें प्राप्त झाली.

तात्यामहाराज यांचें कुटुंब सौ. विठाबाईअम्मा या वेळीं वयांत येऊन ऋतुमती झाल्या. तात्यामहाराज कल्याणास गेले होते. त्यांना पत्र पाठवून बोलावून आणावें अशी योजना करून दादामहाराजांनीं त्याप्रमाणें बोलावणें पाठविलें. तात्यामहाराज इकडे येण्याचें नांवही काढीनात. शेवटीं प्रभूंकडे रदबदली होऊन ताबडतोब निघून यावें अशा अर्थाचें पत्र प्रभूंनीं धाडिलें. हें पत्र हातीं पडतांच आपल्या नोकरीचा राजीनामा देऊन तात्यामहाराज टाकोटाक माणिकनगरास येऊन दाखल झाले. गर्भाधानसंस्कार कोठें करावा याचा विचार निघतां कोणी हुमनाबादेस करावा अशी सूचना आणिली; कोणी दुसरें गांव सुचविलें. ह्या महत्वाच्या प्रश्नावरील निकालावर माणिकप्रभुनगरच्या भावी वृद्धीचा निकाल अवलंबून असल्यामुळें सगळ्यांचे डोळे मोठ्या आतुरतेनें याकडे लागून राहिले. शेवटीं सर्वांना अनुकूल असा इत्यर्थ निघाला. 'तात्यानें गुरुदरबारला आपल्या कमाईतून पांच हजार रुपये दिल्यास हा गोड समारंभ येथें

करण्यास परवानगी मिळेल. यापुढें कोणालाही सपत्नीक येथें राहण्यास हरकत नाहीं. ' हा निकाल ऐकून सर्वांना आनंद झाला. तात्यामहाराजांनीं खुषीनें सर्व गोष्टी कबूल केल्या. अशा रीतीनें या काळजीचा शेवट होऊन, माणिकनगरास सहकुटुंब येऊन राहाण्याची सर्वांना मुभा मिळाली.

याप्रमाणें नगर-वसाहतीस मूर्त स्वरूप येऊन येथें राहणाऱ्यांना उत्साह वाटूं लागला. नगराकडे आसपासच्या गांवकऱ्यांनीं स्वसंतोषानें आपापल्या गांवची जमीन सोडली होती. पण तिला राजमान्यता मिळाल्याशिवाय कायमची मालकी कशी प्राप्त व्हावी, असा प्रश्न व्यवहाराच्या दृष्टीनें तात्यामहाराजांपुढें उभा राहिला. पण प्रभूंच्या सत्तासामर्थ्यानें ह्याही गोष्टीचा उलगडा झाला. हुमनाबाद, गडवंती व धुमणसूर हीं तीन्हीं गांवें त्या वेळीं शमसुल उमरा नबाव साहेबांच्या जहागिरीपैकीं होतीं. नबाबसाहेबांना कर्णोपकर्णीं प्रभूंचें वृत्त समजलें होतें. सन्मानपूर्वक विनंति करूनही जो महात्मा आपल्या जहागीर गांवीं येणें कठीण, तो असा अनायासें आपल्या हद्दींत आलेला पाहून नबावसाहेबांना अत्यानंद झाला. प्रभूंनीं येथें कायम वास्तव्य करून राहावें अशी प्रार्थना करून माणिकनगरास जरूर असलेल्या वरील तीन्ही गांवांतील जमिनीच्या सनदा स्वसंतोषानें करून देऊन त्या प्रभुचरणीं नजर करण्याकरितां आपल्या तालुकदारास हुकूम पाठविला. हुकमाप्रमाणें गुलाम मुस्तफाखां तालुकदार

प्रभूंच्या चरणाजवळ पुनश्च येऊन विनंतिपूर्वक त्या सनदा अर्पण करिता झाला. प्रभूंच्याविषयीं सदर तालुकदारास अत्यंत आदर होता हें वर निर्दिष्ट केलेंच आहे. त्यानेंच सर्वेश्वराच्या देवळाचा जीर्णोद्धार करण्याच्या सूचनेस प्रोत्साहन दिलें असें एका चरित्रकारानें म्हटलें आहे. हिंदुधर्माप्रमाणें गांवास देवालयाची जरूर होतीच. मूर्तिमंत चालता बोलता देव सर्वांच्या सुदैवानें लाभला होता ही गोष्ट खरी असली,तरी नगराच्या कायमपणाला इतर अनेक देवतांचीं देवालयें असणें आवश्यकच होतें. पूर्वीचा सर्वेश्वर व वरील देवालय अगदीं जीर्ण दशेस येऊन गेल्यामुळें त्याच्या ठिकाणीं पक्क्या देवळाची गरज उत्पन्न झाली. भक्तांच्या इच्छा पूर्ण करण्याची कामगिरी प्रभूंनीं पत्करिली असल्यामुळें त्यांच्या इच्छेस अनुसरून सर्व गोष्टी घडवून आणणें प्राप्त झालें. देवालयाची सर्व सिद्धता झाली. दादामहाराजांनीं देवालयाचें काम सुरू केलें. एके दिवशीं एका म्हाताऱ्या वडरानें आपल्या गाड्यावर एक प्रचंड काळी शिळा आणून प्रभूंपुढें ठेविली व तेलंगी भाषेंत प्रभूंना म्हणाला, "असा दगड सांपडणें फार कठीण असतें. तो मला सांपडला आहे. म्हणून मुद्दाम तुझ्याकडे घेऊन आलों आहें. याचा देव करून बशीव. देव तुझें कल्याण करील." प्रभूंनीं त्या भोळ्या वडराच्या शुद्ध अंतःकरणाचें कौतुक केलें व म्हणाले, "मुत्त्या, तुझ्या सांगण्याप्रमाणें करतों बरें! तुझाच आशीर्वाद माझें कल्याण करील." या दगडाची

शंकराची पिंडी तयार करणारा एक गंवडीही अनायासें सांपडला. त्याचे डोळे पुष्कळ दिवसांपासून बिघडले होते; पण प्रभूंनीं आपला अमृतहस्त फिरवून त्याच्या डोळ्यांची व्याधि नाहींशी केली. त्यानें मोठ्या उल्हासानें शंकराच्या ह्या पिंडीचें काम उत्तम रीतीनें योग्य वेळीं तयार केलें. महाशिवरात्रीच्या दिवशीं या सर्वेश्वराची स्थापना मोठ्या समारंभानें झाली. माणिकनगरांत पक्क्या दगडांनीं तयार केलेली अशी ही पहिली इमारत अस्तित्वांत आली.

एक साधु डोकीवर एक ल्हानशी मारुतीची मूर्ति घेऊन बारा वर्षें तीर्थयात्रा करीत फिरत होता. फिरत फिरत प्रभूंचा लौकिक ऐकून तो माणिकनगरास आला. सतत एक तप ही मूर्ति त्यानें डोकीवर वागविली होती. अहोरात्र मूर्ति डोकीवर बांधूनच त्यानें सर्व व्यवहार व प्रवास केला होता. येथें आल्यावर मूर्तीचें ओझें असह्य होऊं लागलें. प्रभूपुढें येऊन त्यानें सांगितलें कीं, " महाराज, या मारुतीची इच्छा आपल्यासंनिध राहावें अशी आहे. मला रात्रीं त्यानें दृष्टांतांत सांगितल्यावरून मी आपल्याकडे आलों आहें. आपण ही मूर्ति माझ्या डोकीवरून काढून आपल्यास योग्य वाटेल त्या स्थळीं हिची स्थापना करावी." त्याच्या विनंतीप्रमाणें प्रभूंनीं स्वहस्तानें ती मूर्ति उतरवून त्याला मुक्त केलें. वाड्यांतील तुलसीवृन्दावनाशेजारीं असलेल्या कट्ट्यावर प्रथम हा मारुति

वसविला होता. पुढें दादामहाराजांनीं गांवच्या पश्चिम बाजूस हल्लीं असलेल्या देवळांत या मारुतीची स्थापना केली. हें देऊळ दादामहाराजांनीं आपल्या खास देखरेखीखालीं तयार केलें. अशा रीतीनें हळू हळू देवाल्याच्या रूपानें पक्क्या चुनेगच्ची इमारतीस प्रारंभ झाला. सर्वेश्वर व मारुति यांच्या पूजेचीहीं व्यवस्था लागली. हा मारुति प्रथमपासून फारच जाज्वल्य असल्याबद्दलची प्रसिद्धि होती. त्याचा अनुभव लोकांना येऊं लागला. पूजारी लोकांच्या चुकांबद्दल प्रायश्चित्त मिळूं लागलें. कोणी पूजारी टिकेना. शेवटीं प्रभूंनीं मारुतीला शांत करून सर्वांची भीति दूर केली.

हळू हळू माणिकनगरची वस्ती वाढूं लागली. कल्याणची कांहीं मंडळी कायम येथें राहण्याच्या हेतूनें आली. हरिनाथ प्रसाद या नांवाचा एक कनोजी ब्राह्मण येथें येऊन प्रभुसेवेंत राहिला. लहानपणीं प्रभूच्या संगतींत यानें अनेक खेळ केले होते व प्रभूंच्या अलौकिक सामर्थ्याची प्रतीति आली असल्यामुळें प्रभूंशिवाय दुसरा देव नाहीं अशी त्याची भावना झाली होती. प्रभूंच्या ठायीं त्याचें अकृत्रिम प्रेम होतें. त्याचें कुटुंबही येथेंच होतें. गरोदरपणामुळें दुसरीकडे कोठें तरी नेऊन ठेवावें असें मनांत आणून तो गडवंतीस जागा पाहावयास गेला असतां येथें त्याची पत्नी प्रसूत झाली; मुलगा झाला. परत येऊन पाहातो तों प्रभुमहाराजांच्या आज्ञेनें सर्व व्यवस्था उत्तम प्रकारें झालेली दिसून आली.

स्वतः प्रभु त्याच्या घरीं गेले होते, असें म्हणतात. आपल्या प्रेमळ भक्ताची अशा रीतीनें सर्व प्रकारें काळजी वाहणारा प्रभु कशाही प्रसंगीं आपणास विसरत नाहीं अशी सर्वांची खातरी झाली.

वृषजा व गुरुगंगा या दोन लहान नद्या माणिकनगरच्या पूर्वेस एकत्र होऊन त्यांचा संगम झाला. हें स्थान सांप्रत फार रम्य बनत चाललें आहे. दोन नद्यांमधील जमीन अत्यंत सुपीक असल्यामुळें तेथें आंब्याचीं व इतर झाडें लावून सुशोभित करावीं अशी कल्पना दादामहाराजांस होऊन त्याप्रमाणें त्यांनीं झाडें लावण्यास सुरवात केली. वासगी काळप्पा नांवाच्या एका वैश्य शिष्यानें संगमावर शंकराचें मंदिर उभारलें. तडीतापडी, गोसावी, वैरागी व साधु लोकांकरितां येथें उतरण्याची सोय झाली. ही भूमि स्वाभाविक तपानुकूल असल्यामुळें शेंकडों तपस्वी लोक येथें येऊन उतरूं लागले. अशा प्रकारें सर्व प्रकारच्या लोकांची व्यवस्था होऊन माणिकनगर हें सर्वांचें आकर्षक स्थान बनलें. मुसलमान लोकांकरितां नगरच्या उत्तर दिशेकडे टेकडीवर एक स्थान नेमून देऊन प्रभूंनीं आपल्या टोपीचा प्रसाद ठेवून त्यावर छल्ला बांधविला.

याप्रमाणें दिवसेंदिवस सर्व गोष्टींची पूर्तता होत चालली होती. व्यावहारिक बाबतींत प्रभु कधींही फारसें मन घालीत नसत. तथापि हे त्रिवर्गबंधु एक विचारानें वागून

माणिकनगरच्या शाश्वततेची बळकटी करीत होते. या त्रिमूर्तींत प्रभुमहाराजांकडे खरें पारमार्थिक श्रेष्ठत्व होतें,तरी व्यवहाराच्या दृष्टीनें त्यांच्या उभयतां बंधूंचें महात्म्य सामान्य लोकांस पटण्यासारखें होतें. प्रभूंप्रमाणेंच त्यांच्या ज्येष्ठ व कनिष्ठ बंधूंना मान देणारे लोक सर्वच होते. त्यांच्यामध्यें भेदबुद्धीनें कोणीं पाहिलें नाहीं. कारण हे त्रिवर्ग परस्परांशीं अत्यंत प्रेमपुरःसर आदरानें वागत असत. वयपरत्वें भासमान होणारा लहान-मोठेपणा मनांत न आणतां अकृत्रिम प्रेमळपणानें परस्परांशीं वागून माणिकनगरच्या उत्कर्षाकरितां सर्व बाजूंनीं झटत. माणिकनगरची स्थापना करतेसमयीं तात्या महाराजांचें वास्तव्य या ठिकाणीं होऊन या संस्थानचा कारभार ते आपल्या अंगावर घेतील अशी कोणासही कल्पना नव्हती. कारण प्रथमपासूनच त्यांची स्थिति आपल्या उभय बंधूंहून वेगळी होती. दादामहाराज व प्रभु यांच्याप्रमाणें ते विरक्त ब्रह्मचारी नव्हते. दादामहाराजांना लग्नाचा संस्कार झाला असला, तरी अल्पवयांतच कुटुंब निवर्तल्यामुळें ते जसेच्या तसेच मौनी ब्रह्मचारी राहिले. तात्यामहाराज मात्र गृहस्थाश्रमाच्या फेऱ्यांत सांपडले. आतां तर ते पक्के गृहस्थ बनले. गृहस्थाश्रमाला अनुरूप अशी साधनसंपत्ति त्यांना अनुकूल होती. कुटुंब सात्त्विक व अर्ध्या वचनांत राहणारें लाभलें होतें. तारुण्य अंगांत मुसमुसत होतें व ईशकृपेनें शरीराची ठेवण गोंडस व रूपसंपन्न अशी होती. व्यावहारिक शिक्षण उत्तम रीतीनें

झालें असल्यामुळें बुद्धिमत्ता सतेज झाली होती. त्यांचें वाङ्मयविषयक शिक्षणही बऱ्याच उच्च दर्जाचें होतें. त्यांनीं केलेलीं अष्टकें व पदें त्यांच्या तद्विषयक दांडग्या व्यासंगाची साक्ष पटवितात. व्यवहारकुशल मनुष्यास अवश्य अशी सर्व सामुग्री त्यांच्याजवळ भरपूर होती. नबाबाच्या दरबारांत त्यांचा मानमरातब वाढत चालला होता, आणि आबालवृद्धापर्यंत ते प्रिय झाले होते. भावी महत्त्वाकांक्षा सफल होण्याचीं चिन्हेंही स्पष्ट दिसत होतीं. अशा वैभवसंपन्न स्थितींतून ते माणिकनगरच्या फकिरी दरबारांत येऊन राहतील अशी कोणास कल्पना होणार ? कल्याणास वैभवशिखरावर राहूनच माणिकनगरास येऊन-जाऊन व्यवस्था पाहतील अशी सर्वांची अटकळ होती. 'नोकरीचा राजिनामा देऊन निघून आलों' असें त्यांनीं कोणास सांगितलें नव्हतें. दादामहाराजांना हें माहित नसल्यामुळें कुटुंबास घेऊन कल्याणास जाण्याविषयीं त्यांनीं त्यांस कळविलें. येथून लौकर जाण्याचा त्यांचा हेतु दिसेना. नोकरीवर लवकर रुजू होण्याविषयीं प्रभूंकडून सूचना देवविली;पण स्वस्थच. मातु:श्रींनीं गोष्ट काढली, पण उपयोग झाला नाहीं. तात्यानें उत्तम प्रपंच करावा, लौकिक व संपत्ति मिळवावी व सुखानें कालक्रमणा करावी, अशी मातु:श्रीची अपेक्षा होती. येथें जंगलांत फकिरांच्या गोटांत आणि गवताच्या झोंपडींत आपल्या तरुण

पत्नीसह तात्यानें राहावें आणि ऐहिक सौख्याला पराङ्मुख व्हावें अशी मातु:श्रींना इच्छा नव्हती. दोन पुत्र पारमार्थिक वैभव अनुभवीत होते, तेवढें बस्स होतें. प्रपंचाकरितां तिसरा पुत्र होता, त्यानें तरी सुखांत राहून संसार करावा अशी त्या माउलीला तीव्र उत्कंठा होती. पण दिवसेंदिवस तात्या कल्याणास परत जाण्याचें नांव काढीत नाहीं असें पाहून तिला चिंता उत्पन्न झाली. एकवार या गोष्टीचा उलगडा व्हावा अशा हेतूनें प्रभुसंनिध ही गोष्ट काढली. प्रभूंनीं तात्यास बोलावून चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्या. शेवटीं तात्यामहाराजांनीं उत्तर दिलें, " आपल्यासारखे जगद्वंद्य बंधु व परमपूज्य मातु:श्री यांना सोडून आतां मी कोठें जावें ? आपल्या सर्वांची सेवा करणें हा माझा धर्म आहे व आपल्या सन्निध असल्याशिवाय सेवा तरी कशी घडावी ? याकरितां आपल्या सर्वांचे चरण सोडून मी आतां कोठेंही जाणार नाहीं. नोकरीचा राजिनामा तर मी मागेंच देऊन इकडे निघून आलों आहें." या उत्तरानें मातु:श्रींची निराशा झाली,तरी तात्याच्या चिरकालीन सहवासाच्या कल्पनेनें एकप्रकारें समाधानच झालें.

इकडे कल्याणच्या नबाबास तात्यामहाराजांना सोडावें असें वाटत नव्हतें. नबाब त्यांच्यावर फारच खुष होता. अशा सर्वगुणसंपन्न मोहऱ्यास हातचें सोडावें हें त्याला बरें वाटेना. त्यानें राजिनामा मंजूर न करितां काम संपल्यावर

ताबडतोब कामावर हजर राहण्यास कळविलें व पुढील बढतीची आशा दाखविली. आणि मोठ्या आर्जवयुक्त पत्रानें त्यांचें मन वळवून नोकरीवर आणण्याचा प्रयत्न केला. आपला हेतु अशा रीतीनें सफल होत नाहीं असें पाहून भीड घालण्यास मुद्दाम मनुष्य पाठविला. तात्यामहाराजांचा निश्चय कायम होता. कोणत्याही रीतीनें कां होईना, तात्यामहाराज एकवार कल्याणास आल्यास आपण हरप्रयत्नानें त्यांचें मन वळवूं अशी नबाबास उमेद होती. पण कोठेंही जमेना हें पाहून हिशेबाची रुजवात देण्याकरितां म्हणून तरी येण्याचा तगादा सुरू केला. खासगी रीतीनें चालविलेले सर्व प्रयत्न व्यर्थ गेल्यानंतर जरा उग्र स्वरूप धारण करून सरकारी रीतीनें हुकूम सोडण्याचा सल्ला कांहीं मुत्सद्दी लोकांनीं दिल्यावरून नबाबानें त्याप्रमाणें हुकूम सोडला. पण हुकमाची अमंलबजावणी कशी करावयाची? तात्यामहाराज सर्व व्यवहार जाणत होते. त्यांनीं नबाबाची युक्ति ओळखून तीही निष्फळ केली. अशा रीतीनें तात्यामहाराजांचें कायम वास्तव्य घडून आलें.तात्यासाहेबांच्या प्रयत्नानें माणिकनगरच्या लोकांना शिस्त लागून संस्थान दरबारी थाटाचें बनलें.

आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक ताप नाहींसे करून सर्व बाजूंनीं स्वास्थ्य मिळून भक्तजनांचें परिपालन

करण्याचें काम या त्रिवर्ग बंधूंनीं श्रमविभागाच्या तत्त्वावर वांटून घेतलें. या वेळीं अनेक प्रकारचे लोक नगरांत नित्यशः येऊं लागले. येणाऱ्या लोकांच्या अन्नोदकाची तरतूद दादामहाराज लावीत असत. स्त्री-पुरुष, मुलेंबाळें, वगैरेंच्या गरजेच्या गोष्टी पुरविण्याचें काम त्यांनीं पत्करिलें होतें. लहान मुलांकरितां दुधाचा पुरवठा त्यांनीं स्वतः करावयाचा, सूर्योदयापूर्वीं गायीचें दूध मिळवून तान्ह्या मुलांना पुरेसें वांटावयाचें. मुलाबाळांची आई दुधाकरितां वेळेवर आली नाहीं, तरी बिऱ्हाडीं दूध पोंचतें करावयाचें, हा त्यांचा नियम असे. अन्न खाणाऱ्या अर्भकांकरितां सकाळच्या वेळीं भाताकरितां तांदूळ द्यावयाचे! जेवण करणाऱ्यास भंडारखान्यांत नेऊन पोटभर अन्न खाऊं घालावयाचें, न जेवणाऱ्यांकरितां शिधासामग्री देऊन त्यांची सोय लावून द्यावयाची आणि धोतरें, अंगरखे, रुमाल, घोंगडीं, लंगोटया इत्यादि वस्त्रांचा गरजेप्रमाणें पुरवठा करावयाचा, हें काम त्यांनीं पत्करिलें होतें. आल्यागेल्याच्या अन्नाच्छादनाची व जागेची सोय लावून देण्याचें काम दादामहाराजांचें असे व तें त्यांनीं अत्यंत कळकळीनें व हौसेनें करावें असा नित्याचा क्रम असे. गोसावी, वैरागी, साधु, सन्यासी वगैरे लोकांच्या झुंडीच्या झुंडी नित्य दर्शनास येत. त्यांना लागणाऱ्या सर्व वस्तु दादामहाराज पुरवीत असत.

नगरांतील शिपाई लोक, नोकरचाकर यांवर देखरेख तात्यामहाराजांनीं करावी. ते लहान वयापासून राजदरबारांत

वागत असल्यामुळें शिस्त, सुव्यवस्था, दरबारी थाट व ऐषआराम यांचे ते भोक्ते असत. संस्थानला दरबारी वळण लागलें तें त्यांच्याचमुळें होय. लोकांना तात्यामहाराजांचा फार दरारा असे. शिस्त बिघडलेली त्यांना मुळींच खपत नसे. योग्य शासन करून चूक दुरुस्त करून घेण्यांत ते कधींही आळस करीत नसत. तात्यासाहेबांचें वास्तव्य वर निर्दिष्ट केलेल्या प्रसंगामुळें येथें कायम झाल्यापासून माणिकनगरास एखाद्या लहानशा राजधानीचें स्वरूप प्राप्त झालें. जिकडे तिकडे व्यवस्था लागण्यास फार दिवस लागले नाहींत. लोकांत परस्पर तंटे न होतील अशी दक्षता त्यांनीं ठेविली. यदाकदाचित् तंटा झाल्यास योग्य न्याय करून शक्य तितका दोघांत समेट करावयाचा, हें त्यांचें तत्त्व होतें. नगरवासी जनांच्या नुकसानीची बाब शक्यतोंपर्यंत घडूंच नये असा योग्य बंदोबस्त त्यांनीं राखिला होता. नगरच्या पूर्व व पश्चिम वेशीवर चौकी ठेवून नियमितपणें पाहरा राहील अशी व्यवस्था करून बाकी जरूरीच्या कामावर योग्य इसमांची नेमणूक करून दिली. प्रभूंच्या छपराजवळ पहारा ठेवण्यांत आला. द्वारपाळाचें काम पदमसिंग करीत असे असें मागें आम्हीं कळविलेंच आहे. एकंदरींत कारकून, शिपाई, पहारेवाले व हजरपेशीचे लोक यांवर योग्य रीतीनें नजर राहून सर्व कारभार ते उत्तम रीतीनें पाहत.

माणिकनगरांतील व्यावहारिक उपाधींपासून प्रभु अगदीं अलिप्त होते. त्यांनीं याविषयीं कधींच काळजी केली नाहीं

व काळजी करण्याचें कारणही या उभय बंधूंनीं ठेविलें नाहीं. आल्यागेल्याची सरबराई अथवा सरकारदरबार यांसंबंधानें प्रभु निष्काळजी होते. आर्तांचें दुःख निवारण करणें, जिज्ञासूंची ज्ञानपिपासा तृप्त करणें व अर्थार्थी लोकांना द्रव्य देऊन संतुष्ट करणें हीं महत्त्वाचीं कामें प्रभूंनीं आपल्याकडे घेतलीं होतीं. प्रभूंचा कीर्तिपरिमळ सर्व प्रांतांत दरवळून हजारों लोक नित्य दर्शनास येत व आपआपल्यापरीनें संतुष्ट होऊन परत जात. लोकांचें अंतरंग ओळखून प्रभूंनीं त्यांचें ईप्सित पूर्ण करीत असावें, हा नित्याचा परिपाठ असे. प्रभूंचें चरित्र भक्तांच्या कामना पूर्ण करण्याच्या अद्भुत अशा अनंत कथांनीं भरलें आहे. या सर्व कथांचा संग्रह या ठिकाणीं केल्यास हा चरित्रग्रंथ अत्यंत विस्तृत असा होईल. करितां अत्यंत उद्‌बोधक व महत्त्वाच्या तेवढ्या गोष्टी आम्हीं या ग्रंथांत देणार आहों. एके ठिकाणीं कायम वास्तव्य झाल्यापासून प्रभूंकडे नित्य अतोनात गर्दी लोटूं लागली. काशीपासून रामेश्वरपर्यंत प्रभूंचा जयजयकार पोंचला होता. यात्रेकरू मुद्दाम वांकडी वाट करून येथें येत असत व प्रभूंचा दिव्य प्रसाद समागमें घेऊन जात. प्रभु सार्वकाळ आत्मरूपांत निमग्न राहून आत्मानंदांत डुलत राहत असत. कोणत्याही प्रसंगानें त्यांच्या स्वरूप स्थितींत बदल झाला नाहीं. तथापि आपल्या भक्तांवरील सर्व संकटांचें ओझें आपल्या शिरावर घेऊन त्यांनीं सर्वांस निर्भयता दिली होती. हिंदु, मुसलमान, शीख,

लिंगायत, जैन इत्यादि अनेक मतांच्या व धर्मांच्या लोकांनीं प्रभूंच्या दर्शनास मोठ्या प्रेमभावानें यावें. प्रभूंजवळ आपपर भाव मुळींच नव्हता. त्या सर्वांच्या प्रेमाला ते भुकेले होते. कनिष्ट, श्रेष्ठ, गरीब, श्रीमंत, सामान्य जनता व अधिकारी, लहान बालक व वयोवृद्ध यांच्याशीं समान आत्मीय भावानें व प्रेमानें वागून ते सर्वांचें चित्त कसें आकर्षण करून घेत हें आपण आतां यापुढें पाहूं.





# प्रभु दरबार

दरबार या शब्दानें सामान्य जनांच्या मनांत जो अर्थ सूचित होतो, त्या प्रकरचा दरबार, प्रभुनगरांत भरत होता कीं काय, अशी शंका साहजिकच उद्भवते. आधिभौतिक सत्ता व आध्यात्मिक सत्ता, ज्याप्रमाणें परस्पर भिन्न असतात, त्याप्रमाणें यांचे दरबारही भिन्न स्वरूपाचेच असतात. माणिकनगरचे हे दरबार केवळ आध्यात्मिक स्वरूपाचे असत. यांतील घटकांचा मुख्य उद्देश, प्रभुदर्शनानें पुनीत होण्याचा असल्यामुळें, याची रचनाही भिन्न असे. तथापि राजदरबारांतील कित्येक गोष्टींचें यांत साम्य असे हें पूर्वींच्या काळच्या राजेरजवाड्यांच्या दरबाराचीं वर्णनें वाचणाराला दिसून येण्यासारखें आहे. माणिकनगरच्या दरबारची शिस्त, तात्या महाराजांनीं बसविली असल्याचा पूर्वीं उल्लेख केला आहेच. यामुळें त्याला राजकीय दरबारचें बाह्यात्कारी स्वरूप आलें होतें; तरी पण आध्यात्मिक श्रेय साध्य करण्याच्या हेतूनें जमा झालेला लोकसमुदाय ह्याच या दरबारचा मुख्य घटक. प्रभुदर्शनास अनेकविध लोक येत असत. त्यांच्या दर्शनाची

कांहीं तरी व्यवस्थित सोय लावून देण्याचें काम कारभारी मंडळाकडे होतें. येथील दरबार अशा रीतीनें विशेष प्रसंगीं बराच वेळ भरत. उत्सवानिमित्त अथवा सणानिमित्त भरलेल्या दरबाराशिवाय विशेष कारणाकरितां भरलेल्या दरबारांत कालमर्यादा घालण्यांत येत नसे. बहुधा पुष्कळ लोकसमुदाय प्रभुदर्शनाकरितां उत्सुक आहे असें आढळून आल्यास असे विशेष दरबार भरत.

दरबारची एकंदर रचना व्यवस्थेशीर होती. एक विस्तीर्ण मंडप उभारला होता. त्याच्या एका बाजूच्या मध्यभागीं पूर्वेकडे तोंड करून एक कमरेइतका कट्टा तयार केला होता. त्या कट्टयावर प्रभुमहाराजांची बैठक असे. उत्तम किनखापी गादी, पाठीमागें तक्क्या, दोन बाजूंस गिर्द्या यांनीं युक्त अशी बैठक, एका सुंदर चारजाम्यावर मांडली जात असे. प्रभूंच्या पर्णकुटीजवळच हा कट्टा असून त्यावर गादी घालीत असत. आज रोजीं विस्तीर्ण व सुंदर असा सभामंटप उभा आहे, तीच पूर्वींच्या दरबारची जागा होती, असें म्हणतात. कट्टयाच्यापुढें दोन बाजूंस दोन छडीदार उभे राहत. दरबारी मंडळी जमल्यानंतर 'भक्तकार्यकल्पद्रुमादि' ब्रीदावळीच्या जयघोषांत प्रभुमहाराजांची स्वारी बाहेर येऊन गादीवर बसत असे. प्रभु येतांच सर्वांनीं उभें राहून ताजीम द्यावी व नमस्कार करून आपल्या स्थानीं बसावें अशी शिस्त होती. गृहस्थ

लोकांकरितां समोरील भागांत जागा असे. संन्यासी शास्त्री, वैदिक, पुराणिक, हरिदास इत्यादि लोकांकरितां प्रभूंच्या कट्टयाच्या उजव्या बाजूस जागा राखून ठेविलेली असे. दुसऱ्या बाजूस साधु, बैरागी, गोसावी, फकीर यांना जागा असे. समोर गवई, बजवय्ये, कंचन्या इत्यादि नृत्यगायनकुशल लोकांनीं बसावयाचें. दरबार म्हणजे वरील सर्व लोकांचा समुदाय ज्या ठिकाणीं एकत्र जमून आपापलें गुणप्रदर्शन करीत प्रभुदर्शन व प्रसादाचा लाभ करून घेत, असें महत्त्वाचें स्थान होय. असे दरबार सांप्रत काळींही विद्यमान प्रभूंच्या कारकीर्दींत वर्षांतून अनेक प्रसंगीं पाहावयास सांपडतात. या दरबारचें वर्णन व एकंदर परिस्थितीचें शब्दचित्र पूर्वींच्या चरित्रलेखकांनीं मोठ्या रसाळ वाणीनें दिलें आहे.

प्रभूंचा दरबारी पोषाख कांहीं ठरलेला नव्हता. वेळेवर लहरीस येईल त्या थाटांत ते दरबारांत बसत असत. कधीं डोकीस उत्तम भरजरी मंदील असे, अंगांत उंच प्रतीचा अंगरखा, गळ्यांत मोत्यांचे हार, कानांत कर्णभूषणें, शिरपेंच, व तुरा पागोट्यास खोंवलेला व डोळ्यांत सुरमा घालून हुक्का पीत बसलेले दिसत असत. कधीं अंगांत कफनी व डोकीवर ताज घालून साध्या पोषाखांत दिसत. या पोषाखाचें ओंवीबद्ध वर्णन एका चरित्रकारानें थोडक्यांत दिलें आहे तें असें:—

केव्हां उंच भरजरी रुमाल शिरीं ।
अंगीं डगलें उंच मुशजरी ।
केव्हां कफनीच साधी खरी ।
केव्हां ताजचि बांधिती ॥ १ ॥
केव्हां मंदिल उंच मोलाचा ।
कंठीं हार हिऱ्याचा ।
शिरपेंच हिरे माणकाचा ।
हातीं कडें शोभत ॥ २ ॥
कांसे कसूनि पीतांबर ।
पिंवळा दुशाला खांद्यावर ।
ऐसेपरी नानाप्रकार ।
समारंभ भोगिती ॥ ३ ॥
नानापरी अलंकार ।
वस्त्रेंहि तैसींच अंगावर ।
कांनीं कुंडल मनोहर ।
ऐसे पोषाख वेगळाले ॥ ४ ॥
दिवसांतून चार वेळां ।
वेष करिती निरनिराळा ।
चहूंकडे जन मेळा ।
दर्शनें हर्षित होतसे ॥ ५ ॥

प्रभूंची मूर्ति नयनमनोहर होती असें प्रत्यक्ष दर्शन घेणाऱ्यांनीं लिहून ठेविलें आहे. साधारण गौरवर्ण असून चेहरा दरदरीत होता. शरीराची ठेवण प्रमाणबद्ध होती. अत्यंत विलक्षण असें त्यांचें दिव्य तेज सर्वांचें अंतःकरण आपल्याकडे ओढून घेत असे.भाषण अत्यंत मृदु पण मार्मिक

असें होतें.निसर्गदत्त तेज:पुंज अंगकांतीस विविध अलंकारांची जोड मिळून प्रभूंचें स्वरूप दैदीप्यमान होत असे.

या दरबारांत नृत्यगायनादि ललितकलांचें प्रदर्शन भरपूर असे. त्यांतल्या त्यांत शास्त्री लोकांचा वादही चाले. वैदिकांचे मंत्र सुरूं होत व वेदांतचर्चाही निघे. दर्शनास आलेल्या लोकांची विचारपूस चाले व प्रसाद देण्याचें काम सुरू असे. हे दरबार म्हणजे शतावधानाचे मूर्तिमंत प्रयोगच होत असा अनुभव आजरोजींही येत आहे. एकसमयावच्छेदेंकरून प्रभूंचें लक्ष सर्व कार्यक्रमाकडे असे. शास्त्रवादांत प्रभूंचें लक्ष आहे असें पाहून गवई गाण्यांत कसूर करूं लागला कीं, प्रभूंनीं तिकडे दृष्टिक्षेप करून, माझें तुझ्याकडे लक्ष आहे अशी त्याला सूचना द्यावयाचीच. प्रत्येक प्रसाद घेणाऱ्याचें अंत:करण ओळखून त्याच्या खुणेच्याच गोष्टी बोलून प्रसाद द्यावयाचा. सारांश, प्रत्येक व्यक्तीच्या अंतरंगाशीं समरस होऊन सर्वांना संतोषित ठेवण्याचा दरबार हा अपूर्व प्रसंग असे.

अशा या दरबारची बैठक अनियमित कालपर्यंत चाले. समाजाच्या कमीअधिक प्रमाणावर दरबारची कालमर्यादा असे. सर्वांना प्रसाद, देणगी, बिदागी, संभावना वगैरे पोंचल्या-नंतर दरबार बरखास्त होई. कित्येक प्रसंगीं तीन-तीन दिवस अहोरात्र या दरबारचें काम चाले. प्रभूंची बैठक व आसन तीन तीन दिवस न ढळतां कायम असे.सहा दिवस

सारखा दरबार चालू असल्याचा एक प्रसंग बरेच लोक सांगतात.

प्रभुदरबारचें दोन-तीन लेखकांनीं वेळोवेळीं केलेलें वर्णन आमच्या वाचकांनीं अवश्य पाहावें म्हणून आम्ही त्या त्या लेखकांच्या शब्दांतच देत आहों. यावरून प्रभुदरबारची कल्पना चांगली होऊन संस्थानची व्यवस्था कशा प्रकारची असे याचेंही ज्ञान होणार आहे.

प्रभूंच्या एका हस्तलिखित चरित्राचा कांहीं भाग सांपडला आहे. या लेखकाचें नांव गांव आम्हांस माहीत नाहीं;तरी पण त्यानें केलेले परिश्रम कौतुक करण्यासारखे आहेत. खालील त्याच्या लेखांतील उताऱ्यावरून संस्थानचा दरबारी थाट व एकंदरींत रीतरिवाज कशा प्रकारचे होते याचा उलगडा होणार आहे, म्हणून आम्हीं तो देत आहों.

" तात्यासाहेब प्रथमपासून राजदरबारांत वागल्यामुळें आतां प्रभूंच्या दरबाराची यथायोग्य व्यवस्था करून सोडण्यास त्यांना फारसे श्रम अगर विचार करावा लागला नाहीं. कोणी प्रभूंचें केव्हां व कशा प्रकारें दर्शन घ्यावें, कशा मर्यादेनें बसावें व वागावें, कोणी स्वतः येण्यास असमर्थ असला तर त्याचा विनंतिअर्ज प्रभूंजवळ कोणी व कसा गुदरावा, कचेरींत कोणी निंद्य वर्तन केल्यास त्याचा बंदोबस्त कोणी ठेवावा, अशा प्रकारच्या सर्व कामावर निरनिराळ्या हुषार व योग्य मनुष्यांची योजना केली. प्रभूंचें दर्शन होण्याची किंवा सभेंत

चाललेलें भाषण ऐकूं जाण्याची अडचण पडूं नये व ज्याला त्याला आपल्या योग्य ठिकाणीं बसतां यावें अशा प्रकारची दरबारची जागा त्यांनीं तयार केली. या दरबारचें ठिकाण म्हणजे हल्लीं प्रभूंच्या देवालयांतील सुशोभित, आटोपसर व टुमदार दिसत असलेला सभामंटप हेंच होय. या वेळीं ही इमारत मात्र आतांप्रमाणें सुंदर पाषाणमय व पक्की नसून गवती छपराची बनविली होती. आजूबाजूची जागाही आतांसारखी आकुंचित नसून चारी अंगांना खुली असल्यामुळें हजारों लोकांचा एकाच वेळीं समावेश होण्यास कांहींच अडचण पडत नसे. मंटपाच्या मध्य भागीं एक छातीइतक्या उंचीचा कट्टा घातला होता. त्यावर गादी घालून तक्याला टेंकून प्रभु खुशाल डुलत बसलेले असावयाचे. यामुळें चारी बाजूंच्या कोणाही मनुष्यास त्यांची ती मनोरम मूर्ति दिसण्यास अडचण नव्हती. प्रभूंजवळ दोन छडीदार दोहों बाजूंस सर्वकाळ हात जोडून उभे असत. त्याप्रमाणेंच समोर कट्टयाखालीं दर्शनास येणाऱ्या लोकांना वाट दाखविण्यास व दुतर्फा बसलेल्या लोकांची मर्यादा राखण्यास चार चार हातांवर छडीदार तयार असत.उजवे अगांस संन्यासी, शास्त्री, वैदिक, ब्राह्मण या लोकांना बसण्याची सोय होती व डाव्या अंगाला स्त्रियाकरितां जागा ठेविलेली असे. प्रभूंसमोर नाना जातींचे गृहस्थ लोक, साधुसंत, गोसावी, बैरागी, फकीर फुकरा अशा लोकांचा हमेषा मोठा समाज बसलेला असून, त्यांच्या

कृपाप्रसादाकरितां ज्याचात्याचा आपापल्या परींनें प्रयत्न चालू असावयाचा. कंचन्याचा नाच चालू असावयाचा, कोणी गवई आपल्या रागरागिणीयुक्त गाण्यानें आणि बजवय्या तबला, पखवाज, बीन, रुद्रवीणा, सतार, सारंगी वगैरे वाद्यें वाजवून, आपल्या हस्तकौशल्यानें साधारण लोकांनाही तल्लीन करून बसवीत असावयाचे. पुराणिकांनीं पुराण सांगावें, वैदिकांनीं वेदघोष करावा, शास्त्रीपंडितांची 'घटपटवादाची लट पटी हमरी तुमरी चाललीच आहे." असे नाना प्रकार दरबारांत हमेषा सुरू असत. स्वतः जरी प्रभु उगीच डुलत बसलेले किंवा कोणाच्या चौकशींत गुंतलेले आहेत असें दृष्टीस पडे, तरी एखाद्या अष्टावधान्याप्रमाणें या सर्व प्रकारांकडे त्यांचें पूर्ण अवधान व लक्ष असे. आपण कायावाचामनानें प्रभूंची सेवा करीत आहों, पण आपल्याकडे त्यांची नजर केव्हां फिरेल अशी शंका ते कोणाच्या मनांत फार वेळ कधींच राहूं देत नसत. त्यांचा स्वतःचा कांहींही उद्योग चालला असला, तरी मधून मधून, निरनिराळ्या सेवेकऱ्यांना त्यांच्या त्यांच्या कामांतील न्यूनाधिक प्रकाराबद्दल विचारपूस करीत व मर्जीप्रमाणें सूचना किंवा शाबासकी तात्काळच देऊन टाकीत. केवळ कामनिक इच्छा विनंती करून घेणारे, निरनिराळ्या विषयांचे शेंकडों याचक लोक नित्य प्रभूंसमोर उभे असत. पण तितक्यांच्याही मनांतील एकेक तरी खुणेची गोष्ट सांगून त्याचें त्यांनीं समाधान

केलें नाहीं, असा एकही मनुष्य दरबार बरखास्त होईपर्यंत शिल्लक राहत नसे. यामुळें कित्येकांची इच्छा जरी तात्काल पूर्ण झाली नाहीं, तरी माणिकनगरांत वसति करणाऱ्या कोणत्याही मनुष्यास मनाची तळमळ कोणत्याच वेळीं अनुभवावी लागत नसे. जो तो प्रभूंचे गुणानुवाद वर्णन करीत आनंदानें आपला उद्योग करीत असावयाचा. दरबारानंतर प्रत्येक आपापली गोष्ट सांगण्यात व ऐकण्यांत दंग राहण्याची, तर जो तो आपल्यास पटलेली गोष्ट अधीरतेनें सांगण्याची धांदल बराच वेळ चालू असे.

खावयास कोणास मिळालें नाहीं ही गोष्ट तर काय, पण कोणी कोणत्याही कारणानें उपोषित राहिला तर तें सुद्धां प्रभूंना मुळींच सहन होत नसे. आपण प्रत्यहीं निद्रिस्त होण्यापूर्वीं, या गोष्टीचें ते कोणत्याही तऱ्हेनें निवारण करीत. अगोदर या कामीं दादासाहेबांची पराकाष्टेची दक्षता असेच. हजारों लोक एखाद दिवशीं जमले, तरी ते स्वतः समक्ष कंबर बांधून उभे राहून ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें सर्वांची खाण्यापिण्याची व्यवस्था करून सोडीतच. पण त्यांतही कोणी हटवादीपणानें किंवा कोणी प्रभूंकडे असलेल्या कामाच्या उद्वेगानें उपास करी, तर प्रभूंनीं रात्रौ गुप्तपणें तो असेल त्या जागीं जावें आणि त्याला खरें वाटेलसें सोंग दाखवून व त्याच्या मनांत भरलेला वैताग उपदेशपर भाषणानें काढून टाकून त्याला खावयास लावीत. कित्येकदां तर त्यांनीं रात्रीं कोणी

कोठें उपाशीं तळमळत पडला असला तर त्याचा ठावठिकाणा व नांवगांव दरबारांतील कोणास तरी सांगून समक्षच बोलावून आणवावें व सर्व लोकांसमक्ष त्याच्या मनांतील गुप्त खुणा सांगून त्याचें समाधान करावें, असाही प्रकार होत असे. प्रभूंच्या दरबारांत एक दिवस जरी कोणी समंजस मनुष्य राहिला तरी प्रभु सर्वज्ञ किंवा अंतर्ज्ञानी आहेत, या गोष्टीची त्याला पूर्ण प्रतीति आल्याशिवाय बहुधा कधीं राहत नसे. कारण प्रभूंची वृत्ति सदासर्वकाळ आनंदी व विनोदी असल्यामुळें त्यांच्या भाषणांत किंवा कृतींत अशा गोष्टी क्षणोक्षणीं घडत. आपल्या दर्शनासाठीं दूर ठिकाणाहून कोणी गृहस्थ आला असून वाटेंत त्याच्या स्मरणांत राहण्यासारख्या कांहीं गोष्टी घडल्या असल्यास त्यानें त्या सांगण्याच्या अगोदरच प्रभु त्याला त्यासंबंधानें विचारपूस करीत. यामुळें सर्वांस मोठें नवल वाटावें आणि यामुळेंच प्रभूंच्या दरबारांत जरी प्रत्येक मनुष्य दुःखग्रस्त, शोकाकुल व कोणत्याही लाभाच्या उत्कट इच्छेनें आला असला, तरी असे प्रकार पाहतांच त्याला आपली इच्छा पूर्ण होणार असा पक्का भंरवसा पटून, तो आपली मानसिक व्यथा विसरून जाऊन आनंदानें तल्लीन होऊन जाई. प्रभूंचें भाषण नेहमी कोमल, रसभरित आणि ज्याच्याशीं बोलावयाचें त्याच्या मनावर पक्कें ठसण्यासारखें असे. ते ज्याच्या मनाचा कल जसा असेल, तसाच त्याशीं संवाद करून त्याच्या मनाला प्रोत्साहन देत. कोणाचा कसाही

प्रकारचा हेतु असला, तरी तो आपण पुरविणारच असें त्यांचें ब्रीद असल्यामुळें त्यांच्यापुढें विचारी व अविचारी अशा दोन्ही प्रकारचे स्तुत्य व निंद्य गोष्टींना सहाय्य मागणारे लोक येत. पण त्यांनीं अविचारी व निंद्य वर्तनाची इच्छा करणाऱ्या लोकांचाही कधीं मनोभंग होऊं दिला नाहीं; किंवा उघडपणें धिक्कार व निषेध केला नाहीं. प्रथम त्यांच्याच कृतीची प्रशंसा करून तिला आपली पूर्ण संमति दाखवावयाची इतकेंच नव्हे, तर तें कृत्य होईल तितकें लवकर घडून येण्याविषयीं उत्सुक करून सोडावयाचें आणि त्यांतल्या त्यांतच त्या दुष्कृतीचा परिणाम त्यांच्या मनांत ठसवून त्याचा विचार व बेत बदलण्यास लावावयाचें ही खुबी त्यांना सर्वोत्कृष्ट व सहजच अवगत होती.

अशा प्रकारच्या महात्म्याचे अगोदरच "मौने मौनी गुणिनि गुणवान् पण्डितः पण्डितेऽपि" अशा प्रकारचें वर्तन असतें. त्यांतही प्रभूंचा हा सगुण अवतार म्हणजे केवळ सर्व जगाच्या उद्धारासाठीं झालेला; मग ते ज्याच्यात्याच्या मनाप्रमाणेंच ज्याला त्याला तृप्त करून सोडणारच यांत आश्चर्य तें काय ! प्रभूंनीं धन, पुत्र, स्त्री अशा इहलोकविषयक संपत्तीच्या कामुक याचक जनांची इच्छा पूर्ण करण्याकरितां जणूं काय त्रिभुवनांत जें काय नवनिधि द्रव्य आहे म्हणून पुराणांतरीं सांगितलें आहे, तितक्या सर्वांचें भांडार रात्रंदिवस माणिकनगरांत उघडें करून ठेविलें आहे आणि स्वतः आपण बंधुद्वयासुद्धां सांगसपरिवार दातव्यशूर कर्णाच्याच

रूपानें अवतार धरिला आहे, असे त्यांच्या दरबारांत हमेषा हजर असणाऱ्या लोकांच्या तोंडानें नेहमीं उद्गार निघत. ऐहिक सुखाकरितां द्रव्य वगैरे मागणाऱ्या याचकानें आपली खरी हकीकत प्रभूला सांगितल्यावर, तें मागणें कितीही मोठें असलें, तरी प्रभूंच्या हातानें त्याची पूर्तता होण्यास फारशी अवधी लागत नसे. शेंकडों तर काय, पण हजारों रुपये प्रभु नित्यशः ज्याच्यात्याच्या मागणीप्रमाणें त्याला त्याला देऊन आपल्या ठिकाणीं परत रवाना करीत. मग त्या याचकाचा उद्देश यथायोग्य असो किंवा क्षुल्लक असो, त्याचा विचार करावयाचाच नाहीं. फक्त त्यांत सर्व खरेपणा असून लबाडी किंवा कपटभाव उपयोगी नाहीं. तसें कोणी कांहीं ढोंग केलें तर त्याची इच्छा वरपांगीं पूर्ण व्हावयाचीच. पण गुप्तपणानें भयंकर शासन झाल्याशिवाय राहत नाहीं, असा सर्वांना लौकरच शेंकडों गोष्टींत अनुभव येऊन चुकला !

एकदां एक घोडेस्वाराचें काम करणारा मनुष्य प्रभूंची कीर्ति ऐकून द्रव्याच्या लोभानें माणिकनगरास आला. आणि आपला घोडा एकाएकीं मेल्यामुळें आपली नोकरी सुटली आणि आतां बायकोमुलांसह आपल्याला उपाशीं मरावें लागत आहे; नवीन घोडा खरेदी करावा तर आपल्याजवळ पैसा नाहीं; तेव्हां सर्व कुटुंबाचे जीव वांचविण्याकरितां आपण आपल्या ब्रीदाप्रमाणें माझ्या योग्यतेसारखा घोडा विकत घेण्यास हजार रुपये मला दिले पाहिजेत, अशी मागणी घालून बसला. या लुच्च्यानें

आपला घोडा जवळपास लपवून ठेवून केवळ द्रव्यलोभानें खोटी बतावणी केली, ही गोष्ट प्रभूंना तेव्हांच कळून चुकली. तरी त्यांनीं ती त्याच वेळीं उघड तर केली नाहींच; पण उलट ही हकीकत ऐकून, त्यानें आपल्याजवळ येण्यास दिनावधि केल्याबद्दल हळहळ दाखविली ! परब्रह्म सद्गुरूचा नित्यानंदरूप झेंडा तुमच्याजवळ फडकत असतां तुम्हीं विनाकारण इतके दिवस हाल कां सोसलेत, सद्गुरु माणिकप्रभु यःकश्चित् घोडा काय पण नवखंड पृथ्वीचें राज्य मागितलें तरी देण्यास सिद्ध आहे; मागणारा मात्र पाहिजे ! अशा उदात्त भाषणानें त्याला खुष करून प्रभूंनीं उद्यांच तुम्हाला अगत्य असलेली रक्कम मिळेल असें वचन दिलें. आणि दुसऱ्या दिवशीं सकाळच्या प्रहरींच चारचौघांदेखत मुद्दाम त्याला आपल्याजवळ आणवून हजार रुपये मोजून त्याच्या पदरांत घातले ! तेव्हां त्याला मोठा आनंद झाला आणि आपल्या बुद्धिकौशल्याबद्दल धन्यता मानून मानभावीपणानें प्रभूंची स्तुति करून परत जावयास निघाला. इतक्यांत त्यानें घोड्याजवळ ठेविलेला मनुष्य रात्रौ एकाएकीं घोडा मेल्यामुळें, त्याचा शोध करीत दरबारांतच येऊन पोंहचला. त्याला ही आपल्या धन्याची लबाडी माहीत नसल्यामुळें, त्यानें तात्काळ भोळेपणानें रडून ओरडून घोड्याची हकीकत सांगितली ! ती ऐकतांच स्वार काळा ठिक्कर पडून गेला ! आपली लबाडी उघडकीस आली, आतां प्रभु काय

शासन करतात कोण जाणें, अशा धास्तीनें त्याची चित्तवृत्ति शून्यवत् होऊन गेली. तो धाडदिशीं निश्चेष्ट पडला. प्रभूंनीं लोकांकरवीं त्याला सावध केलें, आणि रागाचा संपर्कसुद्धां न दाखवितां चार बोधाच्या गोष्टी सांगून त्याचें सांत्वन केलें. 'एकूण कालपर्यंत तुमचा घोडा मेला नव्हता तर ! फक्त आपल्याला एक हजार रुपये मिळावेत एवढयाचकरितां तुम्हीं खोटें बोललां ? पण खोटें कां ? तुम्हीं नुसतेच रुपये मागतां, तर गुरुदरबारांत कांहीं मिळाले नसते काय ! असो; आतां काय, झालें तें झालें ! पण पुन्हा तरी असें करूं नका. तुमच्या इच्छेप्रमाणें रुपये मिळालेच आहेत. आतां पाहिजे तसा घोडा विकत घेऊन आपला धंदा चालवून निर्वाह करा' असें सांगून त्याला परत पाठविलें.

अशा प्रकारच्या पुष्कळ अनुभवांनीं लबाडयांचा बंदोबस्त आपोआपच झाला. प्रभूंजवळ आपण खरी खरी हकीकत सांगून कोणतीही मागणी केली तर आपली इच्छा पूर्ण होणार त्यांत एवढीसुद्धां लबाडी चालत नाहीं, अशी सर्व लोकांची खातरी होऊन चुकली. बाह्य रीतीनें चोरी लबाडी न होण्याबद्दल तात्यासाहेबांचा कडक बंदोबस्त व प्रभूंचें हें असें गुप्त रीतीचें शासन या दोहींचाही नेहमीं अनुभव येत असल्यावर मग लबाडी कोठून व्हावी ? जगांतील दुसरें मोठें पातक व्यभिचार. याबद्दलही प्रभूंच्या दरबारांत असाच पक्का बंदोबस्त होता. कोणाही स्त्रीला तिच्या मर्यादेसंबंधानें कोणाही

पुरुषाकडून थोडा सुद्धां उपद्रव लागूं नये याबद्दल दादासाहेब व तात्यासाहेब यांचीं नेहमी पूर्ण दक्षता असे एवढेंच नव्हे, पण स्त्रीपुरुषांनीं एकमेकांच्या खुषीनेंही अमर्यादेचें वर्तन केल्यास तें त्यांना सहन होत नसे. ते त्या दोघांनाही ताबडतोब भीडभाड न धरतां योग्य शिक्षा करीत. त्यांनीं आपण स्वतःही परक्या स्त्रियांशीं प्रत्यक्ष भाषणसंबंध करावयाचा नाहीं. ज्या कोणास काम पडेल तिनें व्यंकमाच्या मार्फत या उभयतांच्या कानांवर आपला मजकूर घालावा व यांनाच कांहीं कोणास सांगणें झाल्यास तेंही तिजकडून सांगावें असा प्रथमपासूनच शिरस्ता ठेविला होता. या बाबतींत खुद्द प्रभूचाही असाच वर्तनक्रम असे. त्यांकडील कामेंही बायकांना व्यंकमाच्या द्वारानेंच करून घ्यावीं लागत. प्रभु स्वतः कोणा बायका मनुष्याशीं भाषण करीत नसतच. एकट्या बाईस दर्शनास येण्याची सुद्धां मनाई होती. समक्ष दर्शन घेऊन कांहीं विनंति करावयाची असेल, तर त्या बाईनें आपला नवरा बरोबर घेऊन यावें; तो येण्यासारखा नसेल, तर तिनें व्यंकमाला आपली हकीकत कळवावी. व्यंकमानें प्रभूंना कळवून त्यांची आज्ञा होईल ती तिला परत कळवावी, इतका त्यांनीं कडक निर्बंध राखिला होता. हा दरबारांतील आबालवृद्ध स्त्रीपुरुष लोकांचा मर्यादशीलपणा, मुसलमानी रीतीप्रमाणें मोठ्या थाटाचा असे.

प्रभूंचें स्वतःचें भाषण नेहमी मंजुळ, हळूच हलक्या स्वरांत व्हावयाचें. रागाचे किंवा उद्धटपणाचे शब्द फारच विरळा,

किंवा नाहींतच म्हटलें तरी चालेल. लोक त्यांची सेवा करण्याकरितां हात जोडून कांहीं तरी आज्ञा होण्याची वाट पाहत उभे राहिलेले असत. पण 'अमुक एक काम कर' असें एकदम ते कधीं कोणास सांगत नसत. फार तर 'तें होईल काय ?' असें मोघम विचारीत, एवढेंच ! कपटभावानें कोणी ढोंगी किंवा प्रत्यक्ष मोठा गुन्हेगार त्यांच्यापुढें आला, तरी ते अशा शांत वृत्तीनेंच काय ती शिक्षा देत, आणि तीही फार सौम्यरीतीची व मनाला उदासीनता येण्यासारखी नसून, आपल्या हातून पुन्हा असा गुन्हा न घडावा असा मनाला बोध होण्यासारखीच असे.

अशा तऱ्हेनें हा मूर्तिमान दरबार दिवसांतून तीन वेळां व तीन ठिकाणीं भरे आणि त्यांत तिसऱ्या म्हणजे सायंकाळच्या मोठया कचेरींत मात्र पाहिजे त्या मनुष्याला सहज प्रवेश मिळत असे. बाकी सकाळच्या प्रहरीं प्रभु आपला प्रातर्विधि आटोपून ओसरीवर बसत, तेव्हां त्यांचे नेहमींच्या परिचयाचे हरहमेष कामकाज करणारे अशा लोकांना मात्र तेथें जाऊन आपापल्या कामाबद्दल विनंति करण्याची परवानगी असे. किंवा कारणपरत्वें प्रभु मुद्दाम कोणास बोलावून आणून त्याच्या कामाबद्दल काय ती आज्ञा करीत. ते खोलींत असले म्हणजे तर, अगोदर त्यांची आज्ञा घेतल्याशिवाय तेथें कोणालाच जातां येत नसे. चिमणाजी, व्यंकंमा, गोपाळबुवा लंगोटीरामा, रामाण्णा वगैरे निवळ खासगी रीतीनें प्रभूंची सेवा

करणारे लोक जरी आपापल्या कामाकरितां तेथें गेले तरी काम आटोपतांच विनाकारण दुसऱ्या गोष्टींची चवकशी करीत न बसतां, त्यांना तेथून आपल्या जागीं जाऊन बसावें लागे. दरवाजांत तात्यासाहेबांनीं कडक पाहारा रात्रंदिवस स्वतंत्र नोकर लोक ठेवून बसविला होता. यामुळें या गोष्टीचा सहजच चांगला बंदोबस्त राहत असे. प्रभु संध्याकाळच्या प्रहर-दीड प्रहर दिवसाच्या सुमारास बाहेर निघत आणि एक वेळ वाडीभोंवतीं फिरून हनुमंताच्या देवळांत जात. तेथें बहुधा साधुसंत, गोसावी, बैरागी लोक उतरलेले असत. त्यांत कांहीं कमजास्त गोष्ट दिसल्यास तिजबद्दल पूसतपास करीत आणि नंतर परत मंटपांत दत्ताच्या गादीजवळ स्वतःकरितां तयार असलेल्या आसनावर येऊन बसत. या वेळीं मात्र पाहिजे त्याला दर्शन घेण्यास व आपल्या कामाबद्दल विनंति करण्यास सरसहा परवानगी असे. प्रभु एकदां गादीवर येऊन बसले म्हणजे कितीही लोक दर्शनास आले तरी, तितक्यांची हकीकत ऐकून त्यांना कांहीं तरी यथायोग्य उत्तर दिल्याशिवाय दरबार बरखास्त करीत नसत. रात्रीं नेहमीं सर्व कामकाज आटोपण्यास दहा अकरा तर सहजच वाजत. पण केव्हां केव्हां तर लोक फार जमल्यामुळें अपरात्र होऊन पहाटेचे दोन-तीनही वाजून जात. त्या वेळीं हल्लींप्रमाणें लंबकांच्या घड्याळांचा या देशांतील लोकव्यवहारांत मुळींच प्रसार झाला नव्हता. याकरितां दिवसरात्रीची मर्यादा

कळण्यास लोक जुन्या घटिका यंत्राचाच उपयोग करीत. अशा प्रकारचें एक यंत्र तात्यासाहेबांनीं प्रथमच दरवाजावरील चौकींत ठेवून दिलें होतें आणि तेथून रात्रंदिवस, प्रत्येक चार घटकांनीं अमुक अमुक वेळ झाली आहे—"धर्मअवतार ---- पहेर का अमल है—" अशी प्रभूंपुढें वर्दी येवविण्याची तजवीज ठेवली होती.

प्रभुचरित्रलेखकांपैकीं रामचंद्रबोवा सोलापूरकर या नांवाचे एक लेखक होऊन गेले. हे स्वतः प्रभुदरबारीं बरेच दिवस वास्तव्य करून होते. त्यांनीं आपल्या पुस्तकांत लिहून ठेवलेलें प्रभुदरबारवर्णन वाचण्यासारखें आहें. याकरितां त्याचाही उतारा आम्ही देत आहों. त्यांनीं प्रत्यक्ष आपल्या नजरेनें पाहिलेल्या वस्तुस्थितीचें वर्णन दिलें असल्यामुळें तें फार महत्त्वाचें आहे असें आम्हास वाटतें.

" प्रभूंची शामसुंदर मूर्ति पाहून पाहणाराची तहानभूक हरून जात असे. किती वेळ कोणी प्रभूजवळ बसले, तरी त्यास उठावेंसें वाटत नसे आणि प्रभूही एक वेळ गादीवर बसले म्हणजे कधीं कधीं तीन तीन दिवस जागेवरून उठतच नसत ! एकदां बसले म्हणजे तीन तीन दिवस जेवण नाहीं, निद्रा नाहीं, लघवी नाहीं, शौच नाहीं, कांहींच नाहीं. सारखी बैठक आणि एका मांडीवर व एका आसनावर ! त्याचप्रमाणें गादीचे आंत, म्हणजे कचेरीच्या आंत त्यांची खासगत गुंफा असे. त्यांत एकदां गेले म्हणजे कधीं कधीं आठ आठ दिवस

बाहेरच येत नसत ! आंत जाऊन त्यांस बोलावण्याची किंवा निजलेअसले तर उठविण्याची कोणाची मगदूर नव्हे. कधीं कधीं प्रभु निजले म्हणजे आठ आठ दिवस उठतही नसत, आणि कधीं कधीं आठ आठ दिवसपर्यंत मुळींच निजतही नसत ! कधीं कधीं खंजिरी घेऊन स्वतः गात बसावें, तेव्हां प्रत्यक्ष गंधर्वांचाच अवतार आहे काय असा शहाणे लोकांना भास व्हावा. कधीं कधीं लाखों रुपयांचें जवाहीर अंगावर घालून व उत्तम भरजरी पोशाख करून स्वारी बसलेली असावयाची आणि कधीं कधीं अगदीं गरिबाप्रमाणें चिंध्या पांघरून स्वारी बसावयाची ! कधीं कचेरींत प्रभूपुढें उत्तम नायकिणीचें गायनच सुरू असावयाचे, कधीं वेदांतचर्चा होत असावयाची, कधीं वैदिकांचा वेदघोष असावयाचा आणि कधीं कधीं तर शिळोप्याच्या रिकाम्या गप्पाही चालू असावयाच्या !

यांप्रमाणें प्रभूंच्या अनंत लीला असत. त्या कोठवर वर्णन कराव्या ? जसा मनुष्य भेटेल त्याशीं त्या प्रकारचे प्रभु होत असत. शास्त्री, पुराणिक कोणी असल्यास त्याबरोबर हे त्यापेक्षां अधिक शास्त्री पुराणिक बनत असत. पंडिताबरोबर पंडित, गवयाबरोबर गवई, साधूबरोबर साधु, भोंदु आणि कपटयाबरोबर बैरागी कपटी, लोभ्यांबरोबर लोभी, प्रापंचिकांबरोबर प्रापंचिक, बैराग्याबरोबर बैरागी, गोसाव्याबरोबर गोसावी, गरिबांबरोबर गरीब, श्रीमंताबरोबर महाश्रीमंत आणि वृद्धाबरोबर वृद्ध व पोराबरोबर पोर याप्रमाणें

कळण्यास लोक जुन्या घटिका यंत्राचाच उपयोग करीत. अशा प्रकारचें एक यंत्र तात्यासाहेबांनीं प्रथमच दरवाजावरील चौकींत ठेवून दिलें होतें आणि तेथून रात्रंदिवस, प्रत्येक चार घटकांनीं अमुक अमुक वेळ झाली आहे—"धर्मअवतार - - - - पहेर का अमल है—" अशी प्रभूंपुढें वर्दी येवविण्याची तजवीज ठेवली होती.

प्रभुचरित्रलेखकांपैकीं रामचंद्रबोवा सोलापूरकर या नांवाचे एक लेखक होऊन गेले. हे स्वतः प्रभुदरबारीं बरेच दिवस वास्तव्य करून होते. त्यांनीं आपल्या पुस्तकांत लिहून ठेवलेलें प्रभुदरबारवर्णन वाचण्यासारखें आहें. याकरितां त्याचाही उतारा आम्ही देत आहों. त्यांनीं प्रत्यक्ष आपल्या नजरेनें पाहिलेल्या वस्तुस्थितीचें वर्णन दिलें असल्यामुळें तें फार महत्त्वाचें आहे असें आम्हास वाटतें.

" प्रभूंची शामसुंदर मूर्ति पाहून पाहणाराची तहानभूक हरून जात असे.किती वेळ कोणी प्रभूजवळ बसले, तरी त्यास उठावेंसें वाटत नसे आणि प्रभूही एक वेळ गादीवर बसले म्हणजे कधीं कधीं तीन तीन दिवस जागेवरून उठतच नसत ! एकदां बसले म्हणजे तीन तीन दिवस जेवण नाहीं, निद्रा नाहीं, लघवी नाहीं, शौच नाहीं, कांहींच नाहीं. सारखी बैठक आणि एका मांडीवर व एका आसनावर ! त्याचप्रमाणें गादीचे आंत, म्हणजे कचेरीच्या आंत त्यांची खासगत गुंफा असे. त्यांत एकदां गेले म्हणजे कधीं कधीं आठ आठ दिवस

बाहेरच येत नसत ! आंत जाऊन त्यांस बोलावण्याची किंवा निजले असले तर उठविण्याची कोणाची मगदूर नव्हे. कधीं कधीं प्रभु निजले म्हणजे आठ आठ दिवस उठतही नसत, आणि कधीं कधीं आठ आठ दिवसपर्यंत मुळींच निजतही नसत ! कधीं कधीं खंजिरी घेऊन स्वत: गात बसावें, तेव्हां प्रत्यक्ष गंधर्वांचाच अवतार आहे काय असा शहाणे लोकांना भास व्हावा. कधीं कधीं लाखों रुपयांचें जवाहीर अंगावर घालून व उत्तम भरजरी पोशाख करून स्वारी बसलेली असावयाची आणि कधीं कधीं अगदीं गरिबाप्रमाणें चिंध्या पांघरून स्वारी बसावयाची ! कधीं कचेरींत प्रभूपुढें उत्तम नायकिणीचें गायनच सुरू असावयाचे, कधीं वेदांतचर्चा होत असावयाची, कधीं वैदिकांचा वेदघोष असावयाचा आणि कधीं कधीं तर शिळोप्याच्या रिकाम्या गप्पाही चालू असावयाच्या !

याप्रमाणें प्रभूंच्या अनंत लीला असत. त्या कोठवर वर्णन कराव्या ? जसा मनुष्य भेटेल त्याशीं त्या प्रकारचे प्रभु होत असत. शास्त्री, पुराणिक कोणी असल्यास त्याबरोबर हे त्यापेक्षां अधिक शास्त्री पुराणिक बनत असत. पंडिताबरोबर पंडित, गवयाबरोबर गवई, साधूबरोबर साधु, भोंदु आणि कपट्याबरोबर बैरागी कपटी, लोभ्यांबरोबर लोभी, प्रापंचिकांबरोबर प्रापंचिक, बैराग्याबरोबर बैरागी, गोसाव्याबरोबर गोसावी, गरिबांबरोबर गरीब, श्रीमंताबरोबर महाश्रीमंत आणि वृद्धाबरोबर वृद्ध व पोराबरोबर पोर याप्रमाणें

जशास तसे प्रभु होत असत. त्यांच्या स्वभावाचाही धर्म बहुधा जशास तसा वाटत असे. ते क्रोध्यास क्रोधी, व शांतास शांत दिसत असत. परंतु वस्तुतः स्वयंभू त्यांचा स्वभाव फार आनंदकारक होता. नेहमीं श्यामसुंदर शांत मूर्ति गादीवर बसलेली व एकें हातीं तपकिरीची चिमूट घेऊन ब्राह्मनंदांत डुलत असलेली, अशा थाटाचें ध्यान लोकांच्या दर्शनांत येत असे. प्रभु गादीवर बसले असले म्हणजे नेहमीं कचेरीचा थाट असावयाचा. शास्त्री, पंडित, अमीरउमराव, शेटसावकार व राजेरजवाडे इत्यादि बडया लोकांची नेहमीं प्रभूंजवळ गर्दी असावयाची ! शिवाय हजारों यात्रेकरूंची भीड दरवाजावर नेहमीं असून प्रभु कचेरींत आहेत तोंपर्यंत, सर्वकाळ द्वारावर तोबा चालू असावयाचा ! गर्दीमुळें कित्येक लोकांना तीन तीन दिवसपर्यंत दर्शन होऊं नये दर्शन झाल्यावांचून अन्न घेणें नाहीं असे कितीएकांचे नेम होते, त्यांना कधीं कधीं अशा गर्दीमुळें, सात सात दिवसपर्यंत उपवांसही पडत असत. द्वारावर पदमसिंग नांवाचा द्वारपाळ नेहमीं पहाऱ्यावर असावयाचा. दर्शनास आंत सोडण्याचें काम त्याच्या हातीं असल्यामुळें मोठमोठया अधिकारी व श्रीमंत लोकांसही त्यांचे आर्जव करावे लागत व त्याला खुष ठेवावें लागे. येणेंप्रमाणें हुमनाबादेजवळ राहिल्यापासून, प्रभूंचा पूर्वींचा फकिरी बाणा व अरण्यांत राहणें सर्व जाऊन, सर्व गोष्टींत राजदरबारी थाट होऊन गेला. ज्या जागीं पूर्वीं महा अरण्य होतें, तेथें

आतां माणिकनगर वसून जाऊन हजारों लोकांची रात्रंदिवस वस्ती होऊन गेली. आणि ज्या जागीं दिवसा चोर, रोहिले, अरब हे प्रवासी लोकांना लुटीत होते, तेथें आतां हत्ती, घोडे, पालख्या, मेणे व स्वार शिबंदी वगैरे सर्व राजऐश्वर्य झुलून राहूं लागलें.

या संधीस श्रीमाणिकप्रभूंचें वय पूर्ण भरज्वानींत म्हणजे सुमारें तीस वर्षांचें झालें होतें, आणि सर्व राजऐश्वर्यादि संपत्ति माणिकनगरास वस्तीस येऊन राहिली होती. प्रभूंच्या द्वारांत हत्ती, घोडे, पालख्या, मेणे आणि राजेरजवाडे झुलून राहिले होते. ज्याकडे माणिकप्रभु नुसते डोळे उघडून पाहतील, तो भाग्यवान होय अशी लोकांची समजूत झाली होती. इतकें झालें तरी प्रभूंची स्वतः वृत्ति फकिरी बाण्याची, स्वतंत्र व आनंदी अशी कायम होती. ऐश्वर्यामुळें त्यांच्या नम्र व दयाळू वृत्तींत काडीइतकाही फरक पडला नाहीं. त्यांचें भाषण फार फार गोड, खुबीदार आणि नेहमीं दयेनें परिपूरित व विनोदी असें असे. ते मोठे वक्ते, चतुर, समयज्ञ आणि अनेक भाषाभिज्ञ होते. संस्कृत, कानडी, तेलंगी, ऊर्दू, फारशी, हिंदुस्तानी आणि महाराष्ट्र इतक्या भाषा त्यांना अगदीं करतलामलकवत् होत्या. यवनधर्मीयांना प्रमाणादाखल अरबी आयातमधून अनेक गोष्टी ऐकवीत असत. परंतु हें अध्ययन त्यांनीं कोठें व केव्हां केलें होतें याचा कोणास कधीं अंत लागला नव्हता. शिवाय ते सर्व धर्मशास्त्रपारंगत आणि वेदज्ञही होते. कोणी

कोणत्याही मताचा, धर्माचा आणि कोणत्याही जातीचा आला तरी, तो प्रभूंपुढें बोलण्यास व वाद करण्यास टिकत नसे. मोठा महाविद्वान् आला तरी प्रभूंपुढें त्यानें शेवटीं हार मानून, प्रभूंकडून समाधान मिळवून व प्रभूंचें मत कबूल करून माघारी जावें, असें शेंकडों वेळ झालें आहे.

प्रभूंच्या मनांतून हा एवढा राजकीय खटला वाढावावा असें मुळींच नव्हतें. फक्त परोपकार आणि दानधर्म यांशिवाय त्यांना कोणताच विषय प्रिय नव्हता. परंतु तात्यासाहेबांस व्यावहारिक हौस फार होती. त्यांनीं चारपांच वर्षांत माणिकनगरास व प्रभूंच्या दरबारास फारच शोभा आणली पांचपंचवीस दुकानांची लहानशी बाजारपेंठही वसली गेली व तेथें सर्व प्रकारचे जिन्नस मिळूं लागले. हलवाई, माळी, तांबोळी, यांचींही दुकानें बसलीं. याखेरीज जवळच हुमनाबाद शहरीं मोठी पेठ होती, तेथून सर्व सरंजामाचा पुरवठा होत असे. हुमनाबादेस एक काळप्पा म्हणून सावकार होता. त्याची प्रभुचरणीं फार निष्ठा बसली होती. तो नित्य दर्शनास येत असून कारण पडल्यास पांचपन्नास हजार रुपये नेहमीं देतघेत असे. पुढें तात्यासाहेबांनीं माणिकनगरास, पूर्व पश्चिम दोन मोठाल्या वेशी बांधल्या आणि प्रत्येक वेशीवर एकदोन जमादार व परदेशी, रोहिले, अरब असे पांचपन्नास शिपाई ठेवून दिले. त्या लोकांनीं गांवचा बंदोबस्त आणि मोठमोठाल्या मेळ्यांचे व यात्रेचे बंदोबस्त ठेवीत असावे, अशी व्यवस्था केली. याप्रमाणें सर्व

व्यवस्था राजकीय थाटाची तात्यासाहेबांनीं,आपल्या हौसेप्रमाणें करून ठेविली होती. "

वरील उताऱ्यावरून प्रभुदरबारचें सामान्य स्वरूप आमच्या वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. माणिकनगराला येण्याच्या पूर्वीं प्रभुसमागमें 'नित्यश्रीनित्यमंगल' चालें, तरी त्यांस फकिरी वळण होतें. येथें वास्तव्य झाल्यापासून, संस्थानास मूर्त स्वरूप प्राप्त होऊन, सर्व राजकीय थाटाचा सरंजाम जमत गेला. प्रभूंच्याजवळ ऐहिक व पारमार्थिक ऐश्वर्यास कांहीं उणीव नव्हती. हें उभयविध ऐश्वर्य भरपूर नांदत असल्यामुळें कसल्याच गोष्टीची अडचण नव्हती. प्रभूंच्याजवळ अगणित द्रव्य कोठून येत होतें हें समजण्यास मार्ग नव्हता. पण हें द्रव्य कोणीकडे जात होतें तें मात्र सर्वांना प्रत्यक्ष दृष्टीस पडत होतें. कुबेराजवळ असलेल्या सर्व संपत्तीच्या मालकास त्याच्या इच्छेला येईल तेव्हां त्या संपत्तीवर ताबा चालवितां यावा यांत नवल तें काय? प्रभूंची संपत्ति जिवंत होती. संचय करून ठेविलेली नव्हती. प्रभूंकडे मागणी करणाऱ्यांच्या गरजेपुरतीच ही संपत्ति प्रभुचरणाकडे धांव घेऊन येत असे. दरबारांत बसून खैरात चालली असतां, गादीखालीं हात घालून मुठीच्या मुठी भरभरून रुपये काढावेत! दरबार चालू असेतोंपर्यंत, हा हात एकसारखा चालत असे. सर्व लोकांना देणगी पोंचून दरबार बरखास्त झाल्यानंतर गादीखालीं कांहीं सुद्धां शिल्लक राहत नसे.

" कोठून द्रव्य येतें । माहीत न होय कोणातें । गादीवर बसतां त्वरितें । मुष्टी भरभरूनी देताती ॥ १ ॥ जना आश्चर्य वाटे । शोध करिती नेट बोटें । द्रव्य येतें कैसें कोण्या वाटे । न कळेचि तिळभरी ॥ २ ॥ परी असंख्य धर्म करितां । कमी न पडे तत्वतां । महाराज बैसतां उठतां । गादी शोधून पाहताती ॥ ३ ॥ गादी झाडून पाहती । तंव तेथें नसे एक रती । गादीवर बैसतां निश्चितीं । अगणित द्रव्य निघतसे ॥ ४ ॥

अशा प्रकारचें वर्णन आम्ही पुष्कळांच्या तोंडून ऐकिलें आहे. पूर्वीच्या लोकांनीं प्रत्यक्ष पाहून लिहिलेलीं वर्णनें विश्वसनीय नसावींत असें मानणें सबळ कारण सांपडल्यावांचून योग्य नव्हे. आज रोजींही डोळे उघडे ठेवून पाहणारांनाही या प्रभुदरबारच्या अलौकिक सामर्थ्याची साक्ष पटणार आहे. दरबारचें पूर्वीचें वर्णन सध्यांच्या काळीं देखील कमीअधिक प्रमाणानें तंतोतंत लागू होण्यासारखें आहे, अशी पाहणाऱ्यांची खातरी सहज पटेल. प्रभूंची एकंदर चालचलणूक व वागण्याची ढब कशा प्रकारची होती, याविषयीं रामचंद्रबोवांनीं दिलेलें वर्णन वस्तुस्थितिनिदर्शक असल्यामुळें तें आम्ही त्यांच्याच शब्दांत देत आहों.

" प्रभुमहाराज येथील ( आपल्याजवळच्या ) एकूण एक मनुष्यास ओळखून होते. त्यांच्यासारखी मनुष्याची पारख क्वचित् कोणास असेल. ते हलक्या कानाचे नव्हते. कोणीही कांहीं जाऊन सांगितल्यास त्यांतील खरी बाजू कोणती आहे

हें त्यांच्या लक्षांत तेव्हांच येत असे. त्यांचा स्वभाव फारच शांत, गंभीर, विचारी, आणि दयाळु असल्यामुळें कोणत्याही आणि कसल्याही लबाड मनुष्याचें त्यांच्यापुढें कांहीं चालत नसे. आपल्याजवळील मंडळींत कोण मनुष्य किती व कसल्या योग्यतेचा आहे हें त्यांच्या लक्षांत पक्केपणीं वागत असे. इतकें असूनही त्यांच्या वागणुकीची चतुराई अशी असे कीं, ते सर्वांना एके ठिकाणीं नांदवीत असत. वाघ व बकरी यांना एके ठिकाणीं पाणी पिण्यास त्यांनीं लावावें. यामुळें प्रभूंचे दरबारांत साऱ्या जगांतील अट्टल लुटारू येऊन ज्ञान संपादून राहिले होते. प्रभूंच्या दरबारांत लुटारू, छिनाल, जार, चोर, भामटे, अविद्वान् आणि आंधळे, लुले, रोगी, अशक्त व दरिद्री इत्यादि सर्वांच्या आणि संत, साधु, अतीत, बैरागी, वैदिक, ज्योतिषी, शास्त्री, पंडित, हरिदास, गवई, भाट, नायकिणी आणि सुशील गृहस्थ इत्यादि लहानमोठे, सर्वांचा आदर संभाळ होत होता. दोनप्रहरीं अन्नास तर कोणासच ना म्हणावयाचें नाहीं. कोणत्याही जातीचे कितीही येवोत आणि कितीही दिवस तेथें राहोत, कोणी 'जा' असें त्यांना म्हणावयाचें नाहीं. आणि दोनप्रहरीं पक्वान्नाचें भोजन नाहीं मिळालें तरी, कण्याभाकरीचें तरी मिळावयाचेंच. तात्पर्य, दररोज हजारों मनुष्यांचा अन्नखर्च आणि हजारों मनुष्यांच्या लहानमोठ्या द्रव्यादिकांच्या आणि पुष्कळ दुसऱ्या प्रकारच्या मागण्या असावयाच्याच, आणि सर्वांची इच्छा प्रभूंजवळ पूर्ण व्हावयाची."



# विभव विस्तार

## दाजीसाहेब भोसले : : १

आज संस्थानांत प्रहरा प्रहरास नौबत झडत असलेली माणिकनगरास येणाऱ्या यात्रेकरूस ऐकूं येते. ती प्रथम कधींपासून सुरू झाली याची हकीकत मनोरंजक आहे. ती पुढें देत आहों. प्रभूंचें वास्तव्य माणिकनगरास होऊन प्रभुदरबारची भरभराट सुरू झाल्यावर पहिल्याच गणेशचतुर्थीच्या दिवशीं सकाळीं प्रभु मुखमार्जन करीत बसले असतां, राजेश्वर गांवांतील एका गृहस्थानें गणपतीची एक लहानशी पण अत्यंत सुंदर मूर्ति आणून प्रभूंपुढें ठेविली आणि प्रार्थना केली कीं, ' आज गणेशचतुर्थी आहे, करितां गुरुदरबारांत याची स्थापना करून उत्सव व्हावा अशी इच्छा आहे. ' गणपति फारच सुंदर बनविला होता; तो पाहून प्रभु अत्यंत खूष झाले व त्याच्या कौशल्याबद्दल फार तारीफ करून म्हणाले, ' गणपति आमच्याकडे जसा चालून आला आहे तसा त्यानें डंका व चौघडा आणविला तर मोठा उत्सव करण्यांत येईल.' या गोष्टीस एक दोन तास होऊन गेल्यानंतर पूर्ववेशीजवळ चौघडा वाजूं लागला. कल्याणचे चौघडेवाले प्रभूंजवळ कांहीं दिवस

सेवा करण्याच्या हेतूनें या ठिकाणीं आले व आपण आल्याची वर्दी लागावी म्हणून त्यांनीं चौघडा वाजविण्यास सुरुवात केली. सर्व लोकांना प्रभूंच्या प्रात:काळच्या बोलण्याचें स्मरण होतेंच. त्यांनीं प्रभूंजवळ हें वर्तमान कळवून गणपतिउत्सव करण्याची अनुज्ञा मिळविली. दादामहाराजांनीं उत्सवाची सर्व तजवीज करून, गणपतीची स्थापना केली. चौघडेवाल्यांना शिधासामुग्रीची सोय लावून दिली व चौघडयाच्या वेळाही ठरवून दिल्या. याप्रमाणें हा चौघडा प्रहराप्रहरानें वेशींत वाजण्यास सुरुवात झाली. चारपांच महिन्यांनीं हे चौघडेवाले प्रभूंकडे येऊन परत जाण्याची परवानगी मागूं लागले.

या वेळीं अक्कलकोट संस्थानचे कारभारी दाजीसाहेब भोसले प्रभूंकडे दर्शनास आले होते. संस्थानांत चालू झालेला चौघडा बंद पडत आहे असें पाहून,त्यांनीं चौघडा कायम चालू राहावा अशी इच्छा प्रदर्शित करून या चौघडयाच्या खर्चाकरितां 'अक्कलकोट संस्थानांतून दरमहा तीस रुपये देण्याची व्यवस्था करून देतों ' असें अभिवचन दिलें. त्याप्रमाणें त्यांनीं चौघडा सुरू करण्याचें श्रेय आपणाकडे घेतलें. त्यांच्या हातून ही गोष्ट शेवटपर्यंत निभेल असें प्रभूंना वाटलें नाहीं. ते म्हणाले, " आमचा फकीरी दरबार, आम्हांस चौघडयाची कांहीं जरूरी नाहीं. गुरुदरबारचा डंका त्रिभुवनांत वाजतो आहे, त्यापेक्षां या चौघडयाची महती अधीक आहे असें

नाहीं. आतां तुम्ही आग्रह करतां तर असूंदे; पण पाहा हो, शेवटपर्यंत निभेल तीच गोष्ट कोणी झाली तरी करावी."

दाजीसाहेब भोसल्यांनीं आग्रहपूर्वक सुरू केलेला चौघडा तीनचार वर्षें संस्थानांत अक्कलकोट संस्थानच्या खर्चानें चालला होता. त्यानंतर त्या संस्थानांतून चौघड्याकरितां चालू असलेली नेमणूक बंद झाली. त्या संस्थानांत कांहीं उलटापालट होऊन, दाजीसाहेब भोसल्यांना अक्कलकोट संस्थान सोडावें लागलें. पण एकवार सुरू झालेला चौघडा बंद करणें इष्ट नाहीं असें वाटल्यावरून प्रभुदरबाराकडून तो सुरू झाला. आजपावेतों तो अव्याहत चालू आहे.

अक्कलकोटच्या राजास पुत्रप्राप्तीची इच्छा होती. शिवाय संस्थानच्या बाबतींत कांहीं भानगडीही होत्या. त्यांचें निवारण व्हावें म्हणून कारभारी कारकून वगैरे माणसें नेहमीं प्रभुदरबारीं येत. त्याप्रमाणें कोणी विश्वासू लोक एकदां प्रभूंकडे प्रार्थना करण्याकरितां आले होते. त्यांना 'मी बोलावीन तेव्हां या म्हणजे प्रसाद देतों' असें प्रभूंनीं कळविलें होतें. त्याप्रमाणें प्रभूंकडून 'प्रसाद घेण्यास या' असा निरोप आला त्या वेळीं हे गृहस्थ भोजनास बसले होते. बोलावण्यास येणाऱ्या इसमानें ते जेवावयास बसले आहेत असा परत निरोप कळविला. तेव्हां प्रभु फक्त "अरेरे, प्रसादाची वेळ त्यानें गमावली!" असें बोलून स्वस्थ बसले. पुढें त्या गृहस्थानें प्रसाद

मिळण्याबद्दल पुष्कळ खटपट केली; पण प्रसाद मिळाला नाहीं. स्वतःच्या उल्हासानें प्रभूंनीं हातांत घेतलेला प्रसाद मिळणें हें भाग्याचें चिन्ह होतें. तो योग त्या लोकांना लाभला नाहीं. त्या प्रसादाची हकीकत येथील सर्व लोकांना माहित होती. म्हणून ''जेवायला वसले आहेत'' असा परत निरोप प्रभूंकडे न जाईल अशी सर्वजण खबरदारी घेत. हल्लींसुद्धां संस्थानांत हा नियम काळजीपूर्वक पाळला जातो.

# कंदी किशनराव : : २

मागें 'आठ कवड्या' या सदराखालीं दिलेल्या मुख्य कथेविषयीं बहुतेक चरित्रकारांचें एकमत आहे. पण त्या स्त्रीच्या नांवासंबंधानें व स्थळासंबंधानें भिन्न मतें आढळून येतात. सदाशिवराव महासव या नांवाचे एक वृद्ध गृहस्थ, पायगा इलाख्यांतील चिटगोपा जिल्ह्यांत 'अकौंटंट' होते. त्यांच्या सांगण्यावरून हें वृत्त हळिखेडास घडलें असून, ती श्रीमान् श्री कंदीकिशनराव या नांवाच्या एका वैभवशाली देशमुखाची पत्नी होती असें समजतें. नरहरीकृत (अमुद्रित) चरित्रांतही कंदी किशनरावाचेंच नांव असून वरील हकीकत हळीखेड येथें भालचंद्र दीक्षित यांच्या घरीं प्रभु राहिले असतां घडली असेंच म्हटलें आहे. त्या बाईचें माहेर हळीखेडास होतें म्हणून ती आपल्या वैभवास साजेशा लवाजम्यासहित म्यान्यांत बसून माहेरीं येत होती. तिला वयांत येऊन पुष्कळ वर्षें होऊन गेलीं होतीं. पण संतति झाली नसल्यामुळें ती व्हावी अशी तिला फार उत्कंठा लागली होती. तिनें प्रभूंची कीर्ति श्रवण केली असून माहेरीं कांहीं दिवस राहून नंतर कल्याणास जावें, असा तिचा हेतुही होता. मात्र प्रभु हळीखेडास आले असतील अशी तिची कल्पनाही नव्हती. तिच्या अंतरंगांतील हेतु ओळखून प्रभु तिच्या रस्त्यावर अगोदरच येऊन बसले होते. ती जवळ येतांच वरील कथा घडून आली.

प्रभूंची अनपेक्षित रीतीनें भेट होऊन आपला मनोरथ सिद्धीस गेला या आनंदांत ती सासरीं गेली. तेथें गेल्यावर प्रभूंच्या देणगीप्रमाणें तिला गर्भसंभव होऊन पुत्रप्राप्ति झाली. पुत्रोत्सवानें हर्षित झालेल्या या स्त्रीनें यथाविभव विस्तारानें पुत्रासह प्रभुसन्निध येऊन मोठा दानधर्म केला. अशा प्रकारें लागोपाठ पांच पुत्रांचा तिला लाभ झाला. प्रभूंच्या बाल्वयांतील वाक्यावर पूर्ण श्रद्धा असल्यामुळें ती प्रत्येक मुलास प्रभूंकडे आणून प्रभूंच्या पायावर घालून मोठा दानधर्म करून कृतकृत्य होऊन परत जात असे.पांचव्या मुलाच्या वेळेस प्रभूंचें वास्तव्य माणिकनगरास होतें. तेथें ती आपल्या सर्व मुलांसह पूर्ववत् सर्व तयारीनें आली. अत्यंत मनोभावें प्रभूंची पूजा करून प्रभूंस महावस्त्रें अर्पण केलीं व अन्नदानही पूर्वीप्रमाणेंच करून परत जावयास प्रभूंची आज्ञा मागूं लागली.या वेळीं तिनें प्रभूंना प्रार्थना केली कीं, आतां यापुढें आपल्यास पुत्राची आवश्यकता नाहीं. झाले एवढे पांच मुलगे प्रभूंनीं सुखी ठेवावेत. प्रकृतिमान दिवसेंदिवस क्षीण होत चालल्यामुळें, यापुढें आपल्यास प्रसववेदना सहन करण्याची शक्ति नाहीं. करितां प्रभूंनीं कृपा करून आतां पुत्र होण्याचें बंद करावें. अशी चमत्कारिक मागणी तिनें केलेली प्रभूंना आवडली नाहीं. प्रभूंनीं तिची नानाप्रकारें समजूत केली. "बाई, तुझे हें मागणें योग्य नव्हे. दत्तानें तुझें देणें आहे तें या जन्मींच तूं घेतलें पाहिजे. या गोष्टींचा दूरवर विचार कर. मिळालेला वर नको म्हणूं

नकोस." अशा प्रकारच्या भाषणांनीं तिची समजूत करून पाहिली, तरी ती आपला हेका सोडीना, तेव्हां प्रभु म्हणाले, "बरें, बाई, तुझी इच्छा." असें बोलून तिला परत जाण्याची आज्ञा केली.

घरीं येऊन पोंचल्यावर कांहीं दिवसांनीं कांहीं अकस्मात् कारण उद्भवून तिचा नवरा आजारी पडला. आणि त्यांतच त्याचा अंत झाला. हा एकाएकीं आलेला घाला पाहून तिला प्रभूंच्या बोलण्याचें स्मरण झालें व आपल्या हेकेखोरपणाचा पश्चात्ताप वाटूं लागला. पण झाल्या गोष्टीस कांहींच इलाज नसल्यामुळें तिनें पुढील आपत्ति निमूटपणें सहन केली.

अशा प्रकारची ही पुढील हकीकत आहे. यांत नांवासंबंधानें विशेष चिकित्सा करण्याचें कारण नाहीं. ही अप्पाराव हैद्राबादकर यांची बायको भीमाबाई असली काय, किंवा कंदीकिशनरावाची बायको असली काय, या कथेंतील तात्पर्यांत व मुख्य कथानकांत फरक पडत नाहीं.

## जयाप्पा सोनार : : ३

एके दिवशीं संध्याकाळच्या वेळीं प्रभूंच्या दर्शनासाठी लोकांची फारच गर्दी झाली होती. कारण हे दिवस हुमनाबाद येथील वीरभद्र देवाच्या वार्षिक यात्रेचे असून, या प्रांतांतील पुष्कळ लोक तेथें जमत. त्या लोकांना हें जवळचें माणिकनगरचें वर्तमान समजल्यावर अर्थातच तेही प्रभूंच्या दर्शनास येऊं लागले. या दिवशीं तर ही सर्वच यात्रा प्रभूंच्या दरबारांत येऊन लोटल्यामुळें प्रभूंजवळ सकाळ पासून तोबा झडत राहिला होता. सूर्यास्त होऊन काळोख पडूं लागला, तरी गर्दी कमी झाली नव्हती. या वेळीं एक वृद्ध सोनार आपल्या सर्व कुटुंबासह येथील कोणा एका सिद्ध पुरुषाजवळ सर्वच जात आहेत, आपणही दर्शन घ्यावें अशा विचारानें आला होता. त्याचें वय ७५ वर्षांवर असून त्याच्या समागमें मुलगे, नातू, सुना, लेकी अशीं खुद्द घरचींच सुमारें पांचपन्नास मनुष्यें होतीं. त्या सर्वांनीं तसेंच गर्दींत शिरून इतर लोकांप्रमाणें प्रभूंच्या पायांवर डोकें ठेवण्याचा लाभ मिळविला. पण इतका वेळ झाला तरी स्वतः त्या सोनाराचा प्रभूंजवळ प्रवेश होईना. तो बिचारा म्हातारा निरुपायानें दूरूनच प्रभूंचें दर्शन होण्याकरितां तिष्ठत होता. अखेर दिवे लागण्याच्या सुमारास इतक्याही गर्दींतून प्रभूंची नजर त्या वृद्ध गृहस्थाकडे गेली.

आणि त्याचें मनोगत ओळखून त्यांनीं मुद्दाम त्याला आपल्याजवळ आणविलें. प्रभु आपण होऊन बोलावतात असें पाहून तो आनंदानें प्रभूंच्या पायांजवळ कटयाखालीं येऊन उभा राहिला, व हात जोडून नमस्कार करणार तोंच प्रभूंनीं त्याचा उजवा हात धरून मनगटांत रेशमी गोफांत बांधलेली सोन्याची पेटी हिसका देऊन तोडून घेतली, आणि तिचें तोंड झटकन् मोकळें करून तींतून घडी घातलेला एक कागद बाहेर काढला व दिव्यापुढें उघडून वाचूं लागले. जवळचे लोक उगीच टकमक पाहत होते आणि प्रभूंचें हें विलक्षण प्रेम पाहून तो म्हातारा सोनारही आश्चर्यानें चकित झाला. आपण लाडवंतीस असतांना मनोहरमहाराजांनीं, आपणास मोक्ष प्राप्त करून देणारी ही वस्तु दिली असतांना, कांहीं एक परिचय किंवा संबंध नसतां आणि विचारपूसही न करितां प्रभूंनीं कां सोडून घेतली, ह्याचेंच त्याला मोठें नवल वाटलें. मनोहरमहारजांनीं ज्या आपल्या पुत्राला ही खूण दाखविण्यास सांगितलें होतें, तोच हा प्रभु असावा अशी कल्पनाही त्याच्या मनांत येईना. कारण, प्रभूंचा जन्म झाल्यावर लौकरच हा गृहस्थ आपल्या कुटुंबासुद्धां सोलापूर येथें जाऊन राहिला होता. यामुळें प्रभूंचें " माणिकप्रभु " हें नांवही त्यास ठाऊक नव्हतें. माणिकप्रभु हा कल्याणासच कोणी उत्पन्न झाला आहे, असें मोघम त्याला समजलें होतें.

आणि आतां कुलस्वामी वीरभद्राचें दर्शन व यात्रा करून परत जातां जातां कल्याणास जाऊन मनोहरमहाराजांच्या पुत्राचा शोध करावा असा त्याचा बेत होता. असो.

प्रभूंनीं सर्व कागद वाचल्यावर अगदीं आश्चर्य वाटल्यासारखी मुद्रा दाखविली व जवळच्या मंडळींच्या तोंडाकडे पाहूं लागले. तेव्हां या कागदांत कांहीं तरी महत्त्वाची गोष्ट असावी असा सर्वांनीं अजमास केला. पण "प्रभो आपल्याला विस्मय वाटण्यासारखें या कागदांत काय लिहिलें आहे ?" असें प्रभूंना विचारण्यास कोणाचें धैर्य होईना. तात्यासाहेब प्रभूजवळ गोविंदशास्त्री नांवाच्या एका कनोजी ब्राह्मणाशीं योगशास्त्रासंबंधीं वादविवाद करीत बसले होते. त्यांनीं मात्र काय आहे हें पाहूं म्हणून, प्रभूंच्या हातांतून तो कागद तात्काळ आपल्या हातीं घेतला आणि वाचून पाहूं लागले. तेव्हां गोविंदशास्त्र्यांशीं त्यांचा बराच परिचय असल्यामुळें, तेही वांकून वाचूं लागले. तोंच ही मनोहरमहाराजांनीं वर्तविलेली प्रभूंची जन्मपत्रिका आहे, आणि त्यांचें सर्व भविष्य कथन केलें आहे, असें त्यांना आढळून आलें.

सर्व पत्रिका वाचून झाल्यावर तात्यासाहेब तिजबद्दल कांहीं चर्चा करणार इतक्यांत पूर्वींप्रमाणें प्रभूंनीं जलदीनें त्यांच्या हातून तो कागद परत घेतला. आणि तसाच दिव्यावर

धरून जाळून टाकून त्याची राख कपाळास लावून घेतली. कागद दिव्यावर धरतांच तात्यासाहेबांनीं " हें काय करतां ? असा महत्वाचा दस्तऐवज मुद्दाम कां नाहींसा करावा ? " असें म्हणून तो परत घेण्याचा प्रयत्न केला, तरी प्रभूंनीं आपली चिमट सोडिली नाहीं. ते तात्यासाहेबांचें तोंडानेंच समाधान करूं लागले. " आमच्या बापानें आमचें जातक वर्तवून हें भारूड सर्वांना कळण्यासाठीं लिहून ठेविलें आहे. आतां याप्रमाणें आमच्या हातानें सर्व गोष्टी घडल्या तरच त्यांचा लेख खरा होणार आहे. कदाचित् सद्गुरूंच्या स्वच्छंदपणामुळें त्यांत फरक पडला तर विनाकारण जनापवाद यावयाचा. मग सद्गुरूला इतका प्रतिबंध आपण कां करावा ? त्याच्या मनांत ज्या वेळीं जी गोष्ट येईल, तसेंच तो करील ! त्याला दुसऱ्याचा अटक काय करणार ? तेव्हां असें गुप्त रहस्य गुप्तच राहिलें पाहिजे." प्रभूंचें हें भाषण ऐकतांच त्या सोनाराच्या सर्व संशयाची आपोआप निवृत्ति झाली. मनोहरबापूचाच पुत्र हा माणिकप्रभु आणि याचीच ही जन्मपत्रिका, या गोष्टी त्याला कळून आल्याच. पण त्यांनीं सांगितल्याप्रमाणें हा आपल्यास मोक्षमार्ग दाखवील कीं नाहीं हीही शंका प्रभूंच्या अंतर्ज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव आल्यामुळें दूर झाली. आणि मनोहरमहाराजांनीं सांगितल्यापेक्षांही प्रभूंच्या अंगीं जास्त सामर्थ्य आहे, तेव्हां आतां यांस विनंती

करून नुसता परमार्थ साधण्याचा मार्ग विचारण्यापेक्षां एकदम मोक्षप्राप्ति करून देण्याविषयीं हट्ट धरावा असा त्याचा विचार झाला. इकडे, " होणार तें व्हावयाचेंच, पण वडिलांनीं आपल्याबद्दल मोठ्या श्रमानें तयार केलेला लेख आपण नष्ट कां करावा ? भक्तजनांनीं कोणतीही दुर्धर प्रतिज्ञा केली तरी ती परब्रह्म सद्गुरूला पूर्ण केलीच पाहिजे, असें पूर्वींच त्यानें ब्रीद बांधलें आहे, मग आपण निरर्थक शंका कशी घ्यावी ? असें तात्यासाहेब प्रभूला कळवळ्यानें व लडिवाळपणानें बोलून झाल्या गोष्टीबद्दल खेद दर्शवूं लागले. तोंच गोविंदशास्त्रयानेंही त्यांच्या विचारास पाठबळ दिलें. हा ब्राह्मण चांगला विद्वान्, संस्कृत भाषाभिज्ञ होता. तो म्हणाला, "कृष्ण परमात्म्यानें 'शस्त्र हातीं न धरण्याबद्दल केलेली प्रतिज्ञा, भीष्माचार्याकरितां मोडली. रामावताराचें सर्व चरित्र तर यःकश्चित् वाल्या कोळ्यानें कल्पनेनें लिहिलेल्या ग्रंथाप्रमाणेंच परमेश्वराला प्रत्यक्ष करून दाखविणें भाग पडलें. असा जर युगानुयुगीं संप्रदाय चालत आला आहे, तर ज्यांना आपण जनकत्व दिलें त्या मनोहर महाराजांच्या लेखाला बट्टा लावण्यास कोण समर्थ आहे ?"

प्रभु या दोघांचें समाधान करणार तोंच तो वृद्ध सोनार बोलूं लागला. तो म्हणाला, "प्रभुमहाराज, आपल्या वडिलांनीं लिहून ठेवल्याप्रमाणें आपल्या हातानें होणें तें होईलच.

पण मला त्यांनीं दिलेलें वचन मात्र आपण आतांच पूर्ण केलें पाहिजे. वयाला पाऊणशें वर्षें लोटून गेल्यामुळें मला जीवाचा मुळींच भरंवसा वाटत नाहीं. मनोहरमहाराजांचा व माझा किती ऋणानुबंध होता हें माझ्या जीवालाच ठाऊक ! तुमच्या मातुःश्री बयाम्मास मात्र कांहीं थोडी आठवण असली तर असेल. धन्य त्या बापूची ! तुमच्यासारखीं देवरूपी पुत्ररत्नें जगाच्या कल्याणासाठीं उत्पन्न करून ठेवून आपण कधींच स्वर्गीं सोन्याचा होऊन गेला !" सोनाराचें हें भोळेपणाचें व आवेशयुक्त भाषण ऐकून प्रभूला तात्काळ त्याची कींव आली. त्याचा हेतु काय व त्याला वडिलांनीं काय सांगितलें होतें, या गोष्टी प्रभु जाणून होतेच. तरी पण ते म्हणाले, "तें असो, पण तुम्हाला त्यांनीं काय वचन दिलें होतें तें तर सांगा अगोदर; मग पाहूं त्यांच्याच आशीर्वादानें आम्हांस तें पूर्ण करतां आलें तर !" यावर तो वृद्ध म्हणाला, "बापूंचे मजवर अनंत उपकार आहेत. त्यांच्याच सांगण्यावरून मी लाडवंती सोडून सोलापुरास राहिलों. आणि आजवर सुखासमाधानानें संसाराचें सुख भोगिलें. लेक, लेकी, व्याही, जांवई, नातु, पणतु, सुना, नातसुना यांच्यासह थाटानें संसार चालविला. परमार्थाची कांहीं तरी जोड मला सांगा असें अनेकवार मीं बापूंना विनविलें, पण त्यांनीं तो दिवस अद्याप पुढेंच आहे, असें नेहमी म्हणावयाचें. तुमचा जन्म झाला त्या दिवशीं

दोनप्रहरींच बापूंनीं ही जन्मपत्रिका तयार करून मजजवळ दिली. आणि " ही नीट जपून ठेव आणि याची मुंज झाली म्हणजे तुला सवड सांपडेल तेव्हां याला येऊन भेट आणि ही खूण दाखव म्हणजे तो तुझी इच्छा तेव्हांच पूर्ण करील, " असें त्यांनीं मला सांगितलें होतें. पुढें मी सोलापुरास जाऊन राहिल्यावर त्यांनींही लाडवंती सोडली आणि कल्याणास जाऊन आपला देह ठेविला असें मीं ऐकिलें. आणि एक वेळ आपल्या दर्शनास येण्याचा विचार केला. पण घरीं अनेक अडचणी उपस्थित होऊन निघणें होईना. पुन्हा आणखी एकवार निश्चय करून निघण्याची तयारी केली, पण आपण कोणास न सांगतां एका ब्राह्मणाच्या मुलास बरोबर घेऊन पंढरपुराकडे निघून गेलां, अशी एका विश्वासू मनुष्याकडून खबर समजली. यामुळें निघण्याचा बेत रहित झाला. पुढें तर तुमच्या आजोळासुद्धां सर्व खटलें कोठें देशांतरास निघून गेल्याचें ऐकून मनाची निराशा झाली. मग हरीवर हवाला ठेवून स्वस्थ बसलों. आतां हा हुमनाबादचा वीरभद्र आमचा कुळस्वामी असून अलीकडे फार दिवसांत याच्या दर्शनास आमच्या घरचें कोणी आलें नाहीं, तेव्हां यंदा सगळ्याच मुलांबाळांना देवाच्या पायावर घालावें असा मुलांनीं बेत केला म्हणून माझें इकडे येणें झालें. तरी बापूंचे चिरंजीव म्हणजे आपणच हें मला माहित नव्हतें. कल्याणास माणिकप्रभु नांवाचा कोणी मोठा साधु उत्पन्न झाला आहे

च त्यानें हें नवीन गांव वसविलें आहे, असें काल मला समजलें. मी परत जातांना कल्याण येथें मुक्काम करून आपला शोध करावा आणि जातां जातां आधीं या नव्या साधूचेंही दर्शन घ्यावें म्हणून आज सकाळीं येथें आलों. तों हें बापूंच्या आशीर्वादप्रभावानें आयतेंच काम झालें !" एवढें भाषण करीतोंपर्यंत म्हातारा अगदीं थकून गेला; त्याला पुढें बोलवेना. तेव्हां त्याची ही वडिलांसुद्धां आपणावरील भक्ति पाहून प्रभु सद्गदित झाले. त्यांनीं त्याला अगोदर खालीं बसविलें आणि मधुर वाणीनें त्याचें समाधान करीत म्हणाले, "वडिलांचे स्नेही वडिलांसमानच होत. त्यांना आमच्यासारख्या पोरांनीं काय उपदेश करावा ? वृद्ध लोकांनीं जगांतील वऱ्यावाईट दोन्ही गोष्टींचे हजारों अनुभव घेतले असल्यामुळें त्यांना पुढचा रस्ता आपोआपच दिसूं लागतो. आम्ही काय कालचीं पोरें ! अद्याप जग म्हणजे काय हें पुरतेपणीं पाहिलें देखील नाहीं. मग आम्ही दुसऱ्यास परमार्थाचा काय रस्ता दाखवावा ?"

प्रभूंचें भाषण मध्येंच थांबवून तो वृद्ध म्हणाला "महाराज, या वेळेस मी आपणांस कोणी सत्पुरुष किंवा आमच्या मनोहरबापूंचे पुत्र म्हणून कसलीही भीड घालीत नाहीं. माझ्याशिवाय कोणासही माहित नसलेली व कैक वर्षांपूर्वीं घडलेली एक महत्त्वाची गोष्ट आपण बरोबर ओळखली यावरून आपण सर्वव्यापक परमेश्वर अहां अशी माझी खात्री

झाली आहे. आपल्या वास्तविक स्वरूपाची साक्ष मला पटली आहे. आतां माझी विनंति एवढीच आहे कीं, माझ्या हातून जपतप, नेमधर्म किंवा अनुष्ठान इत्यादि कांहीं खटपट आतां होणें शक्य नाहीं. याकरितां तसल्या पोकळ मार्गाचें अवलंबन करावयास न सांगतां, एकदम मोक्षप्राप्ति कशानें होईल तो मार्ग सांगा. आपली आज्ञा मला शिरसा वंद्य आहे. असें होत नसेल तर मला परत जाऊन तरी काय करावयाचें आहे ? जोंपर्यंत आपली ही असामान्य सामर्थ्यसंपन्न सगुणमूर्ति माझ्या दृष्टीसमोर दिसत आहे, तोंपर्यंत आपल्या पायांजवळ राहून याच ठिकाणीं देह अर्पण करितों !" हा त्या वृद्ध सोनाराचा भोळेपणाचा हट्ट पाहून सर्व मंडळीस आश्चर्य वाटलें. प्रभु मात्र थोडें हंसत म्हणाले, "असा खरोखर उतावळा मुमुक्षु असल्यावर सद्गुरुला त्याला मुक्त करण्याचें काम फारसें कठीण नाहीं. तो मनांत आणील त्याच क्षणीं मुक्तच आहे."

यानंतर गौरवयुक्त व विनयपूर्वक शब्दांनीं त्या भोळ्या सोनारास प्रभु म्हणाले, "आमच्या तीर्थरूपावर तुमची इतकी निष्ठा आहे तर आतां एवढेंच करा. होईल तितके लवकर सोलापुरास आपल्या घरीं परत जा. आणि आजपर्यंत कमावलेल्या संपत्तीची स्वतःची संतति आणि तुमचे इतर आप्तइष्ट यांमध्यें तुमच्या इच्छेनुरूप यथान्याय वांटणी करून द्या. तुमच्या पश्चात् त्यांच्यामध्यें भांडणतंटा माजण्यास कारण ठेवूं नका. अशा रीतीनें एकदां तुमचें पूर्ण समाधान झालें, म्हणजे

तुमचा पुढील हेतु तत्काल पूर्ण होईल. " ही प्रभूंची आज्ञा त्या म्हताऱ्यानें मोठया आनंदानें मान्य केली.

अशा रीतीनें प्रभूंच्या जन्माविषयीं अर्धवट पण विश्वसनीय माहिती स्वाभाविकपणें समजल्यामुळें तिचा सर्व खुलासा समजण्याची दरबारांतील सर्व समंजस लोकांना मोठी उत्कंठा उत्पन्न झाली. पण ती सफल होण्याचा रस्ता दिसेना. नंतर तात्यासाहेबांनीं प्रभूंजवळ विनंति करून त्या गृहस्थास एक दोन दिवस ठेवून घेतलें. मुलाबाळांसह बयाम्माचें दर्शन घेऊन, दोन दिवस मुक्काम करण्यास तो मोठया आनंदानें तयार झाला. दुसऱ्या दिवशीं अम्मा व दादामहाराज यांच्या पायांवर सर्व मुलाबाळांस घालून पूर्वीची साग्र हकीकत त्यानें निवेदन केली. दोन दिवस अत्यंत आनंदांत घालवून प्रभूंचा प्रसाद घेऊन तो आपल्या सर्व मंडळीसह परत गेला. नंतर प्रभूंच्या आज्ञेप्रमाणें आपल्या सर्व स्थावरजंगमात्मक मिळकतीची यथायोग्य व्यवस्था करून तो कृतकृत्य झाला. " आतां मात्र मी मनोहरमहाराजांच्या व माणिकप्रभूंच्या वचनाप्रमाणें खरोखर मुक्त झालों " असे उद्गार त्याच्या मुखांतून निघतात तोंच त्याचें प्राणोत्क्रमण होऊन ब्रह्मरंध्र उघडें पडलें ! ही गोष्ट ज्या दिवशीं सर्व व्यवस्था त्यानें केली त्याच दिवशीं घडली असें त्यास पोंचविण्यास जाणाऱ्या एक हुमनाबादच्या गृहस्थाकडून लवकरच समजली. त्याचा वंश अद्यापपावेतों धनकनकसंपन्न असून, प्रभुसंस्थानांत वारंवार दर्शनास येऊन आपल्या शक्तिप्रमाणें प्रभुसेवा करीत असतो.

# गाजराचीं मुलें : : ४

प्रभु एके दिवशीं स्नान करीत असतां, एक म्हातारी माळीण आपल्या समागमें आपले सात मुलगे घेऊन दर्शनास आली. सर्वांत वडील मुलगा अजमासें तीस वर्षांचा होता. प्रत्येकाच्या वयांत दोनतीन वर्षांचें अंतर असावें असें दिसत होतें. हे सर्व तरुण माळी गडी टवटवीत दिसत असून शरीरानें मजबूत होते. प्रत्येकानें आपल्या डोकीवरून गाजराची एक एक मोट आणली होती. म्हातारी वयानें जवळ जवळ साठ वर्षांची होती, तरी कणखर दिसत होती. प्रभूला कधीं पाहीन असें तिला झालें होतें. स्नान करीत असतांही तिनें प्रभूजवळ जाऊन त्यांना कवटाळिलें. वरचेवर तोंडावरून हात फिरवून तिनें प्रेमाश्रूंनीं प्रभूंना न्हाऊं घातलें. जवळच्या शिष्य मंडळींनीं तिचें निवारण केलें, तरी ती कोणाचें ऐकेना व प्रभूंनीं सर्वांना गप्प बसण्यास सांगितलें. प्रेमातिशयानें भरलेलें तिचें अंतःकरण जाणून प्रभु आनंदानें डोलूं लागले. हें गौडबंगाल काय आहे, कोणास कळून येईना. त्या बाईचा उमाळा शांत झाल्यावर जवळच्या लोकांनीं विचारतां ती म्हणाली, "मी आज कित्येक वर्षें याला धुंडाळितें आहें; पण याचा ठावठिकाणा समजला नाहीं. हा आमच्या लाडवंतीच्या बच्चम्माचा नातु रत्न्याभाऊ. आतां तुम्ही याला प्रभु म्हणा कीं काय वाटेल तें म्हणा; मला हा रत्न्याभाऊ म्हणून

माहीत आहे. लाडवंतीस असतांना हा अगदीं लहान होता. फार झालें तर पांच वर्षांचा असेल. यानें माझ्या पाटींतून सात गाजरें उचलून घेतलीं आणि मला सांगितलें, " तुला सात मुलगे होतील." मला या बाळाचें कौतुक वाटलें. मी आणखी गाजरें घेण्यास त्याच्यापुढें पाटीच्या पाटी ठेविली, पण त्यानें 'घेतलीं तेवढीं पुरे' असें सांगून तो पळून गेला. त्याच्या बोलण्याप्रमाणें मला पुढें लागोपाठ सात मुलगे झाले, ते हे मीं दर्शनास आणले आहेत. लाडवंतीहून हा मग कल्याणास गेला. तेथें प्रयत्न करूनही माझी गांठ पडली नाहीं. पुढें कोठें साऱ्या मुलखांत फिरून आतां अलीकडे पांच-सहा वर्षें येथें असल्याचें समजलें, म्हणून मुलांना घेऊन आलें आहें. आतां माझी गांठ पडली; माझी हौस फिटली. एकवार डोळे भरून केव्हां पाहीन असें मला झालें होतें. आतां खुशाल राज्य कर माझ्या बाबा ! तूंच खरा खरा देव आहेस. "

त्या म्हातारीच्या अंतःकरणांत दाटून राहिलेल्या अमोलिक ठेव्याची प्रभूंना भूक होती. भक्तांचें निष्कपट सोज्वल प्रेम प्रभूंच्या आनंदसागरास भरती येण्यास कारणीभूत होत असतें, हा साक्षात् अनुभव सर्वांना या वेळीं पटला. प्रभु आनंदभरानें त्या मुलांकडे पाहून विनोदानें म्हणाले, " हीं गाजराचीं मुलें आहेत एकूण ! तरीच हीं गाजरासारखीं दिसतात बरें का !"

प्रभूंनीं तीं सर्व गाजरें भंडारखान्यांत नेऊन ठेवण्यास आज्ञा केली व त्या म्हातारीला शिधासामुग्री देऊन जेवण

तयार करण्यास सांगितलें. जेवल्यानंतर लुगडें, चोळी व प्रसाद देऊन, तिला संतुष्ट मनानें परत पाठवून दिलें. अशा रीतीनें प्रभूंच्या बालपणाच्या लीला सहजपणें प्रकाशांत येऊं लागल्या. त्या म्हातारीला प्रभूंचें तें ऐश्वर्य पाहून फार धन्यता वाटली. तिच्या मुलांवरही प्रभूंनीं कृपादृष्टि ठेवून त्यांचा उत्कर्ष केला.

## वृद्ध ब्राह्मण : : ७

हुमनाबादेंत एक वयोवृद्ध ब्राह्मण स्त्रीसहित राहत होता. तो चांगला विद्वान् असून रसिक व बोलका होता. म्हणून प्रभूंची मर्जी या ब्राह्मणावर नेहमीं प्रसन्न असे. प्रभूंनीं दोन-दोन प्रहरपर्यंत त्याच्याशीं वेदांतपर भाषण बोलत असावें. त्याचें बोलणें प्रभूंना मनापासून आवडत असल्यामुळें ते त्यास बहुमानानें वागवीत. त्याची स्त्री मोठी पतिव्रता व सुशील असून प्रभूंवर तिची पुत्रवत् माया होती. स्वतः तिला संतान मुळींच नव्हतें; परंतु संतानाची मोठी हौस होती. म्हणून ती आपल्या मनांतून प्रभूंवर पुत्रवत् माया ठेवीत असे, हें तिचें अंतःकरण प्रभु जाणून होते. एके दिवशीं हें उभयतां वृद्ध दंपत्य प्रभूंजवळ बसलें असतां त्याच संधीस महासाध्वी व्यंकमाही प्रभुदर्शनास आली; व चरणावर मस्तक ठेवून, हात जोडून पुढें उभी राहिली. तेव्हां प्रभूंनीं तिला विचारलें कीं, "व्यंके, चार दिवस कोठें दिसली नाहींस ती?" तेव्हां ती म्हणाली, "महाराज, पूर्व पापामुळें महिन्यांतून चार दिवस पायांचें प्रत्यक्ष दर्शन अंतरतें. हा एवढा वंदोबस्त होईल तर मला फार आनंद होणार आहे." व्यंकम्माचें हें भाषण ऐकून प्रभु म्हणाले, "व्यंके, तुला कंटाळा आला असल्यास ज्याला तो मनांतून पाहिजे आहे त्याला देऊन कां टाकीत नाहींस?" व्यंकम्मा म्हणाली, "मी देण्यास

तयार आहें, पण घेणार कोण ?" यावर प्रभु म्हणाले, " आमच्यासमोर ही वृद्ध बाई बसली आहे हिच्या हातावर उदक सोड." मग व्यंकम्मानें लागलीच उदक हातांत घेऊन प्रभूंसमक्ष त्या वृद्ध ब्राह्मणीच्या हातावर सोडलें. पुढें महिना भरल्यावर व्यंकम्मा विटाळापासून मुक्त होऊन, ती वृद्ध साध्वी बाई बारा वर्षांनीं विटाळशी बसली ! !

हें कृत्य पाहून सर्वांस विशेषेंकरून त्या बाईस मोठें नवल वाटलें. परंतु याहीपेक्षां नवलाची गोष्ट पुढें आणखी विशेष झाली. ही बाई दोन तीन वेळ विटाळशी बसल्यावर चवथ्या खेपेस गर्भवती झाली, आणि दहा महिने पूर्ण झाल्यावर सुंदर पुत्र प्रसवती झाली. तेव्हां बाईस व त्या वृद्ध ब्राह्मणास किती आनंद झाला म्हणून सांगावा ! बाईचें वय साठ वर्षांचें होतें, व त्या प्रभूच्या मित्राचें म्हणजे त्या वृद्ध ब्राह्मणाचें वय पाऊणशें वर्षांचें होतें. असें असतां प्रभुकृपेनें पुत्र झाला, मग त्या आनंदास काय विचारावें ! असो; सर्व लोकांना मोठा अचंबा वाटला व जो तो प्रभुसामर्थ्याचें कौतुक वर्णन करूं लागला. पुढें बाईनें त्या मुलाचें नांव ' माणिक ' असें ठेविलें. आणि प्रत्यक्ष माणिकप्रभूंनीं त्यांचें दारिद्र्य देशोधडीस लावून त्याला अक्षय सुखी केलें. इकडे व्यंकम्मा पुन्हां विटाळशी झाली नाहीं. किती आश्चर्यकारक सामर्थ्य हें !"

वरील हकीकत आम्हीं रामचंद्रबोवा सोलापुरकर यांच्या चरित्रलेखांतून जशीच्या तशी उतरून घेतली आहे व हा अद्भुत चमत्कार आम्हीं पुष्कळांच्या तोंडूनही ऐकिला आहे. इतकेंच नव्हे, तर अशा रीतीनें झालेला मुलगाही आम्हीं समक्ष पाहिला आहे. हुमनाबादेस माणिकभट नांवाचे एक वृद्ध ब्राह्मण कांहीं वर्षांपूर्वी राहत असत. त्यांच्या येथें प्रभूंची गादी असून ते प्रभुनवरात्र करीत असत. त्यांना लोक पूज्य मानीत व त्यांचें शिष्यमंडळही बरेंच मोठें होतें असें म्हणतात. त्यांनीं स्वतःच आपल्या अद्भुत जन्मकथेची गोष्ट कळविली होती. ते आमरण प्रभुभक्तींत रंगून गेले होते. आद्यपपर्यंत प्रभूंची गादी हुमनाबादेस असून, त्यांनीं करून ठेवलेल्या व्यवस्थेनुसार पूजाअर्चाही होत असते.

# आबाराव नायब :: ६

भालकी गांवाचा परिचय यापूर्वीं वाचकांस झाला आहेच व तेथील नायब तहसीलदार आबाराव हे परम प्रभुभक्त बनल्याचा उल्लेखही आम्हीं केला आहे. आबाराव नेहमीं प्रभुदर्शनास येऊन विशेष कारणानिमित्त माणिकनगरीं राहतही असत. एकदां भालकी तालुक्याच्या वसुलापैकीं दहा हजार रुपये उंटावर लादून हैद्राबादेस नबाबाकडे पोंचविण्याकरितां म्हणून त्यांना स्वतः जाण्याचा प्रसंग आला. हैद्राबादेस जाण्यापूर्वीं प्रभुदर्शन घेऊन प्रसाद सेवन करून जावें अशा हेतूनें ते माणिकनगरीं आले. या वेळीं मुसलमानांचा 'ग्यारवी' नांवाचा सण होता; त्यानिमित्त खैरात करण्याकरितां प्रभु दरबारांत बसले होते. प्रभूंजवळ मागणी करणारे हजारों फकीर, मौलवी, पीरजादे यांची अतोनात गर्दी होऊन तोबा झडत होता. प्रभु नेहमींप्रमाणें दरबारी थाटांत गादीवर बसले असून खैरातीचा हात चालू होता. मोठ्या प्रयासानें प्रभूंजवळ शिरकाव करून घेऊन आबाराव नायबांनीं प्रभूंना नमस्कार केला. या वेळीं येण्याचें कारण विचारतां, खजिना हैद्राबादीं रवाना होण्याचा आहे तो घेऊन चाललों आहें, असें त्यांनीं सांगितलें. त्यावर प्रभूंनीं उंटावरची सर्व रक्कम आपल्याकडे आणण्याची त्यांना आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें आबारावांनीं सर्व रकमेचे तोडे प्रभूंपुढें ओतले. संतुष्ट मनानें हास्य करून प्रभूंनीं ती सर्व रक्कम खैरातीकडे खर्चून टाकली!

आबाराव नायबांची सत्त्वाची ही परीक्षा होती. सरकारी खजिन्यांतील रोकड अशा रीतीनें दुसऱ्या कामाकडे खर्च केली तर त्याचा परिणाम काय होईल याची जाणीव त्यांना होती. भयंकर बिकट प्रसंग होता, तरी ते डगमगले नाहींत. आपल्या भक्ताला प्रभु फांसाला देतील असा विचार त्यांच्या निर्मळ मनाला शिवला देखील नाहीं. सर्व संकटांतून पार निभावून नेणारा प्रभु समर्थ आहे, अशी त्यांची खात्री असल्यामुळें कांहीं एक न बोलतां ते स्वस्थ राहिले. करुणाघन प्रभु त्यांची निष्ठा पाहून संतुष्ट झाले. पण त्यांच्या खऱ्या परीक्षेची वेळ अजून पुढेंच असल्यामुळें प्रभु कांहीं बोलले नाहींत. दुसऱ्या दिवशीं त्यांना परत भालकीकडे जाण्याची आज्ञा होऊन प्रसाद दिला व आबाराव निमूटपणें परत भालकीस गेले.

त्या वेळीं आजच्याप्रमाणें कायद्याची पायबंदी नव्हती, तरी सरकारी रकमेचा अशा रीतीनें अपव्यय होणें म्हणजे भयंकर गुन्हा होता. नबाबसाहेबांकडे ही बातमी लागतांच तोफेच्या तोंडीं जाण्यास फार वेळ लागणार नव्हता. प्रत्येक सरकारी कचेरींत त्या वेळीं 'अखबारनवीस' म्हणून लोक नेमीत असत. त्याप्रमाणें भालकीसही एकजण होता. घडलेली सर्व हकीकत प्रत्यक्ष नबाबसाहेबांकडे रोजच्या टपालांतून कळविणें हें त्याचें काम होतें. त्याप्रमाणें त्यानें ही सर्व हकीकत नबाबसाहेबांस साद्यंत लिहून पाठविली. रोजचें सरकारी टपाल हैद्राबादेस घोडेस्वार अगर सांडणीस्वार यांच्या हातून रवाना

होत असे. नवाबसाहेब आपल्या इजलासमध्यें ( कचेरींत ) बसले असतां अखबारनवीसानें लिहिलेली हकीकत त्यांच्यापुढें सुनावण्यांत आली. मग काय विचारतां ! नबाबसाहेब गरम झाले व हुकूम सुटला कीं 'नायबास आतांच्या आतां मुसक्या बांधून समोर दाखल करण्याकरितां स्वार रवाना करा.' इजलासमधील इतर लोक आबारावांच्या या अविचाराबद्दल त्यांस दूषण देऊं लागले व अशा तडाक्यांतून तो आतां कसचा जीवंत राहतो, असें सर्वजण आपापसांत बोलूं लागले. इतक्यांत दुसरें टपाल उघडून पाहिल्यावर आढळून आलें कीं, भालकीच्या नायबानें दहा हजार रुपयांच्या हुंड्या पाठविल्या असून व्यापारी रिवाजाप्रमाणें हुंडीबट्टा पन्नास रुपये होत असल्यामुळें ते पन्नास रुपयेही पाठविले आहेत !"

हें ऐकून नबाबसाहेब गार पडले ! 'अखबारनवीस मोठा बदमाष मनुष्य आहे त्याला कामावरून दूर करा; आणि आबाराव नायबानें सरकारचा खर्च वांचवून उलट फायदा करून दिला असल्यामुळें त्याला उंची दुशाला पाठवून त्यास पगाराची वढती द्या' असा हुकूम त्या क्षणींच सुटला ! व ही व्यवस्था करण्याकरितां टांकोटांक स्वारही रवाना झाले.

इकडे आबाराव मनांत फारच घाबरले होते. पण प्रभूंपुढें 'ब्र' सुद्धां काढण्याची त्यांची छाती होईना. 'आबाराव घरीं बसून आहे, कचेरींत जात नाहीं' अशी लोकांकडून प्रभूंस वर्दी मिळाली. प्रभूंनीं स्वदस्तुरचें पत्र लिहिलें कीं,

' कचेरींत जा; भिऊं नको. ' प्रभूंच्या आज्ञेप्रमाणें त्या दिवशीं प्रभूंचें ध्यान करून निर्भयपणानें आबाराव कचेरींत गेले. त्याच दिवशीं हैद्रावादहून आलेला उंची दुशाला व उत्तम प्रशंसापत्र पाहून त्यांची अवस्था काय झाली असेल याची कल्पना वाचकांनींच करावी ! अशा रीतीनें भक्तांचें सत्त्व पाहून त्यांचें संकट निवारण करणारा प्रभु आपल्या भक्तांजवळ सदैव उभा राहून त्यांचा संभाळ करीत असतो, याची प्रचीति येऊन प्रभूंना धन्यवाद मिळाले.

# मेडोज टेलर : : ७

सन १८५७ सालीं उत्तर हिंदुस्थानांत बंडाची धामधूम उठली होती. तिची झळ दक्षिणेकडे व त्यांतल्या त्यांत निजामच्या राज्यांत फारशी लागली नाहीं. पण या धामधुमीचा फायदा आपणही घ्यावा अशा मूर्खपणाच्या समजुतीनें सुरापुर येथील कांहीं बेडर लोकांनीं व रजपुतांनीं थोडीशी उचल खाल्ली होती. सुरापुरचा राजा कृष्णप्पा नाईक नुक्ताच वयांत आला असल्यामुळें त्याला आपल्या राज्याची मुखत्यारी मिळाली होती. राजा अज्ञान असतां त्या संस्थानचा सर्व कारभार मुख्यत्वें कर्नल मेडोज टेलर या युरोपियन अंमलदारानेंच उत्तम रीतीनें चालविला होता. बेडर लोकांचा उन्मत्तपणा पराकाष्टेस चढल्यामुळें राजाच्या अनुमतीची किंवा इच्छेची पर्वा न करितां, त्यांनीं चढाई करून कांहीं गोरे लोकांना ठार मारलें व बंडाचा झेंडा लाविला. हें संस्थान त्या वेळीं व्हाइसरॉय व निजाम यांच्या उभयतांच्या संमतीनें रेसिडेंटच्या देखरेखीखालीं होतें. रेसिडेंटकडून ब्रिटिश पलटण त्या गांवावर लगेच रवाना झाली व वाळूच्या पोत्यांचा उपयोग करून गांवावर तोफांचा मोर्चा लावल्यावर पांच-सहा तासांच्या आंत बंडवाले पसार झाले, व गांव ब्रिटिशांच्या स्वाधीन झालें. पुढें चवकशीनंतर यांत त्या तरुण राजाचा कांहीं संबंध नाहीं असें आढळून आलें. राजा या वेळीं शिकंदराबादेमध्यें कैदेंत

होता. त्याला सोडण्याचा हुकूम सुटला, त्याच दिवशीं त्यानें पिस्तुल उडवून घेऊन आत्महत्या केली. राजाच्या निर्दोषीपणाबद्दल मेडोज टेलरची खात्री होती व त्यानें त्याला या कामीं सहाय्यही केलें. असो.

या बंडखोरांपैकीं एकदोन इसमांनीं आपलें घोडे माणिकनगरास आणिले होते. तात्यामहाराजांस घोडयांचा फारच शौक होता. त्यांनीं हे उमदे घोडे पाहिल्यावर खरेदी घेतले व जवळ बाळगले. परंतु त्यांना या लोकांचा पूर्वेतिहास माहित नसल्यामुळें, ते राजरोसपणें त्या घोडयांवरून फिरत असत. बंडखोरांचा माग काढण्याचें काम कित्येक दिवस चालू होतें. माणिकनगराला दोन उमदे घोडे आले असून ते बंडखोरांनींच दिले आहेत अशी वातमी त्या वेळच्या हुमनाबादच्या तालुकदारास लागून त्यानें चवकशीस पोलिस पाठविले. पोलिस तपासाकरितां येत असल्याची वार्ता तात्यामहाराजांना लागतांच ते घोडयांसह परगांवीं निघून गेले. तथापि माणिकनगरच्या इतर लोकांना पोलिसांची फारच तसदी होऊं लागली.

प्रभुमहाराजांकडे या बाबतींत विचारपूस करण्याकरितां कोणी गेले नाहींत व तेही कांहीं बोलले नाहींत. 'तात्या विनाकारण निघून गेला. मला कळविलें असतें तर बरें झालें असतें,' एवढेंच प्रभु बोलले. इकडे तालुकदार हाजीसाहेबानें वरचेवर इतर लोकांना त्रास देण्यास सुरुवात केली. लोक

त्रस्त झाले. पण प्रभु एक चकार शब्दही बोलेनात व कधीं कधीं झोळीची भाकर खात; पण अलीकडे नुसतीं फळें व त्यांतल्या त्यांत अंजिरेंच खाऊन असत. बंडाळीचा बीमोड होऊन सर्वत्र स्थिरस्थावर झाल्यानंतरही, माणिकनगरच्या लोकांना तालुकदाराच्या लोकांनीं उपद्रव देण्याचें सोडलें नाहीं. अशा वेळीं कर्नल मेडोज टेलर हुमनाबादेस दाखल झाला. त्यानें माणिकनगर व प्रभु महाराज यांच्यासंबंधानें फार बारीक रीतीनें चवकशी केली. चवकशीअंतीं प्रभु हे महान् सत्पुरुष आहेत अशी त्याची खात्री झाली. प्रभूंजवळचे दोन ब्रह्मचारी त्याच्या बंगल्यावर जाऊन उभे राहिले. त्यानें त्यांचें म्हणणें ऐकून घेतलें व प्रभूंचें जन्मगांव, ठिकाण वगैरेसंबंधानें विचारपूस केली. याच मुलखांत प्रभूंचा जन्म झाला असून, येथून चार कोसांवर तें गांव आहे असें सांगतांच तो चकित झाला! ज्या ठिकाणीं महात्मे जन्म घेतात त्याच ठिकाणीं ते मान्यतेला चढत नाहींत, असा सर्वसाधारण अनुभव असतां, प्रभूंच्या जन्मठिकाणींच ते इतके देवासमान पूज्य मानले जात आहेत, असें ऐकून त्याला पराकाष्ठेचा अचंबा वाटला व त्यानें तसें बोलूनही दाखविलें. गोपाळबुवा ब्रह्मचारी याची फिर्याद नीट ऐकून त्यानें “ याचा बंदोवस्त करतों ” असें आश्वासन देऊन त्याला मोठ्या सन्मानानें परत पाठविलें. आणि आपल्या आणि आपल्याबरोबर

असलेल्या शिपायांना सक्त ताकीद दिली कीं, माणिकनगरच्या कोणत्याही मनुष्याला त्रास देऊं नका. हाजीसाहेब तालुकदाराचें कृत्य त्याच्या नजरेस आलें, तेंव्हां त्यानें रेसिडेंटकडे कळवून सरकारांतून त्याला अर्धचंद्र देवविला. अशा रीतीनें माणिकनगरचे लोक निर्भय झाले व नंतर तात्यामहाराजही लौकरच परत आले.

मेडोज टेलर हा उत्तम शिपाई, कर्तबगार मुत्सद्दी व नामांकित कादंबरीकर होऊन गेला, ही गोष्ट इतिहासज्ञांना माहित आहेच.

# तुकाराम धनगर : : ८

तुकाराम धनगर या नांवाचा प्रभूंचा एक भाविक भक्त होता. त्याला थोडेंसें लिहितां वाचतां येत होतें. आपल्याला स्वरूपसाक्षात्कार व्हावा अशी त्याची इच्छा होती. त्याप्रमाणें त्यानें प्रभूजवळ विनंति केली. त्याचा भोळेपणाचा भाव पाहून प्रभु संतुष्ट झाले व त्याला 'आत्मरूप प्रतीति' हा ग्रंथ वाचावयास दिला व त्याचीं अनेक पारायणें करावयास सांगितलें. आत्मरूपप्रतीति हा ग्रंथ ओंवीबद्ध असून, अतिशय लहान आहे. त्याच्याकरितांच मुद्दाम हा ग्रंथ निर्माण झाला असेंही कोणी म्हणतात. त्यानें तो ग्रंथ मोठया आवडीनें घेऊन, पारायणास सुरवात केली. परंतु कित्येक महिने गेले तरी आत्मरूप प्रतीति येईना, म्हणून एके दिवशीं प्रभुसन्निध येऊन ग्रंथ परत करून म्हणाला, " महाराज, या खटपटीची तसदी मला कशाला पाहिजे ? याचा अर्थ मला कांहींच समजत नाहीं; तुम्ही सांगितल्याप्रमाणें याचीं पारायणें करून तो पाठही करून टाकला ! पण आत्मरूपप्रतीति कुठें आहे ? असलीं पोकळ साधनें मला कशाला सांगतां ? मला याची आतां कांहीं गरज नाहीं. तुम्ही साक्षात् देव असतां, मी याच्यामागें लागणार नाहीं. आपला आपण हा ग्रंथ संभाळा. "

त्याच्या भोळेपणाचें प्रभूंना हसूं आलें. त्यांनीं गोड शब्दांनीं त्याची समजूत करून, भंडारखान्यांत जाऊन झोळीचा प्रसाद

भक्षण करून येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो प्रसाद घेण्यास भंडारखान्यांत गेला. त्यानें आपल्या अंगावरील घोंगडें प्रभूंजवळच ठेविलें होतें. तो निघून गेल्यावर प्रभूंनीं तें घोंगडें आपल्या अंगावर घेतलें व कांहीं वेळ ते स्वस्थ बसले. प्रसाद घेऊन परत आल्यानंतर त्याचें घोंगडें त्याला परत दिलें. तुकाराम घोंगडें अंगावर घेऊन बसतांच, त्याच्या चित्तवृत्तीचा लय लागून त्याला समाधि लागली. स्वरूप साक्षात्कार म्हणजे काय असतो, याचा प्रत्यक्ष अनुभव त्याला मिळाला. घोंगडें पांघरून तो आनंदभरांत रंगून जाऊन डोलत राहिला. प्रभूंनीं विचारलें, " तुकाराम, काय झालें रे तुला ?"

" महाराज, काय पाहिजे होतें तें मला मिळालें आहे. असें कांहीं तरी घा अशीच माझी विनंति होती; ती आज सफल झाली ! मी धन्य झालों. "

प्रभूंच्या प्रेमळ स्पर्शामध्यें काय सामर्थ्य असतें याचा अनुभव लोकांना आला. तुकाराम पुढें विदेह स्थितींत राहून मुक्त झाला हें सांगणें नकोच.

वरील हकीकत स्वतः रा. विठ्ठलरावसाहेब तालुकदार तेरपल्ली यांच्या समक्षांत घडली असून त्यांनीं स्वतःच सांगितली आहे.

अशा प्रकारचीं किती तरी उदाहरणें आहेत. त्या सर्वांचा या ग्रंथांत समावेश करणें अशक्य आहे. जेवढी माहिती विश्वसनीय गृहस्थांकडून मिळाली तेवढयाचाच आम्हीं सग्रंह केला आहे.

# जहागिरीची सनद : : ९

प्रभु माणिकनगरीं वास्तव्य करून राहिले असल्याचें वर्तमान सर्व ठिकाणीं पसरलें. हैद्राबादच्या सर्व अमीर उमरावांना प्रभूंची कीर्ति माहीत झाली. मोठमोठ्या राजेरजवाड्यांच्या दरबारीं मिळत नाहीं अशा प्रकारची देणगी प्रभुदरबारांत गुणीजनाना मिळते हें जगजाहीर झालें होतें. प्रभूंचें दर्शन घेण्याच्या इच्छेनें राजेरजवाडे, अमीरउमराव, जहागिरदार वगैरे बडे लोक हमेशा येत असत. आपल्या राज्याला भूषणभूत झालेल्या या नररत्नाची कीर्ति, त्या वेळचे आलाहजरत 'नासिरउद्दवला' यांच्याही कानावर गेली होती. पण हुजूरची प्रभुदर्शन घेण्याची ही इच्छा सफल कशी व्हावी? प्रभु तरी हैद्राबादीं गेले पाहिजेत, नाहीं तर हुजूर तरी प्रभूंकडे आले पाहिजेत ! या दोन गोष्टींपैकीं प्रभूंनीं हैद्राबादीं यावें असा प्रयत्न करण्याचें ठरून त्याप्रमाणें या कामीं सर सालारजंग बहादूर यांच्या विश्वासू मंडळीपैकीं अरब यशवंतराव यांची नेमणूक झाली. अरब यशवंतराव हे ब्राह्मण गृहस्थ असून मोठे नामांकित मुत्सद्दी होते. अरब शिपायांवरील हे एक सरदार होते. त्यांच्यावर सर सालारजंगचा फार लोभ होता. प्रभूंना विनंति करून हैद्राबादीं आणावें म्हणून त्यांच्यावरोबर घोडेस्वार, म्याना, पालखी वगैरे सर्व सरंजाम देऊन,

प्रभूंना अर्पण, करण्याकरितां साठ हजाराच्या जहागिरीची सनदही त्यांच्याजवळ दिली होती.

योग्य कालीं अरब यशवंतराव सर्व सरंजामानिशीं प्रभुदरबारीं येऊन दाखल झाले. त्यांनीं सन्मानपूर्वक प्रभूंपुढें साष्टांग दंडवत घालून, आपल्या येण्याचा हेतु निवेदन केला व हुजूरकडून मिळालेली सनदही प्रभूंच्या चरणीं अर्पण केली. " आम्ही फकीर लोक, आम्हास जहागीर घेऊन काय करावयाचें आहे ? आम्ही जिकडे तोंड करूं, ती आमची जहागीर आहे. सर्व विश्वभर प्रभूचें राज्य आहे. तुमच्या मालकास दिलें आहे त्यापेक्षां अधिक पाहिजे असेल, तर इकडेच यावयास सांगा. येथें तो मागेल तें आहे, आणि शिवाय मी आहें त्या ठिकाणीं असलों म्हणजेच तुझ्या राज्याची बळकटी आहे असें समज, असेंही त्याला सांगून ठेवा. "

प्रभूंच्या या सडेतोड उत्तराचें सर्वांना अतिशय आश्चर्य वाटलें; पण या उत्तरांतच प्रभूंचा प्रभूपणा होता. प्रभूंच्या सर्वतंत्र स्वतंत्र वृत्तीचा सर्वांना हा सहज दाखला आला. सुवर्णाच्या शृंखलांनीं प्रभूंना आवळूं पहाणें शक्य आहे काय ? एखादा भोळा भाविक धनगरही प्रभूंना आपल्या प्रेमानें वश करूं शकेल, पण शहानशहा बादशहांच्या सुवर्णमुद्रांनीं तो जवळ न येतां दूरच रहातो, हें यावरून उघड होत आहे.

## टर्रा हुसेनखां : : १०

प्रभुदरबारीं हिंदुस्थानांतील बहुतेक गुणी लोक येत असत. त्यांतल्या त्यांत नामांकित गवई लोकांचा भरणा फारच असे. प्रभु गायनप्रेमी असून त्या शास्त्राचे मार्मिक दर्दी आहेत, अशी सर्वत्र ख्याति झाली होती. राजेरजवाड्यांकडून बिदागी मिळाली, तरी गुणाची पारख स्वतः राजेलोकांना तितक्यापुरतीच असल्यामुळें खरें गुणप्रदर्शन त्यांच्याजवळ होत नसतें. गुणी लोकांना गुणज्ञाची आवड असल्यामुळें, लांब लांब प्रदेशचे गवई येथें येत असत. त्याकालीं हैद्राबाद शहरीं आलेला कोणताही गुणवान् मनुष्य माणिकनगरांत आल्यावांचून राहिला नाहीं. शिवाय इतर ठिकाणचे प्रख्यात लोक मुद्दामहून प्रभूंजवळ हजेरी देण्याकरितां येत. एकदां अशाच प्रख्यात गवयांपैकीं हुसेनखां नांवाचा एक गवई प्रभूंचा लौकिक ऐकून येथें आला. तो बहुतेक संस्थानांत फिरून मान्यता मिळवून आला होता. त्याला आपल्या विद्येची व कर्तवगारीची अत्यंत घमेंड होती. राजदरबारांत बहुमान होऊन बिदागी कितीही मिळाली तरी, त्याचें समाधान होण्यासारखें नव्हतें. आपलें कसब ओळखणारा कोणी सांपडत नाहीं याचें त्याला दुःख वाटत होतें. एकदा राजदरबारांत त्याचें गाणें चाललें असतां, स्वतः राजानें त्याला शाबासकी दिली, पण त्याचा त्याला राग आला. ‘ महाराज, काय समजून मला आपण

चाहवा दिली ? असा रोखठोक प्रश्न करून त्यानें लगेच आपलें गाणें संपविलें. गाढवापुढें गाण्याकरितांच आपण गाणें शिकलों याचें त्याला वाईट वाटून त्यानें यानंतर कोणापुढेंही गावयाचें नाहीं असा निश्चय केला. उत्तम गवई, पण अशा फकीरी बाण्यानें अधिकच उन्मत्त होऊन, विद्येचा चाहता कोणी मिळतो काय या शोधांत फिरत असतां, प्रभूंचा लौकिक समजल्यावर तो येथें येऊन राहिला. येथील दरबारांत त्याला चोहों मुलखांतले गवई भेटले. सर्वांची हजेरी प्रभूपुढें होऊन, त्यांना बिदागीही मिळाली. पण रोज भत्ता खाऊन हा कित्येक दिवस पडून राहिला तरी त्याची हजेरी लागण्याचा योग आला नाहीं.

येथें राहिल्यावर प्रभूंना गाणें समजतें असें त्याला दिसून आलें, पण खातरी झाली नाहीं. स्वतः प्रभूपुढें गायन झाल्याशिवाय आपली विद्या प्रभूंना कशी कळावी ? व प्रभूंना तरी कितपत यांत गम्य आहे हें आपल्यास कसें समजावें ? बरेच दिवस अशा विचारांत गेल्यावर, प्रभूंपुढें आपलें गायन झालें पाहिजे असें त्याला वाटून, तसा योग घडवून आणण्याच्या तो खटपटीस लागला. त्याला प्रभूंकडून आज्ञा पाहिजे होती, ती मिळविण्यास त्यास फारच प्रयास पडले. शेवटीं एकदांचा योग आला. त्याचें गायन सुरू झालें. त्याचें गायन चाललें असतां प्रभूंनीं त्याच्याकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. प्रभु आपलें गाणें ऐकत नाहींत हें पाहून, त्यांनीं तें लक्षपूर्वक

ऐकावें अशा हेतूनें त्यानें त्या दिवशीं पराकाष्ठा केली. चोहोंकडे गवई लोक भरले होते; सर्वांनीं 'वाहवा' दिली, पण प्रभूंनीं त्याजकडे पाहिलें नाहीं. ते दुसऱ्याशीं बोलण्याच्या नादांत होते. आपलें कसब दाखवून प्रभूंचें मन आकर्षून घ्यावें याची त्याला उत्कंठा लागली. अशा प्रकारच्या मानसिक झटापटींत सांपडल्यामुळें तो एके ठिकाणीं अगदींच घसरला. त्याच्या मनाला ती चूक समजली इतक्यांत प्रभूंनींही 'वाहवा खांसाहेब!' असें म्हटलें. अंतरींची खूण पटली! इतर गवई लोकांच्या लक्षांत हें त्याचें मर्म आलें नाहीं; पण प्रभूंनीं तें ओळखतांच तो गार झाला! आपल्या विद्येचा खरा दर्दी हा प्रभु आहे अशी त्याची खातरी होऊन, त्या दिवशीं त्यानें पराकाष्ठेची बहार केली. प्रभूही अत्यंत खुष झाले. गवयाच्या नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागले. गायन संपवून प्रभूंपुढें दंडवत घालून म्हणाला, "महाराज, आज माझ्या विद्येचें व जन्माचें सार्थक झालें. माझ्या विद्येच्या मस्तीमुळें मी तर्र झालों होतों, याकरितां मला 'टर्रा हुसेनखां' हें नांव मिळालें आहे. येथें माझी मस्ती पार जिरून गेली. पण इतःपर आपल्या चरणाशिवाय या जगांत इतर कोठेंही गावयाचें नाहीं असा माझा दृढ निश्चय झाला आहे."

प्रभूंनीं गोड शब्दांनीं त्याचा गौरव केला व त्याला आपल्या दरबारीं ठेवून घेतलें. त्याला प्रभूंचें गाणें ऐकण्याची इच्छा होऊन, तें ऐकावयास सांपडावें म्हणून तो रात्रंदिवस टपून

राहिला होता. प्रभूंचें गाणें कधीं दरबारांत होणें शक्य नव्हतें. कोणी सांगितल्यानें ते गातील ही गोष्ट केव्हांही शक्य नव्हती. त्यांच्या लहरीप्रमाणें ते कधीं तरी खंजिरी हातांत घेऊन एखादें सुंदर पद म्हणत. त्या गवयानें सहा महिने टेहळणी करूनही त्याला तो योग कधींच साधला नाहीं.

पुढें एके दिवशीं नित्याप्रमाणें प्रभूंच्या झोंपडीच्या आसपास फिरत असतां, त्याला एक मधुर ध्वनि ऐकूं आला. जवळ जाऊन लक्ष्यपूर्वक ऐकतां, प्रभु कांहीं तरी पद म्हणत आहेत अशी त्याची खातरी झाली. ज्या ठिकाणाहून हा ध्वनि येत होता, तेथें प्रभूंचा शौचकूप होता. तेथून बाहेरच्या बाजूला उत्कृष्ट प्रकारें गाणें ऐकूं येत होतें. भिंतीपलीकडे वळचणीच्या खालीं उभा राहून तें गाणें ऐकण्यांत तो दंग होऊन गेला. त्याच्या नेत्रांतून एकसारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या. आपलें देहभान विसरून तेथेंच तो निश्चल राहिला. आंतील गाणें बराच वेळ चाललें होतें. गाणें म्हणजे काय असतें याचा त्याला अनुभव आतां आला; व त्या मानानें आपलें स्वतःचें गाणें काय किंमतीचें होतें हेंही त्याला कळून आलें !

पुढें हा गवई प्रभूंचा चेला बनला व दुसरीकडे कोठें न जाता मरेतोंपर्यंत प्रभुदरबारीं राहून त्यानें येथेंच देह ठेविला.

गायनाच्या विद्येसंबंधानें प्रभुदरबारचा लौकिक अद्यापही कायम आहे. विद्यमान श्रीमार्तंड माणिक प्रभु महाराज यांची

गायनशास्त्र-ख्याति इतकी पसरली आहे कीं, आजकालच्या नामांकित कलावंतांत असा एखादाच निघेल कीं, ज्यानें आपलें कलाप्रदर्शन महाराजांसमोर केलें नाहीं. आर्यावर्तातील आसेतुहिमाचल प्रसिद्ध असलेले शेंकडों गवई येथें येऊन गेले आहेत. गाण्याची खरी परीक्षा या ठिकाणीं होत असून, उत्कृष्ट गुणाचा गौरवही होत असतो. काशीनाथपंत छत्रे यांच्या समागमें राहत असलेला रहिमतखां गवई सर्व हिंदुस्थानांत वरिष्ठ प्रतीचा होता. तो उत्कृष्ट गवई, तसाच लहरी फकीर होता. खरोखर मन मोकळें करून गावयास त्याला सर्व जगांत मणिकनगर हें एकच स्थान सांपडलें व तो या ठिकाणीं अगदीं मुक्तकंठानें गायिला. एक महिनाभर त्याचें वास्तव्य या दरबारांत होतें. दररोज तीन-चार तास याप्रमाणें रोज त्याचें गाणें चाले. त्याचें गाणें संपल्यावर काशीनाथपंत छत्रे यांनीं स्वतः असे उद्गार काढले कीं, “रहिमतखां आपल्या स्वतःच्या उल्हासानें इतकें कोठेंच गायिला नाहीं. त्यानें आजपर्यंत संपादन केलेल्या विद्येचें खरें सार्थक प्रभुमहाराजांच्या दरबारांत गायिल्यानें झालें आहे.”

## नाना नाच्या : : ११

खंदारकर देशपांडे यांचा मुलगा नाना या नांवाचा होता. जमीनदार घराण्यांतला हा तरुण सुस्वरूप असून, त्याचा आवाज फारच गोड होता. खानदानी श्रीमंत घराण्यांत जन्मास आल्यामुळें, त्याला नानासाहेब असें लोकांनीं म्हणावें. पण त्याला लहानपणापासून तमाशेवाल्यांची संगत लागल्यामुळें, लावण्या गाण्यांत व बायकोचें सोंग घेऊन नाचण्यांत गोडी वाटूं लागली. जातीचा हुषार, स्वरूपानें सुंदर व कंठाचा मधुर बालक हातीं आल्यावर तमाशेवाल्यांची वहार झाली ! प्रथम गुप्तपणें त्याचा नाद चालू होता, पण पुढें उघड उघड तमाशांत स्त्रीचें सोंग घेऊन तो नाचूं लागला. त्या वेळीं मोगलाईतील देशपांडे म्हणजे गांवचे सरकारच होते. त्यांना कोणाची भीति नव्हती. वयांत येऊन तो आपल्या संपत्तीचा मालक बनला, तरी त्याचा नाचण्याचा नाद कायमच राहिला. गांवच्या लोकांना ही गोष्ट पसंत नव्हती पण इलाज चालेना. शेवटीं याच्या नांवाचा फारच गवगवा होऊन ब्राह्मण जातभाईंनीं त्याला बहिष्कृत केलें, तरी गाण्यानाचण्याची त्याची स्वभाविक आवड कमी झाली नाहीं. प्रत्यक्ष—अप्रत्यक्ष अशा अनेक प्रकारच्या छळाला कंटाळून तो माणिकनगरीं प्रभुसन्निध आला.

प्रभूंच्या दरबारांत नित्य गायन-नर्तनाचे जलसे चालत. नानाच्या स्वाभाविक आवडीस पोषक असाही समाज

प्रभुदरबारीं होता. प्रभूंचें दर्शन घेऊन त्यानें आपली सर्व कहाणी सांगितली व प्रभुचरणीं शरण जाऊन 'पावन करा' अशी विनंति केली:—

" महाराज मी अनाचारी । विपरीत कर्म घडलें परी ॥
न सुटे मज निर्धारीं । नाचावेंच वाटतें ॥ १ ॥ "

या वाक्यानें त्यानें आपल्या पापकर्माची कबुली देऊन, " कितीही निश्चय केला तरी तें कर्म सुटत नाहीं,नाचण्याची आवड अनिवार आहे याला काय करूं ?" असा प्रश्न विचारला. प्रभूंना त्याची करुणा आली. त्याच्या अंत:करणाची जाणीव त्यांना होती. त्याच्या प्रेमास व आवडीस जें विपरीत वळण लागलें आहे, त्याचा ओघ फिरवून तें योग्य मार्गास लाविल्यानें त्याचा उद्धार होणार आहे असें पाहून प्रभूंनीं त्याच्या जन्मसिद्ध आवडीस प्रतिबंध न करितां, उलट उत्तेजनच दिलें."तूं नाचतोस कसा हें प्रथम मला पाहूं दे; मग पुढें काय करावयाचें तें पाहूं " असें प्रभूंनीं म्हणतांच त्याला अत्यानंद झाला. सर्व सरंजाम सिद्ध करून स्त्रीच्या वेषांत प्रभूंपुढें त्याचें गायन होऊन नाचही झाला. त्याचें कसब अप्रतिम होतें ! त्याच्या स्वरूपाला पाहून व त्याचें गाणें ऐकून सर्व समाज मोहित झाला. त्या दिवशीं त्यानें फारच बहार केली. त्याच्या गुणाचा गौरव करून प्रभूंनीं त्याला आपल्याजवळ ठेवून घेतलें. आणि त्याला स्वत: कांहीं पदें शिकवून त्याच्या आवडीस कृष्णभक्तीचें वळण लाविलें.

त्याचा नाच पाहूनी । आनंदती आपुले मनीं ॥
त्यासी श्रीकृष्ण लीला सांगुनी । हळू हळू सोडविती ॥ १ ॥
पुढें तोचि नटधारी । गाउनी नाचे परोपकारी ॥
श्रीहरि लीला परी । नाना परी वर्णूं लागे ॥ २ ॥

अशा प्रकारें भगवान् श्रीकृष्णाच्या प्रेमळ भक्तीची त्याला गोडी लावून दिल्यानंतर तो त्यांत रंगून गेला व श्रीप्रभूंच्या कृष्णपर पदांनीं नानाचें मूळचें स्वरूप पालटून त्याच्या प्रेमळपणांत दिव्य तेज उत्पन्न झालें.

नानाच्या द्वेष्टयांनीं प्रभूंनीं त्याला आश्रय दिला आहे हे वर्तमान ऐकल्यावर, त्याच्यावरील बहिष्काराला व्यापक स्वरूप द्यावें म्हणून जगद्गुरूकडे त्याची फिर्याद नेली, म्हणून प्रभूंच्या आज्ञेवरून तो जगद्गुरूकडे गेला. तेथें काय झालें याचें वर्णन खालील ओव्यांत फारच बहारीचें केलें असल्यामुळें आम्ही त्या तशाच देत आहों.

नाना येऊनी लागे चरणीं । स्वामीस विनवी दीनवदनीं ॥
महाराज मजला यावांचूनी । अन्य गोडी न वाटे ॥ १ ॥
परी मज पोटीं एक हेत । स्वामींनीं ऐकावें माझें गीत ॥
नंतर मजला प्रायश्चित्त । जें देणें तें द्यावें ॥ २ ॥
ऐसें ऐकून करुणावचन । द्रवलें सर्वांचें अंतःकरण ॥
स्वामीची आज्ञा घेऊन । विचार केला गाण्याचा ॥ ३ ॥
आज्ञा होतांचि पाही । आनंद वाटला नानाचे हृदयां ।
चरणीं ठेवोनी डोई । तयारी करीत असे ॥ ४ ॥

प्रसन्न मर्जी जगद्गुरूची पाहे । सर्व सामान घेउनि लवलाहें ।
येऊनी सन्मुख उभा राहे । श्रीजीचे ॥ ५ ॥

आज्ञा मागून सत्वर । दों बाजूस दोन बजवय्ये सुंदर ॥
तंबुरीस लावूनी मंजुळ स्वर । तबलाही झडूं लागे ॥ ६ ॥

सारंगी वाजे बहु खासी । मोहूनि घेतलें मनासी ॥
घुमघुमलें मंदीर परियेसीं । त्यावर आवाज बहु गोड ॥ ७ ॥

प्रथम नमनाची लावणी । लावणी नोहे ती मनमोहिनी ॥
ताल सुरांत लक्षुनी । आळविलें परमात्म्यासी ॥ ८ ॥

नंतर श्रीहरीची लीला । गाइली स्मरोनि चरणकमळां ॥
श्रोत्यांचें लक्ष आणि डोळा । लागला सर्व नानाकडे ॥ ९ ॥

नंतर लावणीचे चालीवर । गायिली श्रीरामपूजा सुंदर ॥
गायत्र्यादि पुरुषसूक्त प्रकार । तालसुरांत वर्णिले ॥ १० ॥

ती अति कुशलता नानाची । पाहुनी तोषली वृत्ति मनाची ॥
संतोषली मंडळी सर्वंचि । चतुराई पाहूनी ॥ ११ ॥

जगद्गुरूसही तोषविलें । रुष्ट मर्जी संतुष्टविले ॥
कैसेंही परी श्रीहरिगुण आगळे । बहु प्रेमळ गायिले ॥ १२ ॥

याचा गुण आहे अमोल । गातो निर्लज्ज मन करूनी अमळ ॥
केवळ अन्याय नोहे प्रेमळ । त्यावरी प्रभूंनीं आश्रयिला ॥ १३ ॥

शनै शनै सुलभ मार्ग । दाऊनी सोडवितील हा भाग ॥
ऐसें जाणूनी सांग । पूजा घेती तयाची ॥ १४ ॥

प्रसाद जगद्गुरूचा घेतला । माणिकाजवळी नाना राहिला ॥
माणिकाचे शिकूनि पदाला । गाऊनि नाचूनि दाखवी ॥ १५ ॥

ऐसे दुष्टकर्मी जरी येती । त्यांसि सुष्ट मार्ग दाउनि निश्चिती ॥
कोणेही प्रकारें श्रीहरिभक्ति । लावूनि बंधमुक्त करविती ॥ १६ ॥

अशा प्रकारें आपल्या भक्तांना त्यांच्या आवडीच्या मार्गानें नेऊनच त्यांचा उद्धार करण्याची प्रभूंची हातोटी अलौकिक होती. प्रभूंच्या सकलमतसंप्रदायाचा हा एक विशेष आहे. कोणासही त्याच्या कृत्याबद्दल दोष न देतां, त्याच्या अंगीं असलेल्या गुणांचा उत्कर्ष करूनच त्यास निर्दोष बनविण्याचें सामर्थ्य खऱ्या सद्गुरूशिवाय अन्यत्र कसें असणार ? प्रभूंनीं हातीं धरलेल्या मनुष्यास अधोगति देण्याची शक्ति कोणत्याही सत्तेमध्यें नाहीं. 'धरि हातीं मला करि तूं आपुला' अशी करुणा भाकून प्रभूजवळ गेलेल्या मनुष्याची त्यांनीं कधींही उपेक्षा केली नाहीं. "आम्हाला धरतां येतें पण सोडतां येत नाहीं" हें प्रभुवाक्य आहे. भक्तांना हें वाक्य किती आशाजनक आहे ! ! इतकें दृढ व स्पष्ट आश्वासन इतरत्र एखाद्या संतानें दिल्याचें आमच्या आढळांत नाहीं.

# अक्कलकोटचे स्वामी : : १२

माणिकनगरची वसाहत मूर्त स्वरूपास आल्यानंतर, सर्व मुलखांतले लोक प्रभूंच्या दर्शनाकरितां सतत येण्याचा क्रम सुरू झाला होता. राजेराजवाडे, अमीरउमराव, शेटसावकार, देशमुख-देशपांडे इत्यादि बड्या लोकांप्रमाणें साधु, संत, बैरागी, गोसावी, ब्रह्मचारी, संन्यासी तसेंच शास्त्री, वैदिक, पुराणिक, हरिदास, गवई आणि नायकिणी यांचीही रहदारी सुरू झाली. श्रीअक्कलकोटकर स्वामींच्या चरित्रकारानें स्वामींच्या ओंवीबद्ध चरित्रांत प्रभूंचा ज्या ठिकाणीं उल्लेख केला आहे, त्या अध्यायांतील खालील ओंव्यांवरून प्रभुदरबारीं येणाऱ्या लोकांची सामान्य कल्पना होण्यासारखी आहे.

मोगलाईंत हुमणाबादे नजीक । माणिकनगर स्थान रम्यक ।
सिद्ध पुरुष माणिक प्रभु नामक । त्यांचें स्थान असे हें ॥ १ ॥
दया, क्षमा, शांति अंगीं । भक्ति ज्ञानसहित विरागी ।
राग द्वेष विकार परित्यागी । माणिकप्रभु महात्मा ॥ २ ॥
जे बाल्यावस्थेपासून । संसार प्रपंच परित्यागून ।
ब्रह्मानंदांत अखंड निमग्न । होऊन विचरती भूवरी ॥ ३ ॥
जगद्धितार्थ कल्याण ग्रामादिकांत । बसूनि शेवटीं आनंदभरित ।
रचवूनि माणिकनगर प्रख्यात । राहिले विश्रांति स्थानीं त्या ॥ ४ ॥
सहस्रावधि लोक दर्शना । येती धरोनी शुद्ध भावना ।
वैदिक पंडित हरिदास नाना । गायक वैद्य ज्योतिषी ॥ ५ ॥
श्रीमंत गृहस्थ सावकार । व्यापारी आणि सत्ताधिकारी थोर ।
निर्धन रोगी भाविक नारीनर । येती दर्शना गणिकादि ॥ ६ ॥

ब्रह्मचारी गृहस्थ वनवासी। साधु संत महंत विरागी संन्यासी।
सर्व जातीचे लोक दर्शनासी। येती माणिकप्रभूच्या ॥ ७ ॥

वरील वर्णनांत दर्शविल्याप्रमाणें इतर लोकाप्रमाणे मोठमोठे साधु, संत, महंत, विरागी आणि संन्यासी यांचाही भरणा सदैव माणिकनगरीं असे. महाराष्ट्रांतील तत्कालीन सत्पुरुषाग्रणी यांचा संबंध प्रभूंशीं होता, ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होत आहे. तत्कालीन महाराष्ट्रांतील प्रमुख सत्पुरुषांमध्यें, अक्कलकोटचे स्वामी, मिरजेचे अण्णाबुवामहाराज, कोल्हापुरचे कृष्णस्वामी ऊर्फ कुंभार (गल्लींतील) स्वामी, आणि यशवंतराव देवमामलेदार हे प्रमुख चार महात्मे प्रभूंना समकालीन होते. प्रभूंसह यांचें पंचायतन मानल्यास प्रभू हे सर्वांचे अग्रणी होते यांत मुळींच शंका राहत नाहीं. प्रभूंचें बालवयापासूनचें अलौकिक सामर्थ्य, त्यांचें दिव्य तेज, कडकडीत वैराग्य, असामान्य ज्ञान आणि अप्रतिम कर्तृत्वशक्ति यांचा विचार केल्यास ही गोष्ट सहज पटण्यासारखी आहे. समर्थकालीन पंचायतनामध्यें जसे समर्थ, तसे प्रभुकालीन पंचायतनामध्यें प्रभुही श्रेष्ठ मानिले जात होते. कोल्हापुरचे कृष्णस्वामी प्रभूंना ओळखीत होते इतकेंच नव्हे. तर त्यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध होता असें दिसतें. दासगणु यांनीं लिहिलेल्या अर्वाचीन भक्तलीलामृतांत दिलेल्या त्यांच्या चरित्रांतील कांहीं ओंव्यांवरून ही गोष्ट उघड होत आहे:

महाराज श्रीकृष्णस्वामींनीं। काय केलें एके दिनीं।
गडबडीनें उठोनी। स्नान केलें सचैल ॥ १ ॥
तई कृष्णा लाड सद्भक्त। पुसता झाला स्वामीप्रत।
मध्येंच आज किंनिमित्त। स्नान केलें महाराजा ? ॥ २ ॥

स्वामी म्हणती कृष्णासी । माणिकप्रभु निजधामासी ।
गेले हुमणाबादेसी । म्हणून केलें स्नान त्यां ॥ ३ ॥

—अध्याय ४२

प्रभुसमाधीनंतरची ही हकीकत आहे, तरी त्यावरून त्यांचा फार पूर्वींचा संबंध असून तो प्रेमानें दृढ झाला होता यांत शंका नाहीं. प्रभूंच्या सन्निध पुष्कळ वर्षें राहिलेल्या एका सद्गृहस्थाच्या सांगण्यावरून प्रभूंच्या दर्शनाकरितां बहुतेक सर्व त्या कालचे सत्पुरुष आले होते, असें आम्हांस समजलें आहे.

अक्कलकोटच्या लोकांचा व तेथील राजदरबारांतील अधिकाऱ्यांचा माणिकनगराशीं विशेष संबंध होता. त्या दरबारांतील व गांवांतील पुष्कळ लोक नेहमीं येथें येऊन-जाऊन असत. तेथील राजाकडून प्रभूंकडे एक छत्र, अबदागिरी आणि पालखी आली होती. प्रभूंनीं अक्कलकोटास यावें अशी राजाची फार इच्छा होती. त्याकरितांच हा सरंजाम पाठविला होता. प्रभूंनीं मी पुढें केव्हां तरी येईन असें सांगून येणाऱ्यांची समजूत करून परत पाठविलें होतें. सारांश, अक्कलकोटच्या जनतेला त्याचप्रमाणें राजालाही प्रभूंच्या आगमनाची उत्कंठा लागून राहिली होती. सर्वतंत्र स्वतंत्र अशा प्रभूंच्या स्वयंस्फूर्तीनेंच त्यांची ती इच्छा तृप्त होणारी होती. "माझ्या संतोषानें मी पुढें केव्हां तरी तुमच्या गांवीं येईन" अशा प्रकारचें आश्वासन त्यांना मिळाल्यानें थोडा आनंद झाला होता व त्यांच्या आगमनाची ते मार्गप्रतीक्षा करीत होते.

अक्कलकोटहून पालखी, छत्री व अवदागिरी आली त्या वेळीं शंकराप्पा उदगीर नांवाचा एक प्रभुभक्त, प्रभुसन्निध होता. त्याला जवळ बोलावून प्रभूंनीं तो सर्व सरंजाम त्याला देऊं केला. "आमच्यासारख्या फकीराला हें घेऊन काय करावयाचें आहे ? हें तुम्ही घेऊन जा" असें प्रभूंनीं त्याला सांगितलें. त्यावर तो हात जोडून म्हणाला, "प्रभुमहाराज, मी गरीब मनुष्य ! हा सरंजाम वाहून नेण्यास मजजवळ एकही माणूस नाहीं. मग मी याला घेऊन काय करूं?" प्रभु म्हणाले, "अरे, घेऊन तर जा आधीं ! सर्व कांहीं आपोआप जमून येईल. तूं काळजी करूं नको." प्रभु संतुष्ट होऊन देत असलेली देणगी त्यानें प्रसाद म्हणून घेतली व प्रभूंच्या कृपेनें त्याचा लौकिक वाढून त्याजपाशीं सर्व ऐश्वर्य जमा झालें. या शंकराप्पास प्रभूंनीं चार कोसांच्या आंतील पाहण्याची दिव्य दृष्टि दिली होती, असें म्हणतात. अद्यापपावेतों त्याचे वंशज सत्पुरुष असे मानले जात असून, संपन्न स्थितींत आहेत. असो.

अक्कलकोटच्या लोकांचा व प्रभूंचा परिचय होऊन तो प्रेमळ भावनेनें दृढ झाला असल्यामुळें, तेथील बरेच लोक येथें येऊन राहत असत. त्यांमध्यें तेथील एक नामांकित गवईही येऊन राहिला होता. तसेंच तेथील एक रहिवासी महिपती रामचंद्र ऊर्फ बाबा सबनीस याला मनांत उपरति होऊन, तो प्रभुदरबारीं येऊन राहिला होता. त्याला पूर्वी तेथील सरकारी नोकरी होती. ती सोडून देऊन परमार्थप्राप्तीच्या हेतूनें तो माणिकनगराला आला

होता. आपल्याकडे येणाऱ्या लोकांना प्रभु त्यांच्या योग्यतेप्रमाणें साधनमार्ग दाखवीत असत. ते कधीं कोणाला डोकीवर हात ठेवून कानांत उपदेश देत नसत. ज्या मनुष्याला ज्या देवतेची आवड असेल, त्याला त्या देवतेचें नांव घेण्यास सांगावें, हाच त्यांचा उपदेश. प्रभुसंप्रदायाचा हाही एक विशेष वाचकांनीं लक्षांत घेण्यासारखा आहे. "प्रभु, आपण साक्षात् परमेश्वर आहांत, आपल्यापुढें दुसऱ्या देवाचें काय महत्त्व आहे?" असें भाविकपणें व निष्ठेनें म्हणणारास त्यांनीं आपलें नांव घेण्यास सांगावें. त्यांनीं नेहमीं म्हणावें कीं, "प्रभूंची पकड फार जबरदस्त आहे; त्याला धरतां येतें, पण सोडतां येत नाहीं. आपल्या भक्ताला तो कधींही सोडीत नाहीं." असो; बाबा सबनिसाची योग्यता प्रभूंना माहित होती व त्याला मार्गास लावण्याचा उपायही सुलभ होता. पण अनुकूल संधि पाहिजे होती.

या वेळीं एक परमहंस स्वामी प्रभूंच्या दर्शनाकरितां आले. हे आजानुबाहु असून शरीरानें धिप्पाड होते. त्यांची अत्यंत विरक्त स्थिति असून बहुतेक ते दिगंबरच असत. प्रथम येथील संगमावर त्यांचा मुक्काम होता. ते कोणाशींही फारसे बोलत नसत. प्रभूंची व स्वामींची भेट झाल्यानंतर उभयतां तीन दिवसपर्यंत एकांतांत होते. त्यांचें काय काय बोलणें झालें, तें कोणालाही माहित नाहीं. तथापि त्यांची इच्छा प्रभुसन्निध राहण्याची होती, पण प्रभूंनीं त्यांना 'झाडाखालीं झाड वाढत नाहीं, तुम्ही येथून अक्कलकोटास जा' असें सांगितलें

असल्याचें त्या वेळचे लोक बोलत असत. या म्हणण्याला प्रत्यंतर मिळतें. त्यांचा एकांत संपल्यानंतर, स्वामी प्रभुदरबारांत प्रभु-शेजारीं बसल्याचें पाहून लोक चकित झाले. दोन तेजस्वी पुरुष एके ठिकाणीं बसले होते. एक संपूर्ण वैभवसंपन्न सम्राटासारखा पण दिव्य तेजानें शोभत होता, तर दुसरा वैराग्यपूर्ण दिगंबर स्थितींत तळपत होता.

दरबारांत याप्रमाणें या दोन पुरुषांच्या अप्रतिम तेजस्वितेची प्रशंसा चालली असतां,बाबा सबनीस याला प्रभूंनीं आपल्याकडे बोलाविलें आणि स्वामीकडे बोट करून सांगितलें कीं, " हे तुमच्या गांवीं येतील व तुमच्या मनांतील हेतु पूर्ण करतील. हेच तुमचे गुरु ! " सबनीसाला या बोलण्याचें नवल वाटलें. स्वामींची माहिती त्याला नव्हती. हे कशाकरितां येतील व यांनाच गुरु कसें करावें, अशी शंका त्याच्या मनांत आली. दुसऱ्या दिवशीं स्वामीकडे जाऊन याचा खुलासा करून घ्यावा म्हणून ते त्यांच्याकडे गेले असतां, तोंडावर पांघरूण घेऊन स्वामी स्वस्थ पडले होते. पण आंतूनच जेव्हां ते अंःतकरणांतील खुणेची गोष्ट बोलले त्याचें सबनीसास नवल वाटून, प्रभूंकडे परत आल्यावर प्रभूंनीं त्यांच्या अंतःकरणाच्या तळमळीची ओळख दिली, असो. पुढें सबनीसाच्या मनाचें समाधान करून त्याला अक्कलकोटास परत पाठविलें. स्वामीही कांहीं दिवस राहून येथून निघून गेले.

अक्कलकोटास जाईपर्यंत स्वामींचें नांव गांव कोणाला माहित नव्हतें. पुढें ते तेथें राहिल्यामुळेंच 'अक्कलकोटचे स्वामी' म्हणून यांची प्रसिद्धि झाली. अक्कलकोटास जाण्यापूर्वी स्वामींनीं कांहीं दिवस प्रभुसन्निध वास्तव्य केलें होतें, ही गोष्ट निर्विवाद आहे. त्यांच्या चरित्रकारानेंच या आगमनाचें व प्रभूंच्या भेटीचें मोठें रसाळ वर्णन केलें आहे. स्वामी अक्कलकोटास जाणार असल्याचें वर्तमान प्रभूंच्या सांगण्यावरूनच बाबा सबनीस यांस समजलें, असें त्यांच्या चरित्रकारांनींच म्हटलें आहे

बाबा सबनीसास प्रभु बोलती । दोन वर्षांनीं ही दत्तमूर्ति।
तुमच्या अक्कलकोटीं निश्चितीं । जगद्धितार्थ प्रकटेल ॥ १ ॥

यावर स्वामी कांहीं बोलल्याचें ते लिहीत नाहींत, यावरूनही प्रभूंच्या सांगण्यावरूनच स्वामी अक्कलकोटास गेले असावेत असा तर्क होतो.

स्वामी माणिनगरास आले होते व त्यांचा मुक्काम संगमावरील धर्मशाळेंत होता. बाबा सबनीसाचा वृत्तांत व प्रभु आणि स्वामी या उभयतांच्या भेटीचा अपूर्व सोहळा यांची हकीकत आम्ही एका प्रभुचरित्रकाराच्याच शब्दांत खालील ओव्यांतून देत आहों. आतांपर्यंत प्रभूंचीं चरित्रें अनेक भाषांतून तशींच गद्यपद्यात्मकही झालीं आहेत. त्यांपैकीं एक लहानसें ओंवीबद्ध चरित्र आमच्या पाहण्यांत आलें, त्यांतून खालील उतारा घेतला आहे.

बाबाजी रामचंद्र सबनवीस । वसे अक्कलकोटीं खास ।
वीतराग बाणून मनास । दर्शना पातलासे ॥ १ ॥

रोजी रोजगार सोडोनी । संसार सर्व त्यागूनी ।
राहे प्रभुसंनिध येऊनी । निशिदिनीं सेवा करी ॥ २ ॥

अनन्यभावें शरण । पुसे तत्त्वविचार खूण ।
तंव उदया आला सुदिन । स्वामी पातले एकाएकीं ॥ ३ ॥

कोण कोठील नकळे । प्रभूंचे जवळच बैसले ।
बाबाजीस आश्चर्य वाटलें । मनामाजीं ॥ ४ ॥

परी प्रभुमहाराज अंतर्ज्ञानी । वोळखिलें स्वामी लागुनी ।
एकाएकीं सांगती बाबाजीलागुनी । हेचि तुमचे गुरु पैं ॥ ५ ॥

कोण कोठील माहीत नाहीं । नांवही कळूं दिलें नाहीं ।
अंतरींची खूण लवलाही । जाणली प्रभुरायें ॥ ६ ॥

हे तुमचे गांवीं राहतील । जगासी पावन करतील ।
परि ऐसे मोघम बोलिले बोल । पुर्तेपणीं कळलें नाहीं ॥ ७ ॥

पुढें कांहीं वेळ जातां । मनीं शंका वागवितां ।
स्वामी जाणोनि बाबाजी मनोगत्ता । बोलते जाहले ॥ ८ ॥

तूं जावें येथोनी सत्वरीं । मी अक्कलकोटास येईन निर्धारीं ।
तेव्हां बाबाजीचे अंतरीं । आश्चर्य फार वाटलें ॥ ९ ॥

ऐकोनि एकाचे मनोदय । वोळखी खरें निःसंदेह ।
परी पुर्तेपणीं संशय । गेला नाहीं माझा ॥ १० ॥

म्हणोनी स्वामी बिऱ्हाडासी । बाबाजी जाय त्वरेंसी ।
सांगे सर्व वृत्तांतासी । तंव न बोलती महाराज ॥ ११ ॥

मुखावरोनी पदर । स्वामी घेती सत्वर ।
सहजासहजीं मनांतील विचार । बोलती बाबाजीचे ॥ १२ ॥

बाबाजी मनीं तर्कला । हा कोणी सिद्ध पुरुष देखिला ।
न सांगतां सर्व वोळखिला । मनांतील प्रकार ॥ १३ ॥

प्रभूंनीं यासी ओळखिलें । न सांगतां खूणखाण जाणिलें ॥
मजला तेव्हांचि आज्ञापिलें । गुरू तुमचे म्हणोनी ॥ १४ ॥

माझें गांव नांव माहीत नसतां । आपोआप ओळखुनी तत्वतां ।
अक्कलकोटा येऊं म्हणतां । हर्ष वाटला मानसीं ॥ १५ ॥

मनांतील सर्व जाणितलें । न पुसतां अनुवादिलें ।
एकाहूनि एक आगळे । शोभति रामकृष्णापरी ॥ १६ ॥

म्हणूनि अनन्यभावें शरण । माणिकासि घाली लोटांगण ।
नित्यानित्य पूजन अर्चन । संतोषवी गुरुराया ॥ १७ ॥

कांहीं दिवस स्वामी राहविले । एके धर्मशाळे होते उतरले ।
निशिदिनीं आनंदाचे लळे । दृष्टी घडती अकस्मात ॥ १८ ॥

संतसंताची होतां भेटी । तो आनंद नये बोलतां ओठीं ।
गंगाभागीरथीची जेवी मिठी । तेंवी दिसूं लागे ॥ १९ ॥

तंव बाबाजीचे मनीं । मंत्र घ्यावा प्रभुपासूनी ।
हा निश्चय दृढ करूनी । ध्याऊं लागे चित्तीं सदा ॥ २० ॥

निद्रा नये नेत्रासी । ध्यान लागलें दिननिशीं ।
आठवुनि माणिक चरणासी । कधीं पावन होईन म्हणे ॥ २१ ॥

सहज गेले स्वामीजवळी । स्वामी निद्रित होते स्वस्थळीं ।
खूण अंतरीं बाणली । बाबाजी आल्याची ॥ २२ ॥

तंव जाणूनी बाबाजी हेत । स्वामी आपोआप बोलत ।
जें होतें बाबाजीचे मनांत । सहज बोलोनि दाखवी ॥ २३ ॥

तंव कळलें बाबाजीला । हा पुरुष अनुभवी दिसला ।
म्हणूनी चरणासी लागला । प्रेमानंदें ॥ २४ ॥

कांहीं प्रश्नोत्तर बोलावें । म्हणोनि विनवूं लागे भावें ।
परि तो हेतु पूर्ण नोहे । कदाकाळीं ॥ २५ ॥

मुखावरील पदर । काढिला नाहीं साचार ।
मग प्रश्नाचें उत्तर । कोठूनि मिळतें बाबाजीतें ॥ २६ ॥

न बोलतां सहजीं उत्तर । मनांतील देती स्वामी सार ।
म्हणूनी तेथून निघूनी सत्वर । येता झाला माणिकापाशीं ॥ २७ ॥

बाबाजी आले तें पाहून । माणीक बोलती आनंदोन ।
प्रश्नाचें निराकरण । जें केलें तें स्वामींनीं ॥ २८ ॥

जहालें वर्तमान । अंतरींची खूण जाणून ।
न पुसतां आपोआप बोलून । प्रभु दाविती प्रसिद्ध ॥ २९ ॥

तंव बाबाजीस आनंद वाटला । केवढा हा अनावर खटला ।
न बोलतां संशय तुटला । मनांतील माझे ॥ ३० ॥

जाणूनी चरणीं लागला । प्रेमें कंठ सद्गद झाला ।
अष्टभाव सात्विकी उठला । स्वेद सर्वांगासी ॥ ३१ ॥

पूजा केली माणिकाची । इच्छा नसे आणिकाची ।
आस पुरली सेवकाची । म्हणून चरणीं मिठी घाली ॥ ३२ ॥

माणिकनगरीं माणिक । नित्यानित्य येती आणिक ॥
साधुसंत सरदार अनेक । येती दर्शनाकारणें ॥ ३३ ॥

वरील वर्णनावरून प्रभूंच्या व स्वामींच्या भेटीच्या प्रसंगाची तशीच हेतूचीही कल्पना होण्यासारखी आहे. स्वामींचे चरित्रकार यांनीं ही हकीकत कोणाकडून तरी ऐकून लिहिली आहे. पण प्रभुचरित्रकारानें ती समक्ष पाहिली आहे.

हें प्रत्यक्ष जीवनदासें आधीं । पाहिलें जाऊन हुमनाबादीं ।
चरणद्वय वंदोनि निजानंदीं । रमूनी जाहलों धन्य ॥ १ ॥

त्याच्याप्रमाणेंच दुसऱ्या एका गृहस्थानें पाहिलेली हकीकत आम्हांस सांगितली ती वरील वर्णनास जमत आहे.

प्रभुमहाराज व स्वामी यांच्या भेटीचें वर्णन करतांना प्रभूंनीं स्वामींना किती गौरवानें वागविलें हें लिहीत असतां स्वामींच्या चरित्रकारांनीं पुढील ओंवी दिली आहे.

मग माणिकप्रभु समस्तांसी । सांगती हे गुरुस्थानीं हृषीकेशी ।
साक्षात् दत्तात्रेय आम्हां सर्वांसी । आहेत जगदुद्धारक ॥ १ ॥

स्वामींच्या चरित्रकारानें केवळ गौरवार्थ वरील ओंवी लिहिली असली, तरी कांहीं जणांनीं 'स्वामी हे प्रभूंचे गुरु होते' अशी आपली समजूत करून घेतली असल्याचें आम्हांस दिसून आलें आहे. परंतु आतांपर्यंत स्वामींची वर जी हकीकत दिली आहे त्यावरून, हा प्रकार अगदींच विसंगत आहे असें कोणासही सहज दिसून येईल. प्रभुचरित्रकार, ज्यांनीं स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलेली हकीकत लिहिली आहे, ते म्हणतात—

परि प्रभुमहाराज अंतर्ज्ञानी । वोळखिलें स्वामीलागुनी ।
एकाएकीं सांगती बाबाजीलागुनी । हेचि तुमचे गुरु पैं ॥ १ ॥

स्वामींचा पूर्वेतिहास अजूनपर्यंतही अज्ञातच आहे. दासगणु आपल्या संतलीलामृतांत म्हणतात—

हे स्वामी कोण कोठचे । हें न कांहीं कळे साचें ।
कांहीं दिवस तयांचें । वास्तव्य होतें मंगळवेढीं ॥ १ ॥

खुद स्वामींच्या चरित्रकारांनाही याविषयीं कांहीं माहिती नाहीं, हें त्यांच्या लेखावरूनच उघड होत आहे. चरित्राच्या

प्रथमाध्यायांत मंगलाचरण, नमन व स्वतःची पूर्वपीठिका सांगून झाल्यावर, द्वितीयाध्यायांत त्यांनीं महर्षि अत्रि व सती अनसूया यांच्या पोटीं श्रीदत्तात्रेयांचा जन्म वर्णन केला आहे. तृतीयाध्यांत श्रीमद्भागवत स्कंध १ अध्याय ३ मधील अवतारचरित्र सांगून झाल्यावर, चतुर्थाध्यायाच्या प्रारंभींच स्वामींच्या चरित्रास त्यांनीं पुढीलप्रमाणें सुरवात केली आहे.

श्रीगुरु म्हणती शिष्यातें। सावध व्हावें शुद्धचित्तें।
श्रीमन्नृसिंहयति वृत्तांतातें। आतां श्रवण करावें ॥ १ ॥
श्रीगुरुलीलामृतपान। करा हो संत साधु विद्वज्जन।
होउनी एकाग्र विमन। वेदमथित अनादि जें ॥ २ ॥
हिमालय पर्वतीं यतिवर्य। दीनजन कल्पतरू आर्य।
जगद्धितार्थ दिगंबराचार्य। स्वेच्छाचारें संचरती ॥ ३ ॥

येथून पुढें त्यांनीं एकदम स्वामींच्या लीला वर्णन करण्यासच प्रारंभ केला आहे. स्वतःच्या गुरूचा इतिहास अवगत नसतांना, तत्सदृश किंवा त्याहूनही थोर अशा विभूतींच्या गुरुशोधनाचा प्रयत्न स्वामींच्या चरित्रकारांनीं केला असावा, हें संभवनीय दिसत नाहीं. स्वतःच्या गुरूची लीला वर्णन करतांना गौरवार्थ म्हणूनच त्यांनीं वरील ओवी लिहिली असावी हें सहज दिसतें व आतांपर्यंत आम्हीं दिलेला इतिहासही यासच पुष्टि देतो.

हे दिगंबराचार्य यतिवर्य हिमालयपर्वतीं प्रकट झाल्यावर संचरत संचरत दक्षिणेंत प्रथम माणिकनगरीं प्रकट झाले. तेथें

त्यांना प्रभूंची तेजोमय मूर्ति दिसून आल्यावर त्यांनीं येथेंच राहण्याचा निश्चय केला. समार्शी संयोग झाल्यावर वियोगाची इच्छा कोण करील ? पण पुढें स्वामींना अक्कलकोटास जावें लागलें. स्वामी तेथून अक्कलकोटासच कां गेले याचेंही कारण प्रभूंनीं त्यांना तसें सांगितलें म्हणून, हें उघडच आहे. अक्कलकोटकरांचा व प्रभूंचा बराच प्रेमसंबंध होता, हा उल्लेख वर आलाच आहे. अक्कलकोट येथील माणिकबाग व माणिकपेठ हीं नांवें याची साक्ष देतील.प्रभूंनीं अक्कलकोटास यावें अशी तेथील नागरिकांकडून प्रभूंना विनंतीही करण्यांत आली होती व प्रभूंनींही ती मान्य केली असल्याचें वर कळविलेंच आहे. पण इतर गांवांना प्रभु जसे कांहीं काळ जाऊन आले, तसें त्यांना अक्कलकोटास जावयाचें नव्हतें; तर अक्कलकोटकरांचें आतिथ्य तेथें बराच कालपर्यंत राहून घ्यावयाचें होतें. याकरितां प्रभु एखाद्या योग्य प्रतिनिधीच्या शोधांत होते, तोंच स्वामींचें आगमन माणिकनगरास झालें. अक्कलकोटकरांचे मनोरथ पूर्ण करणारा स्वामीसारखा योग्य प्रतिनिधि सांपडल्यावर लागलीच त्यांनीं त्यांची रवानगी तेथें केली. शिवाय प्रभुसमाधीनंतरच, अक्कलकोटास स्वामी उदयास आले हें महाराष्ट्र ज्ञानकोश विभाग ६, पृष्ठ २४ वरील हकीकतीवरून दिसून येईल.

अक्कलकोटच्या स्वामीकडे प्रभूंचें गुरुत्व दिल्यानें प्रभूंच्या चरित्रास कमीपणा येईल, अशी भीति आम्हास मुळींच

वाटत नाहीं. प्रथमभागांत आम्हीं स्पष्टपणें सिद्ध केलें आहे कीं, प्रभूंनीं आपल्या गुरुत्वाचा मान सर्व सृष्ट पदार्थांकडे दिला होता. उपलक्षणार्थ चोवीस गुरूंचीं नांवें सांगून पर्यायानें सर्व विश्व आपल्या गुरुस्थानीं असण्याचें सांगणाऱ्या प्रभूला या गोष्टीमुळें किमपिही कमीपणा न येतां उलट गौरवच होणार आहे. पण युक्तीस येणाऱ्या गोष्टींचेंच ग्रहण करणें योग्य असल्यानें, व्यावहारिक दृष्टीनें प्रभूंचें गुरुस्थान स्वामीकडे जाणें मुळींच संभवनीय दिसत नाहीं. शिवाय प्रभूंच्या जन्मापासूनचें चरित्र नीट अवलोकन केल्यास व समाधीनंतरही या गादीचें जिवंत सामर्थ्य प्रत्यक्ष दृष्टीनें पाहिल्यास, "प्रभुरेव प्रभुः साक्षात्" असेच उद्गार कोणीही समंजस मनुष्य काढील. प्रभु परिपूर्ण होते. आधिभौतिक, आधिदैविक व अध्यात्मिक सत्तासामर्थ्य, त्यांच्या ठिकाणीं मूर्तिमंत वास करीत होतें. या परिपूर्ण विभूतीच्या गुरूचा शोध आम्हांस तरी अजून लागला नाहीं. गुरूची आवश्यकता मानणेंच असल्यास, व्यावहारिक दृष्ट्या हें गुरुत्व प्रभूंच्या मामाकडे जाईल. कारण मौंजीबंधनप्रसंगीं त्यांनींच प्रभूंना गायत्री उपदेश दिला असण्याचा संभव आहे. स्वतःचें नांव घेऊन हा भवसागर तरून जाण्यास सांगणाऱ्या सर्वतंत्रस्वतंत्र विभूतीचा गुरु त्या विभूतीखेरीज दुसरा कोण असूं शकणार ? असो. स्वामी व प्रभु अशा दोन लोकोत्तर विभूतींचा गुरुशिष्य-संबंध जुळवून अनवस्थाप्रसंग आणण्यापेक्षां, ते दोन स्वतंत्र

शक्तिमान दिव्य तेजस्वी पुरुष एकमेकांच्या सहकारितेनें कार्य करीत होते, असें मानल्यास अधिक सयुक्तिक दिसेल. स्वामीस प्रभुदर्शनाची अपेक्षा होती, म्हणूनच ते माणिकनगरीं आले व प्रभूंनाही आपल्या वचनाची पूर्णता करण्याकरितां त्यांनीं अक्कलकोटास जावें अशी अपेक्षा होती, म्हणूनच तेही शेवटीं श्रीप्रभुआज्ञेनें अक्कलकोटास जाण्यास तयार झाले.

शहापूर बेळगांव येथील रहिवासी दामोदरबुवा देऊळकर यांनीं आपल्या ऐन तारुण्यांत प्रभूंचा लौकिक ऐकल्यावर मोठ्या उत्कंठेनें पायरस्त्याचा कष्टप्रद प्रवास करून, माणिकनगर गांठलें. प्रभुदर्शन झाल्यानंतर त्यांचें चित्त तेथेंच रमून गेलें. दामोदरबुवांनीं गायनाची विद्या आत्मसात केली होती व गवई या नात्यानें ते आपल्या गुरूबरोबर व स्वतंत्र रीतीनें पुष्कळ राजेराजवाड्यांमध्यें आपलें कौशल्य दाखवीत फिरत होते. येथें आल्यानंतर त्यांच्या चित्तवृत्तीचा लय प्रभुपदीं लागून ऐन तारुण्यावस्थेंतही प्रभूंना सोडून दूर जावें, असें त्यांच्या मनाला वाटेना. नित्य भजन करून भंडारखान्यांतील पवित्र अन्नावर निर्वाह करावा व आनंदांत काल काढावा, अशा हेतूनें विरक्त स्थितींत कित्येक वर्षें त्यांनीं प्रभुदरबारीं काढलीं. अक्कलकोटचे स्वामी प्रथम येथें आले त्या वेळीं, दामोदरबुवा प्रभुदरबारीं होते. त्यांनींच आम्हांस स्वामींच्यासंबंधीं वरील हकीकत सांगितली. यांचें

पुढील सर्व आयुष्य प्रभुदरबारीं भजन करण्यांतच गेलें असल्यामुळें, ते प्रभुप्रेमानें ओथंबून गेले होते. प्रभुसमाधीनंतर कांहीं दिवसांनीं मनास वैताग आल्यामुळें परत शहापुरास जाण्याकरितां निघाले, तेव्हां अक्कलकोटावरून पायरस्त्यानें गेले. स्वामींचा उदय या वेळीं चांगला झाला असल्यामुळें, स्वामींचें दर्शन घेण्याच्या हेतूनें त्यांनीं अक्कलकोटास मुद्दाम मुक्काम केला. स्वामींचा तपास करतां करतां ते कंटाळून गेले. इतक्यांत नजीकच्या उकिरड्यावर स्वामी बसले असल्याचें त्यांना आढळून आलें. स्वामीपुढें साष्टांग नमस्कार घालून त्यांनीं प्रभूंचें एक गोड पद गाण्यास सुरुवात केली, तेव्हां स्वामी आनंदानें डुलत राहून, हात जोडून 'जय प्रभो, जय प्रभो' असें अनेकवार म्हणाल्याचें पाहून, बुवाच्या आनंदास ऊत आला ! बुवांनीं पांच पदें म्हटलीं. स्वामी शांतवृत्तीनें लक्षपूर्वक ऐकत बसले होते. नंतर बुवांनीं त्याच ठिकाणीं पाणी आणून स्वामीस स्नान घातलें; व पेढ्याचा पुडा आणून अर्पण केला. स्वामींनीं त्यांतील एक पेढा भक्षण करून, बाकीचा प्रसाद म्हणून बुवांच्या हातावर ठेविला.

दामोदरबुवांनीं सांगितलेल्या या गोष्टीवरून आमची खातरी झाली आहे कीं, या दोन विभूतींमध्यें परस्पर प्रेमाचा अखंड प्रवाह अव्याहत चालत होता. यांत कमीअधिक, श्रेष्ठकनिष्ठ अथवा गुरुशिष्य असलें अवास्तव नातें जोडणें, आपल्यासारख्या सामान्य मानवी प्राण्याचें काम नव्हे, असें

आम्हांस वाटतें. प्रभुसमाधीनंतर बरेच लोक अक्कलकोटाहून वरचेवर येथें येत असत. कित्येक लोकांना स्वामीनीं " मेरे बडे भाईके पास जा " असें सांगून येथें पाठविलें होतें, असें आम्हीं ऐकिलें आहे. प्रभूनंतर आप्पासाहेब महाराज गादीवर आले. यांचा अधिकारही प्रभुसमानच होता. गादीवर बसले तेव्हां ते अल्पवयी होते तरी ज्ञानानें अत्यंत प्रबुद्ध होते. स्वामी आप्पासाहेब महाराजांना " बडे भाई " म्हणत असत, असें इकडील वृद्ध लोक सांगतात.

# विठ्ठलराव तालुकदार :: १३

माणिकनगरांत प्रभूंचें वास्तव कायमपणें झाल्यावर प्रभूंच्या कृपेनें उदयास आलेल्या अनेक भक्तगणांमध्यें विठ्ठलराव तालुकदार यांची प्रामुख्यानें गणना होते. विठ्ठलराव हे मूळचे चांगलेरचे कुलकर्णी. चांगलेर हा गांव चिटगोपा तालुक्यांत आहे. राजा रामचंद्राच्या पुत्राच्या मरणानंतर त्याजकडे असलेला मुलुख निजामचे आप्तवर्गीतील एका उमरावाकडे जाऊन त्यास 'पायगा' हें नांव प्राप्त झालें, हें पूर्वींच कळविलें आहे. या पायगा इलाख्याचे दोन भाग होऊन, त्यावर 'रुशवदीखां' व 'मंजले मियां' असे दोन नबाब मालक झाले. यांपैकीं 'रुशवदीखांच्या' मुलखांतील हुमनाबाद या गावीं शेगदारीच्या कामावर विठ्ठलराव यांची प्रथम नेमणूक झाली. त्या वेळीं त्यांना फक्त पंधरा रुपये पगार होता. त्या वेळीं गुलाम मुस्तफाखां नागड हे तालुकदार होते. विठ्ठलराव भाग्यास कसकसे चढत गेले, याविषयीं अनेक चरित्रकारांनीं विस्तारपूर्वक लिहून ठेविलें आहे. रामचंद्रबावा सोलापूरकर आपल्या पुस्तकांत लिहितात कीं, "विठ्ठलराव शेकदाराचें नांव आमच्या वाचकांच्या ओळखीचें झालेंच आहे. त्यांची बायको बहिणाबाई इणेंही, आमच्या कुटुंबाचें पाहून तीर्थाचा नेम धरिला. तिला त्या कामांत फारच ताप सोसावा लागला. ती घरची गरीब, नवऱ्यास फक्त पंधरा रुपये दरमहा, आणि

कोसभर हुमणाबादेंत रहावयाचें आणि तेथून तीर्थाकरितां वहिणाबाईनें यावयाचें आणि इकडे तीर्थ मिळण्याची ही स्थिति वर वर्णन करून दाखविलीच आहे. अशा कारणानें सर्व बायांपेक्षां बहिणाबाईस ताप फारच सोसावा लागला. शेवटीं ती तीर्थाकरितां हुमणाबाद सोडून प्रभूंचे वाडींत येऊन राहिली. शेवटीं प्रभूनें तिजवर कृपा केली. तिचे नवऱ्यास पंधरा रुपये दरमहा होता, तो एकदम पुढें शंभर रुपये झाला. आणि पुढें वाढत वाढत सातशें रुपये होऊन पंधरा रुपयांचे कारकून विठ्ठलराव, सातशें रुपये दरमहाचे तालुकदार झाले ! दरिद्र पळालें आणि दारांत हत्ती, पालख्या, म्याने, स्वारशिबंदी झुलूं लागले ! ज्या विठ्ठलरावास घरांत दोन वेळ खाण्यास मिळण्याची मारामार होती त्या विठ्ठलरावाच्या घरांत पाहतां पाहतां थोडया दिवसांत, साक्षात् लक्ष्मीचा वास व हुकमत सत्ता येऊन पोंचली. विठ्ठलराव प्रभूस शेवटपर्यंत विसरला नाहीं. त्यानेंही हस्तेंपरहस्तें लाखों रुपयांची मदत प्रभूकडे केली.''

रामचंद्रबाबा सोलापूरकर यांचें वास्तव्य माणिकनगरीं पुष्कळ वर्षें होतें, असें त्यांनीं लिहिलेल्या चरित्रावरून उघड होत आहे. वरील हकीकत संक्षिप्त असली, तरी त्यांच्या देखत घडली असल्यामुळें ती सत्य असली पाहिजे यांत शंका नाहीं. विठ्ठलरावाचा संबंध प्रभूंशीं जडण्यास त्यांच्या कुटुंबाची प्रभूंवरील उत्कट भक्तिच कारणीभूत झाली असें कांहीं

चरित्रकारांचें म्हणणें आहे. टोळ यांनीं लिहिलेल्या चरित्रांत ही गोष्ट स्पष्टपणें नमूद केली आहे. सोलापूरकर व टोळ यांच्या लिहिण्यांत किरकोळ बाबतींत फरक असला तरी मुख्य तात्पर्य एकच आहे. टोळ विठ्ठलरावासंबंधीं काय म्हणतात तेंही पाहण्यासारखें आहे. याकरितां त्यांच्याही लेखांतील उतारा आम्ही पुढें देत आहों.

"हुमणाबाद हा जहागीर इलाखा पायगाचा गांव आहे. या गांवीं विठ्ठलराब नामें सरकारी कारकून असत. विठ्ठलराव, चांगलेर तालुका चिटगोपा येथील राहणारे. यांचा वडिलोपार्जित सराफीचा धंदा असे. हे त्या वेळचे पायगा इलाख्याचे वरिष्ठ अधिकारी गुलामअलीखां नागड, सदर तालुकदार इलखे पायगा यांचे हाताखालीं कारकुनीचें काम पाहत असत. विठ्ठलराव यांच्या ज्येष्ठ कन्येस अपस्माराचा आजार होता. त्यानिमित्त पुष्कळ यत्न चालू असतां त्यांचे कुटुंबाची भक्ति प्रभुचरणीं जडली ह्या गोष्टीबद्दल विठ्ठलरावांनीं आपल्या कुटुंबास 'कोणच्या उगीच साधूच्या नादीं लागतेस?' असें म्हणत असावें व त्या गोष्टीबद्दल आपला तिरस्कार दाखवीत असावा. असें चालू असतां एके दिवशीं त्यांच्या कुटुंबानें (बहिणाबाईनें) 'कांहीं असो,एकवार प्रभुदर्शनास तरी चला' अशी विनंति केली. पत्नीच्या आग्रहास्तव विठ्ठलरावजी प्रभुदर्शनास गेले, तों प्रभूंस पाहून त्यांना काय वाटलें असेल तें असो; त्यांची दिवसानुदिवस प्रभुचरणीं अनिवार भक्ति

जडत चालली. कोणतीही गोष्ट करणें तर माणिकप्रभूंचें नांव घेऊन करीत असावी व प्रभुदर्शन नित्य घेण्याचा क्रम चालू ठेवावा. जें करणें तें खासगी असो किंवा सरकारी असो; प्रभूंस विनंति करून आज्ञा होईल तसें करीत असावें. त्यांची पूर्ण श्रद्धा व अचाट प्रभुसामर्थ्याची कृपा, या योगानें त्यांचा उत्तरोत्तर भाग्योदय होऊं लागला व थोडा थोडा अधिकार प्राप्त होत होत, विठ्ठलरावजी हे अखेर पायगा इलाख्याचे सदर तालुकदार या बहुमोल पदास चढले. शेंकड्यांनीं पगार वाढून यजमानाचे गळ्यांतील ताईत बनले. हत्ती, घोडे द्वारीं झुलूं लागून, हैद्राबाद शहरीं मोठे वाडे झाले. त्यांचें हुमणाबाद हें मुख्य अधिकारस्थल व राहण्याचें स्थान होतें. परंतु प्रभुसंनिध वास असावा अशा हेतूनें, त्यांनीं माणिकनगरास वाडा व कचेरी हीं पृथक् बांधून, त्या ठिकाणीं आपला अधिकार चालवून ते प्रभुसेवेंत तत्पर राहूं लागले. जहागीर व मक्तेगांवाची प्राप्ति होऊन चिरंजीवास मनसबी झाल्या व उत्तरोत्तर नांवलौकिक वाढत जाऊन राजलक्ष्मी प्राप्त झाली. ”

वर लिहिल्याप्रमाणें विठ्ठलराव प्रभुदर्शनास आपल्या पत्नीच्या आग्रहास्तव आले असोत किंवा स्वयंस्फूर्तीनें आले असोत, ज्या क्षणीं त्यांना प्रभुदर्शन झालें, त्या क्षणींच त्यांचें दुरित संपलें असें म्हणावयास हरकत नाहीं. माणिकनगरास येण्यापूर्वीं त्यांना दारिद्र्यानें पीडिलें होतें. प्रपंच जेमतेम चालत होता. सापत्न माता व सापत्न बंधु यांच्या पोषणाची जबाब-

दारीही त्यांच्यावरच होती. अशा विपन्न स्थितींतही ते आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावीत होते. परंतु त्यांच्या औदार्याचें चीज सापत्न मातेकडून मुळींच होत नव्हतें. उलट त्यांनीं केलेल्या उपकारांची फेड अपकारानें करावयास सापत्न मातेनें कमी केलें नाहीं, असें रामचंद्रबावांनीं लिहिलेल्या हकीकतीवरून दिसतें. ती हकीकत अशी—

"यांचें कुटुंब मोठें असून, हे घरचे फार दरिद्री होते. दहापंधरा रुपये दरमहावर यांचा संसार बरोबर भागत नसे; 'तेल आहे तर मीठ नाहीं व मीठ आहे तर तेल नाहीं,' अशी त्यांची तारांबळ होती; परंतु या स्थितींत त्यांची पूर्ण निष्ठा प्रभुपायीं जडून गेली होती. प्रभु हुमनाबादेजवळ येऊन राहिल्यापासून यांनीं प्रभुसेवा करण्यास आरंभ केला होता. सरकारी चाकरी संभाळून त्यांतले त्यांत यांनीं प्रभुसेवेकडे लक्ष ठेविलें होतें. कांहीं दिवसांनीं प्रभूंनीं त्यास दोनशें रुपये आणि सोन्याचें कडें बक्षिस दिलें, आणि विचारलें कीं, "या द्रव्याचें तुम्ही काय कराल?" तेव्हां विठ्ठलराव म्हणाले कीं, "हैद्राबादेस घरीं दोघे सावत्र बंधु आहेत व सापत्न मातुःश्री आहे. परंतु घरीं दारिद्र्याची पीडा असल्यामुळें, बंधूच्या संसाराची अव्यवस्था फारच आहे. बंधूंचीं अद्याप लग्नें होणेचीं आहेत. त्यास आपण कृपा करून दिलेलें हें द्रव्य घरीं नेऊन बंधूंच्या लग्नकार्याकडे खर्चावें असें माझ्या मनांत आहे." याप्रमाणें विठ्ठलरावांचें भाषण ऐकून, प्रभु 'उत्तम आहे'

असें म्हणाले. परंतु घरीं गेल्यास फार दिवस न राहतां च फार मोहांत न पडतां आणि घरच्या सापत्नजनांच्या विचारांत न सांपडतां लवकर इकडे निघून यावें ' असें प्रभूंनीं विठ्ठलरावांस सांगितलें. उपरांत विठ्ठलराव प्रभुचरणीं मस्तक ठेवून घरीं निघून गेले. तेथें सापत्न बंधूंचीं लग्नें वगैरे केलीं आणि कांहीं दिवसांनीं प्रभुदर्शनास हुमनाबादेस निघून येणार होते, इतक्यांत सापत्न मातुःश्रीनें कांहीं कपटकृति करून त्यास (विठ्ठलरावास) विषप्रयोग करविला. त्यायोगें विठ्ठलराव मरणोन्मुख झाले. पुष्कळ उपाय केले; परंतु लागू न होतां प्राणोत्क्रमणाची वेळ आली. तेव्हां विठ्ठलरावाचें कुटुंब घाबरें होऊन रडूं लागलें. विठ्ठलरावासही वाटलें कीं, आतां आपण जगत नाहीं. सर्वांगाचा दाह होऊन पंचप्राण गोळा होऊन गेले. मग सर्व उपचारांची आशा सोडून उभयतां स्त्रीपुरुषांनीं श्रीप्रभूंचा धांवा करण्यास आरंभ केला. धावां होतांच अकस्मात् बैराग्याच्या रूपानें प्रभु त्यांच्या दरवाजांत प्रकट झाले आणि झोळींतून चिमूटभर राख काढून विठ्ठलरावाच्या पत्नीच्या स्वाधीन करून सांगितलें कीं, " ही राख पाण्यांत कालवून तुझ्या नवऱ्यास पिण्यास दे, म्हणजे तो चांगला होईल. " असें सांगून बैरागी गुप्त झाला, आणि राख पोटांत जातांच विठ्ठलराव खडखडीत बरा झाला. पुढें बैराग्याचा त्यांनीं पुष्कळ शोध केला, परंतु तो सांपडला नाहीं.

इकडे प्रभूंची मूर्ति एकाएकींच सर्व हिरवी गार होऊन गेली, तें पाहून घरची सर्व मंडळी घाबरली आणि त्यांनीं हुमनाबादेंत

एक वैद्य होता त्याचें औषध प्रभूंस आणून दिलें. प्रभूंनीं तें औषध घेतांच वैद्याची प्रकृति बिघडून तो मरणोन्मुख झाला ! मग त्याची चूक त्याच्या लक्षांत येऊन त्यानें प्रभूंस निरोप पाठविला कीं, तुमची लीला न जाणतां मी तुम्हास औषध देऊन प्रमाद केला आहे. तो अपराध क्षमा करून आतां मला जीवदान द्यावें. मग प्रभूंनीं तीर्थ पाठवून देऊन वैद्यास बरें केलें. इतक्यांत हैद्राबादेहून विठ्ठलराव येऊन प्रभूंजवळ दाखल झाले. तेव्हां प्रभु त्यास म्हणाले कीं, "विषयप्रयोग झाला असतां ज्या बैराग्यानें औषध दिलें, तो बैरागी आम्हास तरी भेटवा. आमच्याही पोटांत विषप्रयोग झाला आहे." असें म्हणतांच विठ्ठलरावांनीं खूण ओळखली आणि चरणांवर मस्तक ठेवून सर्व वर्तमान निवेदन केलें. तेव्हां प्रभु म्हणाले कीं 'मी तुम्हास पूर्वींच हैद्राबादेस जाते वेळीं सावध केलें होतें. परंतु तुम्हास त्या गोष्टीचा विसर पडून मोहजालांत फसलां. शेवटीं तुमचा धांवा ऐकून बैराग्याच्या वेषानें आम्हासच तेथपर्यंत यावें लागलें. तुमचें विष अद्याप आमच्या अंगांत आहे. प्रभूंचें भाषण ऐकून मग प्रभूंचें अंग हिरवेंगार कां झालें हें वर्तमान सर्वांना समजलें.आणि मग सर्व मंडळीस मोठा विस्मय उत्पन्न झाला. प्रभूंनीं आपल्या शरीराची कांति तेव्हांच पूर्ववत् केली आणि विठ्ठलराव निरोप घेऊन चाकरीवर गेले. "

वरील हकीकतीवरून विठ्ठलरावचा सरळ व उदार स्वभाव आणि प्रभूंवरील प्रेम उघड होत आहे. त्याचप्रमाणें प्रभूंचेंही

त्यांच्यावर किती लक्ष होतें हेंही स्पष्टपणें दिसून येत आहे. विठ्ठलराव प्रथम प्रभूंच्या दर्शनास कोणाच्या तरी आग्रहावरून आले असोत अथवा स्वयंस्फूर्तीनें आले असोत; त्यांनीं प्रभूंचें लक्ष आपल्यावर ओढून घेतलें अथवा प्रभूंनीं त्यांना आपल्या पकडींत धरलें, यांपैकीं कोणती तरी एक गोष्ट निर्विवाद मानणें भाग आहे. 'प्रभूंची पकड उंटाच्या पकडीसारखी आहे. त्यास धरतां येतें, पण सोडतां येत नाहीं ' या म्हणण्याची सत्यता विठ्ठलरावाच्या हकीकतीवरूनही सहज पटण्यासारखी आहे. विठ्ठलराव प्रभूंच्या प्रेमाकर्षणांत सांपडले. प्रभूंनीं त्यांना हातीं धरून आपला म्हणविलें आणि ऐहिक उत्कर्षाबरोबर पारमार्थिक निःश्रेयस त्यांच्या पदरांत बांधलें, असें आम्ही म्हटलें तर सत्याचा अपलाप केल्याचा दोष येईलसें वाटत नाहीं. प्रेमाच्या कक्षेच्या आंत असलेल्या स्वकीय भक्ताचें अंतःकरण जाणून त्याची इच्छा पूर्ण करणें हा प्रभूंच्या नित्य कृत्यांतीलच एक भाग होता. विठ्ठलरावाचा ऐहिक उत्कर्ष एकदम झाला किंवा क्रमाक्रमानें झाला ही बाब गौण आहे. प्रभूंच्या कृपेनेंच तो झाला यांत तिळमात्र शंका नाहीं. सामान्य प्रतीच्या कारकुनाचा तालुकदार कसा झाला याचें सर्वांनाच नवल वाटतें. पायरीपायरीनें तो पल्ला गांठावयास किती तरी कालावधि लागला असता ! किंबहुना ती गोष्ट त्या कालीं शक्यतेच्यापलीकडची होती, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं.

तालुकदार हा अधिकार कोणत्या योग्यतेचा असतो हें निजामच्या राज्यांतील लोकांना चांगलें अवगत आहे. ब्रिटिश मुलखांतील जिल्ह्याचा अंमलदार कलेक्टर असतो. त्याच दर्जाच्या अधिकाऱ्यांना तालुकदार असें निजामच्या राज्यांत म्हणतात, एवढें सांगितल्यानें याच्या योग्यतेचा सहज उलगडा होण्यासारखा आहे. तरी पण अलीकडच्या सुधारलेल्या काळांत तालुकदाराचे अधिकार पुष्कळ अंशीं संपुष्टांत आले आहेत. आम्हीं वर लिहिलेल्या काळांत तालुकदार म्हणजे अनियंत्रित सत्तेचें केंद्रस्थानच होतें. आणि त्यांतल्या त्यांत निजामच्या राज्यांतील पोटजहागीरदारांच्या मुलखांतील तालुकदार तर, प्रजेचे खरेखुरे राजेच होते! राजसत्तेचा सर्व भाग या तालुकदारांत मूर्तिमंत वास करीत होता. मुलकी, दिवाणी व फौजदारी इत्यादि अष्टाधिकार तालुकदारास असून, अंमलबजावणीचें कामही त्याजकडेच होतें. सारांश, तालुकदार आपल्या जिल्ह्यांत करील ती पूर्व दिशा, बोलेल तो कायदा व देईल तोच न्याय अशी स्थिति होती! अलीकडील सर्व तालुकदारांना कांहीं तरी ठरींव प्रमाणांत पगार असतो. पूर्वीं तशी स्थिति नव्हती. मुलखांतील जमिनीच्या ठरींव वसुलाच्या प्रमाणांत तालुकदाराला 'तकरूर' मिळत असे. ही तकरूर रुपयामागें आणा, दीड आणा, कधीं कधीं दोन आणे सुद्धां ठरविली जात असे. पायग्याच्या नवाबसाहेबांना ठरींव वसूल पोंचविण्याचें काम तालुकदारानें

वक्तशीर केलें म्हणजे तो हुषार मानला जाऊन त्यावर नबाबसाहेबांची बहाल मर्जी होत असे. विठ्ठलराव ज्या तालुकदाराच्या हाताखालीं काम करीत होते, त्याची प्राप्ति हजारांनीं किंबहुना लाखांनीं मोजण्याइतकी होती. पालखी, म्याना, हत्ती, घोडे, स्वार, शिबंदी इत्यादि मानमरातबासह तालुकदार जिल्ह्यांत फिरतीवर जात असत. त्यांचा दरारा फार असून त्यांच्या हुकमाविरुद्ध वागण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. आपल्या हाताखालील नोकर लोक नेमणें अगर काढून टाकणें तालुकदाराच्या हातीं असे, इतकेंच नव्हे तर, तालुक्यावरील तहशीलदार, नायब, पेषकार, कारकून, शिपाई यांचीही नेमणूक तालुकदाराच्या हुकमावरूनच होत असे. यामुळें तालुकदार म्हणजे प्रत्यक्ष राजा अथवा राजप्रतिनिधि अशी जनतेची समजूत असे.

अशा प्रकारच्या सर्वाधिकारसंपन्न जागेची प्राप्ति एखाद्या सामान्य कारकुनाला होणें अशक्यप्रायच. विठ्ठलरावाच्या मनांत तालुकदारीची इच्छा होती किंवा कसें, हें समजण्यास आज साधन नाहीं. तथापि प्रभूंच्या कृपेनें रंकाचा राव होणें फार कठीण नाहीं अशी त्याची खात्री झाली होती. म्हणून प्रभुकृपा संपादन करण्यास विठ्ठलराव सदैव एका पायावर तत्पर असत. एकदा प्रभु आपल्या पर्णकुटींत स्वानंदमग्न असतां विठ्ठलराव दर्शनाला गेले. त्यांना पाहतांच प्रभु सहज म्हणाले, “ अरे विठ्ठलराव, तूं तालुकदार होतोस

काय ?" हा प्रश्न ऐकून विठ्ठलराव चकित झाले व म्हणाले, "महाराज, एवढी मोठी जागा मला मिळेल कशी व माझ्या हातून तें काम निभेल कसें ?" यावर प्रभु हंसून म्हणाले, "अरे, मी तुझ्या पाठीवर असतां तुला कशाची भीति आहे ?"

प्रभूंच्या तोंडून निघालेलें हें आश्वासन ऐकून विठ्ठलरावाचें अंतःकरण सद्गदित झालें, अंगावर रोमांच उभे राहिले आणि डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. "प्रभु संभाळ करण्यास सिद्ध आहेत त्यापक्षीं मी काय आज्ञा होईल तें करावयास तयार आहें." यापेक्षां विठ्ठलरावांनीं अधिक काय बोलावयास हवें होतें ? प्रभूंनीं त्यांचें अंतःकरण जाणलें होतें, त्यांचा भाग्यकाल प्राप्त झाला होता; त्यांचें दारिद्र्य दूर करावें अशी प्रभूंना इच्छा होऊन प्रसन्न चित्तानें प्रभूंनीं विठ्ठलरावास जवळ बोलावून, त्यांच्या गळ्यांत फुलांची माळ घातली आणि तात्काळ प्रसाद दिला. तो ग्रहण करून आज्ञेप्रमाणें विठ्ठलरावांनीं हैद्राबादेस जाऊन नवाबसाहेबांची भेट घेतली आणि वर लिहिल्याप्रमाणें तालुकदारी मिळवून लगेच सर्व ऐश्वर्यासह ते प्रभुदर्शनास आले.

यापेक्षां जराशी भिन्न हकीकतही कोणी कोणी सांगतात. प्रभुदरबारांतील भंडारखान्यांत त्या वेळीं नित्य कांहीं ना कांहीं निमित्तानें भोजनें होत असत. मोठमोठे जमीनदार, जहागीरदार, सरकारी अंमलदार लोकही भंडारखान्यांत शरीरकष्ट करीत असत. एकदां अशा प्रकारचें कांहीं खटपटीचें काम चाललें असतां, विठ्ठलराव इतरांप्रमाणें काम न करितां नुसते कमरेवर

हात ठेवून उभे होते. खटपट करणाऱ्या लोकांपैकीं कांहींचें त्यांजकडे लक्ष गेल्यावर त्यांतील एकजण विनोदानें म्हणाला, " आम्ही सर्व राबत असतां विठ्ठलराव पाहा कसा एखाद्या तालुकदाराप्रमाणें कमरेवर हात ठेवून उभा आहे. " विठ्ठलराव कोणत्या कारणाकरितां तसे उभे होते हें समजण्यास मार्ग नाहीं. परंतु त्या लोकांचा विनोद त्यांच्या कानावर जातांच, त्यांच्या तोंडून तात्काल असे उद्गार निघाले कीं, " प्रभूंची कृपा झाल्यास, तालुकदार होणें फारसें कठीण नाहीं. "

वरील विनोद व त्यावरील उत्तर प्रभूंना पर्णकुटींत ऐकूं गेलें. प्रभूंनीं हास्य करून विठ्ठलरावास हाक मारली आणि " काय चाललें आहे रे ? " असें विचारलें. त्यांनीं झालेली सर्व हकीकत मोकळेपणानें प्रभूंजवळ सांगितली. त्यावर प्रभु मधुर हास्य करून म्हणाले, "एकूण तुला तालुकदार होण्याची इच्छा आहे तर ! ठीक आहे; मी तुला तालुकदारी देतों." तात्काळ प्रभूंनीं त्यास माळ घालून प्रसाद दिला आणि हैद्राबादेस जाण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें विठ्ठलराव हैद्राबादेस जाऊन तालुकदार होऊन परत आले !

वरील दोन्ही हकीकतींतील तात्पर्य एकच आहे. प्रभु विठ्ठलरावावर प्रसन्न झाले व त्यास प्रसाद मिळाल्यावर तालुकदारी प्राप्त झाली. हैद्राबादेस नवाबाच्या कचेरींत विठ्ठलराव पोंचतांच कसें वर्तमान घडलें याविषयींही आमच्या

ऐकण्यांत जी हकीकत आली, ती आम्ही वाचकांना सादर करीत आहों. नबाबसाहेबांच्या दरबारांत विठ्ठलराव पोंचले, त्या वेळीं हुमनाबादेची तालुकदारी कोणास द्यावी या विवंचनेंत नबाबसाहेब निमग्न झाले होते. त्यांच्या अंतःकरणांत तीन मुसलमान गृहस्थांपैकीं कोणास निवडावें याविषयीं जोरानें खळबळ चालली होती. त्यांपैकीं एकाचें नांव कागदावर लिहावें या हेतूनें त्यांनीं कागद घेऊन नांव लिहिण्यास आरंभ केला. पण त्यांच्या मनांत नसतांही हातांतून ' विठ्ठलराव ' असें नांव कागदावर आलें. तें पाहून त्यांना परम आश्चर्य वाटलें ! हें काय गौडबंगाल आहे हें त्यांच्या लक्षांत येईना. म्हणून त्यांनीं तो कागद फाडून फेकून दिला आणि त्या दिवशीं तालुकदार नेमण्याचें काम रहित केलें. दुसऱ्या दिवशीं तीन मुसलमान गृहस्थांप्रमाणेंच विठ्ठलरावाचेंही नांव त्यांच्या मनांत घोळूं लागलें. त्या दिवशींही नेमणूक केली नाहीं. तिसऱ्या दिवशीं फक्त विठ्ठलराव हा एकच माणूस तालुकदारी करण्यास योग्य आहे अशी त्यांच्या मनाची खातरी होऊन विठ्ठलराव समोर येतांच त्यांना जवळ बोलावून, तात्काल त्यांना तालुकदारीचा हुकूम व त्याबरोबर वस्त्रें आणि सर्व सरंमजाम देऊन त्यांचा गौरव केला.

मानवी स्वभावधर्माप्रमाणें नबाबसाहेबांचा ओढा, स्वकीय आप्तवर्गापैकीं कोणाची तरी नेमणूक करण्याकडे असणें अगदीं स्वाभाविक होतें. परंतु त्यांच्या त्या अंतःकरणांतील

ओढयापेक्षां, दुसरी एक प्रबळ प्रेरणाशक्ति त्यांना मार्गदर्शक झाल्यामुळें तिच्यापुढें मान वांकविणें त्यांना भाग पडलें. आणि त्या प्रेरणाशक्तीच्या आज्ञेप्रमाणें वागण्यांत त्यांची कांहीं एक चूक झाली नव्हती, ही गोष्ट पुढील कालानें सिद्ध केली. विठ्ठलरावांची कारकीर्द अत्यंत यशस्वी होऊन त्यायोगें नबाबसाहेबांचाही लौकिक वाढला. विठ्ठलरावांनीं नबाबसाहेबांची इमानेइतबारें आमरण सेवा केली. त्याबद्दल उतराई म्हणून नबाबसाहेबांनीं त्यांच्या चिरंजीवास जहागीरदार करून मान्यतेस चढविलें. अद्याप विठ्ठलरावांचे ज्येष्ठ चिरंजीव श्रीयुत माणिकराव जहागीरदार हे आपल्या ऐश्वर्याचा उपभोग घेत आहेत. श्रीयुत माणिकरावांनीं पायगा इलाख्याची केलेली अपूर्व सेवा निजामच्या राज्यांत सर्वविश्रुत आहे. श्री. माणिकरावांचे कनिष्ठ सापत्न बंधु कै. मल्हाररावाचे पुत्र त्यांच्या वंशाचे अधिकारी आहेत.

सारांश, विठ्ठलरावांनीं आपल्या हयातीच्या उत्तरभागांत संपूर्ण ऐश्वर्य संपादन करून उत्तमोत्तम लौकिक मिळविला. श्रीप्रभुसंस्थानचे ते एक आधारस्तंभ होते. त्यांनीं संस्थानसंबंधीं अत्यंत महत्त्वाचीं कामें केलीं. त्यांचा उल्लेख वेळोवेळीं होईलच. प्रभुचरणावर अढळ निष्ठा ठेवून प्रभुकृपा संपादन केल्यावर ‘रंकाचा राव’ होणें कांहीं कठीण नाहीं, हें या कथानकावरून आमच्या वाचकांच्या सहज लक्षांत येईल अशी आम्हांस आशा आहे.

## यज्ञ : : १४

श्रीप्रभूंनीं हळीखेडकर यज्ञेश्वर दीक्षित यांच्याकडून माणिकनगरीं सर्वतोमुख नांवाचा यज्ञ करविला. या यज्ञाविषयीं बहुतेक सर्व चरित्रकारांनीं थोडयाबहुत फरकानें तपशीलवार हकीकत लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांतल्या त्यांत ओंवीबद्ध चरित्रांत फारच चटकदार वर्णन आलें आहे. सन १२६६ सालीं म्हणजे सुमारें ७८ वर्षांपूर्वी हा यज्ञसमारंभ झाला असें आम्हीं पुष्कळांच्या तोंडून ऐकिलें आहे व कांहीं चरित्रकारांनीं हें साल स्पष्ट शब्दांत लिहिलेंही आहे. त्या वेळीं हा यज्ञ 'न भूतो न भविष्यति' अशा अपूर्व थाटानें झाला असल्यामुळें बऱ्याच वृद्ध लोकांना त्याचें स्मरण अगदीं ताजें असें होतें. प्रभूंनीं यज्ञाप्रीत्यर्थ लाखों रुपये खर्च केले व त्या वेळच्या परिस्थितीच्या मानानें यज्ञाकरितां आलेल्या हजारों लोकांच्या राहण्याची, भोजनाची वगैरे सर्व प्रकारची व्यवस्था फारच उत्तम रीतीनें ठेविली होती. एवढा मोठा प्रचंड लोकसमुदाय एकत्र जमला असतां त्याची सर्व प्रकारें व्यवस्था राखण्याचें काम किती अवघड असतें याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. यज्ञाची तयारी एक वर्षापासून चालली होती. सर्व तयारी झाल्यानंतर उत्तम व योग्य दिवस पाहून यज्ञसमारंभ सुरू झाला. भालचंद्र दीक्षितांच्या घराण्यावर प्रभूंचें प्रेम अमर्याद होतें हें आमच्या वाचकांना विदित झालेंच

आहे. दीक्षितांनीं देह ठेवल्यानंतर त्यांच्या पुत्राला दीक्षा देऊन त्याच्या हातून यज्ञ करविणें क्रमप्राप्त होतें. दीक्षितास तीन पुत्र होते. वडील पुत्र यज्ञेश्वर, मधला नारायण व कनिष्ठ दिगंबर; यांपैकीं वडील यज्ञेश्वर हळीखेडास राहून अग्निहोत्र संभाळून होते. नारायण दीक्षित सतत प्रभुसंन्निध राहून प्रभुभक्तांपैकीं अगदीं निकटवासी भक्त बनले होते. दिगंबर दीक्षितासंबंधीं विशेष उल्लेख कोठें आढळत नाहीं. या तीन बंधूंपैकीं यज्ञेश्वर दीक्षिताचा वंश हल्लीं हळीखेडास नांदत असून त्या प्रसिद्ध घराण्याचा लौकिक त्यांनीं कांहीं अंशीं आजही राखला आहे.

प्रभु या घराण्यावर प्रसन्न होते. यज्ञेश्वर दीक्षिताची उत्कट इच्छा पाहूनच प्रभूंनीं त्यांना यज्ञ करण्यास परवानगी देऊन स्वतः सर्व खर्चाचें ओझें उचललें. प्रभूंचा आश्रय मिळाल्यावर सर्व देवता मूर्तिमंत या समारंभांत हजर राहिल्या व यज्ञ सांग झाला असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. यज्ञ करण्याचें निश्चित ठरल्यानंतर साक्षात् लक्ष्मीनें तेथें धांव घेतली, अन्नपूर्णा देवी आनंदभरानें पुष्ट झाली, आणि संतोष व प्रसन्नता यांचा सर्वत्र संचार सुरू झाला. कांहीं विघ्नांनींसुद्धां यज्ञास हजर राहण्याचा प्रसंग साधला; पण विघ्नहर्त्या प्रभूंनीं त्यांचा समाचार घेऊन यज्ञक्षेत्राबाहेर त्यांना अनुरूप असें स्थान देऊन त्यांनाही संतुष्ट राखिलें! सुष्टाप्रमाणें दुष्टांचेंही समाधान करणारे प्रभूंसारखे समदर्शी महात्मे विरळाच आढळतील.

या यज्ञसमारंभास लागणारा प्रचंड द्रव्यनिधि प्रभूंनीं कोठून आणला, हा प्रश्नच प्रभुचरित्रांत उपस्थित होत नाहीं, हें आमचे वाचक जाणून आहेतच. यज्ञाला किती खर्च लागला याचें नुसतें अनुमान करणें सुद्धां कठीण आहे. आम्हास जी जी विश्वसनीय माहिती मिळाली आहे तीवरून सांगतां येतें कीं, नुसता पस्तीस हजारांचा खुर्दा किरकोळ दक्षिणा, भत्ता आणि दाणाचारा यांकरितां विकत घ्यावा लागला होता ! पूर्वी शाही पैसे चालत असत व त्यांचा भाव गंड्यावर असे. एक रुपयास सोळा गंडे खुर्दा सरसकट मिळत असे. पण या यज्ञानिमित्त खुर्दा अनिवार लागत असल्यामुळें त्याचा भाव चढत चढत तो रुपयास नऊ-दहा गंड्यांवर आला. तो पुढें पुष्कळ वर्षें तसाच कायम राहिला.

या यज्ञासंबंधीं निरनिराळ्या चरित्रकारांनीं लिहिलेल्या माहितीचे उतारे दिल्यास ते वाचकांना उद्बोधक होतील अशी आमची खातरी आहे. सोलापुरकर म्हणतात, “हा यज्ञ चांगला यथासांग झाल्याबद्दल अद्यापपर्यंत सर्वतोमुखीं प्रभूंची कीर्ति या देशांत सर्वत्र जागृत आहे. यज्ञ चालू असतां मध्यंतरीं एक महाविघ्न उभें राहिलें होतें, तें प्रभुसत्तेनें दूर झालें आणि यज्ञ सांगपणें शेवटास गेला. तें विघ्न कोणतें म्हणाल, तर एका ब्राह्मणाचा सुमारें बारा-चवदा वर्षांचा मुलगा रोज पोळ्या खातां खातां त्याला अजीर्ण होऊन, शेवटीं हगओकी होऊन तें मरण पावलें. तेव्हां त्याला कोणी युक्ति

सुचवून त्याकडून तें प्रेत यज्ञमंडपांत आणून टाकविलें आणि तो ब्राह्मण प्रभूंपुढें जाऊन रडत बसला. प्रभूंनीं त्याला पदर पसरून पुष्कळ प्रकारें समजूत करून सांगितलें कीं, यापुढें तुम्ही उभयतां स्त्री-पुरुष येथेंच रहा आणि मी तुमचा मुलगा आहें असें समजा. मी तुमचें शेवटपर्यंत पोषण करीन; अंतर करणार नाहीं; लागेल तें द्रव्य देईन. असें नानाप्रकारें सांगितलें; परंतु ब्राह्मण ऐकेना. शेवटीं तो ब्राह्मण आपलाही प्राण देण्यास प्रभूंपुढें सिद्ध झाला. इकडे प्रेत पडल्यामुळें यज्ञाचें काम तहकूब राहून सर्व ब्राह्मणांना मोठी काळजी उत्पन्न झाली. मग प्रभूंनीं तात्यासाहेबांना सांगितलें कीं, एका द्रोणांत सर्व ब्राह्मणांचें तीर्थ घेऊन त्या पोराच्या तोंडांत ओतून पाहा बरें. अशी आज्ञा होतांच तात्यासाहेबांनीं लागलीच उठून सर्व ब्राह्मणांचें तीर्थ घेऊन त्या प्रेताच्या मुखांत ओतलें. त्याबरोबर लागलीच प्रेत खडबडून उठून बसलें; मग सर्वांना आनंद होऊन यज्ञाची पूर्णाहुति झाली."

वरील हकीकतींत यज्ञांत आलेल्या विघ्नाचें निवारण प्रभूंनीं कसें केलें, तें दाखविलें आहे. टोळ यांनीं यापेक्षां विस्तृत हकीकत आपल्या पुस्तकांत दिली आहे.

" याकरितां विस्तीर्ण मंडपाची योजना झाली. देशोदेशींचे विद्वान् ब्राह्मण जमा झाले. धान्यसामुग्री व रोकड पैसा यांची जय्यत तयारी झाली. माणिकक्षेत्रीं प्रभूंच्या दरबारीं यज्ञ होत आहे अशी बातमी चोहोंकडे पसरतांच हजारों लोक जमा

होऊं लागले. एखाद्या यात्रेप्रमाणें लोकसमुदाय जमत चालला. नाना देशांचे लोक हमेशा प्रभुदर्शनास येत-जात असत. त्यांत यज्ञ होतो असें कळतांच मग काय विचारावें ! शास्त्री, पुराणिक, गवई, नायकिणी, खेळवाले, तमासगीर, गोसावी, बैरागी, जंगम, फकीर यांची गर्दी होऊन, नाना गुणिजनांचा जमाव जमत चालला. त्या सर्वांची व्यवस्था भंडारखाना सदावर्त यांतून होऊं लागली.

इतक्या मंडळीला लागणाऱ्या जरूरी पदार्थांची व्यवस्था इतक्या बंदोबस्तानें केली जात असे कीं, मजाल काय कोणी अन्नावांचून किंवा इतर पदार्थांच्या अडचणीमुळें आबाळ सोशीत राहील ! ज्याला-त्याला नेमून दिलेलें काम तो बिनबोभाट चालवितो किंवा नाहीं, यावर सदैव नजर असे. जमलेल्या मंडळीला कोणास काय पाहिजे, कोणाचे हाल होतात कीं काय, याचें शोधन चालू असे. लेंकुरवाळ्या स्त्रियांचे, तसेंच लहानमोठ्या मुलांचे खाण्यापिण्याचे हाल होतात कीं काय, या गोष्टीची अंतस्थ चवकशी होऊन त्याचा बंदोबस्त नीट राहील अशी व्यवस्था ठेविली जात असे. योग्यतेनुसार ज्याचा-त्याचा यथायोग्य आदर होऊन त्याच्या योग्यतेनुरूप वस्त्रें, महावस्त्रें, नगद रुपये दिले जात. कोणत्याही जातीचा कोणी कसा का असेना, त्याला संतुष्ट करण्याचा नेम कधीं टळत नसे. वाटेल त्यानें पाहिजे तितके दिवस राहावें, इच्छेला येईल त्या वेळीं जावें. गोसावी, बैरागी येऊन

कोणी घोडा, कोणी बैल, कोणी कपडा, नगद पैसा इत्यादि ज्याच्या-त्याच्या मागणीप्रमाणें त्याला देत असावें. कोणी कोणी 'इमकू पांचसो रुपये होना' अथवा 'मुजकू ये ढाल रुपयेसे भर देना' अशा अनेक प्रकारच्या मागण्या करीत असाव्यात. परंतु तितक्यांना त्यांच्या इच्छेनुरूप देऊन संतुष्ट करून त्याला वाटेस लावीत असावें."

"सकल ऐश्वर्याचें मूलस्थान जें 'नित्य श्री नित्य मंगल' त्याला किती वानावें ? सृष्टिकर्ताच कोणतेंही कृत्य करण्याचें मनांत आणून करूं लागल्यास तेथें कमतरता कशाची पडणार ? असो. यज्ञाचें काम मोठमोठ्या विद्वान् ब्राह्मणांच्या हातें चाललें असतां प्रभूंची स्वारी दिवसांतून कांहीं वेळ यज्ञशाळेंत जाऊन बसे. प्रथम सर्व शाळागृहाभोंवतीं प्रदक्षिणा घालून आंत प्रवेश करावा. कांहीं वेळ स्थित होऊन नंतर स्वारीचें गमन आनंदस्थळाकडे व्हावें. अशा प्रकारें क्रम चालून यज्ञाची पूर्णता झाल्यावर सर्व ऋत्विज मंडळीसह प्रभूंची स्वारी संगमावर स्नानास निघाली.

या अवभृत स्नानानिमित्त संगमीं जलाचा मोठा संचय केला होता. हा समारंभ पाहण्याकरितां आसपास ग्रामवासी लोकांचा पुष्कळ जमाव जमला होता. ऋत्विज मंडळीसह प्रभुस्नानानंतर स्त्रियांचा वायनदानाचा समारंभ होऊन, त्यानंतर फराळाच्या पंक्ति बसल्या. अनेक फराळाचे पदार्थ गाडे भरभरून आणले होते. श्रीकृष्ण परमात्म्यानें गोपालांसमवेत

यमुनातीरीं आनंदें जसा काला केला, त्याप्रमाणें या कलियुगीं दत्तावतारीं श्रीगुरुमाणिकप्रभु यांनीं कृष्ण अवतारींच्या काल्याचें स्वरूप संगमींच्या सहस्रावधि जनसमूहाच्या फराळाच्या पंक्तींत दाखविलें."

जीवनदास हें नांव धारण केलेल्या एका प्रभुभक्तानें या यज्ञाचें वर्णन आपल्या ओंवीबद्ध ग्रंथांत साग्र पण फारच रसाळ वाणीनें केलें आहे. तें आमच्या वाचकांनीं अवश्य पाहावें; याकरितां आम्ही त्यांतील उतारा देत आहों.

" सन् बाराशें सासष्ट सालीं । पाचारोनि विद्वज्जन मंडळी ।
द्रव्यासी सिद्धीच भरूनि उरली । काय कमी पडे ॥ १ ॥

सहस्रावधि ब्रह्मसमुदाय । जमविती झाली श्रीगुरुमाय ।
छाया मंडपाची साधूनि सोय । कुंडमंडपही करविती ॥ २ ॥

सभोंवती कर्दळी स्तंभ । उभारूनि चौफेर स्वयंभ ।
मंटप भेदूनि जाय नभ । शोभा येती वैकुंठीची ॥ ३ ॥

अष्टादशादि धान्य जमविलें । तें कैशापरी बोलिलें ।
मसूर, जव, कारळे । जवस आणि राजगिरा ॥ ४॥

सजगुरा वाटाणा सांवा । भादली राळे मूग बरवा ।
साळी जोंधळा तीळ नवा । करडी तुरी आणविल्या ॥ ५ ॥

चणे गोधूम सुंदर । ऐसी वेगळालीं परिकर ।
धान्यें जमवूनि सत्वर । समिधा सर्व बोलाविती ॥ ६ ॥

अर्क पालाश खदिरा । अपामार्ग अश्वत्थ बरा ।
शमी दूर्वा औदुंबरा । दर्भादि सर्व जमविती ॥ ७ ॥

सप्त मृत्तिका आणूनी । मंटप साधिला चौकोनी ।
आधीं संपादून औपासनाग्नी । पूर्वेस आहवनीय स्थापिला ॥८॥

दक्षिणाग्नि दक्षिणेसी । गार्हपत्य पश्चिमेसी ।
मध्यें अंतर्वेदी निश्चयेंसीं । द्विजसमुदायें जमविला ॥ ९ ॥

मुख्य पंच देवता । ह्या स्थापूनी तत्वतां ।
ध्वजारोपण द्वारीं करितां । शोभायमान दिसतसे ॥ १० ॥

मंत्रमुखी ब्राह्मण पाहूनी । युक्तां ज्या त्यावरी योजूनी ।
देती जागोजागीं बसवूनि । द्विज सारे ॥ ११ ॥

कोणी करिती गायत्री पुरश्चरण । कोणी संहितादि पारायण ।
नवग्रहाचे जपास नऊजण । ब्राह्मण बैसविले ॥ १२ ॥

आग्नीध्र देवाकडे । ब्रह्मदेव कर्मपूर्तिकडे ।
अध्वर्युजनाकडे । होमालागीं योजिती ॥ १३ ॥

होतां प्रेष उच्चारी । देवाचें आगमन करी ।
ऐसे ऐसे कामावरी । नेमिले विद्वज्जन ॥ १४ ॥

ऋग्वेदी पूर्वद्वारीं । यजुर्वेदी दक्षिणद्वारीं ।
दोन दोन विप्रांची करी । योजना गुरुराय ॥ १५ ॥

पश्चिमद्वार सामाचें । दोन ब्राह्मण साम शाखेचे ।
उत्तरद्वार अथर्वणाचें । तेथें उभय बैसविती ॥ १६ ॥

ऐसा नेम केला । अगणित जनसमुदाय जमला ।
अठरापगड जातींचा मेळा । जमला यागाकारणें ॥ १७ ॥

देशोदेशींचे नारीनर । जमले द्विजांचे संभार ।
सुदिन पाहूनि सत्वर । आरंभिते झाले ॥ १८ ॥

नानापरी मंत्रघोष । चारी वेदांचे विप्र विशेष ।
चर्चा चालतां निर्दोष । श्रीयज्ञनारायणची प्रकटे ॥ १९ ॥

श्रीक्षेत्र काशीचे । नाशिक त्र्यंबक क्षेत्राचे ।
करवीर क्षेत्र कोल्हापुरचे । ब्राह्मण सर्व जमले ॥ २० ॥

श्रीगिरी शृंगिरी कानडी देश । भद्राचल मद्रास ।
लिंगसूर सुरापुर भीमातीरास । राहती तेही आले ॥ २१ ॥

कलबुर्गा महागांवादि स्थळीं । सर्व जमली विप्र मंडळी ।
तैलंग देशस्थ जमली । मंथनीकर ही ॥ २२ ॥

श्रीक्षेत्र धर्मपुरी । चमल वाडा राजेश्वरी ।
बंदरप्रांत राजबल्लारी । ऐसे सर्वचि जमले ॥ २३ ॥

श्रीक्षेत्र पंढरी तुळजापूर । नरसिंह क्षेत्र नरसिंहपुर ।
परळी वैजनाथ औंढ्याचे विप्र । जमले प्रभुजवळीं ॥ २४ ॥

गंगातीरवासी नंदिग्रामीचे । गंगाखेड मंजरथचे ।
ऐसे चहूं शाखेचे । जमले द्विजवर ॥ २५ ॥

खानदेश नागपूर । उमरावती अकोला बऱ्हाणपूर ।
वऱ्हाड प्रांतींचे द्विजवर । येती याग पहावया ॥ २६ ॥

कांहीं वाराणसी क्षेत्रींचे । द्विज जमले वांईचे ।
माळवा देश ओढिया जगन्नाथाचे । दूरदूरचे भूदेव ॥ २७ ॥

श्रीक्षेत्र कृष्णातीर । श्रीक्षेत्र गाणगापूर ।
श्रीक्षेत्र कोल्हापूर । ऐसे ब्रह्मवृंद जमती ॥ २८ ॥

कुंभकोण ताम्रपर्णी । मंथन काळेश्वर कुशतर्पणी ॥
सप्त गोदावरीपासूनी । पाहूं येती विप्रवर्य ॥ २९ ॥

गोकर्ण महाक्षेत्र । तेथील जमले विप्र ।
मंत्रमुखी विद्वान विचित्र । अधिकाधिक जमले ॥ ३० ॥

तैसेच चारी वर्णांचे लोक । क्षत्रिय वैश्य शूद्रादिक ।
गोसावी बैरागी जटाधारी अनेक । भस्म चर्चुनी येताती ॥ ३१ ॥

सर्वांगीं विभूतिलेपन । कटीस कौपीन खोंवून ।
काखेंत मृगाजिन घेऊन । बसताती याग पहावया ॥ ३२ ॥

मोठे जटाधारी तपीश्वर । नखाचें गुंडाळे लोम अंगावर ।
हातीं सोटे लोटे गळ्यास वस्त्र । मुखीं सीताराम उच्चारिती ॥ ३३ ॥

ऐशा झुंडीवरी झुंडी । तेजःपुंज भव्य मुरकुंडी ।
माणिक पाहूनि विजयगुढी । जयजयकारें उभारिती ॥ ३४ ॥

कित्येक लावूनि धुण्या बैसती । कोणी पंचाग्नी साधिती ।
कोणी समाधी लाविती । कोणी बसती ध्यानस्थ ॥ ३५ ॥

कोणी मौन धरूनि जप । कोणी एकांगुष्ठीं तप ।
कोणी देव्हारा मांडूनि धूप दिप । लावूनी राहती ॥ ३६ ॥

कोणी झूला बांधोनी । राधाकृष्ण मूर्ति स्थापूनी ।
कोणी घड्याळ वाजवूनी । नैवेद्य दावीती ॥ ३७ ॥

वाद्य वाजविती खंजिरी । कोणी घड्याळ तालावरी ।
शंखादि नाद चाहाटती भेरी । श्रीदत्त प्रभु दरबारी ॥ ३८ ॥

वासुदेव पांगुळ वाळसंतोष । टाळ्याचिपळ्या हरिदास ।
जंगम शेवडे नामघोष । अत्यानंदें करताती ॥ ३९ ॥

पोंवा बांसरी मंजुळ । गोंधळी घालिती गोंधळ ।
डमरू जोशी बुळबुळ । टाळनादें तोषविती ॥ ४० ॥

गोंधळी लोक श्रीहरीपर । गौळणी लावणी गाती तालावर ।
वाणी वाजे मधुरस्वर । मन वेधूनि जातसे ॥ ४१ ॥

उडे संबळांचा कडकडाट । नानापरी वाद्यांचा थाट ।
वाघे मुरळी अचाट । हजऱ्या सर्व देताती ॥ ४२ ॥

कोमळ स्वरें गायन । जगंम करिती सुरांतून ।
घंटयांचा सूर लक्षून । शिवस्तुति करिताती ॥ ४३ ॥

झणत्कार शंखाचा । भं भं शब्द तयांचा ।
गुंगून जाय वेध मनाचा । कैलासचि दुजें भासे ॥ ४४ ॥

चोखामेळा जोड्याचें गाणें । तंबुरी टाळ ढोल घेऊन ।
आलापयुक्त ताल धरून । कृष्णलीला गातातीं ॥ ४५ ॥

पद अभंग प्रभूचें । चरित्र नानापरीचें ।
तनु मन वेधून जाय साचें । मन भुले प्रपंचीं ॥ ४६ ॥

कानफाट्याची किंगरी । वाजूं लागतां सुरावरी ।
गोपीचंदवर्णनाची लहरी । ऐकून मन मुरूं लागे ॥ ४७ ॥

कबीरपंथी अनाथ ॥ जोड्यानें गातां भेदे चित्त ॥
वैराग्यभरित प्रेमयुक्त ॥ वैराग्याची प्राप्ति होतसे ॥ ४८ ॥

आंधळ्या स्त्रीपुरुषांचा मेळा । समागमें घेऊन चोखामेळा ।
दीनवाणी गाती श्रीहरिलीला ॥ श्रीमाणिकमूर्ति लक्षूनी ॥ ४९ ॥

कोणी म्हणती एक पैसा । दे दाता एक खासा ।
कांठीं धरूनी डोळसा । मागें चाल करितातीं ॥ ५० ॥

फकीरांचे सवाल भारी । नेटून खेटून उभे द्वारीं ।
जय माणिकप्रभु तेरी । दवलत बढती हो म्हणती ॥ ५१ ॥

नाना नानकशाही । सोट्यावर सोटे आपटती पाही ।
शिद्दी लोक नारळ घाई । घोळ घोळूनी वाजविती ॥ ५२ ॥

हरिदासांच्या झुंडीवर झुंडी । भुरकेदार गाडी आणि छकडी ।
जागा न मिळे बिऱ्हाडीं । दाटी होती अनिवार ॥ ५३ ॥

गणती नाहीं गरीब भटांची । लाथाळी चाले तट्टांची ।
गाणीं होतात नटांचीं । डफ तुणतुण्यावरी ॥ ५४ ॥

मोठे मोठे गाणार गवई । काखे मृदंग तबल्यांचे बजवई ।
बगलीं सारंगी विणा पाही । झोकोनि हिंडतातीं ॥ ५५ ॥

शमलेदार झोंकोनियां कळया । गलमुच्छीस घालूनी पिळया ।
अंजन सुर्मा घालूनि डोळ्यां । थाटानें हाजरीस जमती ॥ ५६ ॥

वैदिक ब्राह्मण शास्त्री । पुराणीक श्रोत्री अग्निहोत्री ।
अंगी दुशाले शुभ्र धोत्री । कोंकणी पागोटें पैठणीपदरी ॥ ५७ ॥

शास्त्रचर्चा वेदघोष । ठायीं ठायीं कीर्तन हरिदास ।
अनेक जन घेऊन नवस । दर्शनाकारणें येताती ॥ ५८ ॥

नाटकें तमाशे ठायीं ठायीं । कोल्हाटी गारोड्याची घाई ।
अनेक घडती जोड सनई । द्वारीं गजर होतसे ॥ ५९ ॥

दणाणिलें माणिकनगर । अष्टौप्रहर मखाचा गजर ।
भजन पूजन वेदचर्चा विप्र । अनेक गुणिजन गर्जती ॥ ६० ॥

वरील वर्णन वरेंच पाल्हाळिक आहे असें सकृद्दर्शनीं भासतें. परंतु ज्याचा माणिकनगरीं एक वर्षभर वास झाला आहे, अथवा दत्तजयंतीसारखा महोत्सव पाहण्याचें महाभाग्य ज्याला एकवार तरी लाभलें आहे, अशा मनुष्याला वरील वर्णनांतील सर्व प्रकार हल्लीं सुद्धां मूर्तिमंत आढळून आल्याशिवाय राहत नाहींत. येथील वस्तुस्थितीची जाणीव असलेल्यांना हें वर्णन आकर्षक वाटून ते लेखकाच्या सूक्ष्म निरीक्षणाचें कौतुक केल्याशिवाय राहणार नाहींत. या यज्ञसमारंभांतील भोजनाच्या व्यवस्थेची अजून वृद्ध लोक स्तुति गातात. विठ्ठलराव तालुकदार यांनीं सर्व व्यवस्था आपल्या देखरेखीखालीं केली होती. त्यांच्या हाताखालील जिल्ह्यांतील सर्व लहानमोठे अधिकारी व कारकून यांनीं स्वतः सर्व अंगमेहनतीचा भाग घेतला होता. चार-चार कोसांवरून

सोंवळ्यानें सांडगे, पापड, कुरवड्या, चटण्या, लोणचीं आणविण्याची व्यवस्था केली होती. वाढण्याच्या कामांत अत्यंत दक्षता राखिली होती. भोजन न करणाऱ्यास शिधासामुग्री भरपूर पोंचत असे. लहान मुलांच्या दुधाची सुद्धां व्यवस्था होऊन, घरोघर व ठिकठिकाणीं मुलांचा शोध करून त्यांना दूध पोंचविलें जात असे. सारांश, व्यवस्थेंत किंचीतही न्यून आढळून येऊं नये याविषयीं सर्व लोक दक्षता ठेवीत असत. प्रभूंकडून केव्हां आपणास आज्ञा होते इकडेच सर्वांचें लक्ष असे. एकदां प्रभूंकडून अशी आज्ञा झाली कीं, त्याप्रमाणें वागून प्रभूंना संतोषित करण्यांत सर्वजण आपली पराकाष्ठा करीत असत.

भोजनाची व्यवस्था कशा प्रकारची होती हें जीवनदासाच्याच शब्दांत आम्ही पुढें देत आहों.

ऐसा यज्ञ सुरू झाला । विप्र बैसती भोजनाला ।
नित्य नित्य पक्वान्नाला । षड्रसान्न करिताती ॥ १ ॥
दुतर्फा द्विजमेळा । सहस्रावधि एक पंगतीला ।
काढूनि स्वच्छ रांगोळीला । विराजती भूदेव ॥ २ ॥
भस्मावरी केशरी आडवें । गंध लावूनि स्वभावें ।
कस्तूरी टिळक निजभावें । लाविती सर्वांसीं ॥ ३ ॥
वैष्णव मध्व मुद्राधारी । गोपीचंदनाचे टिळे शिरीं ।
द्वादश मुद्रा परोपरी । भव्य हृदयीं विराजे ॥ ४ ॥
गंध नासाग्रीं केशपर्यंत । केशरी स्वच्छ शोभा देत ।
अंगाऱ्यावरी विराजित । अक्षदा कृष्णवर्ण सुगंधीं ॥ ५ ॥
जागीं जागीं शोभा देती । झाडें पितळी अगरबत्ती ।
परिमळें नासिक गंध घेती । आनंदती अश्विनी देव ॥ ६ ॥

सगट तीन विती रंभा पान । मांडिलें थोडथोडें अंतरान ।
वरतीं वाढूनि शुभ्र लवण ॥ पंचामृत वाढिती ॥ ७ ॥

द्वादश चटण्या बहु प्रकार । अनेक चटकदार कोशिंबीर ।
तिळवड्या क्षार मसालेदार । अरुवार तळियेल्या ॥ ८ ॥

पापड कुराड्या खारट । रुचिदार रायतें मेतकूट ।
लवण शाख जंबीर आम्रफुट । नानाविध रसाळ पैं ॥ ९ ॥

षोडश शाका उत्तमोत्तम । वांगीं कारलीं मेथी परम ।
चमकोरा अळु चुका सम । काशी भोंपळा हीं ॥ १० ॥

केळफुलें घोळ पडवळें । ताजीं फळें जांब रसाळे ।
येसर घालून मसाले । पाक सिद्ध केला पैं ॥ ११ ॥

डाळ पिंवळी निसोनि भिजविली । वरी लिंबुरसें सिंचिली ।
मुखीं घालतां द्रवली । जिव्हा तात्काल ॥ १२ ॥

वडे वोंडे खमंग । आमटी कढी फोडणीस हिंग ।
शुभ्र अन्नावरी सांग । पीतवर्ण वरान्न पैं ॥ १३ ॥

लोणकड घृत द्रोणपात्रीं । सोजी पोळी पात्रोपात्रीं ।
वाढूनि मालत्याहि क्षीरी । लाडू मोतीचूर पैं ॥ १४ ॥

बेसन लाडू दळयाचे । राघवविलास घीवर साचे ।
द्रोण भरती बासुंदीचे । केशरी जिलबी वाढती ॥ १५ ॥

साखर भात वेगळा । केशरी भात पिवळा ।
वांगी भातही शोभला । पात्रांतरीं ॥ १६ ॥

ऐसेपरी अन्ने वाढिती । संकल्पोनि बसे पंक्ति ।
कोठे उणें न पडूं देती । जेऊनी होती तृप्त ॥ १७ ॥
होमकुंडी अखंड । घृतधार चाले प्रचंड ।
निशिदिनीं जैसी सोंड । ऐरावतीची ॥ १८ ॥

ऐसे लोटले सप्त दीन । अनेक जेविती इतरजन ।
लक्षावधि अन्नदान । सोमयागीं होतसे ॥ १९ ॥

द्विजपंक्तींत शेवटीं । श्रीदत्ताची माधुकरी रोटी ।
प्रसाद लागतांचि ओंठीं । तृप्तची ढेंकर येतसे ॥ २० ॥

अगणित अन्नाचा भडिमार । होऊन करिती जयजयकार ।
दणाणून गेलें नगर । माणिक माणिक बोलती ॥ २१ ॥

शेंकडों साधुसंत । मोठमोठे गोसावी महंत ।
शिधा सरंजामही नेत । यातीधर्मांप्रमाणें ॥ २२ ॥

संतत धार घृताची चालली । यथाविधि पशु देऊनि बळी ।
देवादिक तोपविलीं । यज्ञनारायणासमवेत ॥ २३ ॥

सर्वही जनांसमवेत । स्नान करिती अवभृत ।
मध्यें माणिक विराजित । प्रजांत जेवीं राजा ॥ २४ ॥

यापरि सारूनि स्नानातें । परत येऊनि नगरातें ।
तोषविती जनांतें । हिरण्य रत्न भूषणें ॥ २५ ॥

प्रथम सर्व याज्ञिक द्विजोत्तम । त्यांसी दानें देऊनि उत्तमोत्तम ।
दक्षिणा वस्त्रें रत्नें हेम । सहस्रावधि अर्पिती ॥ २६ ॥

कोणासी सहस्र कोणासी पंचशत । कोणासी अलंकार वस्त्रांसहित ।
कोणासी हिरे मौक्तिक पदार्थ । कोणासी कंठीच घालिती ॥ २७ ॥

यापरी तोषवूनि ब्राह्मण । संतोषवी यज्ञनारायण ।
नित्यानित्य याचक जन । त्यांसही असंख्य द्रव्य देती ॥ २८ ॥

गादीखालीं घालितां हस्त । मुष्टी भरभरून देत ।
ज्याचें जैसें दैवीं असे लिखित । तैसें प्राप्त तयासी ॥ २९ ॥

मोजून कोणा न देती । जें जें येईल तात्काळ हातीं ।
तें तें देऊनि तृप्त करिती । अनेक याचक ॥ ३० ॥

मोहरा होन्न रुपये । सर्वत्रांसी देत जाये ।
धन्य उदार माणिक माये । अवतरली जगदुद्धारा ॥ ३१ ॥

यज्ञासंबंधीं व त्यांत होणाऱ्या पशुवधासंबंधीं आजकाल बरीच चर्चा चालू आहे. त्याच्याशीं आम्हांला येथें कांहींच करावयाचें नाहीं. सकलमतस्थापक सद्गुरूला वैदिक मार्गानुयायी लोकांचाही संग्रह करणें अवश्य होतें. त्याला अनुसरूनच प्रभूंनीं यज्ञ करविला. यज्ञामध्यें जेवढे उत्तम भाग आहेत, त्यांचें ग्रहण करावें हें युक्तच होय. एक पशुहत्या वगळली, तर यज्ञासारखा उत्तम विधि दुसरा कोणताच नाहीं. पशुहत्या वाईट; पण तेवढ्याकरितां त्यांमधील चांगले भागही वगळावे असें होत नाहीं. शिवाय वैदिक धर्माप्रमाणें ही हत्या समजली जात नसल्यानें हा विधि अवश्यमेव केला पाहिजे असेंही म्हणणारे सहस्रावधि लोक आहेत. असो; प्रभुदरबारीं सर्व मतांतील उत्तमोत्तम भागाला स्थान असल्यामुळें यज्ञांतील जेवढा उत्कृष्ट भाग असेल, त्याचा लाभ इतर जनांना करून देणें अवश्य होतें. यज्ञ सांग होण्याकरितां जितके श्रम व पैसा यांची जरूरी होती, तेवढ्यांत कसलेंही न्यून पडूं नये याविषयीं प्रभूंनीं व इतर सर्व शिष्यवृंदांनीं अत्यंत दक्षता घेतली होती. या यज्ञानंतर अशा प्रकारचा प्रचंड यज्ञ इकडील भागांत किंवा संपूर्ण आर्यावर्तांत देखील झाला नाहीं असें सर्वांचें म्हणणें आहे. जी गोष्ट मोठमोठ्या राजेरजवाड्यांना सुद्धां द्रव्याची अनुकूलता असूनही साधत नाहीं, ती गोष्ट प्रभुदरबारीं सहजसाध्य होत असते, हें यज्ञावरून दिसून येणारें आहे.

## जगद्गुरूंचें आगमन : : १५

माणिकनगरांत प्रभूंचें वास्तव्य होऊन संस्थानास मूर्त स्वरूप आल्यानंतर प्रभूंच्या औदार्यादि अनेक लोकोत्तर गुणांचा कीर्तिपरिमल सर्व देशभर कसा पसरत चालला, याचा वृत्तांत आतांपर्यंत आला आहेच. राजेरजवाडे, जहागीरदार इत्यादिकांप्रमाणें जगद्गुरूंच्या पीठाकडेही हा लौकिक जाऊन पीठस्थ आचार्यांना प्रभूंना पाहण्याची उत्कंठा लागून राहिली. या वेळीं शृंगेरी व हंपी या दोन आचार्यपीठांमध्यें संचार-क्षेत्राच्या बाबतींत कांहीं वाद उपस्थित झाला होता. हा वाद मिटविण्यास समर्थ अशी एखादी प्रबल शक्ति कोठें सांपडेल याची दोन्ही पीठांना चिंता लागली. शृंगेरीपीठस्थ आचार्यांचें श्रेष्ठत्व कबूल करून हंपीपीठानें निजामच्या राज्यांत संचार करावा, आपला स्वतंत्र शिक्का चालवूं नये असें शृंगेरी पीठाचें म्हणणें होतें. हंपीपीठ स्वतंत्र आहे; तें आपल्या इच्छेप्रमाणें स्वतंत्र शिक्कामोर्तब चालवून निजामचें राज्य आपलें संचारक्षेत्र समजून तेथें अनिरुद्ध संचार करीत राहील अशी हंपीपीठाची तक्रार होती.

श्रृंगेरी व हंपी या दोन्ही पीठांकडून प्रभुदरबारीं अधिकारी व शास्त्री नेहमीं येत असत. त्यांनीं या वादाचें स्वरूप प्रभूंना समजावून सांगून प्रभूंनीं या कामीं तडजोड करावी, अशी इच्छा प्रदर्शित केली. याविषयीं श्रृंगेरी पीठाकडून प्रभूंकडे

आलेलें पत्र आम्ही परिशिष्टांत देत आहों; त्यावरून त्या वेळीं प्रभूंच्या लौकिकानें कसें अमर्याद क्षेत्र व्यापिलें होतें, हें वाचकांच्या ध्यानांत येणार आहे. हें पत्र शके १७८६ रक्ताक्षी नाम संवत्सरे वैशाख शु॥ १० सोमवार या दिवशीं लिहिलें आहे. त्यांत प्रभूंचें 'देवतापूजोत्सव, ध्यान, ब्राह्मणसंतर्पण, विद्वज्जन-आदरसत्कार, वदान्यतादि' ( भवदीय गुणगणानाकर्ण्य ) अनेक गुणांचा लौकिक ऐकून आम्हास फार आनंद झाला आहे असें म्हणून श्रीपीठाच्या कांहीं महत्त्वाच्या कार्यास आपली मदत असावी म्हणून अहोबलशास्त्र्यांचे चिरंजीव रामशास्त्री यांस आपल्याकडे पाठविलें आहे असें लिहिलें आहे. कार्याचें स्वरूप रामशास्त्री समक्ष सांगतील त्यावरून कळेल असें म्हटलें आहे. श्रृंगेरीपीठस्थ आचार्यांना प्रभूंकडे येण्याची उत्कट इच्छा होती; पण त्यांना येतां आलें नाहीं असें समजतें. हंपीपीठाचे जगद्गुरु प्रभूंकडे आले होते, याविषयीं सर्व चरित्रकारांनीं लिहिलें आहे. जगद्गुरु माणिकनगरीं आले त्या वेळचें वर्णन कित्येकांनीं तपशीलवार दिलें आहे. जगद्गुरूंचें आगमन त्यांचा आदर-सत्कार, पूजा वगैरेविषयीं वर्णन, पूर्वीच्या चरित्रकारांच्या शब्दांतच दिल्यास वाचकांचेंही मनोरंजन होणार आहे. याकरितां आम्ही थोडक्यांत कांहीं उतारे देत आहों: हंपी विरूपाक्ष पीठाचे अधिपति येथें येऊन गेल्यापासून त्यांचा अनेक परीनें उत्कर्ष झाला. त्यांचा वाद हायकोर्टांत चालून निजामच्या राज्यांतील सर्व भागांत त्यांचें संचारक्षेत्र कायम

झालें आणि संपूर्ण स्वातंत्र्य पदरांत पडलें, हें सर्वविश्रुतच आहे. जगद्गुरूंनीं प्रभूंच्या ब्रीदावळीस मान्यता देऊन आपल्या संचारक्षेत्रांत असलेल्या सर्व अधिकाराची सनदही प्रभुसंस्थानास अर्पण केली, यावरून प्रभूंविषयीं पीठाला अत्यंत आदर वाटत होता व प्रभूंनींही त्यांना सहानुभूतिपूर्वक सहाय्य केलें, या दोन गोष्टी उघड होत आहेत. सन १२७५ हिजरी या वर्षीं उभय पीठाच्या वादाचा निकाल होऊन हंपीपीठाचें आसन निजामच्या राज्यांत कायमचें मजबूत झालें व पुढें यासंबंधीं कसलीही चिंता राहिली नाहीं. प्रभुसंस्थानाकडे दिलेले अधिकार त्यानंतर झालेल्या सर्व आचार्यांनीं मान्य करून त्यांत अधिक भरही घातली आहे, हें परिशिष्टांत दिलेल्या त्यांच्या दोन्ही सनदांवरून सहज दिसून येईल. प्रभूंनीं हंपीपीठस्थ जगद्गुरूंना अत्यंत आदरपूर्वक सामोरें जाऊन माणिकनगरीं आणलें आणि त्यांची यथायोग्य पूजा तात्यासाहेब महाराजांकडून करवून अगणित द्रव्य दक्षिणा म्हणून अर्पण केलें. स्वामीप्रीत्यर्थ ब्राह्मणभोजनें इत्यादि जो अन्य समारंभ झाला, तोही प्रभूंच्या लौकिकांत भर घालणाराच झाला यांत संशय नाहीं.

जगद्गुरूंच्या आगमनसमारंभाचें वर्णन देतांना सोलापूरकर यांनीं श्रृंगेरीपीठाचे आचार्य आल्याचें लिहिलें आहे व टोळ यांनीं हंपीपीठाचे आचार्य आले होते असें म्हटलें आहे. जगद्गुरु येथें आले तेव्हां आपलें वास्तव्य प्रभुदरबारीं असल्याचें

सोलापूरकर सांगतात. त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेली हकीकत वर्णन केली असल्यामुळें त्यांच्या म्हणण्यास विशेष बळकटी येण्याचा संभव आहे. आम्ही आमच्या वाचकांना एवढेंच सुचवून ठेवतों कीं, कोणत्याही पीठाचे असले तरी ते जगद्गुरु म्हणविले जात होते. जगद्गुरूंच्या आगमनप्रसंगीं माणिकनगरांत कसा समारंभ झाला हें आपणास पाहावयाचें असल्यामुळें पीठाच्या नांवाबद्दल वाद न घालतां मुख्य वर्णन आपण पाहावें. कागदोपत्री पुराव्यावरून हंपीपीठाचे जगद्गुरु माणिकनगरीं अनेकवार आल्याचें सिद्ध होतें. शिवाय हंपीपीठही आपल्यास शृंगेरी पीठाचाच एक स्वतंत्र भाग असें मानीत असल्यामुळें कोणत्याही पीठाचें नांव असलें, तरी वर्णनांत फरक होत नाहीं हें सहज दिसून येणारें आहे.

टोळ आपल्या पुस्तकांत " जगद्गुरूंचें आगमन " या सदराखालीं लिहितात, " हंपी मठाधिपति श्रीमच्छंकराचार्य जगद्गुरु यांचें आगमन माणिकक्षेत्रीं झालें. पूर्वींपासून तयारी होती. जगद्गुरूंना दोन-अडीच लक्षांचे अलंकार देण्याच्या हेतूनें नानालंकार तयार करविले होते. जगद्गुरु कोणत्या मुक्कामीं आहेत ही खबर आणवून त्या त्या मुक्कामावर सर्व वस्तूंचा पुरवठा केला जात असे. अशा प्रकारें स्वारीचा बंदोबस्त ठेवीत ठेवीत स्वारी हुमणाबादेस दाखल झाल्याची खबर येतांच माणिकक्षेत्राहून प्रभूंची स्वारी एकंदर शिष्य व इतर मंडळीसह जगद्गुरूंना घेऊन येण्याकरितां सामोरी

निघाली. हुमणाबादेहून जगद्गुरु निघाले. संगमावर उभय श्रेष्ठांच्या भेटी झाल्या. पुष्पमालेनें प्रभूंनीं आपले हात बांधून श्रींचें दर्शन घेतलें. बराच वेळ संभाषणें झाल्यावर उभयतांच्या पादचारी स्वाऱ्या चालूं लागल्या. पालखींत बसण्याविषयीं अत्याग्रह होऊन जगद्गुरु पालखींत बसल्यावर पालखीबरोबर प्रभूंची स्वारी चालूं लागली. मोठ्या समारंभानें अस्तमानाचे सुमारास जगद्गुरु माणिकनगरास येऊन दाखल झाले. पूर्वीं तयार करून ठेविलेल्या स्थळीं श्रींची स्वारी उतरल्यानंतर प्रभूंची स्वारी आपल्या आश्रमास आली. दुसऱ्या दिवशीं प्रभूंनीं जगद्गुरूंची यथासांग पूजाअर्चा करून, नानालंकार व अमोल वस्त्रें श्रींना अर्पण केलीं. त्यानंतर महाप्रसादाचा थाट झाला. हजारों लोकांनीं त्या प्रसादाचें सेवन केलें. ”

रामचंद्रबोवा सोलापूरकर यांनीं लिहिलेल्या हकीकतींत व वरील हकीकतींत किरकोळ गोष्टींत कांहीं फरक दिसून येईल व त्यांचें वर्णनही जरासें अतिशयोक्तीचें असें वाटेल; तथापि जगद्गुरूंच्या आदरसत्कार, मानसन्मान, पूजाअर्चा इत्यादि प्रकारांचें वर्णन वस्तुस्थितिनिदर्शकच आहे, अशी आमची समजूत असल्यामुळें त्यांच्याही लेखाचा उतारा आम्ही यापुढें देत आहों.—

“ यापुढें श्रृंगेरीच्या शंकराचार्यांच्या मठांतून प्रभुमहाराजांकडे रामशास्त्र्यांचें पत्र आलें कीं, जगद्गुरूंची स्वारी माघमासांत तुमचे भेटीस स्वतः येत आहे. जगद्गुरूंचे

कानावर प्रभूंचा लौकिक फारच गेल्यामुळें त्यांना स्वतः प्रभूंकडे जाण्याची इच्छा उत्पन्न झाली आणि त्यांनीं आज्ञा देऊन रामशास्त्र्यांकडून पत्र प्रभूंकडे लिहिलें. जगद्गुरूंची स्वारी स्वतः येत आहे हें पाहून फार आनंद झाला. आणि त्यांनीं दोन महिने अगोदरपासून त्यांच्या बरदास्तीची सर्व तयारी चालविली. साठ हजार रुपये किंमतीचा चांफेकळीचा एक रत्नखचित हार सोनार बसवून तयार करविला. आणि एक लक्ष रुपये किंमतीचा रत्नजडित मुकुट तयार करवून याशिवाय दुसरे अलंकार आणि मोलवान वस्त्रें आणि त्याच्या पदरच्या सर्व मंडळीस वस्त्रेंभूषणें प्रत्येकाच्या योग्यतेप्रमाणें तयार करविलीं. स्वामीस राहण्यास जाग्याची तयारी करविली व चार महिने राहतील, तरी पूर्णपणें पुरी व्हावी अशी सहस्रावधि पात्रांची अन्नसामुग्री तयार करविली. याशिवाय स्वामीस अर्पण करण्याकरितां एक हत्ती, दहा उत्तम अश्व, एक पालखी, एक मेणा, पंचवीस स्वच्छ गायी, दहा दुभत्या म्हशी, इत्यादि संपूर्ण कडेकोट तयारी केली. पुढें माघमास येऊन त्यांचा मुक्काम शृंगेरीहून हालल्याबरोबर तेथपासून म्हणजे पहिल्या मुक्कामासून प्रभूंनीं त्यांची सर्व बरदास्त पुढें प्रत्येक मुक्कामावर पूर्वींच मनुष्यें पाठवून बंदोबस्त ठेवून दिला होता. मजलदरमजल होत होत स्वारी नारायणपेठेस आली. तेथें दयाळदास कारभारी प्रभूंकडून सरबराईस होते. त्या अलीकडच्या मुक्कामावर विठ्ठलराव

तालुकदार स्वतः होते. याप्रमाणें मोठमोठीं अंमलदार माणसें प्रत्येक ठिकाणीं बंदोबस्तास अगोदरपासूनच सर्व प्रकारची तयारी करून ठेवून दिलीं होतीं. अशा इतमामानें जगद्गुरूंची स्वारी जवळ जवळ येऊन पोंचली. जगद्गुरूंबरोबर एकंदर सुमारें पांचशें मनुष्यांचा खटला होता. शिवाय पांच हत्ती, पंचवीस कोतवाली उत्तम घोडे, दोन पालख्या, चार मेणे, पन्नास स्वार, शंभर पायदळी पलटणी लोक, पंचवीस परदेशी शिपाई, दहावीस कारकून, कारभारी, पंचवीस शास्त्रीपंडित लोक, यांशिवाय आचारी, पाणके, शागीर्दपेशाचे लोक, गायी, म्हशी, ओझ्याचे उंट, बैलाच्या गाड्या व बाजारबुणगे लोक असा खटला होता.सोन्याचे काठीचे भालदार, चोपदार, छडीदार वगैरे, चौऱ्या, मोरचलें, अबदागिरी वगैरे सर्व इतमाम स्वामींबरोबर फार शोभिवंत होता. या थाटानें स्वारी माघ शु॥ ७ स हुमनाबादेस पोंचली. तेथें शंकरराव नायबांनीं व विठ्ठलराव तालुकदारांनीं सर्व बेतबात उत्तम ठेऊन स्वामींचा मुक्काम करविला. हें वर्तमान प्रभूंना कळलें, त्या दिवशीं रात्रभर सर्व वाडींत कोणाला निद्रा नाहीं. सर्व नगर पताकांनीं व कोंवळ्या वृक्षांच्या आम्रपल्लवांनीं सुशोभित केलें होतें. गांवांत संपूर्ण रस्त्यांवरून सडासंमार्जन करून रांगोळ्या घातल्या होत्या. प्रत्येक घरीं गुढ्या-तोरणें बांधून आनंद प्रदर्शित केला होता. श्रीदत्ताचे गादीजवळ हंड्या, झुंबरें, बैठका घालून फारच शोभा आणिली होती. ठिकठिकाणीं व गांवच्या वेशीवर केळीचीं झाडें लावून

सुंदर पताका उभ्या केल्या होत्या. या प्रकारें चहूंकडे तयारीची अगदीं गर्दी उडून गेली होती.

अष्टमीच्या दिवशीं पहांटे पांच वाजतां स्वामींची स्वारी हुमनाबादेहून तिकडे प्रभूंकडे येण्यास निघाली आणि इकडून प्रभूंची स्वारी स्वामीस सामोरी निघाली. पूर्वीं अगोदर हत्ती, घोडेस्वार, शिबंदी बरोबर देऊन, तात्यासाहेबांना दोन मुलांसहित हुमनाबादेस स्वामीकडे सामोरें पाठविलें. त्यांनीं स्वामींची भेट घेऊन दोन हजार रुपये नजर धूळभेटीची पुढें ठेवून हारतुरे व वस्त्रें स्वामीस अर्पण केलीं. आणि रामशास्त्र्यांनीं दोन्हीं तात्यासाहेबांचीं मुलें स्वामीच्या पायांवर घातलीं. तेव्हां विठ्ठलराव तालुकदार स्वामीवर मोरचल वारीत होते. त्यांनीं आणि रामशास्त्र्यांनीं स्वामीस, तात्यासाहेब हे प्रभूंचे कनिष्ठ बंधु असें सांगून हीं दोन्हीं मुलें यांची असें निवेदन करतांच तात्यासाहेबांनीं चरणावर मस्तक ठेविलें. मग स्वामींनीं तात्यासाहेबांना पोटाशीं धरून आलिंगन दिलें आणि दोन्ही मुलांना जवळ घेऊन आपल्या गळ्यांतील मोत्याच्या कंठ्या दोन पदकांसहित होत्या त्या काढून दोघांच्या गळ्यांत घातल्या. आणि तात्यासाहेबांना व मुलाला गळ्यांतील पुष्पहार घालून नारळ प्रसाद दिले. आणि मग स्वामींची स्वारी प्रभूंकडे जाण्यास पालखींत बसली.

हुमनाबादेहून स्वामींची स्वारी निघाल्याची वर्दी स्वारांनीं येऊन प्रभूंना कळविल्याबरोबर प्रभुमहाराजांची स्वारी पायानें

निघाली. बरोबर दोन हजार ब्राह्मण मंडळी, दोन हत्ती, एक मागें व एक पुढें, त्यावर सोन्याची अंबारी ठेविली होती. दोनशें स्वार मागें-पुढें चालले होते. अरब, रोहिले, परदेशी वगैरे हत्यारबंद शिपाई पुढच्या बाजूला चालले होते. त्यांचे बंदुकांचे व कराबिनीचे बार एकसारखे चालून अष्ट दिशा धुरानें अगदीं भरून गेल्या होत्या. त्यांत ताशे, मर्फे, वाजंत्री, चौघडे, शंख वगैरे वाद्यांची गर्दी एकच होऊन गेली होती. संत, साधु, बैराग्यांचीं भजनें होत होतीं. अशा सुमारें दहा हजार मंडळीसहित प्रभुमहाराजांची स्वारी स्वतः रुमालानें हात बांधून पायानें चालत जगद्गुरूंना सामोरी निघाली.

यांप्रमाणें इकडून स्वामी जगद्गुरूंची मोठी कडाक्याची शोभिवंत स्वारी आणि तिकडून प्रभूंची स्वारी अशा दोन स्वाऱ्यांचा संगम मध्यभागीं झाला, तेव्हां दोनही स्वारींत एकच जयजकार झाला. तेव्हां प्रभूंनीं आपल्या सेवेकरी लोकांना आज्ञा केली कीं, "संभाळा रे गड्या हो, आतां कोणी जगद्गुरु देखतां आमचा 'सकलमत स्थापित' असा भक्तकार्य म्हणून गर्जना करूं नये. कारण स्वामी आमचे गुरु आहेत. त्यांची अमर्यादा होईल. त्यांची ब्रीदावळीची गर्जना 'षण्मतस्थापक' अशी आहे. त्यांच्यापुढें आपली 'सकलमत स्थापित' अशी गर्जना कोणी करूं नये. केल्यास जगद्गुरूंची अमर्यादा होईल. संभाळा." अशी आज्ञा व ताकीद सर्व सेवेकरी व ब्राह्मण

मंडळीस आणि विशेषें करून कृष्णराव भक्तकार्य म्हणणारा, सोन्याच्या कांठीचा बरोबर नेहमीप्रमाणें पुढचे बाजूस होता, त्याला आज्ञा व सक्त ताकीद दिली असतांही ज्या वेळीं प्रभूंच्या स्वारीचा आणि स्वामींचे स्वारीचा संगम होऊन, प्रभु आणि स्वामींची पालखी अगदीं जवळ जवळ थोडया अंतरावर आली, त्या वेळीं प्रथम स्वामीकडील गर्जना झाल्याबरोबर, इकडे प्रभूंच्या मंडळीस प्रभुआज्ञेचें भान न राहतां आनंदाच्या भरांत नेहमीप्रमाणें, सर्वांनीं म्हणजे सुमार दोन हजार लोकांनीं एकदम "भक्तकार्य कल्पद्रुम गुरुसार्वभौम श्रीमद्राजाधिराज योगीमहाराज त्रिभुवनानंद अद्वैत अभेद निरंजन निर्गुण निरालंब परिपूर्ण सदोदित सकलमतस्थापित सद्गुरु माणिकप्रभु महाराज की जय !" अशी गर्जना केली आणि त्याबरोबर चार शेंकडा कराबिनींची एकदम फेर झडून एकच कडकडाट झाला ! तेव्हां पालखीजवळ रामशास्त्री व विठ्ठलराव मोरचल वारीत होते. त्यांनीं प्रभु अगदीं जवळ आल्याची वर्दी स्वामींना दिली. तेव्हां स्वामींनीं पालखींतून डोकावून पुढें पाहिलें तों, एकच गर्दी होऊन गेली आहे आणि दोन बाजूंना ब्राह्मण मंडळी उभी असून मध्यभागीं डोकीला एक साधी टोपी व अंगांत फक्त साधा झुबा घालून रुमालानें हात बांधून प्रभूंची मूर्ति उभी आहे असें पालखींतून पाहिलें. तेव्हां स्वामींनीं तेथेंच पालखी उभी राहण्यास सांगून आपण पालखींतून खालीं उतरून पायांत खडावा घालून प्रभुसन्मुख चालले.

तेव्हां हें प्रभूंनीं पाहून तेथूनच साष्टांग नमस्कार घालीत येण्यास आरंभ केला. मग स्वामिमहाराज फारच लवकर लवकर चालून पुढें गेले आणि प्रभूंना पोटाशीं गच्च आवळून आपल्या हातांनीं प्रभूंच्या हाताचा रुमाल सोडला तेव्हां प्रभूंच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचे पाट चालले. स्वामीच्याही नेत्रांतून आनंदाश्रु टपाटप गळूं लागले. याप्रमाणें दोघांही महापुरुषांची परम उत्साहानें तेथें भेट झाली, तो आनंदसुखाचा सोहळा कोण वर्णन करण्यास समर्थ आहे ?

अशा आनंदाच्या भरांत प्रभूंच्या भक्तमंडळीस पुनः देहभान नाहींसें होऊन त्यांनीं आणखी एक वेळ 'भक्तकार्यकल्पद्रुमादि ब्रीदावळी'ची गर्जना ठोकली. आणि त्यावरोवर पुनः कडाबिनीची फेर झडून कडकडाट झाला. असो. या आनंदाच्या वेळीं सर्व लोक स्वामीसुद्धां आनंदाच्या भरांत देहभान विसरून गेले होते. परंतु स्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमीचे वंधु शास्त्री, मोठे विद्वान व अभिमानी, स्वारींतच होते. त्यांच्या लक्षांत हा 'भक्तकार्य' येऊन त्यांना स्वामीची अमर्यादा झाली असें वाटलें व फार राग उत्पन्न झाला. परंतु ती वेळ बोलण्याची नसल्यामुळें त्या वेळीं त्यानीं तो राग आवरून गोष्ट पोटांत ठेविली.

सुमारें पांच मिनिटेंपर्यंत दोघांचें प्रेमालिंगनसुख होऊन आनंदाचा केवळ वर्षाव झाला. ज्याप्रमाणें पूर्वीं भरत-रामाची भेट चौदा वर्षांनीं नंदिग्रामीं झाली, किंवा शंकरविष्णूची भेट

पूर्वी त्रिपुरासुराला मारल्यावर झाली, त्याप्रमाणें ह्या भेटीचा आनंदयोग झाला. मग दोघेही आतां पालखींत वसूं चला, म्हणून स्वामींनीं प्रभूंना आग्रह केला; परंतु प्रभूंनीं तें मान्य केलें नाहीं. स्वामींना पूर्वींप्रमाणें पालखींत बसवून प्रभुमहाराजांनीं आपण स्वतः पालखीला खांदा दिला. तेव्हां स्वामींनीं प्रभूंना तसें करूं दिलें नाहीं. आणि कांहीं तरी वाहनावर वसण्याची आज्ञा दिली. शेवटीं स्वामींच्या फार आग्रहामुळें प्रभु तामझामींत वसले, आणि तात्यासाहेबांचीं दोन मुलें पुढील हत्तीच्या अंबारींत बसविलीं. आणि तात्यासाहेब वगैरे मंडळी स्वामींच्या पालखीबरोबर पायानें चालत होती. अशा समारंभानें स्वारी अकरा वाजण्याच्या सुमारास वेशीजवळ आली. तेथें सुवासिनी स्त्रिया वस्त्रभूषणांनीं मंडित अशा पंचारत्या घेऊन उभ्या होत्या. त्यांनीं प्रथम स्वामींना व मग प्रभूंना पंचारति केल्यावर स्वामींची पालखी गांवांत श्रीदत्ताच्या गादीजवळ मंडपांत जाऊन उभी राहिली. मग प्रभूंनीं स्वतः हातीं धरून स्वामींना त्यांच्या सिंहासनावर आणून बसविलें. हें सिंहासन सव्वा लक्ष रुपये रोख पसरून सव्वा गज लांबीरुंदीचें केलें होतें. त्यावर भरजरी किनखापाच्या गाद्या, लोड, तक्के मांडून सुशोभित केलें होतें. जगद्गुरूंची स्वारी सिंहासनावर बसल्यावर मग तात्यासाहेबांकडून यथासांग श्रींची पूजा, पादपूजा शोडषोपचार करवून तयार केलेलीं वस्त्रेंभूषणें संपूर्ण समर्पण करविलीं. हत्ती, घोडे, पालख्या सर्व अर्पण केलें. आणि मग

मोठ्या गजरानें धूप, दीप, आरति वगैरे करून संपूर्ण लहान थोर मंडळीस जगद्गुरूंचा तीर्थप्रसाद वांटला तेव्हां एकच जयजयकार झाला.

यानंतर पुढें श्रींच्या भोजनसमारंभाचा थाट झाला. दहा हजार पात्रें भोजनाला पंचपक्वान्नाचीं झालीं. आणि पात्रीं रुपरुपया प्रभूंनीं सर्वांना दक्षिणा दिली. प्रभूंचा आदरसत्कार पाहून जगद्गुरूंची स्वारी फारच खूष झाली. याप्रमाणें जगद्गुरूंची स्वारी प्रभूंजवळ राहिली तितके दिवस वर लिहिल्याप्रमाणें समारंभ सारखा चालू होता. प्रभूंचा खर्च, औदार्य, भक्ति, प्रेम, दयालुत्व व सर्व प्रकारचीं अमानुष कृत्यें पाहून जगद्गुरूंची स्वारी अगदीं थक्क झाली. नंतर पुढें स्वामींनीं प्रभूंचा निरोप घेतला. जातेसमयीं जगद्गुरूंनीं प्रभूंना एक बहुमोल मोत्याची कंठी, एक हत्ती, चार उत्तम घोडे, एक पालखी, शेला, दुपेटा, शालजोडी, पागोटयाची कळी इत्यादि पुष्कळ प्रसाद म्हणून प्रभु नको नको म्हणत असतां अति आग्रहानें वरील जिनसा दिल्या. त्याचप्रमाणें तात्यासाहेबांना व त्यांच्या दोन मुलांना वस्त्रेंभूषणें दिलीं. आणि शेवटीं निघते वेळीं प्रभूंना सांगितलें कीं, “ तुम्ही आपला सकलमत स्थापित भक्तकार्य कधीं बंद करूं नका. आमच्या मागें येथें आल्यापासून आमच्या बंधूची म्हणजे अहोबळशास्त्र्याची व इतर आमच्या बरोबरच्या थोर थोर विद्वानांची अशी सूचना होती कीं, हा सकलमत स्थापित भक्तकार्य म्हणण्याचा प्रभूंना कोणी अधिकार

दिला आहे तें पुसावें. यापासून आचार्यांच्या गादीची अमर्यादा होते असें त्यांचें म्हणणें आहे. त्याबद्दल आम्हास त्यांचें काय समाधान करणें असेल तें आम्हीं करूंच. परंतु तुम्हास आमची मनापासून आज्ञा आहे कीं, तुमचा 'भक्तकार्य' योग्य असून तो तुम्ही सदोदित लोककल्याणार्थ चालवीत असावें. याप्रमाणें आज्ञा देऊन स्वामिमहाराजांची स्वारी कूच करून निघाली."





# चमत्कार कथा

प्रभुचरित्र चमत्कारांनीं भरलें आहे. प्रभूंच्या अनंत चमत्कारकथा अद्यापपर्यंत लोकांच्या स्मरणांत असून, वृद्ध लोक मोठ्या आवडीनें त्या सांगत असतात. त्या सर्वांचा समावेश या चरित्रांत होणें शक्य नाहीं. याकरितां कांहीं ठळक गोष्टी आमच्या ऐकण्यांत अथवा वाचण्यांत आल्या आहेत, तेवढ्याच आम्ही वाचकांपुढें सादर करीत आहों. बहुतेक सर्व चरित्रकारांनीं लिहिलेल्या कथांचाच भरणा इतका होईल कीं, आमचे प्रेमळ वाचक देखील सर्व कथा वाचतां वाचतां थकून जातील. वृद्ध लोकांच्या सांगण्यांत आलेल्या किंवा येत असलेल्या कथाही विपुल असून अद्याप त्या अमुद्रित अशा आहेत. एकूण एक गोष्टी, प्रभूंच्या असामान्य व अलौकिक योगसामर्थ्याची साक्ष देत आहेत. प्रभूंसारख्या लोकोत्तर विभूतिमागें चमत्कार लागतात. सामान्य जनांना चमत्कारानें चकित करण्याच्या हेतूनें मुद्दाम कधींही अशा चमत्कारांचें प्रदर्शन केलेलें नसतें. योगसामर्थ्यानें अद्भुत गोष्टी घडतात, घडवितां येतात, आणि तें सामर्थ्य म्हणजे प्रभूंची सहज लीला होय, हें अलीकडील गूढ शास्त्रज्ञ देखील कबूल करतील. असो.

## जहाज तारलें : : १

एकदां प्रभु दरबारांत गादीवर बसले असतां एकाएकीं दोन्ही हात वर करून कांहीं वेळ बसले. या वेळीं त्यांच्या अंगांत नुसता साधा कबा होता. कोणत्या तरी अज्ञात व अदृष्ट वस्तूला हातांचा आधार देण्यासारखा त्यांचा आविर्भाव दिसत होता. प्रभूंनीं असें कां केलें, हें विचारण्याचें सामर्थ्य कोणालाच नव्हतें. सर्व माणसें चकित होऊन, चित्रांप्रमाणें तटस्थ राहून पाहत होतीं. कांहीं वेळानें प्रभूंनीं आपले हात खालीं केले. त्या वेळीं प्रभूंच्या दोन्ही अस्तन्यांतून टपटप पाणी गळत होतें. अंगांतील कबा सर्व ओला-चिंब होऊन गेला होता. लोकांना याचा उलगडा होईना. प्रभु इतके घामाघूम कां झाले हें कोणासच समजेना. प्रभूंनीं अंगांतील कबा काढून टाकिला. तो शिष्यगणांपैकीं एकानें घेऊन पिळून काढला. त्यांतून अतिशय खारट पाणी निघालें. कोणी कोणी तें पाणी तेथल्या तेथें चाखूनही पाहिलें. त्या पाण्याची चव समुद्राच्या पाण्याप्रमाणें होती असें चाखून पाहिलेल्यांपैकीं एकानें महाराजा सर किसनप्रसाद बहादूर यांजपाशीं प्रतिज्ञापूर्वक सांगितलें आहे. महाराजा बहादूर यांनीं लिहिलेल्या एका पुस्तकांत या गोष्टीचा उल्लेख केला आहे. हजरत दिलावर अलीशा नाचवारम् नांवाच्या एका मुसलमान सत्पुरुषानें महाराजा बहादूर यांना सांगितलें कीं,

" प्रभूंनीं हात वर केले होते, त्या वेळीं मी स्वतः प्रभूंजवळ होतों; इतकेंच नव्हे, तर कपडा पिळून निघालेलें पाणी मीं स्वतः चाखूनही पाहिलें. तें अगदीं समुद्राच्या पाण्याप्रमाणें खारट लागलें." एका मुसलमान वलीनें सांगितलेली हकीकत, आधीं स्वतः पाहून खात्री करून घेऊन मगच सांगितली असल्यामुळें तिचें महत्त्व अधिक आहे. हजरत दिलावर अलीशा मोठे नामांकित वली होऊन गेले. आपण योगविद्या प्रभूंपासून संपादन केली असल्याची कबुलीही त्यांनीं महाराजा बहादूरजवळ दिली आहे. प्रभूंचें योगसामर्थ्य किती अचाट होतें हें दाखविण्याकरितांच वरील हकीकत दिलावर अलीशांनीं महाराजा बहादूर यांना सांगितली व ती त्यांनीं आपल्या पुस्तकांत नमूद करून ठेविली आहे.

असो; प्रभूंना काय झालें याचा उमज कोणासच पडला नाहीं व नेहमींच्या वहिवाटीस अनुसरून कोणी याच्या कारणाबद्दल पृच्छाही केली नाहीं. पुढें कांहीं महिन्यांनीं मुंबईकडील एक बडा व्यापारी प्रभुदरबारीं येऊन दाखल झाला; त्यानें पूर्वीं केलेल्या नवसाची भली मोठी रक्कम प्रभूंपुढें ओतली, त्या वेळीं वरील गोष्टीचा उलगडा होऊन सर्वांना फार अचंबा वाटला. लक्षावधि रुपयांचा व्यापार करणारा असा हा एक व्यापारी होता. एकदां आपल्या जहाजांत लाखों रुपयांचा माल भरून तो परबंदराहून मुंबईकडे येत असतां वाटेंत अकस्मात वादळ उत्पन्न होऊन त्याचें जहाज हेलकावे खाऊं

लागलें. वादळ फारच वाढल्यामुळें आतां जहाज खास बुडणार अशी सर्वांची खातरी झाली. व्यापाऱ्याला आपल्यावरील संकटाची जाणीव होऊन आतां आपला विनाशकाल आला आहे असें वाटून तो अगदीं घाबरून गेला. काय करावें हें सुचेना ! जहाज बुडलें तर सर्वस्व जाऊन प्राणासही मुकावें लागणार हें त्याला स्पष्ट दिसूं लागलें. त्यानें देवाचा धांवा करण्यास सुरवात केली. सर्व देवांचीं नांवें घेतलीं, पण त्यांपैकीं कोणीही धांवून येईना, असें पाहून तो निराश झाला. इतक्यांत जवळच्या एका गृहस्थानें त्याला सांगितलें कीं, " हुमनाबादच्या माणिकप्रभूंना नवस करा. हल्लींच्या काळांत तोच चालताबोलता देव आहे. भक्तकार्यकल्पद्रुम असें त्यानें ब्रीद धारण केलें आहे. तोच तुमच्या या संकटांत धांवून येऊन तुम्हांला वांचवील. " संकटसमयीं अकल्पित प्राप्त झालेल्या या आप्तवाक्यावर त्याचा विश्वास बसून त्यानें प्रभूंच्या नांवानें हाक मारून प्रभूंना नवस केला आणि लगेच भाक बांधिली. त्याच्या आर्तस्वरानें इकडे प्रभूंना विजेच्या झटक्याप्रमाणें हालवून सोडिलें ! अंत:करणापासून निघालेली आपल्या भक्ताची हाक ऐकून प्रभु तात्काल द्रवले. आणि बसल्या ठिकाणींच त्यांनीं हात वर करून जहाजाचा बचाव केला !

प्रभूंपुढें रुपयांचा ढीग घालून पूजा करण्याच्या आधीं ही घडलेली सर्व हकीकत त्यानें निवेदन केली व नंतर परमप्रेमानें

प्रभूंची पूजा, आरति वगैरे केली. "तुम्ही आपल्या नवसांत बोलल्याप्रमाणें सर्व रक्कम आहे का ?" असा प्रभूंनीं त्याला प्रश्न केला. व्यापारी बिचारा गोंधळून गेला. हिशोबाअंतीं कांहीं रुपये कमी असल्याचें आढळून आलें. त्यानें ती रक्कम लगेच भरतीस घालून संतुष्ट अंतःकरणानें प्रभूंची पूजा केली. हिशेबांत प्रभु किती दक्ष आहेत हें पाहून सर्वांना फार अचंबा वाटला.

रामचंद्रबोवा सोलापूरकर यांनीं लिहिलेल्या चरित्रांत म्हटलें आहे कीं, "मालक घाबरून जाऊन पंढरपूरचा विठोबा, तुळजापुरची भवानी इत्यादि देवांच्या नांवानें मोठमोठ्यानें हाका मारीत असतां, जहाजावरील एका मुसलमान गृहस्थानें त्याला प्रभूंचें नांव सुचविलें. 'विठोबा, अंबाबाई इत्यादि दगडाच्या देवाला हाका मारण्याऐवजीं, एखाद्या चालत्याबोलत्या देवाला हाका माराल तर बरें होईल.' असें त्या मुसलमानानें सुचवितांच 'चालताबोलता देव कोण आहे ?' अशी मालकानें त्याजवळ पृच्छा केली. तेव्हां त्यानें प्रभूंचें नांव सुचविलें. यावरून त्या वेळीं मुसलमान समाजांतही प्रभूंच्या नांवाचा प्रसार होऊन प्रभूंच्या सामर्थ्याविषयीं त्यांची खातरी पटली होती ही गोष्ट उघड होत आहे.

# दमडीची साखर : : २

प्रभु नवसाला पावतात याविषयीं सर्वांची खातरी होऊन चुकली होती. परंतु त्या वेळीं असेही कांहीं लोक होते कीं, त्यांनीं प्रभूंकडे जाणाऱ्या भाविक लोकांचा उपहास करावा. हुमनाबादेंत एक अशा प्रकारचे गृहस्थ होते. ते स्वतः कधीं प्रभुदर्शनास आले नाहींतच; पण दुसरे कोणी जात असतील तर त्यांची त्यांनीं थट्टा करावी. एकदा या गृहस्थाचा जोडा हरवला. तो नवा कोरा असल्यामुळें त्याची त्यांना फार हुरहुर लागली. त्या वेळीं त्यांना प्रभूंना लोक नवस करतात या गोष्टीचें स्मरण झालें. तथापि मूळ जातिस्वभावाला अनुसरून त्यांनीं 'माझा जोडा आजचे आज सांपडल्यास मी एक दमडीची साखर वांटीन' असा नवस केला. कर्मधर्मसंयोगानें त्याच दिवशीं त्यांचा तो जोडा सांपडला. आपण प्रभूंना एक दमडीच्या साखरेचा नवस केला होता याची त्यांना लाज वाटून त्यांनीं चार आण्याच्या साखरेचा पुडा बरोबर घेतला आणि ते प्रभुदर्शनाला निघाले. नेहमीप्रमाणें प्रभुदरबारीं गर्दी होतीच. तींतून वाट काढीत हे गृहस्थ प्रभूंपुढें दाखल होऊन जवळचा साखरेचा पुडा पुढें ठेवून नमस्कार करणार इतक्यांत प्रभु आपल्या शिष्यांपैकीं एकाला म्हणाले "अरे, जरा एक तागडी आण पाहूं !" त्यानें तागडी आणतांच प्रभु त्या गृहस्थाला म्हणाले, "तुमच्या साखरेपैकीं फक्त एक दमडीची साखर माझी आहे; तेवढी

तोलून माझ्या पदरांत टाका. बाकीची मला काय करावयाची आहे !" हें प्रभूंचें बोलणें ऐकून तो गृहस्थ गार झाला. त्याच्या तोंडून शब्द निघेना. मग नमस्कार करून प्रभूंजवळ क्षमेची याचना करूं लागला. प्रभु म्हणाले, "अरे बाबा, देवाची अशी परीक्षा करूं नये. तुझ्या एका दमडीकरितां माझ्या प्रभूला किती श्रम पडले असतील याचा विचार कर"— गृहस्थाला प्रभूच्या अंतःसाक्षित्वाचा प्रत्यय आल्यावर तो ओशाळा होऊन दंडवत् प्रभूंपुढें पडला आणि "पुन्हा असा अपराध माझ्या हातून होणार नाहीं; एकवार क्षमा करा" अशी विनवणी करूं लागला. सर्वांचे अपराध पोटांत घालणाऱ्या प्रभूंनीं त्याच्यावर दया केली व तो गृहस्थ पुढें प्रभूंचा प्रेमळ भक्त बनला.

# बाबा काटकर : : ३

मागें सांगितल्या प्रकारची एक नवसाची हकीकत टोळ यांनीं आपल्या चरित्रांत दिली आहे. लातूरचे बाबा काटकर या नांवाचे एक गृहस्थ दरसाल श्रीव्यंकटगिरीस काठी घेऊन जात असत. एकदां ते प्रभुनगरीं दर्शनास आले, तेव्हां त्यांना प्रभूंनीं व्यंकटेशरूपानें दर्शन दिलें. बाबा हर्षभरित होऊन प्रभूंना म्हणाले, "महाराज, मला आतां यापुढें गिरीला जाण्याची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं. कारण आपल्या दर्शनानें माझे सर्व हेतु परिपूर्ण झाले आहेत. त्यावर प्रभूंनीं त्यांची समजूत केली कीं, तुम्ही आपल्या वडिलोपार्जित वहिवाटीला अनुसरून गिरीला जात जा; मात्र जातां येतां येथें येऊन जाण्याचा क्रम ठेवा म्हणजे झालें. प्रभुआज्ञेप्रमाणें बाबा दरसाल माणिकनगरीं येत असत. एकदां लातूरहून माणिकनगरीं येत असतां, पाणी पिण्याच्या हेतूनें ते वाटेवरील एका विहिरींत उतरले. पाणी पिणें झाल्यावर गडबडीनें वर आल्यामुळें त्यांना आपल्या तपकिरीच्या डबीचें विस्मरण होऊन, ती विहिरींतील एका पायरीवरच राहून गेली. माणिकनगर येथून जवळच होतें. प्रभुदरबारीं आल्यानंतर तपकिरीचें स्मरण झालें, म्हणून पाहतात तों डबी सांपडेना. पुष्कळ शोध केला. शेवटीं त्यांनीं ती डबी सांपडल्यास एक शाही पैशाची साखर प्रभूंना वाटण्याचा नवस केला. पुढें प्रभुदर्शनार्थ गेल्यावर प्रभूंच्या

सन्निध गादीवर आपली तपकिरीची डबी असल्याचें त्यांना आढळून आलें. डबी सांपडल्यास एक शाही पैशाच्या साखरेच्या नवसाचेंही त्यांना स्मरण होऊन, त्याची त्यांना लाज वाटूं लागली. त्यांचें हें अंतरंग ओळखून, प्रभु त्यांना म्हणाले, ‘‘गिरीस जातांना पर्वत चढावा लागतो त्या वेळीं पाय दुखूं नयेत म्हणून लोक काय नवस करतात?’’ त्यावर बाबा हात जोडून बोलले, ‘‘ महाराज, पाय दुखूं नयेत म्हणून गिरिनाथाला आम्ही एक पैचा नवस बोलतों. ’’

‘‘ होय ना ? मग हा तुमचा नवस तर एक शाहीचा आहे. तेवढी शाहीची साखर आणा आणि ही आपली डबी घ्या पाहूं ?’’

## बाबा काटकर :: ३

मागें सांगितल्या प्रकारची एक नवसाची हकीकत टोळ यांनीं आपल्या चरित्रांत दिली आहे. लातूरचे बाबा काटकर या नांवाचे एक गृहस्थ दरसाल श्रीव्यंकटगिरीस काठी घेऊन जात असत. एकदां ते प्रभुनगरीं दर्शनास आले, तेव्हां त्यांना प्रभूंनीं व्यंकटेशरूपानें दर्शन दिलें. बाबा हर्षभरित होऊन प्रभूंना म्हणाले, "महाराज, मला आतां यापुढें गिरीला जाण्याची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं. कारण आपल्या दर्शनानें माझे सर्व हेतु परिपूर्ण झाले आहेत. त्यावर प्रभूंनीं त्यांची समजूत केली कीं, तुम्ही आपल्या वडिलोपार्जित वहिवाटीला अनुसरून गिरीला जात जा; मात्र जातां येतां येथें येऊन जाण्याचा क्रम ठेवा म्हणजे झालें. प्रभुआज्ञेप्रमाणें बाबा दरसाल माणिकनगरीं येत असत. एकदां लातूरहून माणिकनगरीं येत असतां, पाणी पिण्याच्या हेतूनें ते वाटेवरील एका विहिरींत उतरले. पाणी पिणें झाल्यावर गडबडीनें वर आल्यामुळें त्यांना आपल्या तपकिरीच्या डबीचें विस्मरण होऊन, ती विहिरींतील एका पायरीवरच राहून गेली. माणिकनगर येथून जवळच होतें. प्रभुदरबारीं आल्यानंतर तपकिरीचें स्मरण झालें, म्हणून पाहतात तों डबी सांपडेना. पुष्कळ शोध केला. शेवटीं त्यांनीं ती डबी सांपडल्यास एक शाही पैशाची साखर प्रभूंना वाटण्याचा नवस केला. पुढें प्रभुदर्शनार्थ गेल्यावर प्रभूंच्या

सन्निध गादीवर आपली तपकिरीची डबी असल्याचें त्यांना आढळून आलें. डबी सांपडल्यास एक शाही पैशाच्या साखरेच्या नवसाचेंही त्यांना स्मरण होऊन, त्याची त्यांना लाज वाटूं लागली. त्यांचें हें अंतरंग ओळखून,प्रभु त्यांना म्हणाले,"गिरीस जातांना पर्वत चढावा लागतो त्या वेळीं पाय दुखूं नयेत म्हणून लोक काय नवस करतात?" त्यावर बावा हात जोडून बोलले, "महाराज, पाय दुखूं नयेत म्हणून गिरिनाथाला आम्ही एक पैचा नवस बोलतों."

"होय ना? मग हा तुमचा नवस तर एक शाहीचा आहे. तेवढी शाहीची साखर आणा आणि ही आपली डबी घ्या पाहूं?"

# सर्पदंश :: ४

प्रभुदरबारीं याचक लोकांची सदैव गर्दी असे. कांहींना कांहीं निमित्तानें द्रव्याची मागणी करणारे लोक पुष्कळ असत. यांत जातीचा संबंध नसे. हिंदु, मुसलमान, शीख, लिंगायत इत्यादि अनेक जातीचे व पंथाचे लोक नित्यशः दर्शनास येत असत. त्याचप्रमाणें नाना जातींचे व पंथांचे लोक द्रव्य मागण्याकरितां येत असत. अशा लोकांपैकीं एक गरीब ब्राह्मण आपल्या धाकटया भावासह प्रभुदरबारीं आला. कनिष्ठ बंधूच्या लग्नाकरितां त्याला द्रव्याची अपेक्षा होती. म्हणून त्यानें चारशें रुपयांची मागणी प्रभूंकडे केली. प्रभूंनीं त्याला राहण्यास सांगितलें. नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें भंडारखान्यांत अन्न खाऊन हे उभयतां बंधु माणिकनगरीं बरेच दिवस पडून राहिले. आपल्यासमक्ष हजारों लोक येतात व इच्छित हेतु प्राप्त करून घेऊन संतुष्ट होऊन परत जातात; परंतु आपल्या कामाची दाद अजून लागत नाहीं असें पाहून त्यांची उत्कंठा वाढूं लागली. प्रभूंजवळ केलेली प्रार्थना व्यर्थ जाणार नाहीं, अशी त्यांची खातरी होती; पण आपली दाद लवकर कशी लागावी ही चिंता त्यांना लागून राहिली. अशामध्यें एके दिवशीं लहान बंधूस सर्पदंश झाला. सर्पाच्या शेपटीवर चुकून पाय पडतांच त्यानें उलटून दंश केला. दंश करणारा नागसाप असल्यामुळें कसलाही उपाय चालला नाहीं आणि

विचारा ब्राह्मण मृत्युमुखीं पडला ! हें पाहून सर्वजग हळहळलें. वडील बंधु धाय मोकलून रडूं लागला. ज्या भावाच्या लग्नाकरितां म्हणून प्रभुदरवारीं पडून राहिला होता तोच मृत्युमुखीं पडलेला पाहून त्याचा शोक अनिवार झाला. शेवटीं सायंकाळ झाल्यानंतर ही सर्व हकीकत प्रभूंच्या कानावर घालण्यांत आली. प्रभू हळहळून म्हणाले, " अरेरे, विचारा ब्राह्मण लग्नाकरितां येथें राहिला आणि लग्न न होतांच मरून गेला!" वडील बंधूच्या मुखांतून सर्व हकीकत ऐकल्यावर प्रभूंनीं शिष्याला आज्ञा केली कीं, " जो सर्प या ब्राह्मणाला चावला आहे, त्याला इकडे बोलावून आणा." प्रभूंची ही चमत्कारिक आज्ञा ऐकून सर्वजण बुचकळ्यांत पडले व एकमेकाच्या तोंडाकडे पाहूं लागले. शेवटीं मशाल घेऊन उभा असलेल्या दत्तु न्हाव्याला प्रभूंनीं सर्पाला बोलावून आणण्यास सांगितलें. तो बिचारा भीत भीत हातीं जळती मशाल घेऊन चालला. संगमाजवळ जाऊन त्यानें जोरानें हाक मारण्यास सुरवात केली. "अहो, ब्राह्मणास चावलेल्या नागोबा, तुम्हाला प्रभूंनीं बोलाविलें आहे. चला लवकर."

त्याचा आवाज ऐकल्याबरोबर एक प्रचंड नाग फूत्कार टाकीत त्याकडे चालून आला. नागोबाला पाहतांच दत्तु हजाम घाबरून प्रभूंकडे परत जाण्यास निघाला. सर्पानेंही त्याची पाठ धरली. दरबारांत येऊन पोंहचतांच दत्तूच्या जिवांत जीव आल्यासारखें झालें. त्याच्यामागून आलेल्या

नागानें प्रभूंपुढें प्रवेश केल्यावर तेथें बसलेली सर्व मंडळी घाबरून गेली. तें पाहून प्रभु हंसून म्हणाले, " सर्वं खल्विदं ब्रह्मं म्हणणाऱ्या शास्त्री लोकांनीं तरी या सर्पाला भिण्याचें कारण नाहीं. " त्या वेळीं प्रभूंसन्निध बरीच शास्त्री मंडळी बसली होती. आणि त्यांनीं वेदांत विषयावर मोठ्या आवेशयुक्त वाणीनें पूर्वोत्तर पक्ष चालविले होते. अशांत नागोबाचें तें प्रचंड धूड समोर पाहतांच त्यांचा वेदांत जागच्या जागीं राहून सर्वांची गाळण उडाली व त्यांना पळतां भुई थोडी झाली. तो सर्प प्रभूंपुढें आल्यावर त्यांनीं आपल्या अंगावरचें वस्त्र त्यापुढें टाकिलें, त्यावर नागोबाची स्वारी वेटोळें घालून बसली आणि फणा वर काढून डोलूं लागली. प्रभु नागोबाला उद्देशून बोलले, "आमच्या येथें हे बालगोपाल हजारों येतात; त्यांचें रक्षण करण्याचें सोडून त्यांना उपद्रव देणें ठीक नव्हे. तुमच्यासारख्या थोरांनीं असें कृत्य कधींही करूं नये." इतकें बोलून त्या सर्पादेखत आपल्यापुढें असलेल्या खारकेपैकीं एक उचलून घेऊन आपल्या तोंडांत घातली व ती पुन्हा बाहेर काढून त्या ब्राह्मणाजवळ दिली आणि त्याला सांगितलें कीं, "ही खारीक उगाळून तुमच्या भावाच्या तोंडांत घाला, म्हणजे तो उठेल."

पुन्हा असें कृत्य न करण्याबद्दल नागोबाला ताकीद देऊन, त्याची रवानगी करून दिली. इकडे ब्राह्मणानें उगाळलेली खारीक त्या मृत बंधूच्या मुखांत घालतांच झोंपेंतून

उठल्याप्रमाणें तो तरुण ब्राह्मण शुद्धीवर आला. हा सर्व प्रकार पाहून भोंवतालची मंडळी आश्चर्यचकित होऊन प्रभूंच्या अद्भुत योगसामर्थ्याची चोहोंकडे तारीफ होऊं लागली.

त्या तरुण ब्राह्मणाला मृत्यूच्या जबड्यांतून बाहेर काढल्यावर प्रभूंनीं त्याच्या अपेक्षेप्रमाणें देणगी देऊन संतुष्ट केलें. वडील बंधूला पुढें कळून आलें कीं, आपल्या बंधूवर अरिष्ट होतें हें प्रभूंनीं जाणूनच आपणाला मुद्दाम ठेवून घेऊन अपमृत्यूंतून त्याचा बचाव केला. साक्षात् मृत्युंजयाजवळ आपण राहिलों म्हणूनच हें अरिष्ट टळलें हें समजल्यावर त्यांनीं प्रभूंना किती धन्यवाद दिले असतील, याची कल्पना वाचकांनींच करावी.

# टेहळदासाची आई : : ५

मारुतीच्या देवळाजवळ टेहाळदास नांवाचा एक साधु आपल्या आईसहित झोंपडी बांधून राहिला होता. त्याची आई मोठी सिद्ध माणसांपैकीं असून तिचें वय सवाशें वर्षांचें झालें होतें. प्रभूंनीं दिवसांतून केव्हां तरी एकदा तिची भेट घेऊन तिच्याजवळ घटका अर्ध घटका बोलत बसावें. ते तिच्याशीं बोलत बसले, म्हणजे तेथें इतर कोणाला राहूं देत नसत. झोंपडीभोंवतीं पहारे असावयाचे. टेहळदासानेंही ती जागा बागबगीचा वगैरे लावून मोठी रमणीय केली होती. त्याची झोंपडी येथें झाल्यानंतर आणखीही पुष्कळ साधुसंत व बैरागी यांनीं त्याच्या आसपास झोंपड्या बांधल्या होत्या. टेहळदासाचे मातु:श्रीला नित्य भंडारखान्यांतून तीन भाकरींची नेमणूक असे. एके दिवशीं प्रभू त्या म्हातारीजवळ जाऊन बसले, तोंच एकाएकीं ती झोंपडी चोहोंकडून पेटली. थोड्याच वेळांत भोंवतालच्याही सर्व झोंपड्या एकदम पेटून आगीचा मोठा बंबाळ झाला. आणि चहूंकडे धूर दाटून गेला. झोंपडीला आग लागली व प्रभु त्यांत त्या म्हातारीसह सांपडले आहेत हें समजून सर्व वाडींत एकच हलकल्लोळ झाला ! तेव्हां सर्व लोकांची जी धांदल उडाली, ती काय विचारावी ! सर्वत्र एकच हाहा:कार झाला. आणि कोणी हांडे, घागरी, पातेलीं जें सांपडेल तें घेऊन विहिरींतून पाणी आणआणून आगीवर ओतूं लागले, कोणी

प्रभूंकरितां छाती पिटून मोठयानें धाय मोकलून रडूं लागले ! अरब, रोहिले, परदेशी, शिपाई वगैरे सर्व लोक आगीवर पडले आणि आंत शिरून प्रभूंना शोधू लागले. गांवांतील सर्व लहान थोर स्त्री-पुरुष आणि यात्रेकरू, बाहेरील आलेले सर्व लोक, अशा हजारों लोकांचा त्या अगीभोंवताली गराडा पडला. आणि जिकडे तिकडे शोक, दुःख, हळहळ असा भयंकर व उदास देखावा दृष्टीस पडूं लागला व सर्वत्र रोदनाचा स्वर ऐकूं येऊं लागला. सर्वजण 'प्रभु प्रभु' म्हणून छाती पिटून रडूं लागले. तात्यासाहेब, त्यांचें कुटुंब आणि सर्व सेवेकरी धांवून येऊन सर्वांची आगींत शिरून प्रभूंना काढण्याची एकच धांदल उडून गेली ! परंतु प्रभु आंत कोठेंच सांपडेनात व ती म्हतारीही कोठें मिळेना ! तेव्हां प्रभु म्हतारीसहित जळून गेले म्हणून समजून सर्व लोक अधिकच निराश होऊन शोक करूं लागले. अशी सर्वत्र एकच धांदल होऊन गेली आणि चहूंकडे भयंकर देखावा दिसूं लागला. फक्त गादीजवळ व्यंकंमा मात्र स्वस्थ बसली होती. तिच्या वृत्तींत कांहीं तळमळ झाली नव्हती. इतक्यांत प्रभुमहाराज म्हातारीला पाटकुळीं घेऊन अकस्मात् गादीजवळ येऊन उभे राहिले ! ते कोणीकडून आले तें कोणालाच समजलें नाहीं. त्यांना पाहतांच कांहीं लोकांनीं 'प्रभु आले, प्रभु आले, प्रभु जीवंत आहेत' अशी मोठयानें आरोळी ठोकली. तेव्हां सर्व लोक गादीकडे धांवत येऊन पाहतात तों प्रभु खुशाल सुखरूपपणें म्हातारीला

पाठीवर घेऊल हंसत उभे आहेत ! मग सर्वांना आनंद झाला तो काय वर्णावा ? परंतु प्रभु इतक्या आगीच्या गर्दीतून या ठिकाणीं कोणासच न दिसतां आले कसे ? याचा अंत कोणासच लागला नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं त्या म्हातारीनें प्रभु आज्ञेवरून समाधि घेऊन प्रभुसन्निध कायमचें वास्तव्य केलें.

# अग्निनारायण :: ६

मागील प्रकरणांत यज्ञासंबंधीं सविस्तर हकीकत आम्हीं दिलीच आहे. त्या यज्ञाप्रीत्यर्थ आणिलेल्या सामानाचा विनियोग यज्ञाकडेच व्हावा, कोठीखान्यांत कांहीं शिल्लक ठेवूं नये, अशी प्रभूंची आज्ञा असतांही कोठावळ्यांनीं आपल्या वहिवाटीला अनुसरून कांहीं तुपाच्या घागरी व धान्यसामुग्री मागें राखून ठेविलीच होती. ही गोष्ट तात्यासाहेबांना माहीत होती. एके दिवशीं तात्यासाहेब प्रभुसन्निध बसले असतां अकस्मात् गोसावी-बैराग्यांचा एक प्रचंड मेळा प्रभुदरबारीं दाखल झाला. त्यांच्या शिधासामुग्रीची व्यवस्था लावावी म्हणून प्रभूंची आज्ञा झाली. 'कोठीखान्यांत कांहीं तूप शिल्लक आहे काय ?' असा प्रभूंनीं प्रश्न केल्यावर 'शिल्लक नाहीं' असें तात्यासाहेब बोलून गेले. कोठावळ्यानेंही तेंच उत्तर दिलें. त्यावर हुमनाबादेहून तूप आणविण्याचा हुकूम दिला. या गोष्टीला तास अर्धा तास झाला नाहीं तोंच कोठीखान्याला आग लागल्याची एकानें वर्दी आणली. ती ऐकून तात्यासाहेब गडबडीनें उठून जाऊं लागले. पण प्रभूंनीं त्यांना खालीं बसवून घेतलें, "तात्या, कोठींत कांहीं सामान शिल्लक नाहीं ना ? मग लागेना आग ! ती विझविण्याचा व्यर्थ खटाटोप कशाला ? यज्ञांत अग्नि तृप्त झाला नाहीं, असें मला तरी वाटतें. करितां अग्निनारायणाची ही स्वारी पुनश्च येथें आली आहे. यासाठीं भरपूर तूप ओतून

अग्निनारायणाला तृप्त केलें पाहिजे" असें बोलून, होतें-नव्हतें तेवढें सर्व तूप जमा करून व भरतीला हुमनाबादेहून आलेलें तूप घालून अग्निनारायण शांत केला. कोठींत शिल्लक असलेलें सर्व तूप अग्निनारायणानें आधींच फस्त केलें होतें.

कोठावळ्यानें कांहीं सामान मागें शिल्लक ठेविलें होतें, त्यांत त्याचा सद्धेतुच होता. वेळप्रसंगीं त्या सामानाचा उपयोग योग्य कारणाकडेच करावा असा त्याचा हेतु होता व हें कृत्य त्यानें तात्यासाहेबांच्या संमतीनेंच केलें होतें. प्रभूंची दृष्टि सांसारिक नव्हती. उद्यांकरितां राखून ठेवण्याचें काम त्यांनीं कधींच केलें नाहीं. शिल्लक राखून कोणतेंही काम करणें हें प्रभूंचें ब्रीदच नव्हतें. या ब्रीदाची सत्यता अजूनही या संस्थानामध्यें पाहावयास मिळत आहे. प्रभुसमाधि होऊन आज सत्तर वर्षें होऊन गेलीं, तरी संस्थान हें आपलें ब्रीद अखंड राखून चाललें आहे. 'उद्यांची काळजी आज करण्याचें कारण नाहीं' या तत्त्वावरच संस्थानचीं सर्व महत्त्वाचीं कामें पार पडत आहेत. उद्यांची काळजी न केल्यामुळेंच दरसाल लाखों रुपयांची प्राप्ति संस्थानास होऊन लाखों रुपयांचा खर्चही चालत आहे.

# पंक्तीचा लाभ : : ७

एकदां एक महा विद्वान शास्त्री प्रभुदरबारांत आले. दरबारच्या शिरस्त्याप्रमाणें त्यांच्या राहण्याची व पोटापाण्याची सोय लागून त्यांना प्रभुदर्शनही झालें. प्रभूंशीं कांहीं वेळ संभाषण करण्याचा योगही या शास्त्रीबुवांना रोज घडूं लागला. प्रभुदरबारचा थाट, नित्य हजारों लोक दर्शनास येतात, ब्राह्मणभोजनें होतात, गुणिजनांचा योग्य परामर्श घेतला जातो, अशा प्रकारच्या " नित्यश्रीनित्यमंगला "चा देखावा पाहून शास्त्रीबुवा दंग झाले. ज्याच्या प्रभावानें ह्या सर्व गोष्टी यथासांग चालल्या होत्या, त्या प्रभूंविषयीं त्यांच्या मनांत आदरभाव वाढूं लागला. नित्य संभाषणाचा योग येत असल्यामुळें जरा भीड चेपली होती म्हणून एके दिवशीं शास्त्रीमहाराजांनीं प्रभूंजवळ विनंति केली कीं, " महाराज, इतक्या दिवसांत आपल्या पंक्तीचा लाभ कधीं घडला नाहीं. तो पंक्तीचा प्रसाद एकवार मला मिळावा अशी प्रार्थना आहे. "

" शास्त्रीबुवा, आम्ही फकीर लोक; आमची पंगत कसली? तुम्हाला ती मानवेल कीं नाहीं, कोणास ठाऊक? आमची ठरींव वेळ नाहीं; तथापि तुमची तशी इच्छा असल्यास मी तुम्हास बोलावून घेईन. "

" आपली जी वेळ असेल त्या वेळीं सूचना येतांच मी मोठ्या आनंदानें हजर होईन. "

याप्रमाणें बोलणें झाल्यावर "उदयीक तुम्हाला पंक्तीला बोलावतों " असें प्रभूंनीं शास्त्रीबुवांना कळविलें. शास्त्रीबुवाही प्रभुपंक्तीच्या आशेनें दिवसभर तिष्ठत बसले. एवढा मोठा दरबारी थाट जेथें नित्य चालू आहे त्या प्रभूंच्या पंक्तीचा थाट कांहीं तरी तसाच अपूर्व असेल असें शास्त्रीबुवांना वाटत होतें. प्रभूंच्या अलंकार स्वयंपाकाचा प्रसाद मिळून आज आपण कृतकृत्य होणार अशी कल्पना करून ते प्रभूंच्या निमंत्रणाची वाट पाहत राहिले. शेवटीं रात्रीं अकरा वाजण्याच्या सुमारास प्रभूंकडून मनुष्य आला, त्याजबरोबर शास्त्रीबुवा प्रभुसन्निध प्राप्त झाले. तेथें येऊन पाहतात, तों पंक्तीचा कसलाच थाट दिसेना ! पक्वान्नाचा वाससुद्धां येईना. प्रभु एका हातांत एक साधी जोंधळ्याची भाकर घेऊन बसलेले त्यांना आढळले. त्या भाकरीवर लसणीची चटणी होती. प्रभूंनीं हंसत हंसत शास्त्रीबुवांचें स्वागत केलें आणि आपल्याप्रमाणेंच शास्त्रीबुवांनाही झोळीची भाकर देण्यास शिष्याला आज्ञा केली. त्याप्रमाणें त्यानें वर लसणीचें तिखट घातलेली जाडीभरडी भाकर शास्त्रीबुवांच्या हातीं दिली. प्रभूंनीं भाकर खाण्यास सुरवात केली व शास्त्रीबुवांनाही प्रसाद भक्षण करण्यास परवानगी दिली. बोलतां बोलतां प्रभूंनीं ती भाकर मोठ्या मजेनें खाल्ली आणि वर पाणी पिऊन आनंदाची ढेकर दिली. इकडे शास्त्रीबुवांच्या नाकाडोळ्यांतून नद्या वाहूं लागल्या. अशा प्रकारच्या पंक्तीचा कधीं प्रसंग नसल्यामुळें शास्त्रीबुवांना

चतकोर भाकरही खाववेना. हें पाहून प्रभु म्हणतात, "शास्त्री-महाराज, हा दत्ताच्या झोळीचा महाप्रसाद महद्भाग्याशिवाय लाभत नाहीं. पण तुम्हाला त्याची संवय नसल्यानें मानवत नाहीं असें दिसतें."

यावर शास्त्रीबुवा खजील होऊन गेले व प्रभूंजवळ आपलें दौर्बल्य कबूल करून क्षमा मागूं लागले. प्रभूंनीं मग त्यांच्या मनाचें योग्य समाधान करून त्यांना परत पाठवून दिलें. वरील गोष्टीवरून प्रभूंच्या साध्या राहणीची कल्पना होईल. प्रभु नित्यनियमानें कधींही भोजन करीत नसत. एक दोन दिवसांनीं कधीं तरी कांहीं खात असत. पण त्यांत विशेषेंकरून त्यांच्या आवडीचा पदार्थ म्हणजे झोळीची भाकर आणि लसणीचें तिखट. याशिवाय दुसऱ्या कशाचीही त्यांना गरज नसे. जिव्हालौल्याच्या मार्गें लागलेल्या लोकांना प्रभूंचें तें भोजन मानवणें शक्य नव्हतें. अशा लोकांकरितां स्वतंत्र व्यवस्था असल्यामुळें कोणास कशाचीही वाण नव्हती.

## माणक्या : : ८

प्रभूंना लहान मुलांची फारच आवड असे. लहान मुलाप्रमाणें आपणही त्यांच्याशीं खेळावें, बोबडें बोलावें, हंसावें असे नानाप्रकार मुलें जवळ असतांना चालत असत. लहानांत लहान, तरुणांत तरुण व वृद्धांत वृद्ध बनून प्रभु त्यांच्याशीं तात्काळ समरस होत. त्यांच्या बोलण्यांत मार्दव, विनोद व प्रेमळपणा भरलेला असे. त्यामुळें लहान मुलांना प्रभूंचा लळा फारच लवकर लागे. एकदां प्रभूंशीं बोलण्याचा योग आला कीं, लहान लहान मुलें त्यांच्याशीं फारच लडिवाळपणानें वागत. एखाद्या मुलाचा आवाज चांगला असला, कीं प्रभूंनीं एखादें गोड पद त्याला शिकवावें. विठोबा कोमटी या नांवाचा एक वृद्ध भाविक गृहस्थ फार दिवसांपूर्वीं माणिकनगरीं राहत असे. त्याच्या तोंडून प्रभूंचीं पदें ऐकण्याचें भाग्य आम्हांस अनेक वेळां लाभलें आहे. तो कोणीं गवई नव्हता; पण प्रभूंनीं अगदीं बालपणीं त्याला जवळ बसवून कांहीं पदें शिकविलीं होतीं, तीं तो त्या ढबीनें म्हणत असे. त्याच्या साधेपणांतच दिव्य प्रेमाचा मोठा सांठा दिसून येई. अशीं किती तरी उदाहरणें देतां येतील. असो.

अशा या लहान मुलांपैकीं माणक्या या नांवाचा एका पाटलाचा मुलगा प्रभूंशीं फार लडिवाळपणें वागे. प्रभूंना केलेल्या नवसानें मुलगा झाला असल्यामुळें पाटलानें त्याचे

नांव माणिक असें ठेविलें होतें. माणिकनगरापासून त्या पाटलाचें गांव चार कोसांवर होतें. परंतु दर गुरुवारीं तो आपल्या लाडक्यास घेऊन प्रभुदर्शनास येत असे. माणक्या प्रभुसन्निध आल्याबरोबर त्याच्या प्रेमाला भरतें येई. प्रभूही त्याच्याशीं प्रेमळपणानें बोलून त्याचें मन रमवीत. माणक्या अशा रीतीनें प्रभूंच्या प्रेमाकर्षणांत सांपडला होता. प्रभु म्हणजे सारसर्वस्व अशी त्याची स्थिति झाली होती. प्रभूंपासून त्याला परत गांवीं नेण्याचें काम त्याच्या वडलांना फार जाचक होत असे.

एके दिवशीं लहान माणक्या आपल्या शेतांत खेळत असतां देहाचें भान न राहून तो एका खोल विहिरींत पडला. पडतां पडतां माणक्याला प्रभूंची आठवण होऊन आपल्या बोबडया शब्दानें त्यानें प्रभूंना हांक मारली. भक्ताच्या—आणि त्यांतून माणक्यासारख्या शुद्ध अंतःकरणाच्या अर्भकाच्या—हांकेला प्रभु धांवून गेले यांत नवल काय ! माणक्याला प्रभूंनीं वरच्यावर झेलून घेतलें. त्याला कसलीही इजा झाली नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्याला आपण प्रभूंजवळ असून प्रभु आपल्याशीं नित्याप्रमाणें खेळत आहेत असें आढळून आलें. इकडे त्याच्या आईबापाला माणक्या विहिरींत पडल्याचें समजतांच त्यांची धांवपळ सुरू होऊन आईनें एकच आकांत मांडला. आईचा ध्वनि ऐकून माणक्यानें विहिरींतून आरोळी ठोकली. सर्वांना आश्चर्य वाटलें. इतक्या खोल

विहिरींत मुलगा पडला असतांही, जिवंत कसा आहे याचें त्यांना आश्चर्य वाटूं लागलें. आईनें विचारलें " बाळ, तूं अजून कसा रे जिवंत राहिला आहेस ? " त्यावर माणक्यानें उत्तर दिलें, " मी येथें प्रभूंबरोबर खेळतों आहें. "

हा काय प्रकार आहे तें कोणाला न समजल्यामुळें विस्मित होऊन लोकांनीं दोर खालीं सोडला. त्याबरोबर एक मनुष्य खालीं उतरला आणि त्यानें माणक्याला सुरक्षित बाहेर काढलें. वर आल्यावर माणक्यानें प्रभु आंत असल्याचें सांगितलें व प्रभूंनीं आपल्या डोकीला घातलेली पागोट्याची कलीही दाखविली. प्रभूंनीं आपल्या अद्भुत सामर्थ्यानें माणक्याला वांचविलें अशी सर्वांची खातरी होऊन लगेच आईबापांनीं माणक्याला प्रभुचरणांवर घालण्याकरितां माणिकनगरास आणिलें. प्रभूंनीं त्याला जवळ घेऊन त्याच्या अंगावरून हात फिरविला आणि म्हटलें, "गुलामा, मी विहीरींत आलों होतों म्हणून कशाला सांगितलेंस ? "

# तुळजापूरची भवानी : : ९

प्रभुदर्शनाचा लाभ झाल्यानंतर मनुष्याच्या विचारसरणींत व आचारांत फरक पडल्यावांचून राहत नसे. पूर्वींच्या हटवादी मतावर विशाल स्वरूपाची छाप पडून मनुष्याची विचारसरणीही व्यापक क्षेत्र आक्रमूं लागे. अशीं शेंकडों उदाहरणें देतां येण्यासारखीं आहेत. मुसलमानाला आपल्या संकुचित दृष्टीची लाज वाटून प्रभूंच्या प्रभावानें हिंदूंविषयींची द्वेषभावना मावळून जात असे. वैष्णवांना प्रभूंमध्यें साक्षात् विष्णुचें स्वरूप दिसून यावें, शैवानांही प्रभूंच्या ठायीं असलेल्या शंकर स्वरूपाचें दर्शन व्हावें. हिंदु, मुसलमान, शीख, जैन, लिंगायत इत्यादि सर्व मतांतील लोकांना प्रभूंचें स्वरूप आपापल्या इष्ट मताला अनुसरूनच असल्याचें दिसून यावें आणि प्रभुसन्निध वावरत असलेल्या प्रेमळ वातावरणानें एकमेकांचें व्यंग पाहण्याचें सोडून सर्वच एका सर्वव्यापी भावनेनें प्रेरित होऊन नकळत प्रभूंच्या विशालत्वाची साक्ष पटल्यामुळें आनंदभरित होत असत.

हिंदु धर्मांत जीं अनेकविध उपास्य दैवतें आहेत त्यांच्या भक्तांना प्रभूंच्या ठायीं आपापल्या उपास्य दैवतेचें स्वरूप दिसून येऊन त्या स्वरूपांत त्यांनीं प्रभूंची पूजाअर्चा करावी, हा नित्याचाच परिपाठ असे. प्रभूंनीं भाविक भक्तांच्या

आवडीप्रमाणें वागून त्यांच्या हातून पूजा घ्यावी. एकदां एका देवीभक्ताला तुळजापुरची भवानी प्रसन्न झाली व त्याचें कार्य सफल झालें. त्यानें केलेल्या नवसाप्रमाणें देवीला अर्पण करण्याचीं वस्त्रें व भोग घेऊन तो भक्त तुळजापुराकडे जाण्यास निघाला. वाटेंत त्याला स्वप्न झालें कीं, तुळजापुरास न जातां तूं माणिकनगरास जाऊन प्रभूंना आपला भोग अर्पण कर. या दृष्टांतावर त्याचा विश्वास न बसून तो तसाच पुढें चालला. शेवटीं रस्त्यांत तुळजापुरचा उपाध्याय त्याला भेटला आणि त्यानेंही आपल्याला झालेली आज्ञा त्याला सांगितली. तुळजापुराला न येतां त्या भक्तानें माणिकनगरीं जावें, अशी आज्ञा पूजाऱ्यामार्फत देवीनें केली होती. त्यामुळें त्या भक्तानें माणिकनगरचा रस्ता धरला. प्रभुदर्शनानंतर झालेल्या दृष्टांताची हकीकत त्यानें प्रभूंपुढें निवेदन केली. " देवीची आज्ञा आहे तर पूजा घेण्यास माझी कांहीं हरकत नाहीं " हें प्रभूंचें वाक्य ऐकून त्यास परम संतोष झाला व त्यानें पूजेची तयारी केली.

त्या भक्तानें अत्यंत भाविकपणानें देवी समजून प्रभूंची पूजा केली. प्रभूंनींही या समयीं देवीचें रूप धारण केलें होतें. भक्तानें आणलेली पैठणी प्रभूंना नेसवून अंगांत चोळी घातली, अंगावर सर्व अलंकार घातले आणि डोळ्यांत काजळ घालून कपाळ भरून मळवट भरला. या वेळीं प्रभु मूर्तिमंत भवानी बनले होते. सर्व पूजा होऊन आरति सुरू झाली, त्या वेळीं

नित्य परिचयांतील लोकांनाही ही साक्षात् देवीच आहे असा भास झाला ! त्या भाविक भक्ताला प्रेमातिशयानें गंहिवर येऊन त्यानें देवीला साष्टांग नमस्कार घातला व आपल्या नवसाची पूर्तता केली.हा पूजेचा प्रकार प्रत्यक्ष पाहणाऱ्यानेंच आम्हांला निवेदन केला असल्यामुळें आम्हीं येथें दिला आहे. या वेळीं प्रभूंचें तेज इतकें देदिप्यमान होतें कीं, सर्वांचे डोळे दिपून जाऊन अंतःकरण विस्मय व दरारा यांनीं भरून गेलें होतें !

# पंजाबी पैलवान : : १०

' गर्वाचें घर खालीं, ' या म्हणीचा अनुभव प्रभुदरबारांत नित्यशः येत असे. प्रभूंच्या एका हस्तलिखित चरित्रांत पुढील गोष्ट आम्हास आढळली, ती त्या चरित्रकाराच्या शब्दांतच आम्हीं देत आहों.

" एकदा तर अशी मजा झाली कीं, दहाबारा पंजाबी पैलवानांची टोळी प्रभूंकडे आली. ही मंडळी शेंकडों राजदरबारांत जाऊन आपणांस जिंकणारा कोणीं दुसरा पैलवान न मिळाल्याबद्दल त्या त्या दरबारांतून जयपत्र लिहून घेई. त्यांच्यांतील मुख्यानें तर एका पायांत सोन्याचा तोडा व दुसऱ्या पायांत गवती तोडा असें पैलवानी ब्रीद बांधलें होतें. हे लोक प्रभूंकडे आले, तेव्हां प्रथम दादासाहेबांनीं त्यांच्या नित्याच्या खुराकाला दहा रुपये ठरवून दिले. प्रभूंचें दर्शन घेऊन त्यांनीं आपला दरबारी अर्ज केला. आमच्याशीं कुस्ती करणारा कोणी उभा करून त्याजकडून आम्हांस जिंकवा, नाहीं तर आमच्या अजिंक्यपणाबद्दल जयपत्र लिहून द्या, असा त्यांनीं प्रभूंना प्रत्यहीं तगादा लाविला. प्रभूंनीं " हा आमचा फकिरी दरबार, भिक्षा मागून गुरुभजन करावें हा आमचा धंदा, आमच्याजवळ पैलवान कोठचे ? आणि आमच्या जयपत्राचा तुम्हांस फायदा तरी काय ? एक दिवस गुरुघरच्या कण्या-भाकरीचा प्रसाद घेऊन तुम्ही आपल्या

रस्त्याला लागा. सद्गुरुकृपेनें तुमची चोहोंकडे नेहमीं भरभराट होत जाईल, ” असें प्रथमदर्शनींच त्यांना समजून सांगितलें. पण ते आपला हेका सोडीनात. जयपत्र लिहून मिळाल्याशिवाय आपण येथून हालणार नाहीं, असा त्यांनीं दुराग्रह धरला. तेव्हां “ आम्ही ना कोणी राजे ना नवाब ! बोलूनचालून लंगोटबंद झोळीवाले फकीर ! आमच्या जयपत्रापासून तुम्हाला काय फायदा होणार ? आम्हांलाच जर कोणी विचारीत नाहीं, तर त्या पत्राची काय मातब्बरी ? ” अशी जेव्हां त्यांची सामोपचारानें समजूत चालविली, तेव्हां तर ते गर्वानें जास्तच फुगले आणि कोणा कुत्सित लोकांच्या शिकवण्यावरून असो किंवा स्वतःच्या अकलेनें असो, “ प्रभु असा बोलून चालून फकीर आहे तर, राजाधिराज महाराज अशीं मोठमोठीं ब्रीदें दाखवून त्यानें हजारों लोकांना कशाला नादीं लावावें ? आतां त्यांनीं एक राजा म्हणून तरी अजिंक्यपत्र द्यावें, किंवा मी फकीर आहें, माझ्या हातून कांहीं होत नाहीं, असा स्वदस्तुरचा लेख तरी द्यावा, त्याशिवाय आम्ही साफ हलणार नाहीं,” असें त्यांनीं बोलणें लाविलें. या त्यांच्या दुराग्रहाबद्दल प्रभूंच्या भक्तमंडळीनें परभाराच त्यांची कानउघाडणी करून निषेध केला; त्यामुळें खुद्द प्रभूंपुढें मात्र त्यांच्याच्यानें हे उद्गार काढवेनात.

हे लोक संगमावर राहत असत. आणि नित्य त्यांना दादासाहेबांकडून दहा रुपये खाण्याकरितां मिळत.

आठचारदिवस गेल्यानंतर एके दिवशीं संध्याकाळचे वेळीं प्रभु फिरत फिरत संगमाकडे गेले, तेव्हां ही मंडळी त्यांच्यापुढें आपणास निरोप देण्याबद्दल विनंती करूं लागली. त्यांनीं आपला शेवटचा विचार प्रभूंना जाणवला. तेव्हां प्रभु थोडासा विचार करून त्यांना काय ती आज्ञा करणार, इतक्यांत पांच-सात डोंबाऱ्यांचें एक खटलें प्रभूंपुढें येऊन दाखल झालें आणि ते क्षणभर आपली कसरत वगैरे पाहण्याबद्दल प्रभूंना विनंती करूं लागले. तेव्हां प्रभु हसत हसत, " तुमची ती कसरत राहूं द्या; या पंजाबी पैलवानांचें काय म्हणणें आहे तें आधीं ऐका ! यांच्याशीं कोणी तरी अगोदर कुस्ती करा पाहूं ! तुमचें दोघांचेंही कौशल्य काय आहे, अगोदर पाहूं या तर खरें !"

प्रभूंची ही विलक्षण आज्ञा ऐकतांच एक डोंबारी हात जोडून म्हणाला, " महाराज, असें कसें होईल ? कसरतीचें काम निराळें आणि कुस्तीचें निराळें; आपण जाणतच आहां." प्रभु म्हणाले, " अरे, निराळें तें काय ? दोन्हींही शरीराच्या करामतीच्या गोष्टी आहेत. आम्हांस संतोष वाटावा म्हणून जर तुम्ही दोघेही श्रम करणार आहां, तर असेंच कां होईना ? त्यांतून खरें म्हटलें तर, पैलवानापेक्षां तुमचेंच काम कठीण आहे. पैलवानाला नुसतें सामर्थ्य असलें म्हणजे झालें. पण तुम्हाला शक्ति असून युक्तिही पाहिजे आहे. मग असें दुप्पट साधन अनुकूल असल्यावर काय रे ! त्यांतून

येथें काय ? गुरुघरांत क्षणभर गंमत होऊन भक्तमंडळींची करमणूकही होत आहे. येथें राजा किंवा नबाब अथवा बादशहाचा दरबार थोडाच आहे ? पाहूं तर खरें, सद्गुरूंच्या सत्तेनें कसा काय अजब तमाशा होतो तें ! ”

हा डोंबारी भाविक असून प्रभूंच्या सामर्थ्याविषयीं बऱ्याच गोष्टी त्यानें ऐकिल्या होत्या. त्यामुळें कांहीं शंका न घेतां त्यानें प्रभूंची आज्ञा मान्य केली. आणि “ व्हा तयार वस्तादजी; प्रभुमहाराजांसमोर दोन हात करून दाखवूंया ” असें त्या तोंडेवाल्या पैलवानास त्यानें सांगितलें. तो तर आधींच गर्वानें फुगून गेला होता. त्याला प्रभु व डोंबारी या दोघांचेंही आपल्या बळाविषयींचें अज्ञान पाहून हा सर्व पोरखेळ आहे असें वाटलें. मग तो त्यांची निर्भर्त्सना करण्याच्या हेतूनें डोंबाऱ्याला म्हणाला, “ वाघानें कोल्ह्याशीं लढण्यास काय तयारी करावी ! तूं खुशाल वाटेल तशा उड्या मार. मी एक पंजा मारण्याचाच अवकाश ! तोंपर्यंत तूं आपल्या महाराजाला काय कौशल्य दाखवावयाचें असेल तें दाखव. हा मी उभा आहें. ” असें बोलून स्मित हास्य करीत सर्वांकडे पाहूं लागला. तेंव्हां प्रभु डोंबाऱ्याला म्हणाले, “हं, पाहा वस्तादांची तयारीच आहे. तूं दाखव आपल्या गुरूच्या सटक्याचा पराक्रम. ” असें बोलून प्रभूंनीं आपल्या हातांतील सटका जमिनीवर हळूच आपटला. डोंबऱ्यानें, “ जी हुकूम, मायबाप ” म्हणून आपली चड्डी खेंचली व दंड थोपटून

प्रभूंना मुजरा करून पैलवानावर चालून गेला. पैलवानाला आपल्या बळाची फार घमेंड असल्यामुळें तो उगीच हसंत उभा होता. असे शेंपन्नास डोंबारी आले तरी आपला पायसुद्धां त्यांच्यानें हालवणार नाहीं अशी त्याची पक्की समजूत होती. म्हणून तो डोंबारी त्याच्या अंगाशीं जाऊन भिडला, तरी तो हातसुद्धां उचली ना ! पण काय चमत्कार ! डोंबाऱ्यानें त्याच्या दोन्ही बावटयांना धरून थोडया जोरानें मागें ढकलतांच तो एखाद्या कापसाच्या भोतासारखा उताणा पडला ! तेव्हां त्याच्या डोळ्यांवरची धुंदी उतरून त्या डोंबाऱ्याच्या अंगांतही आपल्याप्रमाणेंच बळ आहे असें त्याला आढळून आलें. तो झटकन् उठून कांहीं डावपेंच करणार इतक्यांत चपळाई करून डोंबारी मोठ्या आवेशानें त्याच्या छातीवर चढून बसला. आणि त्याला असा कांहीं जमिनीवर दाबून टाकला कीं, त्यानें पाहिजे तितकीं पराकाष्ठा केली, तरी त्याला इकडे तिकडे हालतां सुद्धां येईना. शेवटीं निरुपायानें त्या पैलवानाला आपण जिंकलों गेलों, आणि डोंबाऱ्यानें जय मिळविला, असें कबूल करणें भाग पडलें. शेवटीं प्रभूंनीं डोंबाऱ्याला त्याला सोडण्यास सांगितलें, तेव्हां तो उठला आणि प्रभूंना पुन्हा मुजरा करून उभा राहिला. प्रभूंपुढें साष्टांग दंडवत घालून त्यानें प्रभूंची स्तुति आरंभिली. " या पैलवानांना जिंकण्याचें तर सोडूनच द्या, पण याच्यापुढें ठाण मांडून उभें राहण्याची सुद्धां आपली योग्यता

नाहीं. आपण आपल्या इच्छेनें मला आज्ञा दिली म्हणूनच ही अघटित गोष्ट घडून आली. आपण पाहिजे त्याला पाहिजे तें सामर्थ्य तेव्हांच देऊं शकतां यांत संशय नाहीं, " असें बोलून कृपाप्रसाद व्हावा म्हणून प्रभूंना विनंती करूं लागला. प्रभूंनीं नेहमींच्या आपल्या रिवाजाप्रमाणें त्याला फारसें बोलूं न देतां तो संतुष्ट होईल इतकी नगदी रक्कम आणि कपडेलत्ते देऊन तात्काल त्यास वाटेस लाविलें. त्याप्रमाणेंच त्या खजिल झालेल्या पैलवानालाही पुष्कळ द्रव्य व सर्वांना उत्तम कपडे देऊन गुरुदरबारीं असा गर्व करूं नये अशी सूचना देऊन रवानगी करून दिली. "

# नांदेडकर शास्त्री : : ११

रामचंद्रबोवा सोलापूरकर यांनीं लिहिलेल्या चरित्रांत एका गर्विष्ठ शास्त्र्याचें गर्वपरिहरण कसें परस्पर झालें याची कथा दिली आहे. ती वाचून कित्येक शास्त्री लोक रुष्ट झाले आहेत हें आम्हास माहीत आहे. तीच गोष्ट आम्ही येथें दिल्यास आमच्यावरही तोच प्रसंग येईल हें आम्ही जाणून आहों. तथापि, आम्ही आमच्या शास्त्रीबंधूंना विनंती करितों कीं, उन्मत्तपणा व गर्वाचा अतिरेक कोठेंही निंद्यच होय हें आपणसुद्धां कबूल करालच. विद्वत्तेच्या घमेंडींत राहून बेफाम उन्मत्त बनलेल्या शास्त्र्याला योग्य वळणावर आणून सोडण्याचें काम प्रभूंच्या प्रेरणेनें एका सामान्य प्रतीच्या मनुष्याकडून घडलें असलें म्हणून राग मानण्याचें कारण नाहीं. या कथेंतून निघणारें तात्पर्य अथवा नीतिबोध याचेंच ग्रहण करावें, या उद्देशानें आम्ही या कथेचें अवतरण आमच्या वाचकांकरितां देत आहों.

" नांदेडचा एक विद्वान् ब्राह्मण, दोन शास्त्रें अध्ययन केलेला, शिवाय वैद्यकींत, याज्ञिकींत आणि वेदांत शास्त्रांत निपुण असा होता. तो प्रभूंची कीर्ति ऐकिल्यामुळें प्रभु कसा आहे हें पाहण्याकरितां प्रभुनगरास आला. वाडींत आल्यावर प्रभुदर्शनास न जातां वीस दिवसपर्यंत तसाच गांवांत उगीच घमेंडीनें राहिला. त्याला आपल्या विद्येचा व

शहाणपणाचा अतिशय अभिमान वाटत असून प्रभुसुद्धां इतर सर्व आपल्यापुढें कःपदार्थ आहेत असें तो सर्वांजवळ उघड म्हणून दाखवूं लागला. आणखी असेंही तो लोकांजवळ म्हणे कीं, "मी प्रभूंना जिंकण्यास आलों आहें. प्रभूंना काय येतें, धूळ ?" असें म्हणून त्यानें गांवांतील सर्व विद्वान् ब्राह्मणांना अगदीं त्रास देऊन सोडिलें ! प्रभूंजवळ त्याच्याशीं टक्कर देण्यास कोणीं नव्हतें असें नाहीं; परंतु प्रभु उगीच काय होतें आहे ही गमंत पाहत स्वस्थ बसले होते. याप्रमाणें वीस दिवस झाले. बापाचार्यासुद्धां सर्व वाडींतील थोर ब्राह्मण या ब्राह्मणास अगदीं कंटाळून गेले. कारण यानें रोज उठून कोणाशीं कांहीं तरी वितंडवाद घालीत बसून भांडणतंटा करून त्यावरून "कोणास कांहीं येत नाहीं, मी सर्वांपेक्षां विद्वान आहें, मला प्रभूंकडून अजिंक्यपत्र देववा" असें म्हणावें. ही कागाळी प्रभूंच्या कानांवर बहुत वेळां मंडळींनीं घातली, तरी प्रभूंनीं कोणाला उत्तरच देऊं नये. तपकिरीची चिमूट घेऊन ती नाकाशीं धुंगीत स्वस्थ आनंदानें डुलत बसावें. याप्रमाणें वीस दिवस झाल्यावर एके दिवशीं सकाळीं हे नांदेडकर शास्त्री गावांतील कांहीं विद्वान ब्राह्मण जमवून वाद घालीत बसले असतां प्रभूच्या सेवेकरी न्हाव्याचा एक मुलगा पुर्ववयस्क दत्तु म्हणून होता, तो बगलेंत धोपटी अडकावून तेथें सहज येऊन उभा राहिला. त्याकडें पाहून नांदेडकरशास्त्र्याला आपल्या हजामतीची आठवण होऊन त्याला म्हणाले कीं, "आमची हजामत आज करतोस

काय ? " तेव्हां दत्तु न्हावी हात जोडून म्हणाला, " होय महाराज, तुमची हजामत करावी म्हणूनच मी आज येथें आलों आहें. " हें ऐकतांच शास्त्रीबोवांनीं एक फाटकी घोंगडी अंथरून दत्तूला आपल्यापुढें बसवून घेतला. तेव्हां पाणी पाहिजे म्हणून शास्त्रीबोवांनीं थंड पाणी घेतलें. तें पाहून दत्तु म्हणाला, " महाराज, थंडी पडलिया लई, पानी जरा ऊन करून घ्या कीं. " शास्त्रीबोवा म्हणाले, " पाणी ऊन घेतलें असतें, परंतु विस्तव जवळ पेटलेला नाहीं. " त्यावर दत्तु म्हणाला, ' महाराज, असें हो काय बोलतां ? तुमच्या पोटांत जठराग्नि नांवाचा विस्तु पेटलेला नाहीं काय ? एवढा रात्रंदिवस पेटलेला विस्तु जवळ असतां त्यावर हजामतीचें देखील पाणी तापूं नये काय ? हीच का तुमची विद्वत्ता ! तोंडानें तर लई मोठया मोठया गोष्टी सांगतां आणि एवढ्याशा पाण्याला विस्तु नाहीं म्हणतां तापायला ! यावरून विद्येच्या अनुभवाच्या नांवानं बहुतकरून तुमच्याजवळ शून्य दिसत आहे. आणि तोंडच्या पोपटपंचीवर तुमचा सारा डौल दिसत आहे असें वाटतें. खरोखर कांहीं विद्येचें व ब्राह्मणपणाचें तेज असेल, तर जठराग्नीवर पाणी एवढें तापवा पाहूं ! " दत्तु न्हाव्याचें हें भाषण ऐकून शास्त्रीबोवा अगदीं रागानें लाल होऊन म्हणाले, "मूर्खा, लहान तोंडीं मोठा घांस घेतोस काय ? मजसारख्या विद्वान ब्राह्मणाची, तूं न्हावी होऊन मानखंडना करतोस ? तोंड संभाळून बोलत जा. नाहीं तर ही पाण्याची वाटी तूं आपल्या तरी जठराग्नीवर ऊन करून दे."

शास्त्रीबोवा असें बोलतांच, दत्तु न्हावी लागलीच उताणा निजला. आणि त्यानें आपल्या पोटावर बेंबीजवळ ती गार पाण्याची वाटी सुमारें पांच मिनिटेंपर्यंत ठेविली. इतक्यांत पाणी कढत होऊन सळसळून त्याला आधण आलें आणि त्यांतून वाफा निघूं लागल्या. तेव्हां शास्त्रीबोवांना परम आश्चर्य वाटून अगदीं त्यांचा तोराच कमी होऊन गेला. अभिमानगलित होऊन पश्चात्ताप झाला कीं, 'ज्या प्रभूच्या वाडींतील केवळ न्हावगंडे देखील इतके योगमार्गांत प्रवीण, यावरून स्वतः प्रभूंची योग्यता काय असावी ! धि:कार असो मला ! मी येथें येऊन प्रभूचें दर्शन न घेतां व्यर्थ वीस दिवस पोकळ बडबडींत व ब्राह्मणांचे द्वेष संपादन करण्यांत दुराग्रहानें व अभिमानानें घालविले ! यावरून मजसारखा अधम जगतीतलावर दुसरा कोणी नाहीं हेंच सत्य आहे.' असा निश्चय करून तो दत्तु न्हाव्याचे पाय धरून 'मला प्रभूंकडे घेऊन चल' असें म्हणूं लागला. तेव्हां दत्तु न्हाव्यानें उलट शास्त्रीबोवांचे पाय धरून सांगितलें कीं, 'आपल्यासारख्या थोर विद्वान ब्राह्मणाला प्रभूंपर्यंत नेण्याची माझी योग्यता नाहीं हें काम बापाचार्य वगैरे थोर थोर समर्थ ब्रह्मवृंद करतील,' असें म्हणून दत्तूनें शास्त्रीबोवांस बापाचार्याजवळ सोंपवून दिलें. तेव्हां बापाचार्यांनीं शास्त्रीबोवांना नेऊन प्रभूंच्या पायावर घातलें. प्रभूंनीं शास्त्रीबोवांचा उत्तम आदरसत्कार करून शालजोडी, धोतरजोडा, पागोटें व दोनशें रुपये देऊन त्याला संतुष्ट केलें."

# शीखाचें मुडुप : : १२

गोपनपल्ली येथें एक शीख जातीचा गृहस्थ राहत असे. त्याची श्रद्धा प्रभूंवर बसून तो गुरु नानकाप्रमाणें प्रभूंना पूज्य मानीत असे. त्याची बायकोही प्रभुभक्त बनली होती. या उभयतां स्त्री-पुरुषांनीं वेळोवेळीं केलेल्या नवसाचे पंधरा रुपये झाले होते. त्याचें मुडुप करून प्रभुदर्शनानंतर पूजा-आरति करून प्रभूंपुढें हें मुडुप ठेवावयाचें असा त्याचा संकल्प होता. संकल्पाप्रमाणें ते दोघे माणिकनगरीं येऊन पोंचले. संगमावर स्नान करून प्रभुपूजेकरितां साहित्य गोळा करून पूजेच्या वेळीं पेढे पाहिजेत म्हणून एक रुपयाचे पेढे विकत आणण्याकरितां तो शीख हुमणाबादेस गेला. संगमावर त्याची बायको चिरगुटें वाळवीत बसली होती. नवरा हुमनावादेहून पेढे घेऊन आल्यानंतर प्रभूंची यथासांग पूजा करून मुडुप अर्पण करावें असा त्या दोघांचा मनोदय होता. मुडुपाची गांठ या स्त्रीजवळ ठेवून शीख गेला होता. इतक्यांत प्रभूंजवळ राहणारा एक ब्रह्मचारी या शीख स्त्रीचा शोध करीत संगमावर आला. मीच ती शीख स्त्री असें तिनें सांगतांच तो म्हणाला, "तुमच्याजवळचें तें पंधरा रुपयांचें मुडुप तेवढें मजजवळ द्या. प्रभूंनीं याकरितां मुद्दाम मला येथें पाठविलें आहे." आपण या मुडुपाची वार्ताही कोणास कळविली नसतां प्रभूंचा हा अकल्पित निरोप ऐकून ती चकित झाली. "नवरा अजून

परत यावयाचा आहे, तो आल्यानंतर विचारून मुडुप देईन" असें म्हणावेंसें तिला वाटलें. परंतु तसे शब्द कांहीं तोंडावाटे निघेनात. नवरा काय म्हणेल तें म्हणो, प्रभुआज्ञा शिरसामान्य करावी असा विचार करून तिनें चिंधींत बांधलेलें तें मुडुप त्या ब्रह्मचाऱ्याच्या स्वाधीन केलें. मुडुप घेऊन ब्रह्मचारी निघून गेला. इकडे हुमणावादेहून नवरा परत आल्यावर त्याला हें वृत्त सांगण्याचा विसर पडून नवऱ्याबरोबर ती बाई घाईघाईनें पूजासाहित्य घेऊन प्रभुस्थलाकडे गेली. दोघांनींही आनंदभरानें प्रभूंची यथासांग पूजा केली. फुलांच्या माळा गळ्यांत घालून आणलेले पेढे प्रभूंपुढें ठेविले. या वेळीं त्या शिखास मुडुपाची आठवण होऊन तें पुढें ठेवण्याकरितां आपल्या हातीं द्यावें म्हणून तो स्त्रीस खुणावूं लागला. इतक्यांत प्रभु आपण होऊनच म्हणतात, "तुमचें पंधरा रुपयांचें मुडुप आम्हांस आधींच मिळालें आहे. आम्ही तें सर्व रुपये या कावडीवाल्यास दिले आहेत."

हा काय प्रकार आहे तें शीखास प्रथम समजलें नाहीं. पूजा करून प्रसाद ग्रहण केल्यानंतर त्याच्या बायकानें घडलेली सर्व कच्ची हकीकत सांगितल्यावर त्याला फार संतोष झाला. प्रभूंची कृपा आपल्यावर असल्यामुळेंच असें झालें असें समजून केलेल्या शहाणपणाबद्दल त्यानें आपल्या बायकोला फार धन्यवाद दिले.

# फकीर : : १३

एकदां प्रभु दरबारांत बसले असतां एक तेजःपुंज अंगकांतीचा फकीर प्रभूंकडे आला. त्यानें डोकीस हिरवा पटका बांधला असून अंगांत झुबा घातला होता. त्याच्या हातांत एक लहानसा लोटा होता. तो प्रभूंपुढें धरून "प्रभू, इतना लोटा भर दे" असा त्यानें सवाल केला. प्रभूंजवळ तात्यामहाराज बसले होते. ते कांहीं शास्त्रीमंडळीसमागमें वेदांताची चर्चा करीत होते. त्यांचें लक्ष्य या फकीराकडे गेलें नाहीं, म्हणून प्रभूंनीं त्यास हाक मारून तो फकीराच्या हातचा लोटा घेऊन रुपयांनीं भरून देण्यास सांगितलें. तात्यामहाराज वादविवादाच्या ऐन भरांत असल्यामुळें फकीराकडे न पाहतां त्याच्या हातचा लोटा घेऊन शेजारीं पडलेले रुपये त्यांत भरूं लागले. बोलण्याच्या नादांत रुपये भरण्याचें काम चालविलें होतें. किती वेळ झाला तरी लोटा भरेना. जवळचे सर्व रुपये संपून गेले तरी लोटा भरत नाहीं असें पाहून त्यांनीं तो प्रभूंच्या हातांत तसाच दिला आणि आपण बोलण्यांत रंगून गेले. फकीर निमूटपणें हा सर्व प्रकार पाहत उभा होता. प्रभूंनीं तो लोटा हातीं घेऊन त्यांत दोन खारका व थोडीं फुलें घालतांच लोटा भरून उचंबळूं लागला. प्रभूंनीं मधुर हास्य करून " साईं,ये लेव " असें म्हणून फकिरास तो लोटा दिला. फकिरानें त्यावरील फक्त दोन खारका व

फुलें तेवढीं काढून घेतलीं आणि " इतनाही मेरेकू बस है " असें बोलून लोटा प्रभूंपुढें पालथा केला. ओतलेल्या रुपयांचा ढीग लोटयाच्या आकाराच्या पांचपट दिसत होता. फकीर प्रभूंपुढें मस्तक लववून निघून गेला. तात्यामहाराज बोलण्यांतच दंग होते. झालेला प्रकार त्यांच्या लक्षांतच आला नाहीं. शेवटीं प्रभु म्हणतात, " तात्या, कोण माणसें कशीं येतात, काय येतात, इकडे न पाहतां, निरर्थक कोरडा काथ्याकूट काय करीत बसला आहेस ? त्या फकिराचा लोटा तुला भरतां येईना ! त्यानें परत ओतलेल्या रुपयांचा ढीग तरी पाहा निरखून ! "

हे शब्द ऐकतांच तात्यामहाराजांचें लक्ष त्या ढिगाकडे गेलें. तो पाहून ते चकित झाले व कोण तो फकीर याची चौकशी करूं लागले. फकिरास शोधण्याकरितां चोहोंकडे माणसें पाठविलीं; पण तो कोठेंच दृष्टीस पडला नाहीं. मुसलमान धर्मांतील बडे बडे अवलिया निरनिराळ्या रूपानें प्रभुदर्शनास येत असत असें आम्हास वरील गोष्ट सांगणारे रामकृष्णपंत तहसीलदार म्हणत असत. या गोष्टीप्रमाणेंच यापूर्वींच दिलेली शिखाच्या मुडुपाची गोष्ट आणि यापुढील दोन गोष्टी रामकृष्णपंतांकडूनच आम्हांस समजल्या आहेत.

## काशीयात्रेचा ब्राह्मण : : १४

एक गरीब ब्राह्मण आपल्या पत्नीसह काशीयात्रेस जाण्याच्या इच्छेनें माणिकनगरास आला. प्रभुदर्शन घेऊन उभयतांनीं प्रसाद मागितला. प्रभूंनीं एका शिष्यास जवळ बोलावून कोठींत कांहीं आहे का तें पाहून येण्यास सांगितलें. शिष्य कोठीखान्यांत जाऊन पाहतों तों त्याला तेथें कांहीं सांपडलें नाहीं. तसेंच परत येऊन त्यानें प्रभूंना कळविलें कीं, " कोठींतील सामान अगदीं संपून गेलें आहे; कांहीं सुद्धां शिल्लक नाहीं. " प्रभूंनीं पुनः पुनः विचारलें तरी कांहींच नाहीं असें उत्तर मिळालें. यावर दुसऱ्या शिष्याला हाक मारून कोठींत जें कांहीं हाताला येईल तें घेऊन येण्यास सांगितलें. या शिष्याला केवळ दहा-वीस उडदाचे दाणे मात्र तेथें सांपडले. तेवढे हातांत घेऊन तो प्रभूंकडे आला. प्रभूंनीं त्याच्या हातांतील ते उडीद घेऊन त्याची पुडी केली आणि फुलेंखारकांसमवेत ती पुडी त्या ब्राह्मणाच्या हातांत देऊन 'ही एका डबींत घालून हिची नित्य पूजा करीत जा' असें सांगितलें आणि काशीयात्रेस जाण्यास निरोप दिला. प्रभूंकडून आपल्यास निदान शेंपन्नास तरी रुपये मिळावेत असा त्या ब्राह्मणाचा तर्क होता. तो खोटा ठरल्यानें ब्राह्मण फार खट्टू झाला. त्याची बायको फार शहाणी होती. प्रभूंवर तिची अढळ निष्ठा असे. प्रभूंच्या हातच्या प्रसादानें आपलें कार्य सफल होणार असा पूर्ण

भरंवसा धरूनच जें संतोषानें मिळालें तेवढयावर तिचें समाधान झालें. हें जोडपें प्रसाद घेऊन काशीस जाण्याकरितां मार्गास लागलें. दोन कोस चालून गेल्यावर वाटेंत राजेश्वरास त्यांचा मुक्काम पडला. तेथें यांचें आदरातिथ्य उत्तम प्रकारें होऊन तेथील ग्रामस्थांनीं यांना दहा रुपये दिले. प्रभुप्रसादाचा हा प्रथम अनुभव पाहून त्या स्त्रीला आनंद झाला व तिनें प्रभुचिंतन अखंड चालू ठेविलें. पुढें दरमुक्कामीं या उभयतांना अकल्पित द्रव्यप्राप्ति होऊन सर्व यात्रा निर्विघ्नपणें यथासांग झाली. वाटेंत कोणत्याही प्रकारचा त्रास झाला नाहीं व द्रव्याची उणीवही कोठें भासली नाहीं. अशा आनंदानें सर्व यात्रा सफल झाल्यानंतर हें जोडपें परत आपल्या गांवाकडे आलें. गांवांत जाण्यापूर्वी प्रभूंचें दर्शन घ्यावें म्हणून उभयतां माणिकनगरीं आले. दर्शन घेऊन उभयतांनीं परम उल्हासानें प्रभूंची पूजा केली. आरति झाल्यावर प्रभु त्या ब्राह्मणाला हळूच म्हणाले, " आमची अमानत ठेव तुमच्याकडे आहे, तेवढी आतां परत द्या पाहूं. तुमचें काम तर झालेंच आहे. आतां ती ठेव घेऊन तुम्हास काय करावयाचें आहे ? " प्रभूंच्या बोलण्याचा आशय त्यांच्या लक्षांत येऊन त्यानें डबींतील ती पुडी काढून प्रभूंच्या हातांत परत दिली. प्रभूंनीं ती पुडी उघडली, त्या वेळीं त्या उडदाच्या दाण्याला मोड आले होते. प्रभूंनीं कांहीं वेळ त्यांकडे निरखून पाहिलें आणि ते मोड हातानें चुरून दूर फेकून दिले. एक दिवस मुक्काम

करून हें जोडपें आपल्या गांवीं परत जाण्याकरितां निघालें. वाटेंतील मुक्कामावर पूर्वींप्रमाणें त्यांची व्यवस्था न झाल्यानें उपासमार झाली. एवढी काशीयात्रा निर्वेधपणें झाली आणि आजच असा प्रसंग कां ओढवला याचें त्या स्त्रीला नवल वाटलें. तिनें नवऱ्याजवळ विचारपूस केली, तेव्हां पुडीचें वर्तमान तिला समजलें. ती पुडी म्हणजे प्रभूंचें सामर्थ्य होतें आणि त्या सामर्थ्याच्या आधारावरच आपली इच्छा फलद्रूप झाली हें तिच्या लक्षांत आलें.

## ऐनुद्दीन उस्ताद : : १५.

चिटगोप्यास ऐनुद्दीनसाहेब नांवाचा एक मुसलमान पंडित होता. त्या भागांतील अखबारनवीस लोकांवरचा हा दारोगा होता. प्रत्येक सरकारी कचेरींत पूर्वीच्या कालीं अखबारनवीस नेमले जात असत हें एका प्रकरणांत लिहिलेंच आहे. ऐनुद्दीन हा फारसी व अरबी विद्येंत अगदीं निष्णात होता. त्याला आपल्या विद्येची फारच घमेंड होती. चिटगोप्यास कांहीं ब्राह्मणांचीं मुलें याजकडे फारसीचा अभ्यास करण्याकरितां जात असत. त्याप्रमाणें रामकृष्णपंतही जात असत. हा वेळीं-अवेळीं ब्राह्मणवर्गाची निंदा करण्यास कमी करीत नसे. मुलांना त्या निंदेचें वाईट वाटे; पण त्याच्याशीं वादविवाद करण्याचें सामर्थ्य त्यांच्याजवळ नसल्यामुळें ते निमूटपणें त्याच्या तोंडचीं मुक्ताफळें ऐकून घेत. प्रभूंसंबंधीं गोष्ट निघाल्यास तो अशींच उणीं उत्तरें बोलत असे. मनुष्यानें मनुष्याची पूजा करणें, त्याला नमस्कार करणें, हें अत्यंत वाईट असून तसें करणारे सर्व लोक मूर्ख आहेत असें तो नेहमीं म्हणे. एकदां रामकृष्णपंत आपले वडील व चुलते यांसमागमें प्रभुदर्शनास निघाले असतां ऐनुद्दीनही तुमचा प्रभु कसला आहे तो पाहतों असें म्हणून त्यांच्याबरोबर माणिकनगरास आला. प्रभूंजवळ जातांच त्याच्या चेहऱ्यांत पालट झाल्याचें दिसून आलें. त्याच्या समक्ष शेंकडों लोकांनीं

प्रभूंची पूजा केली, साष्टांग नमस्कार घातले. या प्रकाराबद्दल प्रभूंशीं चार गोष्टी बोलाव्यात असें आपल्या मनांत असल्याचें त्यानें बोलून दाखविलें. माणसानें माणसास नमस्कार करणें म्हणजे परमेश्वराविरुद्ध केलेला भयंकर गुन्हा होय, असें म्हणून त्याला आधारभूत असें कुराणांतील एक वाक्यही त्यानें म्हणून दाखविलें. प्रभु त्याच्या ह्या अगाध ज्ञानाबद्दल त्याची तारीफ करूं लागले, तेव्हां तो गर्वानें फारच फुगून गेला व भोंवतालच्या मंडळींकडे ताठ्यानें पाहूं लागला. त्याच्याशीं बोलतां बोलतां प्रभूंनीं त्याच्या वाक्याला विरोधक अशीं सातआठ वाक्यें, कुराणांतीलच म्हणून दाखविलीं. आपल्या पवित्र ग्रंथाचें इतकें सूक्ष्म ज्ञान प्रभूंना आहे हें पाहून तो थक्क झाला व त्याची घमेंड पार जिरून गेली. प्रभूंपुढें ब्र काढण्याचेंही सामर्थ्य त्याला राहिलें नाहीं. प्रभूंच्या मानानें रुपयांतील एक आणा देखील आपलें ज्ञान नाहीं हें त्यानें कबूल केलें. अजून आपण ज्ञानाच्या दरवाजातच आहों, आपला आंत शिरकाव झाला नाहीं; प्रभु तर सर्वज्ञच आहेत, त्यांच्याशीं वादविवाद करण्याचा मूर्खपणा आपण उगीच केला असा पश्चात्ताप होऊन निरभिमानपणें त्यानें प्रभूंचे पाय धरले. आजपर्यंत आपण उन्मत्तपणानें भलभलत्या गोष्टी बोलून प्रभूंचा मोठा अपराध केला आहे त्याची क्षमा असावी, अशी तो विनवणी करूं लागला. प्रभूंनीं गोड शब्दांनीं त्याचें समाधान केलें व खऱ्या धर्माचें रहस्य त्याला समजावून सांगितलें. तेव्हांपासून

ऐनुद्दीनच्या वर्तनांत फरक पडून हिंदुलोकांचा द्वेष त्यानें सोडून दिला.

" दुनियामें एक परभू सच है; बाकी सब झूट है" असें तो पुढें नेहमीं म्हणत असे. ऐनुद्दीनच्या स्वभावांतील व वर्तनांतील हें स्थित्यंतर पाहून रामकृष्णपंत व त्यांचे वडील यांना आनंद झाला. त्या प्रसंगानंतर ऐनुद्दीनसाहेब प्रभूंचा परमभक्त बनला आणि हिंदुधर्माच्या निंदेचा शब्द त्याच्या मुखांतून पुढें कधींही निघला नाहीं.

असो. प्रभूलीलांबरांतील या तारका आपण कितीही कालपर्यंत मोजीत बसलों, तरी त्यांचा अंत लागणार नाहीं.

" न विममे पार्थिवानि रजांसि "

तेव्हां आतां पुढील चरित्रभागाकडे वळावें हें बरें.



# निरनिराळे उत्सव

## दत्तजयंति :: १

माणिकनगरची वसाहत कायम झाल्यानंतर वेळोवेळीं जसजसे उत्सवाचे प्रसंग येत गेले, तसतसे ते साजरे करण्याचें काम मोठ्या आस्थेनें व उल्हासानें होऊं लागलें. वर्षातून येणाऱ्या सर्व सणाच्या प्रसंगीं त्या त्या सणाला अनुसरून दरबारसमारंभ होऊं लागले. सर्व जयंत्या येथें साजऱ्या होऊं लागल्या. त्यांत रामनवमीचा जन्मोत्सव मोठ्या थाटानें होऊं लागला, याचें कारण तो दिवस प्रभूंच्या गर्भसंभवाचा होता हें होय. या दिवशीं प्रभु रामरूपानें नटत असत. अद्यापपावेतों हा जन्मोत्सव येथें महत्त्वाचा समजला जात असून शेंकडों भाविक जन याप्रसंगीं श्रीजींची पूजा करून नजरनजराणे करीत असतात. गोकुळअष्टमीस श्रीकृष्णजन्महि तशाच थाटानें होत असतो. गणेशचतुर्थीच्या दिवशीं गणपतीचें आराधन होऊन गणेशोत्सव अनंतचतुर्दशीपर्यंत चालत राहतो. महाशिवरात्र यथायोग्य प्रमाणांत साजरी केली जाते. सारांश,

वर्षांतील सर्व सणांप्रमाणेंच सर्व जन्मोत्सवप्रसंग यथोचित समारंभानें साजरे होत असतात. हा परिपाठ पूर्वींपासून चालत आला आहे. त्यांत कसलाही खंड पडला नाहीं. उलट पूर्वींपेक्षांही कांहीं समारंभ अपूर्व थाटानें अद्यापही होत असलेले आढळून येतील.

सर्व वार्षिक उत्सवांत "दत्तजयंति" हा मुख्य उत्सव होय. तो फार मोठ्या प्रमाणांत होत असे. त्याला अनुसरून हल्लींसुद्धां हा उत्सव विस्तृत रीतीनें साजरा केला जातो. दत्तजयंतीच्या उत्सवाचें वर्णन रामचंद्रबोवा सोलापूरकर यांनीं दिलें आहे. रामचंद्रबोवा हे प्रभुशिष्यगणांत दाखल झाले होते व त्यांनीं कांहीं उत्सवसमारंभ स्वतः डोळ्यांनीं पाहिले असल्यामुळें त्यांच्या वर्णनांत स्वारस्य असून सत्यांशही आहे. ते स्वतः दत्तजयंत्युत्सव दरवर्षीं करणारे होते. प्रभूंनींही त्यांच्याकडून त्यांच्या नियमाप्रमाणें याप्रीत्यर्थ नवरात्रउत्सव सुरू करून त्यांच्या हातून ब्राह्मणभोजनादि सर्व कार्यभाग आपल्या खर्चानें करविला, असें त्यांनीं लिहिलें आहे. या उत्सवासंबंधाची हकीकत त्यांच्याच शब्दांत दिल्यास वाचकांना बोधप्रद होणारी असल्यामुळें आम्ही त्यांच्या पुस्तकांतील उतारा देत आहों.

"प्रभूंच्या घरीं दत्तजयंतीचा समारंभ एकच दिवस. पौर्णिमेच्या दिवशीं मोठा भंडारा व्हावयाचा. सुमारें तीसचाळीस हजार पात्र भोजनाला त्या दिवशीं होत असे, आणि सर्वांना पात्रीं रुपरुपयाप्रमाणें दक्षिणा मिळावयाची, असा थाट

असं; परंतु असा थाट एकच दिवस होत असे आणि आमचा उत्सव मार्गशीर्ष शु॥ ७ पासून पुढें दहा दिवस व्हावयाचा. रोज अभिषेक अकरा ब्राह्मणांचा, गुरुचरित्राचें पारायण, ब्राह्मणभोजन, कथाकीर्तन वगैरे व्हावयाचें. परंतु या वर्षी आम्ही प्रभूंच्या स्वाधीन झाल्यामुळें आमची तयारी कांहींच नव्हती आणि दिवस तर उद्यांवर येऊन ठेपला. काळजी उत्पन्न झाली. इतक्यांत प्रभूंनीं मला हाक मारून जवळ नेलें. आणि बापाचार्यास व दयाळदास कारभाऱ्यास मजसमक्ष हाक मारून आज्ञा केली कीं, उद्यांपासून नासिककराच्या घरीं दत्तोत्सव आहे, त्यास रोज अकरा ब्राह्मण अभिषेकास, एक गुरुचरित्राचे पारायणास आणि एक तुळसी वाहण्यास अशा तेरा ब्राह्मणांची नेमणूक करून देऊन रोज तीनशें पानांचा पुरणवरणाचा सरंजाम, नऊ–दहा दिवसांचा एकदम यांच्या बिऱ्हाडीं नेऊन कोठी लावून द्यावी. लागतील तीं भांडींकुंडी व चीजवस्त देऊन श्रीदत्तगादीजवळ आपल्या देवांचा देव्हारा मांडण्यास सुशोभित जागा करून द्यावी. अशी आज्ञा सर्वांना देऊन आपण कारभाऱ्याकडून तीनशें रुपये रोख आणवून माझ्या पदरांत टाकविले आणि या रुपयांत दक्षिणा वगैरे सर्व वरचा किरकोळ खर्च करावा म्हणून आज्ञा दिली. सारांश, चार घटकेंत आमच्या उत्सवाची संपूर्ण मिसल प्रभुकृपेनें यथास्थित यथासांग लागून गेली. आम्ही मुखावाटे अक्षरही न काढतां पूर्वी प्रथमभेट चार महिन्यांखालीं झाली

होती व त्या वेळीं एकांतांत आम्ही आपली सर्व हकीकत सांगितली होती, तितकीच गोष्ट महाराजांनीं ध्यानांत ठेवून उद्यां उत्सवाला आरंभ होणार हें जाणून पूर्वदिवशीं वर सांगितल्याप्रमाणें ही तजवीज लावून दिली तेव्हां यावरून प्रभूंचा दूरदर्शीपणा आणि स्मरणशक्ति व एक वेळ ज्याला आपला म्हणून आश्रय दिला त्याचे कार्यपटुत्वाचा अभिमान किती होता, हें या उदाहरणावरून व्यक्त होत आहे. असा नऊ दहा दिवसपर्यंत दत्तउत्सवाचा थाट फारच मजेचा झाला. जेथें साक्षात् प्रभूंची मदत मिळाली, तेथें कमी काय पडावयाचें आहे ? नऊ दिवस कथाकीर्तनें, गवयांचीं गाणीं, नायकिणींचे नाच, मंत्रजागराचा वेदघोष, ब्राह्मणभोजनें वगैरे आनंदीआनंद होऊन गेला. जन्माच्या दिवशीं फारच मौज झाली. हजारों लोकांची दाटी होऊन गेली. प्रभुमहाराज स्वतः येऊन कीर्तनांत गादीवर विराजमान झाले होते. मग तो थाट काय वर्णन करावा ?"

" याप्रमाणें दत्ताचा जन्मकाळ झाल्यावर दुसऱ्या दिवशीं मोठा भंडारा आमच्याकडे व्हावयाचा. परंतु त्या दिवशीं आमच्याकडे कांहींच सरंजाम नाहीं व स्वयंपाकही नाहीं. तेव्हां मला मोठा अचंबा वाटला कीं, नऊ दिवसपर्यंत रोज तीनचारशें पात्रांचा महाराजांनीं बंदोबस्त ठेविला आणि आज शेवटचा भंडाऱ्याचा दिवस असून आज आमच्याकडे सर्वच शून्य कसें ? अशा विचारांत व काळजींत मी होतों. इतक्यांत

प्रभूंच्या तिकडे मोठी पंगत बसण्याची तयारी झाली. सुमारें पंचवीस हजार ब्राह्मण जमले होते. आणि भंडारखान्याकडे दीडशें आचारी स्वयंपाक करीत होते. त्याचप्रमाणें दोनशें वाढपी पात्रें मांडून, वाढप वाढण्याच्या गर्दींत गुंतले होते. पोळ्यांचे ढीग तर खरोखरच पर्वतप्राय पडून गेले होते ! चोहोंकडे रांगोळ्यांच्या ओळी काढून त्यांमधून पात्रें घातलीं होतीं; त्यावरून चटण्या, कोशिंबिरी, भाज्या, पोळ्या, वडे व आमटी वाढून तयारीची गर्दी उडून राहिली होती. जो–तो आपापल्या धांदलींत; कोणाचें बोलणें त्या वेळीं कोण ऐकतो ? कोणी सोंवळीं नेसून पात्रें धरधरून बसले, कोणी सोंवळे होण्याच्या बेतांत, कोणी अद्याप ओंवळेच होते, कोणी आपले तांबे, पंचपात्रीं, गबाळे शोधीत होते. कोणी आपल्या मुलाला राम्या, गोम्या, चिमण्या अशा हाका मारून पात्रांवर बसण्यासाठीं मोठ्यानें रागें भरत आहेत, पुरुषाप्रमाणें पलीकडे बाया मंडळीच्या पंक्तींतही धांदल उडाली होती. लेंकुरवाळ्या बायांचीं मुलें रडून मोठा किलकिलाट होऊन गेला होता. कोणी बाया आपल्या सुना, लेकी, बहिणी ह्यांना रमा, उमा, भीमा म्हणून हाका मारीत आहेत, अशी भोजनसमारंभाची एकच गर्दी उडून राहिली होती. हा सर्व प्रकार पाहत मी आपला उगीच तेथें वेड्यासारखा स्तब्ध होऊन चित्रवत् उभा राहिलो होतों. तों इतक्यांत तिकडे गादीजवळ नैवेद्य-वैश्वदेवाची तयारी होऊन आरतीची वेळ आली. म्हणून उपाध्येबोवा घाबरे घाबरे

प्रभूंच्या आज्ञेवरून सोंवळ्यानें पळीपंचपात्री हातीं घेऊन मला बोलावूं आले आणि मला जलदीनें घेऊन गेले. तेव्हां प्रभूंनीं माझ्यासमक्ष उपाध्येबोवास आज्ञा केली कीं, आतां नैवेद्य-वैश्वदेव आज नासिककरांच्या हातानें करवून उदकही त्यांच्याच हातानें सोडवावें. तेव्हां मंडळीला मोठें आश्चर्य वाटलें व माझे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. पुढें नैवेद्य-वैश्वदेव होऊन सर्व वाढणें झाल्याबरोबर इकडे मोठ्या गजरानें गादीची व प्रभूंची आरति माझ्याच हातानें बाजा, गाजा, झांजा, टाळ, मृदंग, शंख, नगारखाने इत्यादि वाद्यगजरानें होऊन, शेवटीं पंचवीस हजार ब्राह्मणपात्रांचें उदकही प्रभूंनीं माझ्याच हातानें सोडविलें. तेव्हां ब्राह्मण भोजनास बसले. असा मोठा ब्राह्मणभोजनाचा समारंभ पाहून मला फार धन्यता वाटली व भारतांतील धर्मराजाच्या घरच्या राजसूययज्ञाची आठवण झाली. खरोखर असे समारंभ नुसत्या डोळ्यांनीं पाहणाराचें देखील मोठें भाग्य समजलें पाहिजे. अहाहा! प्रभूंची लीला परम अगाध होय. इतक्या पात्रांना पात्रीं रुपया, पोटांतील गर्भासुद्धां दक्षिणा दिली."

माणिक नगरांतील सर्वांत मोठा उत्सव म्हणजे हाच होय. मुसलमान धर्माचे लोकही यांत भाग घेत असत. सर्वधर्मीयांना हा उत्सव आपलासा वाटे. विठ्ठलराव तालुकदार व त्यांच्या हाताखालील सर्व अंमलदार या उत्सवप्रसंगीं हजर राहून स्वतः अंगमेहनत करीत असत. पंक्तींतील सर्व प्रकारची

व्यवस्था या लोकांकडेच असे. हजारों लोकांचें अन्न शिजेल इतकीं मोठमोठीं भांडीं भंडारखान्यांत तयार करून ठेविलीं होतीं. सर्व सरंजामाची तयारी उत्सवाच्या अगोदरपासून करून ठेवीत असत. उत्सवाला येणाऱ्याला कशाची वाण पडूं नये अशी तजवीज राखिली जात असे. लहान लहान मुलांकरितां दुधाची व्यवस्था करून प्रत्येक ठिकाणीं हिंडून मुलांचा शोध करून दूध पुरवीत असत. या उत्सवाची परंपरा आजपर्यंत अखंड चालू आहे. सांप्रतकाळीं हा महोत्सव पांच दिवसांचा समजला जात आहे. परंतु तो कमींत कमी एक पंधरवडा चालू असतो, असें म्हणावयास हरकत नाहीं. मार्गशीर्ष शुद्ध एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत हल्लीं हा उत्सव कार्यक्रमपत्रिकेप्रमाणें चालतो व पुढेंही कांहीं ना कांहीं प्रसंगानें तो वाढत वाढत पंधरा–वीस दिवस टिकतो. पूर्वीं दत्तजयंतीचे उत्सव कशा प्रकारचे होत असावेत याची कल्पना हल्लींचे उत्सव पाहिल्यानें सहज होणारी आहे. नाना प्रकारचा लोकसमुदाय या उत्सवाप्रीत्यर्थ जमून याला एखाद्या प्रचंड प्रदर्शनाचें स्वरूप प्राप्त होत असतें. आसेतुहिमाचल प्रदेशांत वास करणाऱ्या अनेकविध गुणिजनांचा समुदाय दरवर्षी या एकाच ठिकाणीं पाहावयास सांपडतो. विद्वान् व गुणवान् लोकांची त्यांच्या त्यांच्या विद्वत्तेप्रमाणें व गुणांप्रमाणें योग्य अशी संभावना ह्या ठिकाणीं होत असते. पूर्वींच्या काळींही या उत्सवप्रसंगीं चोहों मुलखांतले लोक एकत्र जमत असत. अनेक भाषा बोलणारे, अनेक प्रकारची

विद्या संपादन केलेले व अनेक गुणांचें आगर बनलेले असे असंख्य लोक एके ठिकाणीं जमून प्रभूंची मनोभावें सेवा करीत असतांना पाहून कोणत्या सहृदय मनुष्याला कौतुक वाटणार नाहीं ? आसपासच्या भागांतील बहुतेक सर्व मोठे अधिकारी या उत्सवाला हजर राहून यथाशक्ति सहाय्य करीत असतात. या मंगलप्रद उत्सवाचें वर्णन वाचण्याऐवजीं तो एकवार डोळ्यांनीं पाहून त्यांतील आनंदाची लूट करावी अशी आम्ही आमच्या वाचकांना प्रेमाची सूचना करितों.

# जंगमांचा मेळा : : २

श्रीदत्तजयंतीच्या उत्सवाप्रमाणें दुसरा महत्त्वाचा उत्सव या संस्थानांत कोणताही नाहीं हें वर आलेंच आहे. इतर अनेक प्रासंगिक समारंभ किरकोळ असले, तरी त्या त्या कालीं ते साजरे होत असत, असें यापूर्वीं आम्हीं कळविलेंच आहे. अशा समारंभांपैकीं जंगमाचा मेळा माणिकनगरांत जमून एक समारंभ होत असे. संक्रांतीनंतर हा मेळा माणिकनगरांत येत असे. हुमनाबादेंत संक्रांतीच्या सुमारास रथोत्सव होत असतो, तसा तो पूर्वींही होत असे. 'तेर व अग्गी' हें त्या उत्सवाचें प्रचलित नांव आहे. तेर म्हणजे रथ व अग्गी म्हणजे अग्नि. जंगमलोकांचा मुख्य, अग्नीच्या खाईंतून आधीं जात असे व त्याच्या पाठीमागून शेंकडों लोक विस्तव तुडवून जात. या तेर व अग्गीनंतर बहुधा सर्व जंगम प्रसादाची अपेक्षा करीत. या जंगमांचे विविध व विचित्र नाच व अनेक प्रकारचे संवाद व पदें इत्यादि प्रकार प्रेक्षणीय असतात. अद्यापपावेतों माणिकनगरांत हे प्रकार दृष्टीस पडत असतात. या प्रसंगीं हजारों जंगम लोक येथें जमत. माणिकनगरच्या आसपासची जागा एके काळीं बसवेश्वराच्या अनुयायांनीं व्यापली होती. आणि ठिकठिकाणीं त्यांनीं आपले मठही स्थापिले होते. अद्यापपावेतों या मठाचे अवशेष पुष्कळ पाहावयास मिळतात व कांहीं ठिकाणीं मठपतिही

आपलें स्थान संभाळून राहिलेले दिसतात. आतांच्यापेक्षां प्रभुकालीन जंगम जास्त भाविक होते व त्यांची श्रद्धाही प्रभूंच्या ठायीं अवर्णनीय होती. हे मेळे पाहण्यांत प्रभूंना फार संतोष होत असे व अशा संतोषाच्या भरांत जंगम समाजाला भरपूर देणगी मिळत असे. जंगमांच्या मेळ्याप्रमाणेंच वेळोवेळीं गोसावी-वैराग्यांचे मेळेही नेहमीं येत. पण त्यांची वेळ व महिना जंगमाप्रमाणें ठरींव नसे. कोणत्याही धर्माचा किंवा समाजाचा मेळा प्रभुसंन्निध आला, तरी त्याची योग्य संभावना होत असे.

## मोहरम व ग्यारवी : : ३

हिंदुधर्मांतील अनेक पोटभेदांचे मेळे किंवा समाज ज्याप्रमाणें माणिकनगरीं येत असत, त्याचप्रमाणें मुसलमान लोकांचाही भरणा प्रभूंसन्निध येत असे. त्यांचा मुख्य सण किंवा उत्सव मोहरम हा होय. या निमित्तानें त्यांचे मेळे माणिकनगरीं येत असतच; पण त्यापेक्षांही ग्यारवीच्या निमित्तानें येणाऱ्या फकीर लोकांचा जमाव फार मोठा असे. ग्यारवी म्हणजे मुसलमानी 'रज्जव' महिन्याची अकरावी तारीख; त्या धर्मांतील एका विशिष्ट संप्रदायाची ही फार महत्त्वाची तारीख आहे. आमच्या धर्मांत अवधूताचें वर्णन केलें आहे, तशाच प्रकारच्या स्थितींत वावरत असलेल्या " महबूब सुबहानी " नांवाच्या एका प्रसिद्ध सत्पुरुषाची ही पुण्यतिथि म्हणावयास हरकत नाहीं. प्रभूंना मुसलमान लोकांनीं त्या महबूब सुभानीचा अवतार मानिलें होतें. बेदरमधील मुसलमान लोकांनीं प्रभूंना "पीरान्पीर दस्तगीर" म्हटल्याचें वृत्त यापूर्वीं आलेंच आहे. ज्ञानप्रधान संप्रदायाचे अग्रणी महबूब सुभानी मानिले जात असून दत्ताप्रमाणें ते स्मर्तृगामी आहेत अशी मुसलमान 'सुफी' लोकांची भावना आहे. हिंदुलोक प्रभूंना दत्ताचा अवतार मानीत, तर मुसलमान लोक त्यांना महबूब सुभानीचा अवतार मानीत. यामुळें या ग्यारवीच्या प्रसंगीं प्रभुदर्शनार्थ हजारों मुसलमान लोक येथें जमत असत. हे फकीर बहुधा

याचकवृत्तीचे असल्यामुळें त्यांचा संतोष होईल इतकी देणगी प्रभूंकडून त्यांना मिळत असे. ही खैरात ग्यारवीच्या आधीं एक दोन दिवस होत असे. या प्रसंगीं प्रभु दरबारांत गादीवर बसत व क्रमाक्रमानें आंत येणाऱ्या फकीरास गादीखालीं हात घालून मुठींत येईल त्याची खैरात होत असे. हजारों फकीरांची गर्दी होऊन तोबा झडत असे. पण प्रभूंचा खैरातीचा हात एकसारखा चालू असे. प्रत्येक फ़कीराच्या अपेक्षेप्रमाणें पुरेसें द्रव्य मुठींतून येत असल्यामुळें कोणीही नाखूष होत नसत. अशी ही ग्यारवीची खैरात कधीं कधीं बारा बारा तास अखंड चालत असे. कांहीं प्रसंगीं यापेक्षांही अधिक वेळ लागल्याचें इतर चरित्रकारांनीं लिहून ठेविलें आहे.

महबूब सुभानीची ग्यारवी करण्याकरितां प्रभूंना दुसऱ्या एका सत्पुरुषाची प्रेरणा झाली व तो सत्पुरुष महंमदाला पूज्य मानणाऱ्या 'कादरिया' पंथाचा होता, असें विधान महाराजा सर किसनप्रसाद बहादूर यांनीं आपल्या एका ग्रंथांत केलें आहे.: " एका पवित्र श्रेष्ठ पुरुषानें ( जो महंमदाचा अनुयायी होता ) त्यांच्यावर ( प्रभूंवर ) पूर्ण कृपा करून स्थितप्रज्ञ केलें आणि आपल्या हातानें फकिरीचा मुकुट प्रभूंवर ठेविला. आणि दृश्य प्रापंचिक भासाचा बदल आत्मचिंतनपर करून त्यांचें मन विश्वव्यापी व पारदर्शक केलें. हे श्रेष्ठ पुरुष कादरिया पंथाची पीठिका चालवीत होते. त्यांनीं आपल्या

होतकरू व सन्मार्गदर्शी शिष्याला (माणिकप्रभूला) उपदेश केला कीं, " उत्तम माल कोणत्याहीं दुकानांतून घ्यावा ( मतानेक हरदुकांके बाशद ) आणि हजरत महबूब सुभानीच्या कबरची सेवा हेंच आपलें भाग्य समजावें व ग्यारवी करीत जावी."

सर महाराजा बहादुरांना ही अद्भुत माहिती कशी मिळाली याचें आम्हांस नवल वाटतें. त्यांचें हें विधान स्वधर्मग्रंथांच्या खोल अभ्यासावर उभारलेलें दिसत नाहीं. मुसलमानी धर्माचें परिशीलन जसें त्यांनीं केलें, तसें आपल्या आर्य संस्कृतीचें व आर्य धर्मग्रंथांचें केलें असतें, तर वरील विधान त्यांच्या कडून झालें नसतें. फारसी व अरबी या भाषांचा परिचय त्यांना जसा आहे, तसा तो संस्कृत किंवा तद्भव भाषांचा असता, तर आपल्या ग्रंथभांडाराचें महत्त्व त्यांना कळून आलें असतें. 'उत्तम माल कोणत्याही दुकानांतून घ्यावा' या नियमानें ज्ञान मिळविण्याचें साधन म्हणून तरी त्यांनीं प्राचीन ग्रंथभांडाराचें अवलोकन केलें असतें, तर बरें होतें. फार प्राचीन कालापासून आपल्या पवित्र ग्रंथांत जें विश्वव्यापी ज्ञानभांडार सांठविलें आहे, त्याचा क्षणभर विचार केल्यास प्रभूंचा संप्रदाय अतिशय जुना आहे, अशी सहज खात्री पटेल. प्रभूंचें चरित्र अगदीं बालवयापासून तों समाधि-कालपर्यंत सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केल्यास ते मूर्तिमंत ज्ञानाचें परमपवित्र व श्रेष्ठ स्थान होते यांत संशय राहत नाहीं.

हिंदु, मुसलमान, शीख, जैन, लिंगायत, बौद्ध, ख्रिस्ती इत्यादि अनेक धर्मपंथांतील सर्वोत्तम भागांचें ग्रहण करून आपल्या अनुयायांनीं श्रेष्ठतम स्थान स्वाधीन करावें या हेतूनेंच त्यांनीं 'सकलमतस्थापित' संप्रदायाची उभारणी केली. 'उत्तम माल कोणत्याही दुकानांतून घ्यावा' हें तत्त्व भागवतांत देखील अत्युत्तम रीतीनें कथन केलें आहे. किंबहुना अवधूताचें हें ब्रीदवाक्यच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. भागवतग्रंथ निर्माण झाला, त्या वेळीं आपल्याइकडे मुसलमानी धर्माचें अस्तित्व नसावें. 'उत्तम माल कोणत्याही दुकानांतून घ्यावा' यापेक्षांही व्यापक तत्त्व "अणुभ्यश्च महद्भ्यश्च सर्वेभ्यः कुशलो नरः। सर्वतो सारमादद्यात् पुष्पेभ्य इव षट्पदः॥ १॥" या भागवतांतील श्लोकांत ग्रथित केलें आहे व हें तत्त्व प्रत्यक्ष अवधूताच्या मुखांतून आलें असें भागवत म्हणतें.

असो; मुसलमानी धर्माच्या अभिमानी व्यक्तीकडून महाराजा बहादुरांना ही विकृत माहिती मिळाली असावी असें आमचें अनुमान आहे. त्यांनीं लिहिलेलें पुस्तक प्रसिद्ध होऊन बरींच वर्षें झालीं आहेत. प्रभुचरित्राचें साद्यंत अवलोकन केल्यानंतर आपली विधानें निर्बल आहेत अशी त्यांची खातरी होऊन या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं योग्य तो फेरफार ते अवश्य करतील, अशी आम्ही आशा करितों. असो.

प्रभूंना उदारमतवादी मुसलमान लोक महबूब सुबहानी समजतात. मुसलमानी समाजाला त्यांच्या धर्माप्रमाणें प्रभुआराधन करण्यास सुलभ जावें म्हणून प्रभूंनीं माणिकनगरच्या उत्तरेस छल्ला बांधला आहे हें आम्हीं पूर्वींच कळविलें आहे. या छल्ल्यांत प्रथम प्रभूंनीं आपल्या डोकीवरील ताज ठेवून त्यावर चबुतरा उभारला आहे हें सर्वविश्रुत आहे. मुसलमानी धर्मास अनुसरून होणारे सर्व उत्सव व समारंभ या छल्ल्यावर होत असतात. मुसलमानांकरितां प्रभु मुसलमान बनले यांत त्यांची व्यापक दृष्टिच प्रत्ययास येत नाहीं काय ?





# शिष्यवृंद

## बापाचार्य : : १

प्रभूंच्या शिष्यगणाचा समुदाय फारच मोठा होता. त्या सर्वांचा येथें नामनिर्देश करणें शक्य नाहीं. करितां त्यांतील प्रमुख शिष्यांचाच उल्लेख आम्ही करणार आहों. यापूर्वीच्या प्रकरणांत वेळोवेळीं या शिष्यगणांतील बहुतेकांचा संबंध आला आहे; त्यांच्याशिवाय इतरांसंबंधानें उपलब्ध झालेली विशेष माहिती आम्ही या प्रकरणांत देणार आहों. या सर्वांत संस्थानच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची कामगिरी केलेले शिष्य म्हणजे बापाचार्य हे होत. हे मूळचे कल्याणचे राहणारे असून यांचें घराणें नामांकित विद्वान् गणलें जात होतें. कल्याणचे आबाचार्य नांवाचे अत्यंत विद्वान् व सत्वशील ब्राह्मण त्या कालीं सर्व लोकांना पूज्य वाटत होते. आबाचार्यांची प्रभूंवर अत्यंत निष्ठा असून प्रभूंवर ते पुत्रवत् प्रेम करीत असत. प्रभूंच्या अंगीं असलेलें लोकोत्तर सामर्थ्य त्यांनीं जाणिलें होतें. आपली उपास्य देवता श्रीव्यंकटेश प्रभूंच्या ठायीं मूर्तिमंत वास करीत असल्याचा अनुभव त्यांना आला होता. म्हणून प्रभूंना समवयस्क असलेला आपला

एकुलता एक मुलगा बापाचार्य यांस त्यांनीं प्रभूंजवळ सदैव राहण्यास आज्ञा दिली होती; त्याप्रमाणें बापाचार्य हे प्रभूंसन्निध राहिले होते. बापाचार्यांनीं दोन शास्त्रांचें अध्ययन करून त्यांत प्रावीण्य मिळविलें होतें. सदैव प्रभूंसन्निध राहून अत्यंत निःस्पृहपणानें ते वागत असल्यामुळें त्यांचा दरारा सर्व लोकांवर होता. दादामहाराज व नंतर तात्यासाहेबमहाराज यांनीं देह ठेविल्यावर संस्थानचा सर्व कारभार बापाचार्य यांजकडेच आला व तो त्यांनीं अत्यंत दक्षतेनें व चातुर्यानें चालवून मोठा लौकिक मिळविला.

प्रभुसान्निध्यांत राहणाऱ्या अत्यंत विश्वासपात्र शिष्यांमध्यें ते अग्रणी होते. प्रभूसमाधीनंतर अत्यंत बिकट परिस्थितींतून संस्थानचें तारूं मोठ्या कौशल्यानें हाकारून त्यांनीं संस्थानची व्यवस्था पूर्ववत् उत्तम प्रतीची राखिली यांत मुळींच शंका नाहीं. हा कथाभाग पुढें यथाप्रसंग येणार आहेच. त्यांच्याप्रमाणें त्यांचा पुत्रही अत्यंत विद्वान् होऊन गेला. बापाचार्य यांनीं "माणिकप्रभाकर" नांवाचा संस्कृत ग्रंथ लिहून त्यांत प्रभुचरित्र ग्रथित केलें आहे. त्यांनीं आपली कन्या, विद्यमान श्रीमार्तांड माणिकप्रभूंस दिल्यानें ते साहजिकच प्रभुवंशाच्या आप्तवर्गांत दाखल होऊन गेले.

## नारायण दीक्षित : : २

बापाचार्याप्रमाणेंच सदैव प्रभुसान्निध्यांत वास करणारे नारायण दीक्षित हे एक होते. हळीखेडच्या भालचंद्र दीक्षितांचे हे चिरंजीव. भालचंद्र दीक्षितासंबंधीं यामागें सर्व हकीकत आली आहेच. प्रभुप्रेमांत आकर्षिल्यामुळें प्रभुसान्निध्याची गोडी यांना लागली होती व वडिलांनींही त्यांना प्रभुसेवा करण्यास निक्षून आज्ञा केली होती. नाराप्पा दीक्षित प्रभुसन्निध असतांना तिकडे भालचंद्र दीक्षितांचा अंतकाल ओढवला. त्या वेळीं त्यांना पुत्राची आठवण होण्यापूर्वी प्रभूंचें स्मरण झालें. प्रभूंनीं अंतर्ज्ञानानें हें जाणून नाराप्पास तावडतोड हळीखेडास जाण्याची आज्ञा दिली. प्रभुआज्ञेनुसार नाराप्पा हळीखेडास जाऊन वडिलांस भेटले. पण वडिलांनीं " प्रभु कोठें आहेत ? " असा प्रश्न केला, तेव्हां नाराप्पा बुचकळ्यांत पडले. " प्रभूस सोडून कसा आलास ? " असें विचारून दीक्षितांनीं प्रभूंचा धांवा केला. तेव्हां अग्निकुंडांतून अग्निज्वालेबरोबर प्रभु बाहेर येऊन दीक्षितास भेटले असें एका चरित्रकारानें लिहिलें आहे. अंतकालीं प्रभूंची भेट होऊन दीक्षितांस समाधान झालें व त्यांनीं प्रणवोच्चार करून देह विसर्जन केला. पुढें नारायण दीक्षित शेवटपर्यंत प्रभूजवळच राहिले होते. त्यांचे वडील बंधु यज्ञेश्वर दीक्षित यांच्या हातीं प्रभूंनीं यज्ञ करून त्या घराण्याच्या लौकिकांत व उत्कर्षांत

भर घातली हें आमच्या वाचकांस श्रुत आहेच. नारायण दीक्षित हे कर्मठ मार्गांतले होते. संस्थानच्या इतर कारभारांत त्यांनीं कधीं लक्ष घातलें नाहीं. तरी पण आपलें कर्मानुष्ठान यथायोग्य पाळून तद्द्वारा त्यांनीं प्रभुसेवा फारच उत्कृष्ट रीतीनें केली. अद्यापपावेतों येथील वृद्ध लोक त्यांचें नांव घेत आहेत.

# चिमण्या ब्रह्मचारी : : ३

प्रभूंच्या शिष्यवर्गांतील प्रथम शिष्य या नात्यानें चिमण्याची योग्यता मोठी आहे. अंबिलकुंडापासून प्रभुसहवासांत राहण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें शेवटपर्यंत त्यानें प्रभूंना सोडिलें नाहीं. कांहीं चरित्रकार चिमण्या हा कल्याणचाच राहणारा होता असें म्हणतात. हा घरचा अत्यंत दरिद्री होता. द्रव्याची इच्छा करून तो प्रथम प्रभूंजवळ गेला. पण त्याच्या प्रारब्धांत द्रव्यसंपादन नसल्यामुळें प्रभूंनीं मागितलेले मूठभर तीळ त्याला कोठेंही मिळाले नाहींत. नंतर प्रभूंनीं त्याची द्रव्यसंपादनाची हाव क्रमाक्रमानें कमी करून त्याला योग्य मार्गावर आणून सोडिलें. दत्ताची झोळी फिरविण्याचा मोठा मान प्रभूंनीं प्रथम त्यालाच दिला. माणिकनगरांत येण्यापूर्वींपासूनच झोळी त्याच्याकडे दिली होती. तें काम तो एकनिष्ठेनें करीत असे. प्रभूंशीं तो अत्यंत प्रेमळ व लडिवाळपणानें वागे. त्याच्या अंगांत बरेच दुर्गुण होते, तरी प्रभूंजवळ खरें खरें सांगूनटाकण्याचा एक मोठा सद्गुण त्याच्या ठायीं होता. प्रभु नेहमीं म्हणत, “ चिमण्या, तुझ्या अंगीं दुर्गुण आहेत; पण एक मोठा सद्गुण त्या सर्वांना मागें सारतो आहे. तूं खरें बोलतोस हाच तो मोठा सद्गुण होय. ” ब्रह्मचारी असूनही स्त्रीविषयक मोह त्याला अनावर होत असे व तशा प्रसंगींही प्रभूंजवळ सर्व सत्य सांगण्यास तो भीत नसे. एका चरित्रकारानें

म्हटलें आहे कीं, चिमण्याचा अंत झाल्यानंतर तो पिशाच्चयोनींत जाऊन संगमावरील झाडावर राहिला. पुढें कांहीं दिवसांनीं प्रभु संगमावर गेल्यावेळीं, प्रभुदर्शनानें तो मुक्त होऊन दिव्यलोकास गेला. प्रभुस्पर्श होतांच संगमावरील आम्रवृक्ष एकाएकीं जळाल्याचें पुष्कळांनीं पाहिलें आहे व शिवदूतांनीं मोठ्या सन्मानानें चिमण्याला विमानांतून प्रभूंकडे आणिलें असें तेथें असलेल्या एका विधर्मी भक्ताला दिसून आलें आणि त्यानें ही हकीकत सर्वांना कळविली असेंही म्हटलें आहे.

## गोपाळबुवा : : ४

गोपाळबुवा ब्रह्मचारी हा रेकुळगीचा रहिवासी. त्याचे वडील हे बक्कप्रभूचे पूर्ण भक्त होते. करकनळीस अरण्यांत बक्कप्रभु वास करून होते. लोक त्यांना शंकराचा अवतार मानीत असत. प्रभु हे त्याच बक्कप्रभूचा अवतार आहेत अशी गोपाळबुवाच्या वडिलांची दृढ भावना होती. प्रभु फिरत फिरत रेकुळगीस गोपाळबुवाच्या घरीं आले, त्या वेळीं त्याच्या वडिलांनीं बक्कप्रभु म्हणून त्यांची पूजा केली. बक्कप्रभूजवळ दोन विश्वासू कुत्रे होते; तेच आपल्या उदरीं आले आहेत अशी गोपाळबुवाच्या वडिलांची श्रद्धा होती. म्हणून प्रभूंनीं गोपाळास मजजवळ द्या असें म्हणतांच त्यांनीं मोठ्या आनंदानें त्यास प्रभूंच्या हवालीं केलें. गोपाळबुवा वर्णानें काळा भोर असून शरीरानें फारच धिप्पाड होता. प्रभूंजवळ आल्यावर त्यानें अत्यंत निष्ठापूर्वक प्रभूंची सेवा केली. आपल्या प्रणाचीही पर्वा न करितां तो प्रभुसेवेंत सदैव दक्ष असे. हा आमरण ब्रह्मचारी राहिला. त्याचे वडील बंधूचा वंश हल्लीं रेकुळगीस नांदत असून तो प्रभुभक्तिपरायण आहे.

## रामभाऊ लंगोटी : : ५

हा ब्रह्मचारी अष्टौप्रहर लंगोटी घालूनच वावरत असे, म्हणून याचें टोपण नांव लंगोटी असें पडलें होतें. हा प्रभुमहाराज माणिकनगरांत असतांनाच आला. प्रथम त्याचा ओढा तात्यामहाराजांकडे फार होता. याचा बहुतेक काल घरगुतीं व्यवसायांत जात असे. तात्यामहाराजांनंतर त्यांच्या उभय पुत्रांना संभाळण्याचें काम याच्याकडेच असे. याला दीर्घायुष्य लाभलें होतें, यामुळें याच्या तोंडून प्रभुचरित्रकथा श्रवण करण्याचा लाभ पुष्कळ लोकांना मिळाला. टोळ यांनीं लिहिलेलें प्रभुचरित्र याच्या माहितीवरूनच लिहिलें गेलें आहे. नरहरिकृत अमुद्रित व अपुरें चरित्रही याच्या सहाय्यानें तयार झालें आहे. घरांतील लहान लहान मुलांना याचा फार लळा असे. श्रीमार्तंड माणिक प्रभूंच्या चिरंजीव द्वयांना याच्याकडूनच लहानपणीं फार सहाय्य मिळालें. किंबहुना त्यांच्या बालवयांत सर्व बाजूंनीं यानेंच त्यांना सांभाळलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. घरांतील सर्व मुलांना 'लंगोटी रामा' हवासा होता. माणिकनगरांत आलेल्या गोसावी, बैरागी, अतिथिअभ्यागतांचा परामर्ष यानें घेत असावा व त्यांच्या गरजा शक्य तितक्या पुरवाव्या, असा त्याचा परिपाठ असे. प्रभुचरित्रांतील कित्येक कथा आम्हांसही याच्याकडूनच मिळाल्या आहेत. यानें आपलें उत्तर आयुष्य प्रभुवंशांतील मुलाबाळांचा संभाळ करून आणि प्रभुसेवा संपादन करून माणिकनगरांतच घालविलें आणि शेवटीं याच ठिकाणीं आपला पवित्र देह ठेविला.

## दयाळदास : : ६

दयाळदास हा एक श्रीमान् व्यापारी होता. मद्रासेस याचा मोठा व्यापार चाले. हा जातीचा भाटिया होता. भाटे लोकांच्या उपजत अंगस्वभावास अनुसरून मोठमोठे धाडसाचे व्यवहार करून त्यानें पुष्कळ द्रव्य संपादन केलें होतें. पुढें उपरति होऊन कांहीं काल तीर्थाटनांत घालविल्यावर प्रभूंचा लौकिक ऐकून हा प्रभुदर्शनार्थ माणिकनगरास आला. येथें आल्यानंतर प्रभूंची अगाध लीला पाहून तो विस्मित झाला. प्रभूंच्या ठायीं साक्षात् ईश्वर आहे अशी त्याची खातरी झाली. परंतु आपल्यास रामरूप दिसावें अशी त्यानें विनंति केली. प्रभूंनीं त्याला सांगितलें कीं "बाबा, रामाची भेट होणें फार कठीण आहे. त्याची भेट होण्यापूर्वी, आपल्या सर्वस्वावर पाणी सोडावें लागतें. तुझ्यासारख्या द्रव्याच्या मागें लागलेल्या मनुष्यानें या देवधर्माच्या मागें लागूं नये हेंच बरें! हा नाद फार वाईट आहे." इतक्यावरही त्याचा आग्रह पाहून प्रभूंनीं त्यास परत घरीं जाऊन आपल्या बायकोचा व मुलांचा विचार घेऊन येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें घरीं जाऊन आपल्या प्रपंचाची सर्व व्यवस्था केली आणि बायकोस घेऊन तो येथें येऊन राहिला. त्याचा निश्चय पाहून प्रभूंनीं त्याला रामरूपानें दर्शन देऊन पावन केलें. त्यानें संतुष्ट अंतःकरणानें प्रभुपूजन

केलें, त्या वेळीं प्रभूंच्या बैठकीखालीं सवा लक्ष रुपयांचा चौथरा केला होता असें म्हणतात. पुढें तो प्रभुसंस्थानांत कारभारी होऊन प्रभूंपुढें येणारें द्रव्य संभाळणारा खजिनदार बनला. आपल्या हिश्शास आलेलें सर्वस्व त्यानें प्रभुदरबारीं खर्च केलें आणि प्रभुक्षेत्रांत देह ठेविला. त्याचे पश्चात् त्याची बायकोही आमरण संस्थानांत राहून प्रभुसेवा करीत होती. या सात्विक संपन्न बाईला आम्हीं पाहिलें आहे. प्रभु व प्रभुवंशांतील सर्व मंडळीवर तिचें अलोट प्रेम होतें.

## गिर्‌राव चौधरी ११७

माणिकनगरांतील वसाहतीच्या कामीं गिर्‌रावाचा फार उपयोग झाला आहे. प्रभुनगरांतील वाडी व आश्रित लोकांकरितां तयार करून दिलेलीं लहान लहान घरें यांच्या देखरेखीखालीं झालीं आहेत. गिर्‌राव मूळचा कल्याणचा राहणारा असून तेथील चौधरीचें वतन त्याजकडे होतें. प्रभूंशीं समवयस्क असल्यामुळें प्रभूंच्या सामर्थ्याचा अनुभव पूर्ण पटला होता, म्हणून प्रभूंचें वास्तव्य माणिकनगरीं होतांच गिर्‌रावही येथें येऊन राहिला. याची गणना मुत्सद्दीवर्गांत होती. तथापि प्रभुप्रेमामुळें यानें आमरण येथें राहूनच प्रभुसेवेंत आपलें आयुष्य खर्च केलें. हल्लींही याचा नातु माणिकनगरांत वास्तव्य करून आहे.

# रामचंद्रबोवा नासिककर : : ८

रामचंद्रबोवा प्रथम माणिकनगरीं आले, ते 'नासिककर' या नांवानें ओळखले जात. येथून गेल्यानंतर त्यांचें वास्तव्य आमरण सोलापुरास झाल्यामुळें पुढें ते 'सोलापूरकर' बनले. यांचें वास्तव्य प्रभुसंनिध कांहीं काळ होतें. त्यांनीं प्रभूंचें एक ओंवीबद्ध चरित्र लिहिलें आहे. तसेंच पुस्तकरूपानेंही एक चरित्र त्यांच्या नांवावर प्रसिद्ध आहे. त्यांत त्यांनीं आपण माणिकनगरीं कसे आलों याचा उल्लेख करून आपल्या वंशांतील हकीकत दिली आहे. त्यांचे पूर्वज नाशिकजवळील त्र्यंबकेश्वरीं राहत असत. यजुर्वेदांतर्गत माध्यंदिन शाखेचें हें कुटुंब, वेदशास्त्र अध्ययन करून होतें. त्यांच्या पूर्वजांतील दहा पिढ्या दत्ताची उपासना करून होत्या, त्याप्रमाणें हेही दत्तउपासक होते. यांचे गुरु बाबादीक्षित हरडीकर यांनीं समाधिसमयीं यांना आज्ञा केल्यावरून चारधाम यात्रा करण्यास निघाले. तीन धाम यात्राकरून रामेश्वरास जाण्याकरितां हे सोलापुरीं आले. तेथें त्यांनीं प्रभूंचा लौकिक ऐकला. यापुढील हकीकत त्यांच्याच शब्दांत देणें इष्ट असल्यामुळें ती आम्ही देत आहों.

" सोलापुरीं शुभ्रबोवाचे मठांत आम्ही राहिलों होतों. येथें कुटुंबाची प्रकृति बिघडली, म्हणून बाबांनीं वैद्याचें औषध चालू केलें होतें. मठांत मोरभटाचें पुराण चालू होतें, तें मी

ऐकत बसत असें. एके दिवशीं पुराण आटोपल्यावर मठाधिपतीच्या आमच्या गोष्टी झाल्या, त्यांत श्रीमाणिकप्रभूंचा लौकिक त्यांच्या मुखानें फार ऐकला आणि रामेश्वराच्या वाटेवरच प्रभु आहेत, त्या अर्थी मार्गांत त्यांचेंही दर्शन घेऊन पुढें रामेश्वरास जावें असा आमचा निश्चय झाला.

मग आमच्या कुटुंबाच्या प्रकृतीला थोडा आराम वाटल्यावर आम्हीं सोलापुराहून रामेश्वरास जाण्याची तयारी केली. भाड्यानें गाडींत स्त्रीस व सीताबाईस आणि एक ब्राह्मण नोकर होता त्यास बसवून, मी गंगाबाईस खांद्यावर घेऊन पायांनीं चालत निघालों. मजल दरमजल करीत नळदुर्ग ओलांडून पुढें उमरग्याच्या नजीकच्या रानांत येऊन पोंहचलों. उमरगें पुढें दोन कोस होतें. या ठिकाणीं एकाएकीं अभ्र भरून येऊन असा कांहीं पर्जन्य आला कीं, सांगतां सोय नाहीं ! मुसळासारख्या मोठ्या धारा सुटून जलमय पृथ्वी आजच होते कीं काय असें आम्हांस वाटूं लागलें. आम्ही गाडीवानासहित पांच माणसें होतों, ते सर्व भिजलों. बोटा-एवढें देखींल वस्त्र आमचेजवळ राहिलें नाहीं. जमिनीवर सर्वत्र चिखल गुडघ्याएवढा होऊन गेला. आम्ही रानांत सांपडलों, आश्रय मुळींच नाहीं, आणि मागेंपुढें दोन दोन कोस गांव नाहीं ! या स्थितींत रात्र होऊन गेली, अंधार पडला, आणि पुढें कांहीं वेळानें त्या सर्द हवेच्या योगानें आमच्या कुटुंबाची प्रकृति एकाएकीं वायु होऊन बिघडली. ती इतकी कीं,

पुढें प्रहर सहा घटकेनें ऊर्ध्व होऊन अगदीं प्राण निघून गेला ! मग प्रसंगीं तेथें दुसरा उपाय काय ? आम्ही सारे स्वस्थ बसून, मनांतल्या मनांत श्रीप्रभूंस नवस करून त्यांचा धांवा एकसारखा करूं लागलों. प्रभूंना विनंती केली कीं, तूं चालता बोलता परमेश्वर जाणून आम्ही तुझ्या दर्शनास येत असतां मार्गांत आम्हांवर हें संकट काय आलें आहे ? आतां तूंच कृपाळू होऊन याप्रसंगांतून पार पाड; आणि मला स्त्रीदान दे. याप्रमाणें शेंकडों प्रार्थना मनांत होऊन नवसही करण्यांत आले. तेव्हां खरोखरच प्रभु आमच्या धावण्यास धांवला ! कांहीं वेळानें पाऊस राहून चंद्रोदय झाला आणि गाडींत आपली स्त्री गतप्राण होऊन पडली होती ती आपलें अंग हालवूं लागली ! आणि कांहीं वेळानें तर चांगली सावध झाली.पुढें पहातों तों सूर्योदयही झाला. मग आमच्या आनंदाला काय पहावयाचें आहे ? आम्ही आपली गाडी लागलीच तेथून हांकून पुढील गांवास दोन कोस येऊन तेव्हांच पोंचलों. तेथें मुक्काम करून कपडे वाळवून प्रभूंच्या पहिल्या नवसाबद्दल लागलीच तेथेंच पांच ब्राह्मण सवाष्णी जेऊं घातल्या. आणि पुढें कूच करून लवकरच श्रीमाणिकनगरास येऊन दाखल झालों.

तेथें उतरण्यास जागा मिळेना. मग श्रीदत्तगादीच्या एका बाजूस पडवींत थोडी रिकामी जागा होती,तेथें बळेंच जाऊन उतरलों.आणि स्नानें संगमाच्या ओढयावर करून प्रभुदर्शनास जाण्याची तयारी केली. दर्शन केव्हां होईल असें झालें

होतें. पूजेचीं तबकें व मोठमोठे फुलांचे कमलाखानी दोन हार बरोबर घेऊन प्रभूच्या द्वारांत जाऊन आम्ही दोघे स्त्रीपुरुष उभे राहिलों. परंतु तेथें आंत शिरकाव होईना. द्वारावर हजारों मनुष्यांची गर्दी, तोबा चाललेला ! तेव्हां दर्शन होण्याची आशा आम्हांस दिसून येईना. आम्हीं अगदीं दीन होऊन द्वारांत बराच वेळ तिष्ठत उभे राहिलों. इतक्यांत आंतमध्यें अंतर्साक्ष प्रभूंना आमची वर्दी लागली. प्रभूंना आमची खरोखर त्या वेळीं करुणा आली यांत संशय नाहीं, असेंच म्हटलें पाहिजे. नाहीं तर तीन दिवस उभे राहिलों असतों तरी आमची दाद प्रभूंच्या द्वारीं लागली नसती. पदमसिंग द्वारपाळास आंतून वर्दी आली कीं, नासिककर स्त्री-पुरुष दोघे कोण आहेत त्यांस पहिल्यानें दर्शनास आंत पाठवून द्यावें. ही आज्ञा आंतून आल्यावर मग अर्थातच द्वारपाळाला आम्हांस आंत सोडावें लागलें. आम्हीं उभयतां आंत जाऊन प्रभुचरणांवर मस्तक ठेविलें. आम्हांस प्रेमगहिंवर येऊन नेत्रांवाटे आनंदाश्रु वाहूं लागले ! त्या धांदलींत गंध कशाचें आणि धूपदीप कशाचें ! तेवढे पुष्पहार गळ्यांत घेण्याकरितां प्रभूंनीं आपण होऊनच मान पुढें केली. तेव्हां आम्हीं उभयतांनीं ते दोनही हार गळ्यांत घातले.त्या समयीं प्रभूंनीं मला विचारिलें कीं, "तूं त्र्यंबकेश्वरांतील पूर्णानंदाचा पणतू नव्हेस काय ? आणि अच्युतानंदाचा नातू व सदानंदाचा पुत्र नव्हेस काय?" तेव्हां मला मोठेंच आश्चर्य वाटून मीं होय म्हटलें. मग मला म्हणाले कीं, "सोलापुराहून आम्हाकडे येतेवेळीं मार्गांत तुमचे

फार हाल झाले. परंतु उमरग्यांतील मजकूर येथें कोणाजवळ प्रसिद्ध करूं नये." अशी आज्ञा झाल्यावर मीं ती मान्य केली. पुढें एक घंटाभरपर्यंत दर्शनसुखाचा आनंद आम्हीं घेतल्यावर आज्ञा झाली कीं, "आतां तुम्ही बिऱ्हाडीं जावें आणि झोळीचा व भंडारखान्याचा प्रसाद घेऊन थोडें स्वस्थ व्हावें. आम्ही रात्रीं पाचारण करूं, त्या वेळीं पुनः यावें." अशी आज्ञा होतांच आम्ही परतून बिऱ्हाडीं आलों.

बिऱ्हाडीं आल्यावर आमच्या कुटुंबानें सरंजाम काढून स्वयंपाकाची तयारी केली. इतक्यांत प्रभुआज्ञेनें आमच्याकडे उत्तम सरंजामाचा शिधा येऊन पोंचला. नंतर जेवणखाण होऊन आनंदानें स्वस्थतेंत होतों. रात्रौ एक वाजतां पुन्हा प्रभुआज्ञेनें द्वारपाळ आला आणि आम्हाला प्रभुभेटीकरितां घेऊन गेला. या वेळीं प्रभूंची भेट निवांतपणें झाली. त्यांत पुष्कळ बोलणें चालणें होऊन पुढें आतां रामेश्वरास न जातां येथेंच कालक्षेप करावा अशी आज्ञा होऊन नानाप्रकारें समाधानाचीं भाषणें झाल्यावर परतून बिऱ्हाडीं येऊन निजलों. मनांत विचार उत्पन्न झाला कीं, प्रभूंची आज्ञा आतां पुढें रामेश्वरास जाण्याची होत नाहीं, येथेंच रहावें म्हणतात. परंतु तसें झाल्यावर मग गंगाबाईची व्यवस्था काय व्हावी ? गंगेची कावड रामेश्वरास घालावयाची आहे तिची वाट काय करावी ? याप्रमाणें चिंतेंत असतां निद्रा लागली. तेव्हां स्वप्नांत तेजःपुंज गोसाव्याच्या रूपानें साक्षात् श्रीरामनाथाची मूर्ति येऊन त्रिशूलानें मला डंवचून जागें करून म्हणूं लागली

कीं, आतां पुढें लांब पांचशें कोस येण्याचें कारण नाहीं. तूं आपली गंगा माणिकप्रभूस घाल, म्हणजे मला पोंचेल. कारण प्रभु आणि मी एकच आहें.

जागा होऊन पाहूं लागलों तों गोसावी नाहीं, परंतु गंगेची कावड मात्र सुटलेली होती. पुढें प्रभूंच्या दर्शनास गेल्यावर ते म्हणूं लागले कीं, तुम्ही गंगेची कावड घेऊन रामेश्वरास केव्हां जाणार ? तेव्हां मीं उत्तर दिलें कीं असला चालता बोलता प्रभु रामेश्वर सोडून मी आतां पांचशें कोस लांब रामेश्वर धुंडण्यास कशाला जाऊं ? प्रभूंचे पाय हाच माझा रामेश्वर !"

यानंतर दोनतीन दिवसांनीं एकादशी होती. त्या दिवशीं प्रभूंना गंगा घालण्याचा समारंभ मोठ्या थाटानें झाला. हा समारंभ शिवालयांत झाला. हजारों ब्राह्मण जमले होते. ताशे, मर्फे, शिंगें, हलकाऱ्या, चवघडे वगैरे वाद्यांचा एकच गजर होऊन चहूंकडे आनंद भरून गेला. मोठे बडे अधिकारी शिवालयांत प्रभूंबरोबर अवभृतस्नानास होते. बाकी लोक बाहेर होते. प्रभूंच्या स्नानाच्या वेळीं शिवालयांत व आसपास ब्राह्मण वेदघोष करीत होते. प्रभूंचें स्नान झाल्यावर तें तीर्थ धरून कित्येकांनीं त्यांत स्नानें केलीं व हजारोंनीं मार्जनें केलीं. दुसऱ्या दिवशीं द्वादशीस सहस्र ब्राह्मणभोजन होऊन पात्रीं रुपरुपया दक्षिणा देण्यांत आली. हा सर्व खर्च व व्यवस्था प्रभूंकडूनच ठेवण्यांत आली होती. आम्ही फक्त स्नान घालण्याचे मात्र धनी होतों. अशा प्रकारें हा समारंभ शेवटास जाऊन आमची चवथ्या धामाची

रामेश्वर यात्रा प्रभुचरणीं परिपूर्ण झाली, आणि यापुढें आम्ही प्रभुआज्ञेनें प्रभूंजवळ राहिलों. "

रामचंद्रबोवा सोलापुरकर यांनीं केलेल्या पुस्तकांत स्वतः-संबंधानें वरील हकीकत दिली असल्यामुळें, ती सर्वस्वी विश्वसनीय आहे. प्रभूसमाधिपर्यंत हे माणिकनगरीं वास्तव्य करून होते. त्यानंतर प्रभुप्रेरणेनें ते सोलापुरास जाऊन राहिले. तेथें त्यांनीं प्रभूंची गादी स्थापन केली आणि आपलें शेवटचें आयुष्य तेथेंच प्रभुसेवेंत घालविलें. त्यांनीं लिहिलेलें प्रभुचरित्र प्रकाशांत आणण्याचें काम, सोलापुरांतील पंडित या उपनांवाच्या एका गृहस्थानें केलें. सदर पंडित यांनीं हें पुस्तक सन १८८९ सालीं प्रसिद्ध केलें. त्या वेळीं रामचंद्रबोवासंबंधानें त्यांनीं त्रोटक हकीकत दिली आहे, ती पाहण्यालायक आहे.

" हे माणिकप्रभूंचे प्रीतींतील सच्छिष्य असून यांची योग्यता सत्पुरुषांत गणण्यायोग्य आहे. यांचें वय हल्लीं ८५ वर्षांचें असून त्यांचीं संपूर्ण इंद्रियें २५ वर्षांच्या तरुणाप्रमाणें कायम व सशक्त आहेत. हे उत्तम गाणारे व उत्तम सतार वाजविणारे असून कीर्तन चांगलें करितात; चित्रें चांगलीं काढतात आणि सर्वांत उत्तम गुण त्यांचा हा आहे कीं, ते उत्तम कविता करतात. त्यांनीं आजपर्यंत ओंवीबद्ध दोनचार ग्रंथ केले असून शिवाय शेंकडों पदें, अभंग, साक्या, ध्रुपदें, ख्याल, श्लोक, अष्टकें वगैरे प्रकारची कविता सहस्रशः केली आहे."

## लक्ष्मीनृसिंहशास्त्री : : ९

प्रभुभक्तींत समरस झालेले हे शास्त्री मूळचे तेलंगणांत राहणारे होते. प्रभूंचा यशोदुंदुभि महाराष्ट्र, कर्नाटक, इत्यादि प्रांतांप्रमाणें तेलंगणांतही दुमदुमत होता. लक्ष्मीनरसिंहशास्त्री यांनीं प्रभूंचा लौकिक श्रवण केल्यावर ते प्रभुदर्शनास माणिकनगरीं आले. प्रभूंचें दर्शन झाल्यानंतर त्यांच्या वृत्तींत फरक पडून ते प्रेमी भक्त बनले. तेव्हांपासून त्यांचें आयुष्य प्रभुचिंतनांत जाऊन ऐहिक व्यवहारांतून चढत चढत त्यांनीं पारमार्थिक श्रेष्ठता संपादन केली. तेलंगणांत त्यांनीं प्रभूंच्या संप्रदायाचा प्रसार केला. त्यांचा शिष्यसंप्रदाय बराच वाढला. त्यांच्या अनुयायांमध्यें सुबय्या नांवाचे एक परमश्रेष्ठ सत्पुरुष होऊन गेले. यांनीं आपलें उत्तर आयुष्य माणिकनगरांत घालविलें. यांची तपश्चर्या प्रचंड होती. त्याचप्रमाणें दृढनिश्चयाचे ते मूर्तिमंत पुतळे होते. सुबय्यामहाराज आबालवृद्धांशीं फारच गोडीनें वागत. त्यांच्या अगाध ज्ञानाचा परिचय आम्हांस अनेक प्रसंगीं आलेला आहे. आज तेलंगणांतून जे हजारों शिष्यगण माणिकनगरांत येत असतात, ते त्यांच्यामुळेंच होय. लक्ष्मीनरसिंहशास्त्र्यांप्रमाणेंच सुबय्यामहाराजांनीं आपल्या प्रांतांत सर्वोत्तम लौकिक संपादन केला. सुबय्यांच्या इच्छेप्रमाणेंच त्यांचें शेवटचें आयुष्य माणिकनगरांत जाऊन त्यांचा देहही येथेंच पडला.

माणिकनगरांतील उत्तर बाजूच्या आंबराईंत सुबय्यांची समाधि असून तिच्या नित्यपूजेचीही व्यवस्था चांगली राखली आहे. समाधीवरील इमारतीचें काम चांगलें झालें असून शेजारीं भक्तलोकांकरितां धर्मशाळाही चांगली बांधली आहे. येथें पाण्याची सोय उत्तम असून, भोंवतालीं बागबगीचा झाला असल्यामुळें या जागेस रमणीयता आली आहे.

## रामण्णापंत दुबळगुंडी :: १०

रामण्णापंत आपल्या वयाच्या बाराव्या वर्षीं प्रभुदर्शनास गेले असतां प्रभूंचें लक्ष्य त्यांजवर गेलें. रामण्णापंतांस पाहून प्रभु म्हणाले, “ बाळा, माझ्याजवळ राहतोस काय ?” त्यावर त्यांनीं “ ऋणानुबंध असेल तसें होईल ” असें उत्तर दिलें. पुढें पुन: मैलारास प्रभूंचें दर्शन झालें, त्या वेळीं प्रभूंकडे त्यांचें मन ओढ घेऊं लागलें. प्रभूजवळ असतां ते नेहमीं प्रभुपादुका जवळ बाळगीत. रामण्णापंतांची वडील बहीण सुंद्राही प्रभुसेवेंत राहूं लागली. रामण्णापंत हे दुबळगुंडीचे कुळकर्णी. यांचें तारुण्यांतील बहुतेक आयुष्य प्रभुसहवासांतच गेलें, यामुळें सरकारी कामावर त्यांचें लक्ष्य नव्हतें. एकदां तालुकदाराचा त्यांच्यावर रोष होऊन त्यांची चौकशी करण्याकरितां त्यांना भालकीस नेलें. त्यावेळचे तालुकदार सर्वाधिकारसंपन्न होते. त्यांच्यावर कोठेंही अपील चालत नसे. रामण्णापंतांस आपलें भवितव्य समजून आलें. पण निराश न होतां त्यांनीं प्रभूचा धांवा केला. रात्रीं त्यांना स्वप्न पडलें कीं, ‘ आपण एका भयंकर अरण्यांत आहों. परंतु एकाएकीं त्या अरण्यांतील जागा साफसूफ करण्याकरितां हजारों लोकांनीं कंबर बांधून, तात्काळ जिकडेतिकडे स्वच्छता केली. त्या ठिकाणीं प्रभुरामचंद्राचा दरबार सर्व ऐश्वर्यासह भरलेला पाहून रामण्णापंत विस्मित झाले ! इतक्यांत तालुकदारास

मुसक्या बांधून प्रभुपुढें आणून उभे केलें. त्याच्याबरोबर दुबळगुंडीचे कांहीं लोकही होते.' इतके पाहून ते जागे झाले. दुसऱ्या दिवशीं त्यांचें काम तालुकदारापुढें चाललें असतांना हैद्राबादेहून स्वार आला. तालुकदाराला हैद्राबादीं बोलाविलें होतें. त्याप्रमाणें हुकूम देखतांच तालुकदाराला जावें लागलें. अशा रीतीनें रामण्णापंतांवरील संकट अनायासें टळलें. पुढें त्या तालुकदाराला नबाबानें कमी करून त्याच जागेवर विठ्ठलरावांची नेमणूक केली.

रामण्णापंत माणिकनगरीं बरेच दिवस होते. एकदां एका दुराचरणाच्या प्रसंगीं संकटनिवारणार्थ त्यांनीं प्रभूंचें स्मरण केलें. त्या वेळीं प्रभूंनीं त्यांचें संकट दूर केलेंच; पण पुन्हां अशा प्रकारचीं कामें कधीं करीत जाऊं नकोस, अशी सक्त ताकीद देऊन ठेविली. त्यांनींही प्रभूंविषयीं निःसीम प्रेमभाव ठेवून पुढील आयुष्य काढलें. हे गृहस्थाश्रमी होते, यांचा वंश हल्लीं दुबळगुंडीस वास्तव्य करून आहे. प्रभूंचें नवरात्र अद्यापही यांच्या घरीं चालू आहे.

## शरण साधु : : ११

शरण नांवाचा एक वैश्य साधु प्रभूंचा परम भक्त होता. तो चिटगुप्यास असतां त्याच्यावर एकदां संकट आलें. एका दरवड्याच्या प्रकरणांत त्याला कैद करून तुरुंगांत घातलें होतें. वास्तविक त्याचा त्या दरवड्याशीं कांहीं संबंध नव्हता. परंतु या साधुपुरुषाचा द्वेष करणारा काशीनाथ पापडे या नांवाचा एक मांत्रिक होता. त्यानें चिटगोप्याच्या राजेश्वरकर नायबास चुगल्या सांगून शरणास अटकेंत ठेवविलें होतें. काशीनाथ मांत्रिकाचें त्या नायबावर फार वजन होतें; कारण तो त्याचा शिष्य बनला होता. निरपराधि शरणानें तुरुंगांत प्रभूंचा धांवा केला. म्हणून प्रभु स्वतः चिटगोप्यास गेले. माणिकनगरची वसाहत झाल्यावर ही हकीकत घडली असें कोणी म्हणतात. कोणी म्हणतात माणिकनगरीं येऊन कायम राहण्याच्या पूर्वी प्रभु येथें कांहीं काल राहिले होते, त्या वेळीं घडलेली ही हकीकत आहे. माणिकनगरांत कायम वास्तव्य झाल्यानंतर प्रभु सहसा कोठें गेले नाहींत, असें बहुतेकांचें म्हणणें आहे. असो. प्रभु चिटगोप्यास स्वतः जाऊन तेथील रामाच्या देवळांत उतरले व नायबास निरोप पाठविला कीं, शरण निरपराधी असून त्याला विनाकारण अटकेंत ठेविलें आहे करितां त्याला सोडून द्यावें. नायबास मांत्रिकाची फूस मिळाल्यामुळें त्यानें प्रभूंच्या सांगण्याकडे दुर्लक्ष्य केलें. शरणास सोडविल्यावांचून तेथून

न हालण्याचा प्रभूंचा विचार होता. म्हणून तेथें त्यांनीं तीन दिवस मुक्काम केला. या तीन दिवसांत तिकडे पायगाच्या नबाबाला स्वप्न होऊन शरणाला सोडून देण्याची आज्ञा झाली. आज्ञेप्रमाणें तालुकदाराला त्यानें हुकूम दिला. त्या वेळीं तेथें महंमद मुकीम नांवाचा तालुकदार होता. त्यानें त्या दिवशीं शरणाला कांहीं सोडलें नाहीं. इकडे नबाबाला पुनः स्वप्न झालें व स्वप्नांत एका साधूनें त्याला सोटे लगावून फेंकून दिलें. त्याबरोबर नबाबानें घाबरून महंमद मुकीम तालुकदारास सक्तीचा हुकूम पाठवून शरण साधूला ताबडतोब सोडण्याबद्दल फर्माविलें. तेव्हां स्वतः तालुकदारानें चिटगोप्यास येऊन शरणास सोडून दिलें, आणि नायबाच्या मुसक्या बांधून व बेड्या घालून त्याला हैद्राबादेस पाठवून दिलें. शरण साधूवरील संकट अशा रीतीनें दूर करून प्रभु तेथून अखंडेश्वरास गेले.

## रामकृष्णपंत तहसीलदार : : १२

रामकृष्णपंताचे वडील शामराव हे मंगलगी वगैरे गांवचे शेकदार होते. त्यांची प्रभूंवर फारच निष्ठा होती. प्रभु एका प्रसंगीं मंगलगीच्या मळ्यांत बसले होते. तेथें प्रथम शामरावचे चिरंजीव रामकृष्णपंत यांनीं वडिलांबरोबर प्रभूंचें दर्शन घेतलें; त्या वेळीं त्यांचें अल्पवय होतें. प्रभुसमागमें नेहमीं हजारों सटके असत. या वेळीं हे सटके पुढील म्हणजे हळीखेळच्या मुक्कामावर रवाना झाले होते. तथापि तरुण रामकृष्णपंत यांनीं प्रभूंजवळ एक सटका मागितला. आपल्या घरांतील सर्वारिष्टनिरसनार्थ भाविक लोक प्रभूंकडून सटका घेऊन तो नेहमीं आपल्या पूजेंत ठेवीत असत. भलत्याच वेळीं मुलानें सटक्याची मागणी केली म्हणून शामराव रामकृष्णपंतास रागें भरूं लागले. पण प्रभूंनीं कृपाळू होऊन मुलाची बाजू घेतली व त्याच्या मागणीप्रमाणें तात्काळ ते ज्या पेरूच्या झाडाखालीं बसले होते, त्याची एक फांदी काढून तेथल्या तेथें सटका तयार करवून दिला. हा सटका अद्यापपावेतों रामकृष्णपंताच्या वंशजांनीं पूजेंत ठेविला असून त्यामुळें त्या वंशाचा उत्कर्ष होत चालला आहे. ह्या सटक्याच्या पूजेमुळें रामकृष्णपंतास व्यावहारिक 'फारसी' विद्या अवगत होऊन, एक लहानशी नोकरी लागली. पुढें वाढत वाढत ते तहसीलदार बनले. हसनाबाद नारायण खेडा, येथें नानामिया नांवाचा मुसलमान

तालुकदार होता. त्याजकडे प्रथम यांना पंधरा रुपयांची नोकरी लागली. नोकरीवर जाण्यापूर्वीं रामकृष्णपंत प्रभुदर्शनार्थ आले होते. प्रभूंनीं प्रसाद देतेवेळीं त्यांना तीनतीनदां बजावून सांगितलें कीं, “ कोणास अपकार न करितां नेहमीं शक्य तितका उपकार करीत जा. बाळ, तुला पुढें मोठें काम मिळेल; पण कोणाचें वाईट करूं नकोस अं ! ” हें प्रभूंचें वाक्य आमरण त्यांच्या स्मरणांत होतें. वृद्धापकाळ होऊन काम करण्यास असमर्थ होईतोंपर्यंत त्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं तहसीलदाराचें काम मोठ्या प्रामाणिकपणें केलें. त्यांच्या कर्तबगारीवर पायग्याच्या नबाबांनीं खूष होऊन, त्यांच्या चिरंजीवासही तहसीलदाराचें काम दिलें होतें. यांचा वंश सध्यां चिटगोप्यांत आहे.

## विठ्ठलराव तेरपल्ली : : १३

अगदीं सामान्य स्थितींतून तालुकदारीपर्यंत चढून आमरण प्रभुसेवा एकनिष्ठपणें केलेले असे आणखी एक विठ्ठलराव होऊन गेले. या विठ्ठलरावांचें आडनांव तेरपल्ली असें होतें. यांचे वडील धोंडोपंत हे मूळचे अहमदनगरचे राहणारे. परंतु नोकरीकरतां नबावपेठ जहागीरदारांजवळ येऊन राहिले. तेरपल्ली येथील मुलगी धोंडोपंतांस मिळाल्यामुळें ते तेथेंच राहूं लागले. तेव्हांपासून त्यांना तेरपल्ली हें आडनांव मिळालें. धोंडोपंतास दोन मुलगे होते. एक विठ्ठलराव व दुसरे गोविंदराव; हे उभयतां नोकरीकरितां हैद्राबादीं गेले. मंजलेमियांच्या इलाख्यांतील महंमदसाहेब तालुकदाराच्या कचेरींत विठ्ठलरावाला जागा मिळाली. पुढें बेल्लपहणमंतराव यांच्यामार्फत सरकारआलीमध्यें त्यांना नोकरी आली. पण विठ्ठलरावांचा विश्वास प्रभूंवर असल्यामुळें त्यांनीं प्रभूंना ही हकीकत कळविली. "असलेली अर्धी भाकर सोडूं नको, यांतच दत्त यश देईल." असें प्रभूंनीं सांगितलें. प्रभूंच्या आज्ञेप्रमाणें सरकारआलीमध्यें आलेली जागा न पत्करतां ते पूर्वींच्या ठिकाणींच राहिले. त्यांना प्रथम पस्तीस रुपये पगार मिळत होता. पुढें त्यांची हुषारी पाहून रुकमोदीनखानें त्यास आपला मदतगार केलें. या वेळीं त्यांना पगार शंभर रुपये मिळून शिवाय म्यानाही मिळाला. पुढें ते तालुकदार झाले. त्यांनीं पंचवीस वर्षें

तालुकदारीचें काम केलें. हे प्रभुभक्ताग्रणी आमरण मोठ्या वैभवानें राहून शेवटीं प्रभुचरणीं लीन झाले. माणिकनगरीं हे दरसाल येऊन हजारों रुपयांचा दानधर्म करीत असत. आपल्या हयातींत दत्तजयंतीच्या पौर्णिमेचा सर्व खर्च हे स्वतः करीत असत. इहलोकीं ऐश्वर्य संपादन करून, प्रभुकृपेनें परलोक साध्य करून यांनीं आपल्या जन्माचें सार्थक केलें.

## रावजीबुवा : : १४

गोपाळरावजी या नांवाचा एक तरुण ब्रह्मचारी प्रभुसंनिध येऊन राहिला होता. याचें मूळ राहण्याचें ठिकाण कोणास माहीत नाहीं; तथापि कोल्हापूर प्रांतांतील एखाद्या गांवचा तो असावा असें अनुमान आहे. ऐन तारुण्यांत गोपाळरावजी प्रभुदर्शनार्थ आले. त्यांच्या शेवटच्या ' रावजी ' या नांवामुळें, त्यांचें तेंच आडनांव असावें अशी समजूत होऊन, त्यास इकडे ' रावजीबुवा ' म्हणत असत. रावजीबुवांची बुद्धिमत्ता पाहून, प्रभूंनीं त्यांना दासबोधांतील कांहीं प्रकरणें समजावून सांगितलीं. त्यामुळें रावजीबुवांस दासबोधाची गोडी लागली. व शेवटपर्यंत त्यांनीं या ग्रंथाचें परिशीलन चालविलें होतें.

मुंबईस नोकरीस असलेले रघुनाथराव नाईक या नांवाचे एक गृहस्थ प्रभूंची कीर्ति ऐकून माणिकनगरास आले. प्रभुदर्शन झाल्यानंतर त्यांचा ओढा प्रभुचरणांकडे लागून ते प्रभुभक्त बनले. तेथील इंजिनियरखात्यांत प्रथम रघुनाथरावांस पंधरा रुपये पगार मिळत होता. पण प्रभुकृपेनें त्यांची बढती होत होत ते इंजिनियरच्या जागेपर्यंत वाढले. आपल्या ह्यातींत त्यांनीं लक्षावधि रुपये संपादन करून प्रभुसेवाही चालविली. एके ठिकाणीं सरकारी इमारतीचा पाया खणण्याचें काम चाललें असतां त्यांना एक लहानशी दत्ताची मूर्ति सांपडली.

ती त्यांनीं प्रभूंकडे आणून दिली. प्रभूंनीं ती मूर्ति मांडीवर घेऊन तिला पेढा खावूं घातला, असें त्यांच्या वंशांतील लोक सांगतात. ही मूर्ति अद्याप रघुनाथरावजींच्या वंशांतील पुरुषांच्या पूजेंत आहे. हें घराणें सध्यां मुंबईंत नांदत आहे व आपल्या इतर आप्तगणांसह प्रभुसेवेचें कार्य मोठ्या तत्परतेनें करीत आहे. प्रभूंच्या आज्ञेप्रमाणें ते रावजीबुवांस मुंबईस घेऊन गेले. रावजीबुवांचें वास्तव्य मुंबईंत आमरण यांच्या घरींच होतें. त्यांनीं तेथें मोठा लौकिक संपादन करून पुष्कळ शिष्यवर्गास प्रभुसंप्रदायांत सामील करून घेतलें. रावजीबुवांनीं केलेल्या मृत्युपत्राप्रमाणें कै. माणिकराव मुळगांवकर यांचे घरीं दरसाल प्रभुजयंतीचा उत्सव मुंबईस होत असतो. रावजीबुवामुळें प्रभूंचा सांप्रदायिक समाज मुंबईंत प्रथम अस्तित्वांत येऊन आजपर्यंत वृद्धिंगत होत आला आहे.

## चिंतामणबुवा : : १५

प्रभुभक्तांमध्यें चिंतामणबुवा हे एक श्रेष्ठ प्रतीचे भक्त होऊन गेले. त्यांचें मूळचें वास्तव्यस्थान कोठचें होतें याची माहिती मिळत नाहीं. विरक्त स्थितींत राहून सामर्थ्य संपादन केल्यावर यांनीं माणिकनगर सोडलें. रायचूर ते सोलापूर लाइनवरील बहुतेक स्टेशनांवर त्यांचे अनुयायी भक्त पुष्कळ होते. यांचीं वृत्ति बालोन्मत्त पिशाचवत् असे. प्रभुनामाचा घोष करीत हे कोठेंही फिरत असत. यांची वृत्ति पाहून पुष्कळ लोकांनीं त्यांचा अनुग्रह घेतला. त्यांच्या या अवधूत वृत्तीमुळें त्यांच्या संबंधानें मूळची हकीकत कोणास समजूं शकली नाहीं. प्रभुसमाधीनंतरही ते कांहीं काल माणिकनगरीं येऊन राहिले होते. आरसा, तांब्या व चिलीम हीं सदैव त्यांच्याजवळ असावयाचीं, पण लहर लागली कीं या तिन्ही वस्तूंचा ते क्षणांत विध्वंस करून टाकीत. येथें असतांना त्यांना या वस्तूंचा पुरवठा संस्थानामधून होत असे. यांच्यापासून कोणासही उपद्रव नव्हता. सर्वांशीं ते अत्यंत प्रेमळपणानें वागत. यांच्या वृत्तीचा अनुभव आल्यावर यांच्याविषयीं साहजिक पूज्यभाव उत्पन्न होत असे. आपले शिष्यगण वाढवून यांनीं प्रभुसंप्रदायाची बहुमोल सेवा केली आहे.

# संतरामदादा गवंडी : : १६

चिंतामणबुवाप्रमाणें बाहेर वावरत राहून शिष्यगण वाढविण्यांत, संतरामदादा गवंडी यांनीं अत्यंत महत्त्वाची कामगिरी केली आहे. संतरामदादांची माहिती असलेले कांहीं वृद्ध लोक अजून येथें आहेत. त्यांच्याकडून आम्हांस समजलें आहे कीं, प्रभुसमाधीनंतर समाधीवरील देवळाचें काम सुरू झालें. त्या वेळीं हें काम करण्याकरितां संतरामची नेमणूक झाली होती. देवळाचें काम करणारा नागोबा नाईक यास संतरामनें आणलें होतें. संतरामांस दरमहा पगार सोळा-सतरा रुपये होता. संतराम व नागोबा नाइकाचा आप्तसंबंध होता. संतरामांचा मुलगा हाही त्या वेळीं कामावर होता. समाधीवरील देवळाच्या कामानिमित्त संतराम माणिकनगरास आल्याचें सर्वांस विदित आहे. त्यापूर्वीं प्रभूंचें दर्शन त्यांस केव्हां झालें व त्यावर अनुग्रह केव्हां झाला याची माहिती आम्हांस नाहीं. मुंबईस संतरामदादांचे अनुयायी असंख्य आहेत. प्रभूंची ब्रीदावळी संतरामदादांच्या मुंबई येथील मंदिरावर मोठ्या अक्षरानें लिहिलेली आम्हांस पहावयास मिळाली त्यावरून श्रीप्रभुसंप्रदायाचा प्रसार करण्याचें काम त्यांनीं उत्तम रीतीनें केलें असें उघड होत आहे. श्री एकनाथ गणेश भांडारे यांनीं लिहिलेलें संतरामदासांचें एक छोटें चरित्र नुकतेंच आमच्या पाहण्यांत आलें. प्रभूंचा व त्यांचा किती निकट संबंध होता हें त्यावरून दिसून येतें. या लघुचरित्राशेवटीं संतरामदासांना अनुभवलेले कांहीं प्रभुचमत्कारही दिले आहेत.



# निर्याण

## दादामहाराज : : १

आतांपर्यंत आम्हीं आमच्या प्रिय वाचकांना प्रभुचरित्रांतील अनेक अद्भुत रमणीय कथा निवेदन केल्या. प्रभूंची अवतारलीला अनंत रसाळ प्रसंगांनीं भरून गेली आहे. ते सर्व प्रसंग प्रस्तुत लहानशा चरित्रांत साद्यंत कथन करण्याचें काम परम दुस्तर आहे. आतांपर्यंत कथन केलेल्या भागावरून प्रभुचरित्राची सामान्य रूपरेषा आमच्या वाचकांच्या ध्यानांत आली असेलच. प्रभुचरित्र हें एखाद्या महासागराप्रमाणें विशाल असल्यामुळें त्याचें आलोडन सर्व बाजूंनीं करतां येण्यासारखें नाहीं, हें आम्हीं प्रांजलपणें कबूल करीत आहों; तथापि प्रभुसेवा म्हणून आमच्या शक्तीप्रमाणें बहुतेक आवश्यक तेवढा कथाभाग आम्हीं आपल्या प्रिय वाचकांना सादर केला आहे. या सर्व कथाभागावरून प्रभूंच्या अद्भुत योगसामर्थ्याची व लोकोत्तर गुणांची ओळख होण्यासारखी आहे. यामुळें जास्त विस्तार करण्याच्या भरीस न पडतां

प्रभुचरित्रांतील हें शेवटलें अप्रिय प्रकरण हातीं घेणें भाग पडलें आहे.

प्रभूंचा दरबार हा सामान्य दरबाराहून अगदीं भिन्न होता. या दरबारांतील अंतरंगांत पांच प्रमुख मूर्ति होत्या. ह्या पांचांचें हें पंचायतन बाहेरील व्यवहारांत जरी भिन्न दिसत असलें, तरी अंतर्यामीं एका दिव्य शक्तीनें बांधलें गेल्यामुळें एकरूपच होतें. प्रभु, देवी बयाम्मा, दादामहाराज, तात्यामहाराज आणि व्यंकम्मा ह्या त्या पांच मूर्ति होत. या सर्वांनीं एक विचार करून आपण मांडलेला बाजार येथल्या येथेंच सोडून इहलोकापासून दूर जाण्याचें ठरविलें. ह्या पंचमूर्ति एकामागून एक अदृश्य होत होत निजधामास चालत्या झाल्या, हा कथाभाग या प्रकरणांत निवेदन करावयाचा आहे. हें प्रकरण अप्रिय आहे. अंतःकरणाला क्लेश देणारें आहे यांत शंका नाहीं. तथापि कर्तव्यबुद्धि जागृत ठेवून धैर्यानें तें कथन केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. वाचकांनींही आपल्या मनाचा निर्धार करून शांत मनानें हें वाचावें, अशी आमची त्यांना विनंती आहे.

वरील पंचमूर्तींपैकीं दादामहाराजांनीं प्रथम प्रयाणाचा मान मिळविला. कांहीं दिवस प्रभूंचा व दादामहाराजांचा एकांत चालून उभयतांच्या विचारें देहविसर्जन करण्याचें

ठरून त्याची पूर्वतयारी म्हणून दादामहाराजांनीं चतुर्थाश्रमाचा स्वीकार केला. सशास्त्र चतुर्थाश्रम घेऊन मातेला अभिवादन केलें. मातेच्या ऋणांतून मुक्त होण्याचा हा एक मार्ग शास्त्रानें सांगितला आहे. त्याप्रमाणें त्यांनीं आचरण केलें. मातेच्या हृदयाला कशाची उपमा द्यावी ? तें निरुपम आहे. आपला पुत्र आपल्यापुढें जावा हें मातेला पाहवणें शक्य नाहीं. तथापि प्रभूंनीं व दादामहाराजांनीं मातेचें सांत्वन करून तिला चार समजुतीच्या गोष्टी सांगितल्या. प्रभूंच्या प्रेरणेनें मातेनें परवानगी दिल्यानंतर दादामहाराजांनीं योगमार्गाचा अवलंब करून आपला नश्वर देह विसर्जन केला. फाल्गुन शु॥ १ शके १७८३ ह्या दिवशीं दादामहाराजांची समाधि झाली. ते परमसमर्थ योगी असून मौनवृत्तीनें राहत. गोरगरीब, दीनदुबळे, गोसावी, बैरागी, फकीर इत्यादि लोकांवर त्यांची प्रेमळ दृष्टि असे. माणिकनगरांतील अनाथांचे ते साहाय्यकारी होते. मातेचा आज्ञाधारक पुत्र व बंधूचे प्रेमळ बंधु होते; यामुळें त्यांच्या निधनानें माणिकनगरांतील आबालवृद्ध शोकाकुल होऊन गेले. माता तर धाय मोकलून रडूं लागली आणि बंधूंनाही अनावर दुःख झालें. परंतु प्रभु हे सर्वांचे आधारचक्र असल्यामुळें प्रभूंकडे पाहून सर्वांनीं तें दुःख गिळलें व माणिकनगरांतील सर्व कार्यक्रम पूर्ववत् चालूं लागून दादामहाराज स्मृतिशेष होऊन गेले. त्यांची समाधि संगमावर होऊन त्यावर एक लहानसें देऊळ बांधिलें आहे. त्यांच्या

समाधीची नित्य पूजाअर्चा चालू असून वार्षिक आराधनाही होत असते.

दादामहाराजांच्या समाधीसंबंधानें इतर चरित्रकारांपेक्षां सोलापूरकरांनीं सविस्तर वर्णन दिलें आहे. ते म्हणतात, "दादासाहेब कोणत्याही कारभारांत अगदीं नसून व कोणाशीं भाषण वगैरे नसून नेहमीं परब्रह्म ध्यानांत ध्यानस्थ असून आपल्या आत्मसुखांत नेहमीं तल्लीन राहून एकांतांत बसत असत. पूर्वीपासून त्यांच्या वृत्तीचा धर्म जो होता तोच शेवट समाधीपर्यंत कायम होता. समाधीच्या पूर्वीं कांहीं दिवस अगोदर दादासाहेब आणखी प्रभु तीन दिवस सारखे रात्रंदिवस एकांतांत होते. आंत दोघेच जण होते आणि आंतून दाराला कडी होती. शौच, लघवी किंवा स्नान, पान खाणें कांहींच नाहीं. मग आंत उभयतांचें भाषण किंवा आनंद काय व कसा झाला असेल तो त्यांचा त्यांनाच माहित ! चवथ्या दिवशीं बाहेर आल्यावर प्रभु दादासाहेबांच्या समाधीच्या तयारीला लागले. संगमवार जागा वगैरे तयार करून ठेविली. ज्या दिवशीं समाधि व्हावयाची त्या दिवशीं पूजा, अर्चा, नैवेद्य, प्रसाद वगैरे सर्व नित्यविधि सर्वत्र सर्वांनीं लौकर आटोपण्याचा हुकूम प्रभुमहाराजांनीं देऊन व द्वादशीप्रमाणें सर्व विधि लवकर आटोपून नंतर दादासाहेबांची समाधि व्हावयाची म्हणून प्रभूंनीं मातुश्री अंमांना व तात्यासाहेबांना कळविलें. तेव्हां मातुश्री परम कष्टी

झाल्या; हें पाहून दादासाहेबांनीं मातु:श्रींना आपल्याजवळ कांहीं वेळ एकांतांत बसवून स्वसामर्थ्यानें त्यांचें पूर्ण समाधान केलें आणि प्रभूंनींही मातु:श्रींचें व तात्यासाहेबांचें समाधान करून सर्व मायाभ्रांति दूर केली. पश्चात् ब्राह्मणांकडून वेदघोष चालू असतां सर्व संत, साधु, बैरागी यांचा गराडा भोंवतालीं पडला आणि सर्वांसमक्ष मातु:श्री व प्रभुसंनिधानीं असतां दादासाहेबांचा ब्रह्मरंध्रभेद होऊन प्राणज्योति ब्रह्मरूपीं समरस झाली ! मग पुढील सर्व विधि यथासांग धर्मशास्त्ररीतीनें प्रभुमहाराजांकडून होऊन हजारों रुपये दानधर्म झाला."

टोळ यांनीं "ज्येष्ठ बंधु हणमंतरावदादा यांचें हठयोगरीत्या देहावसान झालें" एवढेंच म्हटलें आहे.

## बयाम्मा : : २

देवी बयाम्माचें थोरपण वर्णन करण्याचें काम अशक्य कोटींतील आहे. जिच्या उदरीं प्रभूंसारख्या असामान्य दिव्य पुरुषाचा जन्म झाला, तिची थोरवी कोणत्या शब्दांनीं वर्णन करावी ? बयाम्मा लौकिक व्यवहारांत अत्यंत भोळ्या असून फार मृदु अंतःकरणाच्या होत्या. तात्या महाराजांचें बयाम्मांवर फार प्रेम होतें. त्यांच्या उभय पुत्रांवर व वडील कन्येवर बयाम्मांचें प्रेम अतोनात असून विठाईअम्मांस सुनेपेक्षां कन्येप्रमाणेंच वागवून सर्व कुटुंबाचें प्रेम बयाम्मांनीं संपादिलें होतें. लौकिक व्यवहारास अनुसरून तात्यामहाराजांनीं द्रव्यसंचय करावा असें बयाम्मांना वाटत असे. प्रभूंकडे नित्य हजारों रुपये येत असत, त्याचप्रमाणें दागदागिनेही पुष्कळ जमत. एकदा एक उत्कृष्ट चंद्रहार कोणी प्रभूंच्या गळ्यांत घातला. तो आपल्या संग्रहीं असावा असें बयाम्मांना वाटून त्या माउलीनें तो आपल्याजवळ ठेविला. तात्याच्या मुलांबाळांना उपयोग व्हावा म्हणून दागदागिने जवळ बाळगावेत अशी इच्छा त्या माउलीला वारंवार होत असे. परंतु प्रभु कशाचाही संग्रह करूं देत नसत. कांहींना कांहीं निमित्तानें सांठवून ठेविलेलें द्रव्य अथवा दागिने प्रभूंनीं उचलावे असा नेहमींचा क्रम असे. वरील चंद्रहार बरेच दिवस बयाम्मांकडे राहिला,

म्हणून बयाम्मांना जरा समाधान वाटलें. पण पुढें एकाएकीं त्यांना पोटशूळ उठला; कांहीं चैन पडेना. कितीही औषधोपचार केले, तरी पोटशूळ कांहीं थांबेना. शेवटीं प्रभूंकडे वर्दी पोंचली. ते अम्मांकडे येऊन पोटशूळासंबंधीं विचारपूस करूं लागले व शेवटीं हलकेच म्हणतात, "अम्मा, तेवढा तो चंद्रहार दत्ताला देऊन टाक, त्याशिवाय हें पोटदुखणें रहावयाचें लक्षण दिसत नाहीं." त्यावर अम्मांनीं, "घे बाबा तुझा तूं, तात्याच्या पोरांबाळांना होईल म्हणून ठेवला होता. तोही तुला बघवत नाहीं. मला घेऊन काय करावयाचा आहे ?" मातु:श्रीनें चंद्रहार प्रभूंच्या स्वाधीन करतांच पोटशूळ बंद होऊन अम्मांना बरें वाटूं लागलें. प्रभूंचें अम्मावर अतोनात प्रेम होतें. फराळाचे कांहीं जिन्नस अम्मांनीं नित्य आणावे; ते मोठ्या प्रेमानें प्रभु खात असत. उभय पुत्रांचा लौकिक व उत्कर्ष प्रत्यक्ष पाहून ती माउली धन्य झाली होती. प्रभूंच्या दर्शनार्थ आलेला भाविक समूह अम्मांना पूज्य भावानें वंदन केल्याशिवाय जात नसे.

याप्रमाणें अम्मांचें उत्तर आयुष्य प्रेमळ व आनंददायक वातावरणांत बराच काळ गेल्यावर अवतारसमाप्तीचा काळ जवळ येऊन ठेपला. कांहीं कारणानें अम्माच्या प्रकृतींत विकृति होऊन अस्वस्थता उत्पन्न झाली. परंतु प्रभूंनीं अम्माजवळ रात्रंदिवस बसून अनेक प्रकारच्या समजुतीच्या गोष्टींनीं त्यांचें समाधान केलें. अम्मा सर्व मायामोह बाजूला

सारून पुढील मार्ग आक्रमणाच्या तयारीला मोठ्या आनंदानें लागल्या. प्रभूंच्या समक्ष शांत वृत्तीनें देहविसर्जन करून इहलोकयात्रा उत्तम रीतीनें पूर्ण केली. या माउलीचें भाग्य कोटयवधि स्त्रियांपैकीं फारच थोडयांना लाभणारें आहे. अम्मांची चिता-समाधि संगमांत आहे. या प्रसंगीं धर्मशास्त्राला अनुसरून प्रभूंनीं क्षौर केलें होतें हें कित्येक मुसलमान भक्तांना खपलें नाहीं. प्रभु सर्वश्रेष्ठ अवलिया असतां ब्राह्मणांनीं प्रभूंना दाढी काढावयास लाविलें म्हणून यवनांना राग आला; परंतु प्रभुसामर्थ्यापुढें त्यांचें कांहीं न चालल्यामुळें कसलीही गडबड झाली नाहीं. असें कांहीं चरित्रकारांनीं लिहिलें आहे. व्यंकम्मांच्या समाधीनंतर साधारणपणें एका वर्षांतच अम्मांचें निर्याण झालें. उत्तरक्रिया तात्यामहाराजांकरवीं करून त्याप्रीत्यर्थ प्रभूंनीं हजारों रुपयांचा दानधर्म केला.

## तात्यामहाराज : : ३

माणिकनगरांतील पांच प्रमुख देवतांमधील तीन मूर्तींनीं इहलोक सोडून स्वस्थान गांठल्यानंतर तात्यामहाराजांनींही आपला अवतार संपविण्याचा विचार केला. एकदां त्यांची प्रकृति अस्वस्थ होऊन ते फार घाबरले. कांहीं शिष्यांनीं हें वर्तमान प्रभूंना निवेदन केले. परंतु प्रभूंनीं सांगितलें कीं, " भिण्याचें कांहीं कारण नाहीं तात्या इतक्यांत कांहीं जात नाहीं. हा सटका घेऊन जा व तात्याच्या उशाजवळ ठेवा, म्हणजे त्याला बरें वाटेल." शिष्यांनीं त्याप्रमाणें केल्यावर तात्यामहाराजांना आराम वाटूं लागला, व पुढें ते चांगले दुरुस्त झाले. त्यानंतर प्रभूंनीं तात्यामहाराजांच्या वडील पुत्राची मुंज मोठ्या थाटानें करविली. प्रभुवंशांतील माणिकनगरांत होणारा हा प्रथमसमारंभ असल्यामुळें फारच उत्साहानें साजरा केला गेला. या व्रतबंधाच्या समयीं दहापांच गोरगरिबांच्या मुलांचेही व्रतबंध धर्मार्थ करविले. यानिमित्त अन्नदान, दक्षिणा इत्यादि प्रकार यथासांग होऊन कमीत कमी पंचवीस-तीस हजार रुपये खर्च झाले.

या समारंभानंतर कांहीं काल गेल्यावर तात्यामहाराजांचा अवतारसमाप्तीचा समय जवळ येऊन ठेपला. यापुढील हकीकत सोलापुरकरांनीं खालील शब्दांत दिली आहे.

" मुंजीचा समारंभ झाल्यावर पुढें एक महिनापर्यंत प्रभु आणि तात्यासाहेब एकांतांत बसून दोघांत आत्मरूप विचार झाला. एक महिनापर्यंत शौच, लघवी, खाणेंपिणें, कांहीं एक न होतां लोकांना प्रभूंचें दर्शनही बंद झालें होतें. मग दोघे बाहेर आले व नित्यकर्म चालू झालें. पुढें तात्यासाहेबांनीं स्वतः गुरुचरित्राचें पारायण करून पुष्कळ दानधर्म करून व भजनपूजनादि सर्व सत्कर्में साधून, नियमित दिवशीं सर्वांशीं आनंदानें बोलणें चालणें करून सर्वांचा निरोप घेतल्यावर प्रभुचरणांवर मस्तक ठेवलें आणि मग योगासन घालून समाधि घेतली. तेव्हां भक्तकार्याचा सर्वत्र गजर होऊन टाळ, झांज, मृदंग, शंख, भजनाच्या मागेंपुढें मेळे चालून हजारों मंडळी बरोबर चालत असतां व बंदुकी कडाबिणींचे सर्वत्र कडकडाट चालू असतां मोठया समारंभानें तात्यासाहेबांचा समाधियोग पूर्णतेला गेला. स्वतः प्रभु पायानें आपल्या कनिष्ठ बंधूंच्या या शेवटच्या विधिला समाधिस्थळापर्यंत येऊन शेवटपर्यंत जवळ उभे होते. चिरंजीव आपासाहेबांकडून सर्व उत्तरविधि यथाधर्मशास्त्र करविला. आणि हजारों रुपये दानधर्म करून,तात्यासाहेबांचें नांव प्रभूंनीं आपल्या समागमांतील लीलेंत अजरामर करून ठेविलें. तात्यासाहेबांकरितां रडला नाहीं असा तेथें एकही मनुष्य आढळला नाहीं. सर्व प्रभूंची वाडी व हुमनाबाद तर काय, परंतु सर्व निजाम सरकारचा मोंगलाई प्रांत तात्यासाहेबांकरितां हळहळत रडत उदास होऊन गेला."

वरील हकीकतींत समाधि म्हटलें आहे तें प्राणोत्क्रमणाच्या समयीं आसन साधून निर्याण झालें म्हणून होय. तात्यामहाराज गृहस्थाश्रमी होते व गृहस्थाश्रमाला योग्य असेच सर्व संस्कार होऊन त्यांचा अंत्यविधि झाला. त्यांची अस्थिसमाधि संगमावर मातुःश्रीसंनिध आहे. तात्यामहाराजांनीं प्रभूंसमक्ष धीरोदात्त वृत्तीनें देह विसर्जन केला असें वृद्ध लोक सांगतात. शेवटपर्यंत प्रभु त्याला धीर देत होते. "बघ तात्या, डगमगूं नको, संभाळ, धीर धर" असें मस्तकभेद होईपर्यंत प्रभु म्हणत होते, असेंही कित्येक लोक सांगतात. यासंबंधीं टोळ यांनीं असें लिहिलें आहे, "रामा, तात्या आज जाणार म्हणतो चल पाहूं, आतांच त्याला मुक्ति देऊन टाकूं. असें बोलून स्वारी तात्यामहाराजांपाशीं गेली आणि त्यांच्या उजव्या पायाची शीर कांहीं वेळ दाबून पंचप्राण नाभिकमळीं जमा करविले." रामभाऊ लंगोटी यानें सांगितल्याप्रमाणें टोळ यांनीं चरित्र लिहिलें आहे. रामभाऊ लंगोटी तात्यामहाराजांच्या सदैव सेवेंत असल्यामुळें, वरील हकीकतीत सत्य असावें असें वाटतें.

तात्यामहाराजांनीं मोठ्या धैर्यानें इहलोक सोडला यांत शंका नाहीं. या वेळीं त्यांचें ऐन तारुण्य होतें. पाठीमागें तरुण पत्नी व तीन लहान लहान अर्भकें यांना सोडून निर्भयपणें त्यांनीं देहयात्रा संपविली. त्यांचें निर्याण श्रावण वद्य ४ शके १७८४ या दिवशीं झालें.

## व्यंकंमा : : ४

या परम समर्थ योगिनीचा उल्लेख मागें अनेक ठिकाणीं आला आहे. माणिकनगरांत व्यंकंमा सर्व लोकांना पूज्य वाटत असून तिच्यावर सर्वांचें प्रेम होतें. शुभ्र वस्त्र परिधान करून सदैव प्रभुचिंतनांत ती निमग्न असे. प्रभूंच्या अवतारसमाप्तीचा कार्यक्रम ठरल्याप्रमाणें प्रभूंच्यापुढें आपण जावें ह्या हेतूनें या साध्वीनें देहयात्रा संपविण्याचा निश्चय केला. पायांत चाळ बांधून अहोरात्र प्रभुभजनांत कांहीं काल घालविल्यावर व्यंकंमा निश्चेष्ट होऊन पडली. ती जातीची कोमटीण होती हें पूर्वीं कळविलेंच आहे. कोमटयांच्या जातिधर्माला अनुसरून तिच्या जातभाईंनीं तिच्या प्रेतयात्रेची तयारी केली. व्यकंमांचें देहावसान झालें असें समजून सर्व तयारी त्यांनीं केली आणि प्रेत उचलावयास लागले, तों तिच्या मुखांतून ॐकारध्वनि निघूं लागला. सर्व कोमटी चकित होऊन गेले. परंतु पुढेंही जिवंतपणाचें लक्षण दिसून येईना. म्हणून फिरून उचलण्याचा प्रयत्न करूं लागले. तरीही ॐकारध्वनि निघतोच आहे ! हें पाहून सर्वजण विस्मित होऊन प्रभूंजवळ येऊन वरील हकीकत सांगूं लागले. प्रभु सर्वज्ञ असल्यानें व्यंकंमाचें अंतःकरण जाणून म्हणाले, " अरे, तिच्या मनांत ब्राह्मणांकडून समाधि मिळावी असें आहे, म्हणून तुम्ही कोणी स्पर्श करूं नका. " त्यानंतर

प्रभुआज्ञेप्रमाणें ब्राह्मणांनीं व्यंकमाला स्नान घालून हळदी-कुंकवाचा मळवट भरून, नवीन लुगडें-चोळी नेसवून तिची ओटी भरली आणि मारुतीच्या देवळानजीकच्या मैदानांत नेऊन मोठ्या समारंभानें तिच्या देहाला समाधि दिली. ब्राह्मणाचा हात लागतांच ॐकार निघण्याचा बंद होऊन पुढील सर्व संस्कार व्यंकम्मांच्या देहास यथाविधि मिळाले.

या प्रसंगाचें अवलोकन करणाऱ्या रामचंद्रबोवांनीं म्हटलें आहे कीं, "व्यंकम्माकरितां सेवेकरी ब्राह्मणमंडळीकडून विमान बांधून सुशोभित मखर तयार करविलें. नंतर मी व बापाचार्यांनीं तिला आंघोळ घालून नवीन शुभ्र पातळ व चोळी नेसवून सर्वांगाला भस्म व कपाळास शुभ्र गंध आणि अक्षत भव्य लावून गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा घातल्या. तेव्हां व्यंकमा पुन्हा एक वेळ जागची उठून तिनें प्रभूंना व विठाबाईला नमस्कार केला आणि मग मांडी घालून योगासन साधून अक्षयची समाधि लाविली ! तेव्हां ' अवधूतचिंतना'चा सर्वत्र एकच ध्वनि होऊन वाद्यांचा गजर होऊन गेला. विमान उचलण्यास आठजण सेवेकरी ब्राह्मण लागले होते. चोहोंकडून खारका, खोबऱ्याच्या वाट्या, सुपाऱ्या, बत्तासे, गुलाल, बुका, तुळसी, फुलें, पैसे, चवल्या, पावल्या आणि कित्येकांनीं तर रुपयेही उधळले ! पुढें शेंकडों साधुसंत, बैरागी यांचा भजनाचा तांडा चालला होता. आणि अरब, रोहिले, परदेशी यांच्या बंदुकांच्या बारांचा तडाखा चालू

होता. तो धूर सर्वत्र गगनांत भरून सर्व दिशा धुंद झाल्या होत्या. अशा समारंभानें व्यंकंमाचें विमान टेहळदासाच्या आईच्या समाधीजवळ आणून उतरलें. तेथें अरब, रोहिले वगैरे यवन लोकांनीं पुढें येऊन हत्यारें खालीं ठेवून व्यंकंमांना फात्या दिला. "आणि आज हमारी बेहेन हमकु छोडकर खुदाकेपास चली गई" असें म्हणून संपूर्ण यवन लोकांनीं अश्रुपात गाळले. आसपास सहा सहा कोसांवरून सर्व गांवांतील लहानथोर मनुष्यें व्यंकंमाच्या समाधीच्या यात्रेला जमलीं होतीं. नंतर प्रभुमहाराजांची स्वारी स्वत: तेथें येऊन व्यंकंमाची यथासांग पूजा, आरति, आम्हां सर्वांच्या हातून करवून मग विमानांतून जमिनींत समाधीच्या जागीं बसविली, त्या वेळीं दत्तनामाचा सर्वत्र गजर होऊन गेला. पुढें रीतीप्रमाणें सर्व समाधीचा बंदोबस्त करून सर्वांना व मुख्यत्वेंकरून यवन लोकांना बतासे, रेवड्या, साखरफुटाणे, पेढे, बर्फी इत्यादि प्रसाद प्रभुमहारजांनीं वांटल्यावर माग व्यंकंमाचे गुणानुवाद गात सर्व लोक आपापल्या घरोघर उदास होत्साते निघून गेले."

व्यंकंमांसंबंधीं सोलापूरकर आणखी म्हणतात," व्यंकंमा म्हणजे सामान्य जनांतली नव्हती. ती प्रत्यक्ष सिद्धयोगिनी, केवळ पार्वतीचा अवतार होती. संपूर्ण मंडळीच्या नेत्रांतून सारखे अश्रुपात त्या दिवशीं दिवसभर चालले होते. व्यंकंमाची योग्यता प्रभूंच्या खालोखाल लोक मानीत असत."

व्यंकंमाचा देह ज्या ठिकाणीं भूमिगत झाला होता, त्या ठिकाणीं कांहीं तरी इमारत व्हावी अशी सर्व भक्तमंडळींची इच्छा होती. परंतु प्रभूंची आज्ञा झाल्याशिवाय ही गोष्ट साध्य होणारी नव्हती. कांहीं लोकांनीं वेळप्रसंग पाहून प्रभूंजवळ ही गोष्ट काढली तेव्हां उत्तर मिळालें कीं, "तिच्या अंगीं सामर्थ्य असेल, तर ती आपलें देऊळ करून घेईल. आम्हांस त्याची पंचाईत करावयाचें कारण नाहीं." हें उत्तर ऐकून त्यांची निराशा झाली. पण पुढें कांहीं काल लोटल्यावर व्यंकंमाच्या सामर्थ्यानें समाधीवर प्रचंड देऊळ उभारलें जाऊन ब्राह्मणाकडून सकाळ-संध्याकाळ व्यंकंमाची पूजाअर्चा सुरू झाली. देवळांत सध्यां नंदादीप जळत आहेत व देवीचे सर्व भोग व्यंकंमास मिळत आहेत. माणिकनगरांत प्रभुमंदिराच्या खालोखाल व्यंकंमांचें देवालय असून, व्यंकंमा ही एक परम समर्थ देवी होऊन बसली आहे. नवरात्रादि देवीचे सर्व उत्सव व्यंकंमांच्या देवळांत होत असून, होमहवनादि प्रकार मोठ्या प्रमाणांत होत असतात. देवी मधुमती ही भगवान् दत्तात्रेयाची शक्ति असून तीच व्यंकंमांच्या रूपानें प्रभुसान्निध्यांत येऊन राहिली असा सार्वत्रिक समज आहे. देवीप्रमाणें सर्व पूजा, अभिषेक, उत्सव वगैरे ब्राह्मणाकरवीं होत असून ही देवी अनेक स्त्रीपुरुषांच्या नवसास पावत असते. आपलें देऊळ किंवा पूजेची व्यवस्था ही अगदीं स्वतंत्र रीतीनें व्यंकम्मानें करवून घेतली आहे.

संस्थानावर याचा मुळींच बोजा पडला नाहीं. मुंबईकर प्रभुभक्तांनीं रावजीबुवांच्या मार्फत पंचवीस-तीस हजार रुपये खर्च करून देऊळ व सभोंवारच्या ओंवऱ्या बांधून पूजेची व्यवस्थाही केली आहे. अलीकडे श्रीजींकडूनही वर्षांतून बराच खर्च होत असतो. इहलोकीं सामान्य प्रतीच्या कुळांत जन्म घेऊन परमोच्च स्थान मिळविणारी ही देवी सदैव जागृत राहून आपल्या भक्तांचें ईप्सित पूर्ण करीत असते अशी सर्वांची भावना आहे.

व्यंकंमांची समाधि श्रावण वद्य १३ शके १७८४ रोजीं झाली.

## प्रभुसमाधि : : ५

श्रीमद्बाहुजशालिवाहन शकाच्छैलाष्ट सप्तेन्दुभि
र्युक्ते क्रोधनवत्सरे सहसिजा मोक्षाभिधैकादशी ॥
तस्यां भूमिजवासरे मुनिवरैर्धेय: सदा निर्जरै
र्माणिक्यप्रभुदत्त एव सहसा स्वानध्दलीनो ह्यभूत ॥ १ ॥

प्रभूंनीं आपल्यासमक्ष आपल्या परिवारांतील महत्त्वाच्या चार व्यक्तींची व्यवस्था लावून नंतर आपण इहलोकांतून प्रयाण करावें असें योजिलें होतें. जन्ममरणरहित अशा विभूति कांहीं काल लोककल्याणार्थ या जगांत अवतरून वावरत असतात आणि इकडील कार्य पुढें चालविण्यास योग्य अशा अधिकारी पुरुषाची योजना करून आपण निजधामाला जातात हा नित्याचा अनुभव आहे. प्रभूंनीं एका दिव्य संप्रदायाची स्थापना केली, व तो संप्रदाय पुढें चालविण्यास सर्व बाजूंनीं समर्थ अशा एका पुरुषाच्या हवालीं करून आपला नश्वर देह तात्कालीन लोकांच्या दृष्टीआड केला. प्रभूंचा आधिभौतिक देह समाधिगत झाला याचें सर्वांना दु:ख वाटलें यांत नवल नाहीं. प्रभूंचें सामर्थ्य व सत्यस्वरूप त्या दिव्य देहाच्या साहचार्यानें लोकांच्या प्रत्ययाला येत होतें म्हणून त्या देहाचा वियोग सर्व प्रेमळ भक्तांना असह्य झाला.

प्रभूंनीं आपल्या समाधीचा दिवस ठरवून ठेविला होता. पण ही गोष्ट जगजाहीर झाल्यास फारच अनर्थ ओढवेल

म्हणून आपल्या चार शिष्यांना एकांतांत बोलावून त्यांना पुढील व्यवस्था करण्याची आज्ञा दिली. समाधीपूर्वी सहा महिने सर्व बेत ठरून त्याप्रमाणें तयारी चालली. सर्व शिष्यांचें प्रभूंवर अतोनात प्रेम होतें व असला लोकोत्तर दिव्य मोहरा आपल्या नजरेआड होणार याचें त्यांना दु:ख होत होतें. पण ही गोष्ट कोणाजवळही सांगण्याची सोय नव्हती. या शिष्यांमध्यें प्रमुख बापाचार्य हे होते. त्यांनीं मोठ्या धैर्यानें संस्थानचें कामकाज चालविलें होतें. तात्यामहाराजांच्या पश्चात् संस्थानची सर्व जोखीम आपल्या शिरावर घेऊन त्यांनीं मोठ्या चातुर्यानें सर्व उणीव भरून काढली होती. तशांत प्रभूंच्या अवतारसमाप्तीचा समय जवळ येत चाललेला पाहून त्यांना अनिवार दु:ख होत असे. पण तें दु:ख गिळून ते सर्व कामकाज दक्षतेनें करीत. अंतरंगांत सलणारें हें दु:ख कोणाजवळ बोलतां येण्यासारखें नव्हतें. म्हणून लांब जंगलांत जाऊन मोकळेपणानें विलाप करून दु:ख हलकें करण्याचा ते प्रयत्न करीत. अशा प्रकारें मोठ्या कष्टानें सहा महिने घालविल्यावर शके १७८७ चा मार्गशीर्ष महिना उगवला, ज्यांना प्रभूंच्या समाधीचें रहस्य कळलें होतें, त्यांना सर्व दिशा उदास दिसूं लागल्या. सर्वत्र दुश्चिन्हें अनुभवाला येऊं लागलीं. प्रभूंच्या प्रकृतींत थोडा फरक दिसूं लागला. प्रभु शेवटच्या या कालांत कांहीं खात नसत. फक्त फळफळावळें खावींत; त्यांतल्या त्यांत अंजीर फार आवडीनें खात असत.

पाठीवर एक फोड दिसूं लागला. त्यावेळीं 'हा काळफोड आहे रे ' असें ते आपल्या शिष्यांना सांगूं लागले.प्रभु राहत असत, त्याच जागीं भुईंत एक खड्डा काढून समाधीला योग्य असें बांधकामही या चार विश्वासू शिष्यांनीं आपल्याच हातानें तयार केलें. दत्तजयंतीनिमित्त बाहेर हजारों लोकांची धांदल चालू होती. कोणाला या समाधीची वार्ताही नव्हती. सर्व कारभार बिनबोभाट चालले होते. या वर्षी मुसलमानांच्या ग्यारवीचा सणही याणी महिन्यांत येऊन ठेपला होता. ही ग्यारवी बहुतेक आमच्या महिन्याच्या द्वादशीच्या दिवशीं येत असते. पण ग्यारवीची खैरात आधींच करीत असत. बहुधा ती दशमीच्या रात्रीं होत असे. वर दिसायला प्रभूंची प्रकृति अस्वस्थ होती व पाठीवरील फोडानेंही मोठी जागा व्यापिली होती. अशा स्थितींत ग्यारवीची खैरात कशी व्हावी ही शिष्यमंडळींना विवंचना लागली. पण प्रभूंनीं खैरातीचा दरबार भरविण्याची आज्ञा दिल्यावरून सर्व व्यवस्था झाली. या वर्षीं मुसलमान फकिरांचा समाज 'न भूतो न भविष्यति' असा लोटला होता. खैरातीला प्रभु दरबारांत गादीवर येऊन बसले त्या वेळीं त्यांना कांहीं शारीरिक विकार झाला आहे असें कोणालाही दिसून आलें नाहीं. उलट ते नेहमीपेक्षां फारच आनंदांत असे लोकांना दिसून आले. हें खैरातीचें काम रात्रभर चाललें होतें व प्रभूंची मूठ अखंड सुरू होती.

सूर्योदय होतांच प्रभु आपल्या कुटिरांत विश्रांतीकरितां म्हणून गेले. एकादशीचा पुण्य दिवस असल्यामुळें प्रभूंनीं समाधीसाठीं हा दिवस नक्की ठरवून टाकला होता. ठरल्याप्रमाणें आश्रमाची तयारी करून यथाविधि आश्रम घेतला आणि नेमलेल्या वेळीं तयार केलेल्या समाधींत असनावर ते स्थित झाले. सर्व शिष्यांकडून पूजा घेतली आणि तात्यामहाराजांच्या उभय चिरंजीवांना जवळ बोलावून कांहीं वेळ त्यांना मांडीवर बसवून घेतलें. नंतर त्यांजकडून पूजा करवून घेऊन आरति करून घेतली. वडील पुत्र मनोहर ऊर्फ अप्पासाहेबांस आपल्या अंगावरील दुशाला पांघरविला व प्रसादाची माळ गळ्यांत घालून मंत्रोपदेश देऊन महाप्रसाद दिला. कनिष्ठ पुत्र खंडेराव यांच्या गळ्यांत माळ घालून प्रसाद दिला व दोघांना घरीं घेऊन जाण्यास शिष्यांना आज्ञा केली. नंतर सर्व शिष्यांना प्रसाद दिल्यावर आपलें आसन स्थिर करून समाधीचा पुढील भाग चिणून घेण्यास शिष्याला आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें सर्व शिष्यांनीं मोठ्या कष्टी अंतःकरणानें समाधीचें दार बंद केलें. वरच्या बाजूला फक्त एक गवाक्षद्वार ठेवून त्यांतून पाहत राहण्यास रामभाऊ लंगोटी याला सांगितलें होतें. त्याप्रमाणें तो संध्याकाळच्या पांच वाजेपर्यंत पहात बसला होता. पांचाच्या सुमाराला मस्तकभेद होऊन गेल्याचें पाहून तें गवाक्षही बंद करण्यात आलें. हा सर्व प्रकार व्यवस्थेनें व गुप्तपणें चालला होता. प्रभूंची आज्ञा होती म्हणून शिष्यांनीं सर्व दुःख

आवरून धरून पौर्णिमेपर्यंत या समाधीची परिस्फुटता होऊं दिली नाहीं. दत्तजयंतीनिमित्त हजारों लोकांची गर्दी जमून भंडारखान्यांत हजारों लोकांचें अन्न तयार होऊन पंक्तीवर पंक्ति चालत. पण कोणालाही या समाधीची वार्ता कळूं दिली नाहीं. पौर्णिमेला दत्तजयंतीचा उत्सव होऊन भोजनसमारंभ होऊन गेल्यावर ही समाधि उघडी केली गेली. त्या वेळीं प्रभूंचें सगुणरूप दृष्टीआड होऊन दगडाची समाधि दिसतांच सर्वत्र हलकल्लोळ होऊन आकांत सुरू झाला. कित्येक लोकांनीं प्रभूंचा वियोग असह्य झाल्यानें डोकें आपटून जीव देण्यास कमी केलें नाहीं. मुसलमान लोक शोकाकुल झाले व कित्येक तर बेफाम होऊन समाधि उकरून काढून प्रभूंचें शेवटचें दर्शन घेण्याचा हट्ट धरून बसले. हिंदु, मुसलमान, शीख, लिंगायत इत्यादि अनेक धर्मांच्या व पंथांच्या लोकांचें प्रभूंवर अत्यंत प्रेम असल्यामुळें प्रभुवियोग सर्वांनाच असह्य होऊन गेला. त्यावेळच्या दुःखाचें वर्णन करण्यास आमची लेखणी समर्थ नाहीं. कांहीं चरित्रकारांनीं याचें वर्णन सविस्तर दिलें आहे व कांहींनीं म्हटलें आहे कीं, सर्व जातींतील कांहीं भाविक लोकांनीं आपला देहत्याग करण्यास कमी केलें नाहीं. मुसलमान लोकांतील आडदांड पण भाविक लोकांची समजूत करण्याचें काम फारच अवघड होतें. तथापि बापाचार्यादिक

प्रभुशिष्यांनीं सर्वांची समजूत करून पुढें होणारे अनर्थ टाळले.

समाधीनंतरची हकीकत सोलापुरकरांच्या शब्दांत दिल्यास वाचकांना त्या काळच्या स्थितीचें यथार्थ ज्ञान होणार आहे. ते म्हणतात, ‘‘याप्रमाणें तीन दिवस मोठया दु:खांत व मुग्ध स्थितींत गेल्यावर चतुर्दशीला कसा तरी दत्तगादीजवळ आम्ही दत्तजन्म केला; तेव्हां त्या दिवशीं प्रभु बाहेर आले नाहींत, म्हणून मंडळींत बरीच कुजबुज सुरू होऊन, त्या दिवशीं गुह्य गोष्टीची गुळणी बरीच फुटली गेली. दुसऱ्या दिवशीं भंडारा कसा तरी झाला. तेथपर्यंत कसा तरी लोकांनीं दम धरला होता. परंतु त्या दिवशीं संध्याकाळीं गोष्ट फुटली जाऊन सर्व नगरांत हाहा:कार आणि द्वारावर मोठाच दंगा होऊन बंदोबस्त मोडला आणि हजारों लोक दर्शनाकरितां एकावर एक पडून आंत शिरून गेले, तेव्हां आंत प्रभु नसून, समाधि सर्वांच्या दृष्टीस पडली. मग काय विचारतां ? लोकांत खरोखर दु:खसमुद्र उचंबळला. कित्येकांनीं प्रभु, प्रभु, म्हणून डोचकीं आपटून घेतलीं; कित्येक छाती बडवून घेऊं लागले आणि कित्येकांनीं तर जंबिये पोटांत खुपसले ! याप्रमाणें एकच गोंधळ, एकच गर्दी आणि एकच हाहा:कार उडून गेला. लोक डोचकीं फोडून घेऊन समाधीजवळ अंग टाकून गडबडां लोळण

घेऊं लागले. मुसलमान, रोहिले, अरब इत्यादि लोकांनीं भडाभड जंबिये मारून घेऊन आत्मघात करून घेतले. कोणी विहिरींत उड्या टाकल्या आणि कित्येकांनीं विष खाल्लें. सहस्रावधि अरब रोहिल्यांनीं समाधीपुढें येऊन, शस्त्रें समाधीपुढें ठेवून फात्या दिल्या. कित्येकांनीं हट्ट घेतला कीं, समाधि उघडून आम्ही प्रभूंना एक वेळ पाहिल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां हिंदु-मुसलमानांचीं शस्त्रें चालून दंगा होण्याचा बेत आला. तेव्हां हुमनाबादेहून मोठमोठे सरकारी अंमलदार येऊन त्यांनीं हा सर्व घाट मोठ्या युक्तिप्रयुक्तीनें मिटवून शांतता केली. प्रभूंकरितां सर्व मोंगलाई प्रांत पंधरा दिवसपर्यंत रडत होता. आणि प्रभूंच्या वाडींतील लोकांचा व प्रभूंच्या खासगी लोकांचा शोक वर्णन करण्यास तर प्रत्यक्ष शेषही समर्थ होणार नाहीं."

ढोळ म्हणतात, " प्रभु निजधामास गेले, ही वार्ता वद्य प्रतिपदेच्या प्रातःकाळसमयास हां हां म्हणतां सर्वतोमुखीं झाली. प्रभुविण ते दीन विव्हल झालेले लोक, ही दुःखवार्ता ऐकून महा आक्रोश करीत भर दौड समाधीस्थळाकडे प्राप्त झाले. निजानंदीं स्थित झालेल्या त्या महाश्रेष्ठाच्या स्थलाभोंवतीं यात्रेकरूंचा अनिवार समुदाय जमून जो दुःखाग्नि भडकून गेला तो कांहीं केल्या शांत होईना. हजारों पुरुषस्त्रियांस आपलें जीवित तृणप्राय भासूं लागलें. कोणी

कोणाला ओळखीना. त्या महाविलापानें तर दशदिशा व्याप्त होऊन गेल्या. त्यांत कोणीं कपाळमोक्ष करून, तर कोणी उरीं सुरी भोंसकून प्राण देऊं लागले. कोणी त्या स्थलाकडे पाहून आपलें शरीर जामनीवर टाकूं लागले. ”

प्रभूंच्या जड दिसणाऱ्या नश्वर देहावर लोकांची अनिवार आसक्ति होती म्हणूनच सर्व समाज शोकविव्हल होऊन गेला. त्या सगुण स्वरूपावर जनता लुब्ध होण्याचें कारण उघडच आहे. आपल्या अवतारलीलेमध्यें प्रभूंनीं हजारों जीवांचें दुखःहरण करून त्यांना सुखी केलें होतें. ते दीनाचे दयाळू होते, मनाचे कोमल होते. औदार्यांत कर्णालाही लाजविणारे होते. समर्थांमध्यें अत्यंत समर्थ होते. संपूर्ण ऐश्वर्य त्यांच्याकडे धांवत येत असतांही कल्पनातीत विरक्त होते. व्यवहारांत पराकाष्ठेचे कुशल असून जगाच्या कल्याणार्थ सदैव दक्ष होते. त्यांच्या स्वरूपांत, बोलण्यांत आणि वागण्यांत अतीव मधुरता असल्यामुळें सर्व समाजाचें अंतःकरण ते तात्काळ आपल्याकडे ओढून घेत. प्रेमळपणानें ओतप्रोत भरले असल्यामुळें विधर्मीय लोकांनाही ते आपल्या प्रेमाकर्षणांत सहज ओढून घेत असत. ज्ञानानें ओतप्रोत भरलेल्या त्यांच्या चित्स्वरूपाची जाणीव ज्ञानी लोकांना झाली असेल; पण सामान्य जनता त्यांच्या सगुण स्वरूपावरच लुब्ध झाली असल्यामुळें ते

दृष्टीआड होतांच सर्व जनसमूह शोकाकुल झाला यांत नवल तें काय ?

प्रभूंचें सगुण चरित्र गर्भापासून सुरू होऊन येथें समाप्त झालें. परंतु प्रभूंनीं सुरू केलेल्या गादीचें व संप्रदायाचें कार्य अद्याप जिवंत असल्यामुळें त्या रूपानें प्रभुदर्शन घेणारास प्रभूंचें अस्तित्व दृग्गोचर होणारें आहे. याकरितां या समाप्तींतच प्रभुकार्याचा उत्कर्ष बीजरूपानें भरला आहे असें आम्ही म्हणतों.

शके ऽ श्वानुष्टुप् क्ष्माधरशशिमिते क्रोधन शरत् ।
सहोशुक्लैकादश्यवनि सुतवारे मुनिवरः ॥
अगात् श्रीमाणिक्य प्रभुवर गुरुर्ब्रह्मपरमं ।
ऋषींद्रैः संध्येयं सकल भुवन व्यापक तमम् ॥ १ ॥





श्री मनोहर माणिक प्रभू

PREMIER ART PRINTING WORKS
FORT, BOMBAY



# श्रीमनोहर माणिकप्रभु

प्रभुमहाराजांची समाधी झाल्यावर धर्मशास्त्राप्रमाणें और्ध्वदेहिक कर्म तात्यामहाराजांचे ज्येष्ठ पुत्र अप्पासाहेबमहाराज यांच्याकडून यथासांग करवून सोळावे दिवशीं त्यांना शास्त्रोक्त रीतीनें गादीवर बसविण्यांत आलें. यावेळीं अप्पासाहेबांचें वय अवघें सात वर्षांचें होतें. प्रभूंची गादी चालविण्यास समर्थ असा एखादा पोक्त वयाचा सांप्रदायिक शिष्य मिळण्यासारखा नव्हता कीं काय अशी शंका सकृद्दर्शनीं मनांत उभी राहते. त्याप्रमाणेंच त्याकाळीं प्रभूंच्या कांहीं भक्तलोकांनाही अशाच प्रकारची शंका येऊन, प्रभु संस्थानासंबंधानें काय व्यवस्था करणार आहेत अशी त्यांना विवंचना लागली होती. सर्व शिष्यमंडळ कांहीं एकाच विचाराचें नव्हतें. या बाबतींत प्रत्येक मनुष्याचें मत भिन्न होतें. प्रभु सर्व लोकांचें म्हणणें ऐकून घेत. पण आपल्यास योग्य वाटत असेल तशीच योजना करीत. तात्यामहाराजांचीं दोन्हीं मुलें प्रभुसमाधीसमयीं अत्यंत अल्पवयी होतीं. वडिलाचें वय सात वर्षांचें व धाकट्याचें तीन-चार वर्षांचें. अशा अज्ञ

अर्भकांच्या हातून प्रभूंनीं मांडलेला हा प्रचंड पसारा कसा आवरला जाईल ही मोठी चिंतेची बाब होती. प्रभुसमाधिसमय जसजसा जवळ येत चालला, तसतशी शिष्यगणाची जिज्ञासा वाढूं लागली. नाना लोकांच्या कल्पना नानाप्रकारें वावरूं लागल्या. भालकीस मच्छिंदरराव नांवाचा एक तरुण होता. तो प्रभुभक्त होता इतकेंच नव्हे तर प्रभूंच्या मागें गादी चालविण्यास सर्वथा योग्य आहे अशी पुष्कळ लोकांची कल्पना होती. प्रभूंचेंही त्याच्यावर अतिशय प्रेम होतें. लहानपणापासून प्रभु त्याचे लाड करीत व अत्यंत प्रेमळपणानें त्याच्याशीं वागत. अशी स्थिति असल्यामुळें लोकांनीं साहजिकच तर्क चालविले कीं, बहुतकरून मच्छिंदररावास प्रभु गादीवर बसवितील. प्रभूंच्या प्रकृतींत बदल होऊन ते स्वस्थ पडून आहेत हें पाहून, कांहीं लोकांनीं मच्छिंदररावास भालकीहून मुद्दाम आणविलें. या प्रसंगीं मच्छिंदररावास म्यान्यांत बसवून यथायोग्य मानमरातबानें आणिलें होतें. मच्छिंदररावाकरितां एक स्वतंत्र गादी करविली होती. प्रभुसंनिध आणिल्यावर त्यास गादीवर बसविण्यांत आलें. पण मच्छिंदररावाच्या दुर्दैवानें त्या दिवशीं रात्रीं कांहीं अकस्मात् कारण उत्पन्न होऊन त्याची गादी जळून खाक झाली !

प्रभुशिष्यांत मच्छिंदररावाच्या पक्षाचे लोक बरेंच होते. त्या सर्वांची उत्कट इच्छा त्यासच प्रभुमागें गादीवर बसवावें

अशी होती. प्रभूंनीं त्यांच्या आकांक्षेस कधींही विरोध केला नाहीं. उलट मच्छिंदररावाशीं ते अत्यंत प्रेमळपणानें वागूं लागले. यामुळें त्या सर्वांची खातरी झाली कीं, प्रभु मच्छिंदररावास आपली गादी देतील. प्रभु मच्छिंदररावास मांडीवर केव्हां घेतील व अनुग्रह केव्हां देतील या महत्त्वाच्या प्रसंगाची ते मोठया उत्कंठेनें वाट पाहत होते. अशा उत्कंठेंत ते असतां एक भुमका उठली कीं, प्रभुमहाराजांस चाळीस हजार रुपये कर्ज आहे. प्रभूंचें संस्थान पाहिलें तर झोळीचें; त्यास जमीन नाहीं, जहागीर नाहीं. अशा प्रकारें हें फकीरी संस्थान असून त्यांत चाळीस हजार कर्ज ? या कर्जाची फेड कोठून करावी ? हा मोठा प्रश्न मच्छिंदररावास उत्पन्न होऊन तो घाबरून गेला. मानाकरितां गादी स्वीकारावयाची पण, या मानाबरोबर आपली मान कापणारी भलतीच धोंड अंगावर घेण्यास तो तयार होईना. या चाळीस हजारांची जबाबदारी अंगावर कोणी घ्यावी ? मच्छिंदररावाच्या पक्षास धीर होईना. त्यांची छाती दडपून गेली. व भयभीत अंतःकरणानें त्यांनीं हळूहळू माणिकनगरांतून पाय काढण्यास सुरवात केली. शेवटीं मार्गशीर्ष शुद्ध एकादशीचे दिवशीं प्रभु समाधींत जेव्हां बसले तेव्हां त्यांनीं मच्छिंदररावास बोलावून आणण्यास सांगितलें. पण शोधाअंतीं मच्छिंदरराव व तत्पक्षीय सर्व लोक मुकाटयानें भालकीस निघून गेल्याचें ऐकून प्रभु हंसूं लागले व म्हणाले "अरे बाबा, प्रभूंची गादी चालविण्याचें काम

फार कठीण आहे. योग्य अधिकाऱ्याशिवाय हें काम कोणासही झेंपणार नाहीं."

अप्पासाहेबांची योग्यता प्रभूंना माहीत होती. "हा फार दिवस राहणार नाहीं, पण तेवढ्यांतच सवाई माणिकप्रभु म्हणवून घेईल." असें एकदां प्रभूंनीं म्हटल्याचें सर्वश्रुत आहे. अप्पासाहेब पांच वर्षाच्या वयाचें असतां एकदां दरबारांत प्रभु येण्यापूर्वीं प्रभूंच्या गादीवर येऊन बसले.या वेळीं प्रभूंच्या नेहमींच्या बैठकीचें अनुकरण करून, त्यांनीं प्रभूंप्रमाणेंच गंभीर स्वरूप धारण केलें होतें. लोकांनाही त्यांचें कौतुक वाटून सर्वांची दृष्टि त्यांच्यावर खिळून गेली. इतक्यांत प्रभूंची स्वारी आली. आपली गादी मनोहरनें बळकाविली हें पाहून प्रभु विनोदानें म्हणाले "बेटया मनोहरा, माझी गादी तुला पाहिजे काय रे ? पण बाळ गादीवर बसल्यास अंगावरचे दागिने दुसऱ्याला द्यावे लागतात हें तुला ठाऊक आहे काय ?" यावर अप्पासाहेबांनीं चटकन् उत्तर दिलें कीं, "हे सर्व दागिने आपण सांगाल त्याला देऊन टाकतों." असें म्हणत गळ्यांतील कंठी, हातांतील कडीं, वगैरे दागिने लगेच काढून त्यांनीं प्रभूपुढें ठेविले ! या छोटया बालकाचे हे अपूर्व गुण पाहून प्रभु संतुष्ट झाले आणि आपल्या शेजारीं एक लहानशी गादी मांडून त्यावर त्यांना बसवून घेतलें.

आपल्या पाठीमागें संस्थानचा मोठेपणा व संप्रदाय परंपरा चालविण्यास अप्पासाहेब अल्पवयस्क असले तरी परम समर्थ आहेत अशी प्रभुमहाराजांना पूर्ण खातरी होती, यांत तिळमात्र संशय नाहीं. सात वर्षांच्या कोमल वयाच्या अर्भकावर ही प्रचंड जबाबदारी टाकून प्रभु दृष्टीआड झाले यातलें मर्म हेंच आहे. पूर्ण भरभराटींत राहून भरवेगानें चालणारें हें संस्थानरूपीं जहाज कीर्तिमहासागराच्या मध्यावर आणून सोडल्यावर कर्णधार अदृश्य झाला; पण तें जहाज एका सात वर्षांच्या बालकानें मोठ्या चातुर्यानें परतीरावर सुखरूप आणून सोडलें, हाही एक अद्भुत चमत्कार नव्हे काय ?

गादीवर बसल्यावर अप्पासाहेबांना चाळीस हजार रुपये कर्जाची हकीकत समजली तेव्हां त्यांनीं कोणाकोणाचे किती किती देणें आहे त्याची यादी तयार करण्यास सांगितलें व ज्याचें देणें असेल त्यांना बोलावून आणण्यास बापाचार्यास कळविलें. जवळ पैसा शिल्लक नसतां सावकारास बोलावून आणा असें महाराज आग्रहानें सांगतात याचें सर्वांना नवल वाटलें;पण महाराजांची आज्ञा अमान्य करूं नये म्हणून बापाचार्यांनीं सर्वांना पत्रें लिहिलीं. पत्रांप्रमाणें सर्व लोक क्रमाक्रमानें येऊं लागले. कल्याणचा किशनगीर म्हणून एक गोसावी होता. त्याचे दहा हजार रुपये देणें होते.त्याला हिशेब विचारतां तो म्हणाला, "महाराज,प्रभूंना कर्ज देण्याची माझी काय योग्यता? उलट प्रभूंच्या कृपासामर्थ्यानें मला लक्षावधि रुपयांचा नफा

झाला आहे. आमच्याजवळ पैसा असूनही आमच्या हातून दानधर्म होत नाहीं, तो प्रभूंकडे पैसा गेल्यानें होतो म्हणून मीं हे पैसे दिले होते. हें माझें कर्जही नव्हे व तें आपण द्यावें अशी माझी मागणी पण नाहीं.आपण कसलीही काळजी करूं नका'' त्यावर या गोसाव्याला महाराजांनीं सन्मानपूर्वक पुढारीपणा देऊन इतर सर्व सावकारांची तडजोड करण्यास सांगितलें. त्यानें सर्व सावकारांचें म्हणणें एकून त्यांच्या म्हणण्याप्रमाणें तडजोड केली. ही तडजोड नक्की होऊन रक्कम कायम झाल्याबरोबर हैद्राबादेहून विठ्ठलराव तालुकदार यांचेकडून गाडीभर रुपये अकस्मात येऊन महाराजांजवळ दाखल झाले. मग ज्या सावकारांनीं रकम मागितली, त्यांच्या पदरांत रक्कम टाकून सर्वांना प्रसाद देऊन रवाना केलें. या वेळीं मुख्य कारभारी बापाचार्य हे होते. ते बालमहाराजांच्या या अद्भुत कर्तबगारीनें चकित होऊन गेले.

अप्पासाहेबमहाराजांची कारकीर्द केवळ बारा वर्षांची झाली. एवढया अवधींत त्यांनीं अत्यंत महत्त्वाची कामगिरी केली आहे. यांचें संस्कृत भाषेवर प्रभुत्त्व होतें. संप्रदायपूजापद्धति यांनींच तयार करून संप्रदायाला मूर्त स्वरूप आणलें. प्रभुसमाधीवरील सुंदर देऊळ यांनींच आपल्या कारकीर्दींत तयार केलें. यांच्या स्वरूपाप्रमाणें यांचा स्वभावही अत्यंत मोहक व गोड असा होता. हजारों भक्तलोक यांच्या तेजस्वी चेहऱ्याकडे पाहून विस्मित होत असत. यांना

योगाभ्यासाची फार आवड होती. सर्व व्यवहार अगदीं नियमितपणें व नियमित वेळीं करावयाचे असा त्यांचा निर्धार असे. यांचें भाषण मृदुल असून विनोदयुक्त असे. हे कधीं कोणावर रागावल्याचें कोणीं ऐकिलें नाहीं, किंवा पाहिलेंही नाहीं. यांचा आहार अत्यंत सात्त्विक असा होता. यांचें विद्वान लोकांवर फार प्रेम असे व योग्य विद्वानांना भरपूर देणगी व वस्त्रप्रावरणें देऊन ते संतुष्ट करीत. यांनीं पुष्कळ पदें लिहिलीं असून तीं सर्व छापलीं आहेत. यांनीं ओंवीबद्ध प्रभुचरित्रही लिहिलें आहे; पण तें पुरें झालें नाहीं.

हे अत्यंत मातृभक्त होते; तसेंच ते आपल्या वडील भगिनीवर आणि कनिष्ठ बंधु खंडेराव यांजवर अतिशय प्रेम करीत. यांनीं शेवटपर्यंत नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळिलें. यांच्या औदार्यादि अनेक गुणांची प्रशंसा अजूनही लोक गातात. एकदां ह्यांना कांहीं आजार झाला, त्या वेळीं हैद्राबादचे लोकाबापू वैद्य यांच्या दर्शनार्थ आले होते. त्यांनीं परिश्रमपूर्वक महाराजांना औषध देऊन नीट केलें. महाराजांनीं संतुष्ट होऊन लोकाबापूला उंची बहुमोल वस्त्रें आणि पुष्कळ द्रव्य देऊन घरीं जाण्यास प्रसाद दिला. महाराजांच्या गळ्यांत प्रभूंनीं दिलेला एकमुखी रुद्राक्ष होता तो आपल्यास मिळावा अशी लोकाबापूस इच्छा झाली; पण भिडेनें त्याला त्याबद्दल मागणी करवेना. एकमुखी रुद्राक्ष हा प्रभूंचा प्रसाद असल्यानें तो कोणाला देऊं नये असें महाराजांना सर्वांनीं सुचविलें

होतें. परंतु लोकाबापूस त्या रुद्राक्षाची इच्छा झाली असल्याचें पाहून कांहीं निमित्तानें त्याला पोंचविण्याकरितां संगमापर्यंत महाराज स्वतः गेले व त्याला एकीकडे बोलावून चटकन् त्याला आपल्या गळ्यांतील एकमुखी रुद्राक्ष काढून दिला. अंतरंग ओळखण्याचें हें सामर्थ्य पाहून लोकाबापु थक्क झाले व आपल्यास इच्छित वस्तूचा लाभ झाला म्हणून आनंदभरानें त्यांनीं महाराजांच्या पायावर मस्तक ठेविलें.

अप्पासाहेबमहाराजांच्या औदार्याविषयीं अशा असंख्य कथा ऐकण्यांत येतात. संस्थानचें सर्व काम अत्यंत सुव्यवस्थेनें चालवून यांनीं प्रभूंच्या कीर्तींत विलक्षण भर घातली. प्रभूंनीं सुरू केलेले सर्व उत्सव, कारखाने पूर्ववत् चालवून प्रभुनामाचा लोकांना विसर पडेल असें यांनीं केलें. प्रभूंप्रमाणेंच सर्व भाविक लोक यांची पूजा करूं लागले. प्रभुसामर्थ्य यांच्या द्वारें प्रकट होवून सर्वांना प्रभूंचा वियोग झाल्याचें भानहीं राहिलें नाहीं. महाराजांनीं लग्न करून घ्यावें, अशी मातुःश्री विठाईआम्मांची इच्छा होती. सर्व प्रेमी मंडळीलाही हा विचार पसंत पडला. पण कोणालाही महाराजांना याबद्दल आग्रह करण्याचें धैर्य होईना. वडील भागिनी मुक्ताबाई यांचें लग्न महाराजांनीं अपूर्व थाटानें करविलें. आपल्या उपाध्यायाचा एक तरुण मुलगा पाहून त्याला मुक्ताबाईचें सालंकृत कन्यादान करून दिलें व त्यांच्या प्रपंचाचा सर्व भार आपल्यावरच घेतला. पुढें १७९५ या वर्षाच्या ज्येष्ठ महिन्यांत महाराजांचें

वय पंधरा वर्षांचें असतां माणिकनगरांत लग्नाच्या कडेकोट तयारीची धांदल उडून गेली. सर्व साहित्य जमा झालें. मांडव उभारले जाऊन सर्व माणिकनगर शोभिवंत झालें. लग्न कोणाचें होणार आहे याचा कोणासही पत्ता लागेना ! कांहीं लोकांनीं कल्पना केली कीं, महाराज स्वतःचें लग्न करून घेणार आहेत. या कल्पनेवर सर्वांना आनंद झाला. पण नवरी कोठली याचा उमज कोणालाही होईना. सर्व तयारी होऊन मुहूर्तही नेमला. पण नवरा-नवरी यांची मूस फुटेना. सर्वजण बुचकळ्यांत पडले. शेवटीं मातुःश्रींनीं महाराजांना यासंबंधीं विचारलें. महाराजांनीं आपलें लग्न करून घेऊन गृहस्थाश्रम स्वीकारावा अशी मातुःश्रींची इच्छा होती म्हणून त्यांनीं लग्नाचें साहित्य मोठ्या आनंदानें जमविलें होतें व सर्व तयारी मोठ्या दक्षतेनें केली होती. परंतु महाराजांनीं आपण लग्न करून घेणार नसून खंडीचें लग्न करणार असल्याचें मातुःश्रींना कळविलें. तेव्हां मातुःश्रींस बरें वाटलें नाहीं. पण महाराजांना स्वतःच्या लग्नाविषयीं आग्रह करण्याचें त्यांनीं मोठ्या शहाणपणानें सोडून दिलें. “ खंडीचें कां होईना, लग्न झाल्यास आनंदाचीच गोष्ट आहे. पण मुलगी कोठली पाहिली आहे ? ” यावर महाराजांनीं कळविलें कीं, “ बापाचार्यांची मुलगी पसंत केली असून लग्नाचा तिथिनिश्चयही करून टाकिला आहे. ”

अशा रीतीनें आपल्या कनिष्ठ बंधूचें लग्न मोठ्या थाटानें केलें. प्रभुकुळाच्या वंशविस्ताराला ह्या तरी मार्ग मोकळा झाला याचें सर्वांना समाधान वाटलें. महाराजांनीं आपल्या कनिष्ठ बंधूचे सर्व बाजूंनीं कोड पुरविण्यास कांहीं कमी केलें नाहीं. त्याच्या शिक्षणाची यथायोग्य व्यवस्था लावून दिली. लग्नाच्या वेळीं खंडेरावमहाराजांचें वय बारा वर्षांचें होतें. लग्नानंतर पुढील तीन वर्षांत त्यांचा शिक्षणक्रम जोरानें चालून त्यांनीं विविध विद्या व कला यांत बरीच प्रगति केली. अप्पासाहेबमहाराजांना बंधूच्या सामर्थ्याची यथायोग्य कल्पना होऊन आपल्यामागें प्रभूंची गादी चालवून संस्थान पूर्ण भरभराटीस आणण्यास ‘खंडी’ सर्वस्वी पात्र आहे अशी त्यांनीं खूणगांठ बांधून ठेविली होती. महाराज योगाभ्यासाचे चहाते असून परम योगीही होते. प्रभुसमाधीच्या पाठीमागच्या जागीं जमिनींत एक तळघर तयार करण्यास त्यांनीं आज्ञा दिली. त्यांनीं आंखून दिलेल्या नमुन्याप्रमाणें तळघर पूर्ण तयार झाल्यानंतर तें पहाण्याकरितां ते कारभारीमंडळीसह तेथें गेले. तळघरांत तीन कमानी तयार केल्या होत्या, त्याचें काम महाराजांना फारच पसंत पडलें. या तीन कमानींपैकीं मधल्या कमानींत आपण स्वतः आसन घालून बसले. त्या वेळीं त्यांच्या तोंडांतून साहजिक संतोषाचे उद्गार निघाले कीं, “ वा ! ही जागा एखाद्या योग्याला समाधि घ्यावयाला फारच उत्तम आहे. ”

वरील हकीकतीस सहा महिने लोटतात न लोटतात इतक्यांत महाराजांच्या प्रकृतींत एकाएकीं बदल झाला. आश्विन कृष्ण सप्तमी शके १७९९ रविवार या दिवशीं महाराजांना एकाएकीं दोन उलटया झाल्या व प्रकृति हलक झाली. सर्व लोक घाबरून गेले. पण महाराजांनीं सर्वांना धीर देऊन शांत केलें. लगेच विधिपूर्वक आश्रम घेऊन त्यांनीं मातुःश्रींस नमस्कार केला. कनिष्ठ बंधु खंडेराव यांना उपदेश देऊन प्रसाद दिला. भक्तमंडळींना प्रसाद दिल्यानंतर आसन सिद्ध करून देहविसर्जन केला.सर्व माणिकनगर दुःखानें होरपळून गेलें. बघतां बघतां हा तेजस्वी तारा तुटल्याचें पाहून सर्व लोक शोकाकुल झाले. मातुःश्रीच्या दुःखास तर सीमाच नव्हती. या दुःखांत कोणीं कोणाचें सांत्वन करावें हेंच कोणाला कळेना. पण कारभारी लोकांनीं सर्व दुःख एकीकडे करून पुढील सर्व विधि यथाशास्त्र केला. आसन घालून पाटावर बसलेला महाराजांचा देह तशाच्या तसा उचलून प्रभुसमाधीमागील तळघरांत आणून ज्या कमानींत महाराज एकवार बसले होते, त्या मधल्या कमानींत ठेवून यथोचित पूजाद्रव्यानें व सुगंधी साहित्यानें ती कमान भरपूर भरून कायमचा दृष्टीआड केला. हा प्रसंग हृदयविदारक असा झाला. पण प्रभूंच्या इच्छेच्या या गोष्टी असल्यामुळें यापुढें कोणाचा इलाज चालणार ?

नवनवघनतुल्ये शाककाले प्रवृत्ते ।
शरदि मनुजमानैरीश्वरे चेषुकृष्णे ॥
रवितिथि रविवारे श्रीमनोहारि योगी ।
मुनिवर गुरुराजो चित्सुखाम्भोधिमग्नः ॥ १ ॥

नवनवाग धरा मित वत्सरे ।
शरदिचादिममास्य सितार्धके ॥
नगतिथाविनवासर ईश्वरे ।
गुरुमनोहरचित्सुखमाविशत् ॥ २ ॥





# श्रीमार्तंड माणिकप्रभु

श्रीप्रभुचरित्र लेखनास सुरवात केल्यानंतर श्री. गणपतरावजी मास्तरसाहेब यांनीं यापूर्वींचें "श्रीमनोहर माणिकप्रभु" हें प्रकरण लिहून चरित्रकथाभाग पुरा केला. सांप्रतचें प्रकरण मला कां लिहावें लागत आहे याचा खुलासा प्रेमळ वाचकांना, माझ्या प्रकाशन निवेदनावरून सहज कळून येण्यासारखा आहे. श्रीसद्गुरु मार्तंड माणिकप्रभु महाराज यांची कारकीर्द संस्थान व संप्रदायाच्या दृष्टीनें इतकी विशाल व अमोल आहे कीं, श्रीजींचें स्वतंत्र व सविस्तर चरित्र प्रसिद्ध होणें अवश्य आहे. त्यांची इच्छा असल्यास तेंही कार्य यथावसर आमचेकडून पूर्ण होईलच. तूर्त प्रेमळ वाचकांची जिज्ञासा अगदींच अतृप्त राहूं नये म्हणून श्रीजींचें त्रोटक चरित्र या प्रकरणांत आम्ही देत आहों.

—अप्पासाहेब देशपांडे

श्रीसद्गुरु मार्तंड माणिकप्रभु महाराज यांचा जन्म **शनिवार, मार्गशीर्ष कृष्ण १२ शके १७८३** रोजीं झाला. श्रीजींना श्रीप्रभूंची पाखर फक्त चार वर्षेंच लाभली. त्यानंतर वडील बंधु श्रीमनोहर माणिकप्रभु यांनींही शके १७९९ सालीं या नश्वर देहाचा त्याग केला व वयाच्या सोळाव्या वर्षींच संस्थानची सर्व जबाबदारी श्रीजींवर येऊन पडली. अल्प

वयांतच इतकी मोठी जबाबदारी शिरावर पडली तरी श्रीजी मुळींच डगमगले नाहींत. आत्मसामर्थ्यावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. व गुरुवार, फाल्गुन कृष्ण ४ शके १८५७ पर्यंत म्हणजे संस्थानची धुरा अंगावर पडल्यापासून अठावन वर्षें अविरत झटत राहून संस्थानला स्वकर्तृत्वबलानें त्यांनीं आजचें भव्य व विशाल मूर्त स्वरूप प्राप्त करून दिलें आणि आसेतुहिमाचल संप्रदायाचा प्रसार केला.

स्वतंत्रता आणि पूर्णावस्था हे श्रीजींच्या आयुष्याचे गमक होते. प्रत्येक अवस्थेंतील कार्यें त्यांनीं अगदीं पूर्णावस्थेला नेलीं. बालपणीं ते अतिशय द्वाड, खोडकर व क्रीडाप्रिय होते. मर्दानी खेळांचा त्यांना अतिशय शोक होता. पोहणें, घोडयावर बसणें व निशाणबाजी हे त्यांचे आवडीचे खेळ असून त्यांत त्यांनीं अप्रतिम नैपुण्य संपादन केलें होतें. तासचे तास पाण्याच्या तळाशीं जाऊन बसलेल्या महाराजांना पाहिलेले आज कितीतरी लोक हयात आहेत. श्रीजींना लहानपणीं वडील काय त्या फक्त त्यांच्या मातुःश्रीच. घरीं कोणीच कर्ता वडील पुरुष नसल्यानें मातुःश्रींना साहजिकच श्रीजींविषयीं अत्यंत काळजी वाटे. व त्या नेहमीं महाराजांना या असल्या कार्यापासून गोड शब्दानें परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत. मातृहृदयच तें! त्याची सर दुसऱ्या कशास येणार? अशा वेळीं महाराज रात्रीं नऊ वाजतां सर्वत्र सामसूम झालें कीं, गुपचुप आपल्या सोबत्यांना घेऊन बाहेर पडत व

रात्रभर मनसोक्त पोहून पुनः सकाळीं चार वाजतां घरीं येऊन दाखल होत. बालपणचे संस्कार फार दृढ असतात असें मानसशास्त्र सांगतें. निशेनें बालपणींच महाराजांवर मोहिनी घातली. बालपणींच्या या मैत्रीला श्रीजींनीं शेवटपर्यंत अंतर दिलें नाहीं. पुढेंदेखील महाराजांचा सर्व कारभार रात्रींच्या निवांत समयींच चालत असे. "खंडेराव महाराजांचा म्हणजे रात्रीचा दरबार" ही म्हण सर्वांच्याच तोंडांत बसून गेली होती.

बालपणांतील क्रीडाप्रेमाप्रमाणें तरुणपणांतील व प्रौढावस्थेंतील कर्तव्येंही श्रीजींनीं अशींच उत्कृष्टपणें पार पाडलीं. तारुण्याचा विद्यार्जनाचा काल होय. मराठी, संस्कृत, उर्दु, फारशी आदि भाषांचा तत्कालीन पद्धत्यनुसार अभ्यास पूर्ण झाल्यावर त्यांनीं आपल्या आवडीच्या विषयांत विशेष श्रम करण्याचें ठरविलें. अध्यात्म आणि गायन हे दोन त्यांच्या अत्यंत आवडीचे विषय होत. या दोहोंतही त्यांनीं अप्रतिम नैपुण्य संपादन करून आपला व्यासंग शेवटपर्यंत चालू ठेवला होता. श्रीजी गायनाचे पूर्ण मर्मज्ञ होते. श्रीजींच्या गायन-शास्त्र-ख्यातीचा उल्लेख व रहिमतखांची गोष्ट यापूर्वी " विभव विस्तार " या प्रकरणांतील " टर्रा हुसेनखां " या उपप्रकरणांत येऊन गेलीच आहे. कलावंत खऱ्या रसिकाचा भुकेला असतो. म्हणूनच आज हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व प्रसिद्ध गायक माणिकनगरासारख्या आडरस्त्याच्या गांवीं मुद्दाम येऊन श्रीजींपुढें आपल्या गुणांचें प्रदर्शन करून

गेले आहेत. महाराजांच्या मुंबईच्या वास्तव्यांतील बराचसा काल गांधर्व महाविद्यालयांत गेला याचें कारणही त्यांचें निरतिशय गायनप्रेमच होय.

गायनाप्रमाणेंच अध्यात्माचें. संप्रदाय पद्धतिनुरूप सर्व पूर्व वेदांत ग्रंथांचें परिशीलन केल्यावर त्यांनीं पाश्चात्य देशांत आजकाल या विषयासंबंधीं चाललेल्या चर्चेचा ठावही पण घेतला होता. महाराजांची ज्ञानलालसा फार तीव्र होती. आजकाल प्रत्यहीं निघणारे शास्त्रीय शोध, तसेंच मानसशास्त्रांत होत असलेली प्रगति या सर्वांचा ते नेहमीं शोध घेत असत. महाराजांच्या अविरत व्यासंगाचें पक्व फळ म्हणजे त्यांचा 'ज्ञानमार्तंड' ग्रंथ होय. हा ग्रंथ रसिक जिज्ञासूंना सर्वच दृष्टीनें अपूर्व वाटेल. वेदांत विषयावर आजवर हजारों ग्रंथ झाले आहेत; पण या 'ज्ञानमार्तंड' ग्रंथाचें परिशीलन केल्यास वाचकांच्या तोंडून "परंतु यासम हा" असेच उद्गार बाहेर पडतील. आतांपर्यंतचे बहुतेक वेदांत ग्रंथ "....तथापि नव्यं भवति काव्यं ग्रथनकौशलात्" याच सदरांत येतील. जुनेच सिद्धांत स्वतःच्या भाषेंत सांगितलेले. स्वतंत्र विचाराची चमक नाहीं व स्वानुभूतीची प्रतीति तर नाहींच नाहीं. "ज्ञानमार्तंड" ग्रंथांत वाचकास पदोपदीं महाराजांचा स्वतंत्र बाणा व स्वानुभव दिसून आल्याखेरीज राहणार नाहीं. वेदांताचा अभ्यास सुरू करतांच प्रथम कुठें अडचण येत असेल तर ती अधिकाराची. आतांपर्यंतच्या

ग्रंथकारांनीं या अधिकाराला इहामुत्रफलभोगविराग, शमदमादि षट्क वगैरेंच्या चक्रव्यूहांत अगदीं बंदिस्त ठेविलें आहे. सुरवातीसच हा प्रचंड चक्रव्यूह पाहिला कीं, खंबीर योद्धयाचें मनही परावृत्त होऊं लागतें. मग साधारण जिज्ञासु तर काय! 'नको बुवा ही कटकट' म्हणून चुकूनसुद्धां पुनः या वाटेस जाणार नाहीं. वेदांताची आतांपर्यंत जी उपेक्षा झाली आहे त्यास बऱ्याच अंशी साधनसंपत्तीचा कट्टरपणाच कारणीभूत झाला आहे, म्हटलें तरी चालेल. " आपला उद्धार व्हावा अशी ज्यास अपेक्षा आहे तोच अधिकारी होय " ही महाराजांची अधिकाऱ्याची व्याख्या वाचून किती तरी जिज्ञासूंना हायसें वाटेल. " सर्व जग हें नित्यमुक्तच आहे"; " आमच्या ग्रंथांत अमुकच साधक असावा, त्याचीं लक्षणें अगर गुरूचीं लक्षणें अमुकच असावींत असें मुळींच नाहीं. जरी कॉलेजमध्यें आत्मविद्या शिकून तो त्यांत पूर्ण प्रवीण झाला तरी त्यानें आपलें हित केलें, असें आमचें मत आहे"; " कोणतीही विद्या संपादन करण्यास प्रारंभ केला कीं, त्यास आवश्यक ती साधनसंपत्ति आपोआपच येते, वेगळी साधनसंपत्ति मिळविण्याची जरूरी नाहीं "; असे विचार निर्भयपणें प्रकट केलेले पाहून रसिक जिज्ञासूंना कौतुक वाटल्यावांचून राहणार नाहीं. असो; या ग्रंथाची काशीस्थ पंडितांनींही मुक्तकंठानें प्रशंसा केली आहे. दक्षिणेकडील कांहीं पंडितांनीं तर या ग्रंथावर लुब्ध होऊन महाराजांना " अभिनव शंकराचार्य " ही पदवी समर्पण केली आहे. महाराजांचा हा ग्रंथ जसा अपूर्व तशींच त्यांचीं पदेंही

अत्यंत ओजस्वी व रसाळ आहेत. बहुतेक पदें वेदांतविषयकच आहेत. प्रत्येक पदांत वेदांतांतील अनेक सिद्धांतापैकीं एकाद्या सिद्धांताचें रसाळ व निर्भीड विशदीकरण आढळून येईल. इथें "जागा जागा पंडित जागा। वेदशास्त्रें देतिल दगा" अशासारखीं अवतरणें देण्याचा मोह अनावर होतो. पण स्थलसंकोचास्तव तो आवरता घेतला पाहिजे. पदांच्या चाली जराशा अपरिचित असल्यामुळें पदें वाचून त्यांतील तितकीशी गोडी प्रतीत होत नाहीं. पण एकदां माणिकनगरांत ज्यांनीं तीं ऐकलीं, त्यांच्यावर त्यांचा कायमचा ठसा उठल्यावांचून राहणार नाहीं.

गायन व वेदांत यांखेरीज आणखी कोणतें शास्त्र श्रीजींनीं आत्मसात् केलें असेल तर तें "मंत्रशास्त्र" होय आपल्याकडचें मंत्रशास्त्र अलीकडे लुप्तप्राय होत चाललें आहे. मंत्रशास्त्राच्या तपशीलासंबंधीं अजून बराच वाद असला तरी मंत्रशास्त्राचे सिद्धांत मात्र आतां जवळ जवळ सर्वमान्य झाल्यासारखेच आहेत. सूक्ष्म सृष्टींत सदैव वावरणाऱ्या अनेक सामर्थ्यरूपी देवता असून त्यांना वश केल्यास त्या इष्ट फल देतात, हा महाराजांचा निश्चल विश्वास होता. त्याप्रमाणें तपोबलावर त्यांनीं त्यांना वश करून घेऊन त्यांचेकडून इष्ट कार्येंही साधलीं होतीं. ही तपश्चर्या चालू असतांना महाराजांनीं रात्रीचा दिवस कसा केला व किती परिश्रम घेतले याचा विस्तार या त्रोटक वृत्तांत शक्य नाहीं. सारांश "आफलोदयकर्म"

हें श्रीजींच्या जीवनाचें रहस्य होतें. प्रारब्ध कर्माचा त्यांनीं शेवट गांठला होता. महाराज हे कर्म, भक्ति, ज्ञान व वैराग्य यांचें मूर्तिमंत स्वरूप होते असें म्हटल्यास महाराजांचें दर्शन ज्यांना घडलें नाहीं अशांना कदाचित् अतिशयोक्ति वाटेल. पण ज्यांनीं महाराजांना पाहिलें आहे व त्यांचा सहवास ज्यांना घडला आहे अशांना यांत मुळींसुद्धां असत्याचा लेश सांपडणार नाहीं.

महाराजांचा स्वभाव अतिशय प्रेमळ होता. ते पराकाष्ठेचे भोगी व त्यागी होते. लाखों रुपये त्यांनीं मिळविले. संपत्तीनें त्यांचेकडे धांव घेतली. पण त्यांनीं संपत्तीचा संग्रह मुळींच केला नाहीं. मिळालेली सर्व संपत्ति त्यांनीं दानधर्मांत व गरिबांच्या गरजा पुरविण्यांत खर्च केली. "त्यागाय संभृतार्थ" हें त्यांचें ब्रीद होतें. महाराजांनीं संग्रह कशाचा केला असेल तर तो प्रेमी जनांचा. प्रत्येक मनुष्यांतील विशिष्ट गुणाचा ठाव घेऊन प्रेमळ शब्दानें त्याला प्रोत्साहन द्यावयाचें ही कला महाराजांना फार चांगली साधली होती. याचें एकच उत्कृष्ट उदाहरण म्हणजे महाराजांचे मामेबंधु श्री. यशवंतराव कोरेकल. हे हैद्राबादेस फिनॅन्स खात्यांत नोकर असले तरी मुळची प्रवृत्ति अध्यात्मपर; चतुरस्त्र प्रतिभेचीही देणगी आहेच. महाराजांकडून यांना मिळालेल्या प्रोत्साहनामुळेंच आज त्यांचे दहाबारा गद्य व पद्य ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. व त्यांच्यामागें पदव्यांचें भेंडोळें लागून हैद्राबादेंत ज्या थोड्या

भारतविख्यात व्यक्ति आहेत, त्यांपैकीं एक हे गणले जाऊं लागले आहेत.

असो; महाराजांनीं संस्थानचा उत्कर्ष कसा साधला याचें दिग्दर्शन करावयाचें म्हटल्यास पानेंच्या पानें लिहावीं लागतील. व तें कार्य स्वतंत्र चरित्रग्रंथांतच अधिक योग्य दिसेल. माणिकनगरची त्यांनीं सर्वांगीण उन्नति केली. श्रीप्रभूंचें भव्य देवालय व गांवांतील श्रीव्यंकम्मा देवीचें व इतर देवालयें व धर्मशाळा महाराजांच्या कारकीर्दींतच झाल्या. संस्थानला सरकारांतूनही बरेच मानपान मिळाले. लोकसंग्रह महाराजांनीं अगदीं व्यापक प्रमाणांत साधला. हल्लींच्या बहुतेक हिंदु साधुसत्पुरुषांचा लोकसंग्रह बहुधा एकांगी असतो. पण महाराजांनीं श्रीप्रभूंचा आदर्श समोर ठेवून व सकलमत संप्रदायास अनुरूप अशी प्रेमाची शिकवण आचरणांत आणून मुसलमान समाज आणि मुसलमान अधिकारीवर्ग यांना आपल्या इतक्या प्रेमाकर्षणांत ठेविलें होतें कीं, महाराजांची कांहीं सेवा करण्याची संधि आपणास लाभते काय इकडे नेहमीं त्यांचें लक्ष असे व अशी संधि सांपडल्यास ते स्वतःस अतिशय धन्य मानीत असत. संप्रदायाच्या प्रसारार्थ व संस्थानच्या उत्कर्षाकरितां महाराजांनीं सबंध निजाम इलाख्यांत व ब्रिटिश हिंदुस्थानांतही मुंबई, मद्रास वगैरे प्रसिद्ध ठिकाणीं प्रवास केला. या प्रवासांत श्रीजींच्या अलौकिक सामर्थ्याचे अनंत चमत्कार लोकांना पहावयास सांपडले. हे सर्व चमत्कार

अनुभवलेले अजून बरेच लोक हयात आहेत. विस्तृत चरित्राकरितां या सर्व चमत्कारकथांचा संग्रह करण्याचें काम आम्हीं प्रारंभिलें आहेच. वाचकांनीं शक्य तों सत्वर आपले अनुभव आम्हांस कळविल्यास आमचें कार्य सुकर होऊन इष्टार्थ सिद्धीही लौकर लाभेल. श्रीजींशीं अपरिचित अशा वाचकांकरितां आम्हीं एकच चमत्कार येथें देत आहों.

प्रवासांत महाराज एकदां चितापुरास गेले होते. चितापुर हा एक जहागीर गांव असून वाडी ते हैद्राबाद या एन्. एस्. रेल्वेच्या फाटयावरील वाडीनंतरचें तें पहिलें स्टेशन होय. या गांवास थोडेंसें ऐतिहासिक व पौराणिक महत्त्वही आहे. गांवापासून जवळच " नागाई " क्षेत्र आहे. येथें मुख्य नागाईच्या देवालयाखेरीज आजूबाजूस बरींच प्राचीन देवालयें आहेत. नागाईसंबंधीं पौराणिक माहिती " नागवेलांबाचरित " या ग्रंथांत व ऐतिहातिक माहिती 'The Journal of the Hyderabad Archeological Society Vol. 5, 1919-20' या नियतकालिकांतील टी. श्रीनिवास यांच्या "Nagai and its remains" या लेखांत सांपडेल. येथें नागवेलांबादेवी जलरूपानें प्रकट झाली. 'जलदुर्गा' असेंही एक नांव तिला येथें आहे. नागाईचा सर्व प्रदेश जलमयच आहे. नागाईच्या देवालयांतील मुख्य स्थान म्हणजे एकाजवळ एक असलेलीं दोन लहान कुंडें. मुख्य पूजाअर्चा या कुंडाचीच. कुंडें लहानच असून

तळाशीं पाण्याचा झुळझुळ प्रवाह आढळतो. चितापुरास असतांना महाराजांनीं नागाई क्षेत्रांत जाऊन कुंडांची पूजा केली. पूजेच्या समयीं कुंडांतील पाणी वर येऊन महाराजांचा पादस्पर्श होतांच परत ओसरलें. जणूं काय हिमकन्येनें आपला पति ज्ञानशंकर आपल्यास भेटावयास आला आहे असें पाहून त्याच्या चरणाकडे धांव घेतली. पण स्त्रीस्वभावसुलभ लज्जेनें ठाव घेतांच परत लाजून आपल्या स्थानीं जाऊन बसली. हा चमत्कार त्या वेळीं हजारों लोकांनीं समक्ष पाहिला. लोकोत्तर विभूतींचा विश्वांतील सर्व तत्त्वांशीं संवेदनात्मक व्यवहार चाललेला असतो याचें हें प्रत्यंतर नव्हे काय ?

" ज्ञानमार्तंडा उदय नाहीं वा अस्त नाहीं"



# अनुक्रम

## ॥ श्रीसद्गुरुमाणिकप्रभु प्रसन्न ॥

भाऊ नाईक, उपनाम हरकुडे.

केशव नाईक, ( पत्नी-सौ. रमाबाई )

नृसिंह नाईक, ( पत्नी-सौ. बचंमाबाई )



॥ श्री ॥

## श्रीसद्गुरुमाणिकप्रभु

शके १७३९ ईश्वरनामसंवत्सर; मार्गशीर्ष शु॥ १४ भौमवार घ. ३३।१० रोहिणी १२।४२; इष्ट घटि ५९।५०; धनुमीनांशोपरि जन्मः; स्प. ल. ८।८।१०।२८; स्प. र. ८।९।४०।२०




| जन्म ता. | निर्याण ता. |
|---|---|
| २२ डिसेंबर १८१७ ई. | २९ नोव्हेंबर १८६५ ई. |
| १३ सफर १२३६ हि. | १० रजब १२८२ हि. |

॥ श्री ॥

## श्रीमनोहरमाणिकप्रभु

शके १७८० कालयुक्तिनामसंवत्सर; श्रावण कृ॥ ३० भौमवार घ. २२।१० पूर्वा ५१।२१; इष्ट घटि ४५।३८; मिथुनधनांशोपरि जन्मः; स्प. ल. २।९।२०।१०; स्प. र. ४।२२।४३।५५.




जन्म ता.

७ सप्टेंबर १८५८ इ.

२८ मोहरमं १२७५ हि.

निर्याण ता.

२८ ऑक्टोबर १८७७

२० शवाल १२९४ हि.

॥श्री॥

# श्रीमार्तंडमाणिकप्रभु

शके १७८३ दुर्मतिनामसंवत्सर; मार्गशीर्ष कृ॥ १२ शनिवार घ. ४६।२८ विशाखा २१।२७; इष्ट घटि १५। ; मीनमीनांशोपरिजन्मः; स्प. ल. ११।२७।२१।४८; स्प. र. ८।१४।४३।३१




| जन्म ता. | निर्याण ता. |
|---|---|
| २८ डिसेंबर १८६१ ई. | १२ मार्च १९३६ ई. |
| २५ जमादिलावल १२७८ हि. | १७ जिहजा १३५४ हि. |

श्री

श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्य पदवाक्यप्रमाणपारावार-पारीण यमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टां-गयोगानुष्ठाननिष्ठ तपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषड्-दर्शनस्थापनाचार्य व्याख्यानसिंहासनाधीश्वर सकलनिगमागम-सारहृदय सांख्यत्रयप्रतिपादक वैदिकमार्गप्रवर्तक सर्वतंत्रस्वतन्त्र आदिराजधानीविद्यानगरमहाराजधानीकर्नाटकसिंहासनप्रतिष्ठा-पनाचार्य श्रीमद्राजाधिराजगुरुभूमण्डलाचार्य ऋष्यशृंगपुरवराधी-श्वर तुंगभद्रातीरवासी श्रीमद्विद्याशङ्करपादपद्माराधक श्रीमदभि-नवसच्चिदानन्दभारतीस्वामीगुरुकरकमलसञ्जात शृङ्गेरीश्री-नृसिंहभारतीस्वामिभिः ॥

श्रीमदुमारमारमणचरणारविन्दमिलिन्दायमानमानसात्यन्त-प्रियशिष्यमाणिक्यप्रभुश्रेयोऽभिवृद्धये प्रत्यग्ब्रह्मैक्यानुसन्धान-पूर्वकश्रीनारायणस्मरणसंसचिताशिषस्समुल्लसन्तुतराम् । आसे-तुहिमाचलप्रसिद्धात्रभवच्छ्रीमच्छङ्करभगवत्पादपूज्यपीठविषयिणी भक्तिरनवधिकश्रेयोनिदानमिति सर्वजनविदितमतत् साम्प्रतम् ॥ श्रीदेवतापूजोत्सव ध्यान ब्राह्मणसन्तर्पण विद्वज्जन सन्मानादर सत्कार वदान्यतादि भवदीयगुणगणानाकर्ण्यात्यन्तसन्तुष्टान्तरङ्गा वयमास्महे । एतद्धर्मसंस्थानधर्मकार्यानुकूलीकरणविषये एत-त्सं थीयाहोबलशास्त्रितनुजरामशास्त्रीमुखवचसा विशदीभविष्यति।

तदनुगुणमुत्तमप्रकारेण सहाय्यमारचय्याचन्द्रतारकं पुण्य कीर्तिः सम्पादनीया स्वत एवैतद्धर्मसंस्थानाज्ञापरिपालनैकपुराण धर्मनीतिनिपुणप्रज्ञाशालियोगिवरविषये किं भूयसा लेखनेन ॥

श्रीशारदेन्दुमौलीशरत्नगर्भगणेश्वराः ॥

प्रदिशन्तु प्रसन्नास्ते भवत्कल्याणमन्वहम् ॥

इतोऽधिकश्रेयोऽभिवृद्धये श्रीशारदेन्दुमौलीश्वररत्नगर्भहेरम्बादि-देवताप्रसादमंत्राक्षताः प्रेषिता वर्तन्ते सङ्गृह्यताम् ॥

शके १७८६ रक्ताक्षीनामसम्वत्सरे वैशाख शुक्ल दश-म्यामिन्दुवासरे श्री

( मुद्रिका )

॥ श्री ॥

# श्रीमत्‌जगद्‌गुरु शंकराचार्य मठ हंपीविरूपाक्ष

॥ श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्य पदवाक्यप्रमाणपारावार पारीण यमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणसमाध्यष्टांगयोगानुष्ठाननिष्ठागरिष्ठतपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरंपराप्राप्त-षट्दर्शनसंस्थापनाचार्य व्याख्यानसिंहासनाधीश्वर सकलवेदार्थ-प्रकाशक सांख्यत्रयीप्रतिपालक सकलनिगमागमसारहृदयवैदीक-मार्गप्रवर्तक सर्वतंत्रस्वतंत्रादिराजधानी श्रीविद्यानगर महाराज-धानी कर्नाटक सिंहासनप्रतिष्ठापनाचार्य श्रीमद्राजाधिराजगुरु-भूमंडलाचार्य तुंगभद्रातीरनिवासऋष्यश्रृंगपुरवराधीश्वर श्रीश्रृंग-गिरी श्रीविरूपाक्ष श्रीविद्याशंकरदेवदिव्य श्रीपादपद्माराधक श्रीमदभिनवोदण्डसच्चिदानंद विद्यारण्यभारती स्वामीगुरुकर-कमलसञ्जात श्रीसच्चिदानंद

श्रीमदभिनवशंकरभारती स्वामिभिः

अस्मदत्यंत प्रिय शिष्यांपैकीं प्रियतम शिष्य निजाम इलाखा श्री संस्थान माणिक नगरांत राहणार भक्तकार्यकल्पद्रुमादि श्रीदांकित श्रीमार्तंडमाणिप्रभु यांजला लिहून दिलें कीं, नारायण स्मरणपूर्वक आशीर्वचनपत्रिका विरोधीनाम संवत्सरे आश्विन व॥ २ ते दिवशीं माणिकनगर क्षेत्रामध्यें श्रीपूजातत्परते करून आनंद निर्भरित असो. सांप्रत समस्त देश संचार करून या स्थळास विजय करून नंतर चातुर्मास्य व देवी नवरात्र उत्सवादि करून घेऊन इकडून पुढें संचारास जाणेचा निश्चय करून तुम्हांस आग्रहपूर्वक लिहून दिली पत्रिका अशी कीं, अनुश्रुताप्रमाणें आमचे संस्थाननें या संस्थानास आलेवेळीं




# श्रीमाणिकप्रभु संप्रदाय ग्रंथ

| | रु. आ. |
|---|---|
| १ श्रीज्ञानमार्तंड | १—४ |
| २ श्रीमाणिकप्रभुचरित्र | २—८ |
| ३ पद्यमाला | १—० |
| ४ सात वारांचें भजन | ०—६ |
| ५ नित्यकर्मावलि | ०-१२ |
| ६ ज्ञानशिखा | १—० |
| ७ माणिक-प्रभाकर | ०—६ |
| ८ पंचरत्नगीता | ०—४ |

पत्ताः—श्रीसंस्थानमाणिकनगर

पो.ः—होमिनाबाद

